श्रीशंकर.

# सार्थ वाग्भट

अथवा

सिंहगुप्तपुत्र वाग्भट यांच्या

## अष्टांगहृदय

ग्रंथाचें मूळासह मराठी भाषांतर.

### भाग पहिला.



भाषांतरकार

कै. आयुर्वेदमहोपाध्याय शंकर दाजीशास्त्री पदे.

संशोधक

परशुराम लक्ष्मण वैद्य

संस्कृत टीचर, न्यू इंग्लिश स्कूल, पुणें.

प्रकाशक

यज्ञेश्वर गोपाळ दीक्षित,

बुकसेलर, बुधवार पेठ, पुणें सिटी.

आवृत्ति पहिली.

सन १९१५.

किंमत ५ रुपये.

॥ श्री ॥

परमपूज्य

रा. रा. विनायक रामचंद्र ऊर्फ

# अण्णासाहेब पटवर्धन



यांस

त्यांचें आयुर्वेदावरील निस्सीम प्रेम, आयुर्वेदांतील तत्त्वांविषयीं सर्व समाजांत त्यांनीं उत्पन्न केलेला दृढ विश्वास, लोकोपकारांत देह झिजविण्याचें त्यांचें व्रत व त्यांची साधुवृत्ति इ० गुणांवर लुब्ध होऊन मनांत असलेला आदर व्यक्त करण्यासाठीं हा ग्रंथ अत्यंत नम्रतेनें अर्पण केला आहे.

प्रकाशक.

चित्रशाळा प्रेस, पुणें शहर. ]

# प्रस्तावना.



ग्रंथाचा विषय, त्याचा संबंध व त्याचें फल हीं वाचकांस समजावून देऊन नंतर मुख्य विषयास आरंभ करावा, अशी प्राचीन ग्रंथलेखकांची—आचार्यांची परंपरा आहे; हें चतुष्टय म्हणजे अधिकारी, विषय, संबंध व प्रयोजन या चार गोष्टी ते ग्रंथाच्या आरंभीं लिहीत असत; व अलीकडील लोकांच्या मताप्रमाणें प्रत्येक पुस्तकास अवश्य लागणाऱ्या प्रस्तावनेचें काम भागवीत असत. आधुनिक ग्रंथकारांनीं मात्र प्रस्तावना किंवा उपोद्घात या शब्दाचा एवढाच अर्थ ठेवला नसून त्यांत आणखीही पुष्कळ गोष्टींची भर घातली आहे; व आधुनिक प्रस्तावना ही मुख्य ग्रंथापासून थोडीशी दूर—किंवा अलिकडेच—येऊं लागली आहे. प्रस्तुत पुस्तक विशेषतः आधुनिक वाचकांच्याच उपयोगार्थ लिहिलें असल्यामुळें वाचकांस जरूर वाटणाऱ्या विषयांचा ऊहापोह प्रस्तावनेंत आम्हीं केलेला आहे.

अष्टांगहृदय हें पुस्तक आयुर्वेदग्रंथभांडागारांतील अत्यंत तेजस्वी रत्नांपैकीं एक असून त्याची योग्यता व गुणदोष आपल्या पूर्णपणें लक्षांत येण्यास त्याच्या आजूबाजूचे ग्रंथ व त्या वेळची राजकीय व सामाजिक स्थिति यांचें ज्ञान प्रथमतः आपण करून घेणें अवश्य आहे. त्या योगानें ग्रंथकारानें आपली सामुग्री कोठून आणिली, रचनाकौशल्यार्थ कोणाचा आश्रय केला, कोणच्या संक्रमणावस्थेंत त्यानें हा ग्रंथ लिहिला, व त्यामुळें ग्रंथांत कोणकोणते गुणदोष आले, हें सर्व आपणांस उत्तम समजेल.

सर्व आधिभौतिक शास्त्रांच्या उत्पत्तीचा व वाढीचा विचार करूं लागलें असतां एक गोष्ट आपणांस आढळून येते कीं, या सर्व शास्त्रांचा प्रादुर्भाव मनुष्याच्या निरीक्षणशक्तीमुळें झाला आहे.

दोन गोष्टी सर्वकाळीं व सर्व ठिकाणीं एकत्र दिसूं लागल्यास आपणास अशी कल्पना होते कीं, या दोन गोष्टींचा कांहींतरी कार्य-कारणसंबंध असावा. ही आपली कल्पना दृढमूल होण्यास आपणास आणखी पुष्कळ उदाहरणें पहावीं लागतील व पुष्कळ प्रयोगही करावे लागतील. या प्रयोगांनीं त्या दोन गोष्टींत कार्यकारणभाव प्रस्थापित झाला व निदान आपल्या अवलोकनांत तरी त्यास अपवाद सांपडला नाहीं, म्हणजे तें तत्त्व सर्वत्र अबाधित ठरेल. वैद्यक हें आधिभौतिक शास्त्र असल्यामुळें त्याची उत्पत्ति व वृद्धि हीं या आधिभौतिक शास्त्राच्या नियमाप्रमाणेंच झालीं असलीं पाहिजेत, व पुढेंही होतील; व या शास्त्राची पूर्णताही अबाधित कार्यकारण-भाव प्रस्थापित होण्यावर आहे. आर्यवैद्यकाचा इतिहास पाहूं गेलें असतां पुष्कळ भक्तांची निराशा होणार आहे. इतिहासाचीं साधनें आज मुळींच उपलब्ध नाहींत म्हटलें तरी चालेल; तेव्हां आम्ही जो इतिहास म्हणून मानतों तो अर्थातच अनुमानाच्या जोरावर अवलंबून असून त्यांत कदाचित् चुकीचींही विधानें अस-ण्याचा पुष्कळ संभव आहे. पण त्यास इलाज नाहीं.

मनुष्यप्राण्याच्या उत्पत्तीबरोबरच सुखाची कल्पना, दुःखाचें अस्तित्व व त्याबरोबरच त्याच्या परिहारासाठीं धडपड हीं अस्तित्वांत आलीं. मनुष्य प्राण्याचे सर्व व्यवहार सर्वदा सुरळीत चालणें अशक्य असल्यामुळें त्याच्या प्रकृतींत वारंवार बिघाड होऊं लागला व याचा प्रतिकार करण्यासाठीं त्याची धडपड सुरू झाली. या धडपडींतच आर्यवैद्यकाचें मूळ आहे. या प्रतिकारांतच चिकित्सा-शास्त्राचा पाया आहे. जसजशी मनुष्यप्राण्याची सुधारणा होऊं लागली, तसतसे निरनिराळे पदार्थ त्याच्या खाण्यांत येऊं लागले, निरनिराळ्या पदार्थांशीं त्याचा संबंध येऊं लागला, व या प्रत्येक पदार्थाच्या अंगीं कांहीं विशिष्ट गुणधर्म आहेत, असें त्याच्या नजरेस येऊं लागलें. एकाच पदार्थाचे विशिष्ट गुणधर्म वारंवार दिसूं लागल्यानें त्या त्या पदार्थांत ते ते गुणधर्म आहेत, अशी

लोकांची खात्री होऊं लागली, व याप्रमाणें त्या त्या गुणधर्मांची ज्या वेळेस जरूर लागेल, त्या वेळीं तो पदार्थ वापरण्याचे त्यांनीं प्रयोगही केले असतील. तात्पर्य, याप्रमाणें पदार्थांच्या गुणदोषांचे निरीक्षणामुळें ज्ञान व प्रयोगामुळें गुणधर्मांची निश्चितता याप्रमाणें उपयोग मनुष्य जातीला होऊं लागले. तथापि येवढ्यावरूनच शास्त्र तयार होत नाहीं. शास्त्र तयार होण्यास यापेक्षां पुष्कळ माहिती पाहिजे; त्यांतील सिद्धांत त्रिकालाबाधित जरी नसले तरी त्या वेळेस तरी त्याला अपवाद नसले पाहिजेत; त्याचे अंगप्रत्यंगविभाग पाहिजेत; व त्याची रचना पद्धतशीर झाली पाहिजे. या सर्व गोष्टी आपणांमध्यें केव्हां प्रचा-रांत आल्या, आपणांमध्यें प्रथम शास्त्ररचना कोणीं केली, वगैरे माहिती निश्चयानें सांगतां येणार नाहीं, तरी येवढें मात्र म्हणतां येईल कीं, वेदामध्यें पुष्कळ निरनिराळ्या औषधींचे व खाण्यांत येणाऱ्या पदार्थांचे गुणदोष सांगितले आहेत; निरनिराळ्या वनस्पतींच्या रसांचे उपयोग कसे करावे, हें सांगि-तलें आहे; व निरनिराळीं पक्वान्नें कशीं तयार करावीं, याचेंही वर्णन आहे. यावरून त्या काळीं सुद्धां लोकांना बऱ्याच पदार्थांचे गुणदोष माहीत असावे, असें दिसतें. यज्ञयागांची प्रवृत्ति फार वाढल्यावर पशु मारण्याची सुरवात झाली; त्या वेळीं त्यांच्या शरीराच्या निरनिराळ्या अवयवांची माहिती व गुणदोष समजले, याचेंही वर्णन वेदामध्यें आलें आहे. यज्ञामध्यें बोकड मारण्याचा प्रसंग पुष्कळ वेळां आल्यामुळें साहजिकच त्याच्या मांसाचे गुण-दोष व त्याच्या शरीराची माहिती लोकांस जास्त चांगली झाली. बोकडाच्या शरीराच्या अवयवांत व रक्तादि धातूंत आणि मनुष्याच्या शरीरांत व रक्तादि धातूंत साम्य असल्याचें त्यांस आढळून आलें होतें. अजमांसाचे गुणदोष वर्णन करितांना वाग्भट म्हणतो:—

नातिशीतं गुरु स्निग्धं मांसमाजमदोषलम् ।
शरीरधातुसामान्यादनभिष्यन्दि बृंहणम् ॥

सूत्र, अ. ६, श्लोक ६६.

अर्थः—"बकऱ्याचें मांस किंचित् थंड, जड, स्निग्ध, निर्दोष आणि मनुष्याच्या मांसाशीं समगुण असल्यामुळें पौष्टिक आहे व तें कफ पातळ करीत नाहीं." या श्लोकावरील टीकेंत अरुणदत्तानें 'न केवलमाजं मांसं पुरुषशरीरधातूनां मांसाख्येन तुल्य यावदन्येऽपि ये छागशरीरगता धातवस्तेऽपि मनुष्यशरीर-धातुना तुल्यगुणाः तेप्यनभिष्यन्दिनो बृंहणाश्च'। म्हणजे 'केवळ बोकडाचें मांसच मनुष्याच्या मांसाशीं समगुण आहे असें नाहीं, तर त्याचे इतर रसरक्तादि धातूही मनुष्याच्या धातूंशीं समगुण आहेत.' असें स्पष्टीकरण केलें आहे. दुसऱ्या एक ठिकाणीं तर रक्तक्षय झाल्यास तत्काल मारलेल्या बोकडाचें रक्त प्यावें म्हणजे त्याचें ताबडतोब जीवरक्त बनतें, असें सांगितलें आहे. इतका विस्तार येथें करण्याचें कारण इतकेंच कीं, नेहमीं जरूर लागणाऱ्या व पाहण्यांत येणाऱ्या वस्तूंचे गुणदोष आपणास चांगले समजतात, हें होय.

आर्यलोक आपली उत्तरध्रुवाकडील वसाहत सोडून जेव्हां दक्षिणेकडे येऊं लागले, तेव्हां त्यांच्या निरनिराळ्या टोळ्या होऊं लागल्या. वाटेंत येतांना त्यांवर दस्यूंनीं हल्ले केले, व पुढें पंजाबांत व सिंधुनदीचे कांठीं आल्यावर सुद्धां त्यांना हिंदुस्तानांतील मूळ रहिवाशांशीं लढावें लागलें. पुढें पुढें तर त्यांचीं आपसांत युद्धेंही होऊं लागलीं. युद्धांत शस्त्रास्त्रांनीं जखमा होत, बाणांचीं टोंकें शरीरांत घुसत व एखादा अवयवही तुटून पडे. अशा वेळीं त्या जखमा बांधण्यासाठीं, शल्यें काढून टाकण्यासाठीं व तुटलेले अवयव शिवण्यासाठीं योजना लागत. या योजना कराव्या भागविण्यासाठीं शस्त्रवैद्यांची जरूर भासूं लागली, व कालांतरानें शस्त्रवैद्यही तयार झाले. वेदांमध्यें दोन्ही अंगांची पूर्ण माहिती असलेल्या वैद्यांचें वर्णन आलें आहे. त्यांना अश्विनीकुमार म्हणत. यांचें वैद्यविद्येंतील कौशल्य फारच अप्रतिम होतें. म्हाताऱ्या च्यवन ऋषीला यांच्याच औषधानें पुन्हा तारुण्य प्राप्त झालें; व रुद्रानें छिन्न केलेलें

यज्ञाचें शिर त्यांनीं पुन्हा बरें केलें. या दोन्ही गोष्टींचा उल्लेख ऋग्वेद, शतपथ ब्राह्मण, तैत्तिरीय संहिता व ऐतरेय ब्राह्मण यांत आला आहे; व दुसऱ्या गोष्टीचा उल्लेख सुश्रुतानेंही आपल्या ग्रंथांत केला आहे. अश्विनीकुमारांच्या या कौशल्याबद्दल देवांनीं इंद्राजवळ प्रशंसा केली, व यज्ञांत त्यांना भाग नव्हता तो इंद्रानें प्रसन्न होऊन त्यांस दिला. याप्रमाणें ज्या अंगांची आयुर्वेदांत उणीव होती, तीं तीं अंगें परिस्थिति तयार झाल्याबरोबर उत्पन्न झालीं आहेत. अशा रीतीनें लोकांच्या स्थितीवर व जरूरीवर अवलंबून असणाऱ्या आधिभौतिक शास्त्रांची उत्पत्ति एका व्यक्तीकडून होणें शक्य नाहीं; निरनिराळ्या व्यक्तींचे अनुभव व त्या अनुभवांवरून होणारे सिद्धांत हे या आयुर्वेदाचा पाया असल्यामुळें त्याचा प्रणेता एकच पुरुष असणें शक्य नाहीं. तथापि शास्त्र म्हणून व उपवेद म्हणून आयुर्वेदाचा प्रचार ब्रह्मदेवाकडून सुरू झाला असें समजतात. म्हणून चरकामध्यें आयुर्वेदाची परंपरा देतांना म्हटलें आहेः—

ब्रह्मणा हि यथाप्रोक्तमायुर्वेदं प्रजापतिः ।
जग्राह निखिलेनादावश्विनौ तु पुनस्ततः ॥
अश्विभ्यां भगवान् शक्रः प्रतिपेदे हि केवलम् ।
ऋषिप्रोक्तो भरद्वाजस्तस्माच्छक्रमुपागमत् ॥

—सूत्रस्थान, अ. १.

अर्थः—प्रथम ब्रह्मदेवानें सांगितल्याप्रमाणें निखिल आयुर्वेदाचें प्रजापतीनें ग्रहण केलें; प्रजापतीपासून अश्विनीकुमारांनीं आयुर्वेद घेतला; व अश्विनीकुमारांपासून तो इंद्राला मिळाला; म्हणून ऋषींच्या सांगण्यावरून भरद्वाज (आयुर्वेद मिळविण्यासाठीं) इंद्राकडे गेला.

सुश्रुतांतही ही परंपरा अशी दिली आहेः—

ब्रह्मा प्रोवाच ततः प्रजापतिरधिजगे तस्मादश्विनावश्विभ्यामिन्द्र इन्द्रादहं मया त्विह प्रदेयमर्थिभ्यः प्रजाहितहेतोः ।

अर्थः—' ब्रह्मदेवानें सांगितलेला आयुर्वेद प्रजापति शिकला; प्रजापतीपासून अश्विनीकुमार, त्यांच्यापासून इंद्र, इंद्रापासून मी

( काशिराज धन्वंतरि दिवोदास ). तो येथें प्रजांच्या कल्याणासाठीं मी सर्व याचकांना ( शिष्यांना ) देणार आहें. ' या दोन्ही परंपरांचा विचार केला तर असें दिसून येईल कीं, दोन्ही ग्रंथांत ब्रह्मदेवापासून इंद्रापर्यंत क्रम एकच आहे. पुढें मात्र इंद्रानें भरद्वाज व धन्वंतरि यांना आयुर्वेद शिकविला व येथेंच आयुर्वेदाचे मुख्य दोन विभाग कायचिकित्सा व शल्यचिकित्सा हे झाले. भरद्वाजानें कायचिकित्साप्रधान आयुर्वेद पुनर्वसु आत्रेयाला शिकविला; व आत्रेयांनीं पंचाल क्षेत्रांत आपल्या आश्रमांत अग्निवेश, भेड, जतूकर्ण, पराशर, हारीत व क्षारपाणि यांस शिकविलें. इकडे धन्वंतरि काशिराज दिवोदास यांनीं इंद्रापासून मिळविलेला शल्यचिकित्साप्रधान आयुर्वेद सुश्रुत, औपधेनव, औरभ्र, पौष्कलावत इत्यादिकांस दिला; अशा रीतीनें आयुर्वेदाच्या दोन परंपरा सुरू झाल्या.

आत्रेयांनीं अग्निवेशादि शिष्यांना व धन्वंतरींनीं सुश्रुतादि शिष्यांना आयुर्वेद निरूपण केल्यावर आपापल्या बुद्धीप्रमाणें यांनीं आयुर्वेदसंहिता रचिल्या. जरी गुरूंनीं सर्वांसच सारखा उपदेश केला होता, तरी शिष्यांच्या बुद्धिमत्तेनुरूप त्यांच्या संहितेंत फरक झाला. या संहितांपैकीं कायचिकित्साप्रधान अशी अग्निवेशाची आणि शल्यचिकित्साप्रधान अशी सुश्रुताची, या दोनच चांगल्या असून बाकीच्या साधारण होत्या. कारण वाग्भटानें आपल्या ग्रंथांची प्रशंसा करितांना

ऋषिप्रणीते प्रीतिश्चेन्मुक्त्वा चरकसुश्रुतौ ।
भेडाद्याः किं न पठ्यन्ते तस्माद् ग्राह्यं सुभाषितम् ॥

असें म्हणून चांगले ऋषिप्रणीत ग्रंथ चरक व सुश्रुत हेच होत व भेडादि ग्रंथ निकृष्ट आहेत असें दर्शविलें आहे. जरी या दोन्ही ग्रंथांत आर्यवैद्यकाच्या आठ अंगांपैकीं ( काय, बाल, ग्रह, ऊर्ध्वांग किंवा शालाक्य, शल्य, विष, रसायन व वाजीकरण ) मुख्यत्वें काय व शल्य या दोनच अंगांचें विस्तारानें वर्णन केलें आहे, तरी

इतर अंगांचाही संक्षेपानें संग्रह केलेला यांत सांपडतो. अर्थातच ह्या दोन ग्रंथांच्या अध्ययनानें व परिशीलनानें सर्व आर्यवैद्यकाचें आलोडन केल्यासारखें होणार आहे. तरीपण इतर अंगांचें विस्तारानें वर्णन कांहीं ग्रंथकारांनीं केलें आहे. कौमारभृत्य किंवा बालचिकित्सेचा प्रचारक जीवक नांवाचा बौद्ध असून तो राजगृह नगरांत बिंबिसार राजाचे पदरीं असून भगवान् तथागताचा वैद्य म्हणून याची प्रसिद्धि आहे. ( Vide Rockhill's Life of Budha ) अथर्वा नांवाचा एक ऋषि होऊन गेला; त्यानें भूतविद्येचा प्रचार केला. शालाक्यचिकित्सेचा प्रचार विदेह, निमि वगैरेंनीं केला. विषचिकित्सेचा प्रवर्तक काश्यप ऋषि असून महाभारतांत तक्षकोपाख्यानांत त्याचें वर्णन आलें आहे. रसायन व वाजीकरण या अंगांचे प्रवर्तक कोण होते, त्याचा अद्यापि पूर्ण शोध लागलेला नाहीं; तथापि रसायनप्रवर्तक नागार्जुन होता व वाजीकरणाचे प्रवर्तक यवन लोक होते, अशी समजूत आहे; परंतु रसायन शब्दाचा अर्थ प्रशस्त रसादि धातु असा घेतला असतां त्याचें प्रवर्तकत्व नागार्जुनाकडे येत नाहीं, असें आम्हांस वाटतें. वाजीकरणांगही यवन अथवा ग्रीक लोक ( Ionians ) इकडे येण्याच्यापूर्वीं प्रचलित असल्यामुळें त्यांच्याकडून तें आलें असें म्हणता येत नाहीं. वर निर्दिष्ट केलेल्या प्रत्येक अंगावरील ग्रंथ आज आपणांस उपलब्ध नाहीं, त्यांतील पुष्कळ तर कायमचेच नाहींसे झाले असावेत असें दिसतें, व त्यांचें अस्तित्व टीकाकारांनीं त्यांच्या ग्रंथांतून घेतलेल्या अवतरणांवरूनच सिद्ध करावें लागत आहे. भावमिश्र, डल्हण, चक्रपाणि, विजयरक्षित व श्रीकंठदत्त यांनीं आपल्या टीकांतून प्रमाणासाठीं घेतलेल्या ग्रंथकारांची यादी केली

१. निरनिराळ्या अंगांवरील ग्रंथांची यादी.

**कायचिकित्सातंत्रें.**–( १ ) अग्निवेशसंहिता. ( २ ) भेडसंहिता. ( ३ ) जतूकर्णसंहिता. ( ४ ) पराशरसंहिता. ( ५ ) क्षारपाणिसंहिता. ( ६ ) हारीतसंहिता. ( ७ ) खरनादसंहिता. ( ८ ) विश्वामित्रसंहिता. ( ९ ) अत्रिसंहिता.
**शल्यचिकित्सातंत्रें.**–( १० ) औपधेनवसंहिता. ( ११ ) औरभ्रसंहिता. ( १२ )

तर तींत सुमारें ४०।५० नांवें तरी भरतील. सारश, वैदिक कालापासून तों बौद्धधर्माच्या प्रारंभापर्यंत वैद्यकाच्या निरनिराळ्या भागांवर पुष्कळ ऋषींचे ग्रंथ झाले आहेत, व त्या वेळच्या स्थितीवरून अनुमान केलें तर हे सर्व ग्रंथ मागील व त्या वेळच्या अनुभवावरून तयार केलेले असावेत. या पुढच्या काळांत मात्र हिंदुस्थानावर निरनिराळ्या लोकांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या; धर्मामध्यें क्रांति होऊं लागली; व आयुर्वेदाच्या प्रगतीला विरोधी अशा पुष्कळ गोष्टी घडून आल्या. त्यामुळें आर्यवैद्यकाची प्रगति अजीबात थांबली. इचे पुढें काय काय परिणाम झाले, हें सांगण्यापूर्वीं हल्लीं उपलब्ध असलेल्या सर्व ग्रंथांना आधारभूत जे चरक व सुश्रुत यांच्या कालाविषयीं व ग्रंथांच्या अंतरंगाविषयीं थोडासा विचार करूं.

हल्लीं जी चरकसंहिता उपलब्ध आहे, ती अग्निवेशसंहितेची सुधारलेली आवृत्ति होय. अग्निवेशसंहितेवर चरकानें संस्कार केला. संस्कार करणें म्हणजे कर्ता कोणकोणच्या सुधारणा करितो, हें खालील श्लोकांत सांगितलें आहे:—

> विस्तारयति लेशोक्तं संक्षिपत्यतिविस्तरम् ।
> संस्कर्ता कुरुते तंत्रं पुराणं च पुनर्नवम् ॥
>
> चरक. सिद्धि. १२-२८.

---

वृद्धसुश्रुतसंहिता. ( १३ ) पौष्कलावतसंहिता. ( १४ ) वैतरणसंहिता. ( १५ ) भोजसंहिता. ( १६ ) करवीर्यतंत्र. ( १७ ) गोपुररक्षिततंत्र. ( १८ ) भालुकितंत्र. ( १९ ) कपिलतंत्र. ( २० ) गौतमतंत्र. **शालाक्यचिकित्सातंत्रें.**—( २१ ) विदेहतंत्र. ( २२ ) निमितंत्र. ( २३ ) कांकायनतंत्र. ( २४ ) गार्ग्यतंत्र. ( २५ ) गालवतंत्र. ( २६ ) सात्यकितंत्र. ( २७ ) शौनकतंत्र. ( २८ ) करालतंत्र. ( २९ ) चक्षुष्यतंत्र. ( ३० ) कृष्णात्रेयतंत्र. **कौमारभृत्यतंत्रें.**—( ३१ ) जीवकतंत्र. ( ३२ ) पार्वतकतंत्र. ( ३३ ) बंधकतंत्र. ( ३४ ) हिरण्याक्षतंत्र. **अगदतंत्रें.**—( ३५ ) काश्यपसंहिता. ( ३६ ) अलंबायनसंहिता. ( ३७ ) उशनःसंहिता. ( ३८ ) सनकसंहिता. ( ३९ ) लाट्यायनसंहिता. **रसायनतंत्रें.**—( ४० ) पातंजलतंत्र. ( ४१ ) व्याडितंत्र. ( ४२ ) वशिष्ठतंत्र. ( ४३ ) माण्डव्यतंत्र. ( ४४ ) नागार्जुनतंत्र. वगैरे वगैरे. वर लिहिलेल्या संहितांपैकीं भेडसंहिता तंजोरच्या ग्रंथसंग्रहालयांत आहे, असें समजण्यांत आलें आहे. हारीतसंहिता या नांवाची एक संहिता प्रसिद्ध झाली आहे. पण ती मूळची नसावी, असें इतरांप्रमाणें आमचेंही मत आहे.

अर्थः—संस्कार देणारा मनुष्य थोडक्यांत सांगितलेल्या गोष्टींचा विस्तार करितो, व अतिशय विस्तृत रीतीनें लिहिलेल्या गोष्टींचा संक्षेप करितो; अशा रीतीनें जुनें झालेलें शास्त्र तो नवीन करितो.

याप्रमाणें अग्निवेशसंहितेवर चरकानें संस्कार दिला खरा; परंतु अशा रीतीनें सुधारलेल्या चरकसंहितेंतील कांहीं अध्याय पुन्हा गहाळ झाले; ते अध्याय कापिलबल दृढबलानें लिहून जोडिलेले आहेत. याप्रमाणें हल्लीं उपलब्ध असलेल्या चरकसंहितेचा इतिहास आहे. चरकसंहितेची विषयप्रतिपादनाची पद्धत पाहिली म्हणजे ती कोणच्या काळीं तयार झाली व कशा रीतीनें लिहिली गेली हें चांगलें कळून येतें. उपनिषदें ज्या सुमारास—[इसवी सनापूर्वी सुमारें २००० वर्षे] लिहिलीं गेलीं, त्या वेळीं एखाद्या विषयाचें प्रतिपादन करावयाचें झालें म्हणजे सभेमध्यें असणाऱ्या मंडळींनीं आपलीं मतें पुढें मांडावयाचीं व नंतर त्या विषयावर वादविवाद होऊन निकाल ठरावयाचा, अशी पद्धत असे. [बृहदारण्यकोपनिषत्-अध्याय ३ पहा.] अशीच पद्धति चरकामध्यें दिसून येते. या पद्धतीचें उत्तम उदाहरण पहावयाचें झालें तर चरकाच्या सूत्रस्थानाचा २६ वा अध्याय वाचकांनीं पहावा. या अध्यायांत 'रस किती आहेत,' या प्रश्नावर निरनिराळ्या ऋषींनीं आपलीं मतें मांडलीं असून शेवटीं आत्रेय महर्षींनीं सहाच रस आहेत, असें सिद्ध केलें आहे. चरकांतील विषयप्रतिपादन चांगलें पण किंचित् विस्कळित असें आहे; एका अध्यायांत एकच मुख्य गोष्ट नसून कोठें कोठें तर असंबद्ध गोष्टीही त्याच अध्यायांत सांगितल्या आहेत. वैद्यकविषयावर वादविवाद चालू असतांना तत्त्वज्ञानविषयक वर्णनहीं त्यांत केलेलें आढळतें. न्याय, वैशेषिक, वेदान्त या शास्त्रांत प्रतिपादन करण्याजोग्याही पुष्कळ गोष्टी यांत सांगितल्या आहेत. तथापि हल्लीं या शास्त्राचे जे उपलब्ध ग्रंथ आहेत, त्यांतील विषय जितके पद्धतशीर आहेत, तितकें व्यवस्थित स्वरूप या सिद्धां-

तांना चरकाचे वेळीं आलेलें नव्हतें. ज्या देवता किंवा जे मंत्र चरकांत आले आहेत, ते शुद्ध वैदिक असून पुराणांत सांगितलेल्या देवतांचा यांत बहुधा उल्लेख नाहीं. मनुष्याच्या हाडांची संख्या वेदांतल्याप्रमाणें ३६० च मानिली आहे. चरकाची भाषासरणीही ब्राह्मणांतील ग्रंथांतील भाषेच्या वळणावर आहे. ती शुद्ध, साधी आणि जोरदार आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला तर असें म्हणतां येईल कीं, चरकसंहिता—निदान अग्निवेशसंहिता तरी—इसवी सनापूर्वीं २००० वर्षांच्या अलीकडे लिहिलेली नसावी. अग्निवेशसंहितेला संस्कार देणारा चरक म्हणजे व्याकरणभाष्यकार व योगसूत्रकार पतंजलिच होय, असें बहुतेकांचें म्हणणें आहे; त्यावरून पाहिलें तर चरकाचा काल इसवी सनापूर्वीं ५०० वर्षें तरी ठरतो; व दृढबलाची आपलें नांव लिहिण्याची पद्धति ( कापिलबल दृढबल ) पाहिली तर त्यावरून त्याचाही काल इसवी सनापूर्वीं एकदोन शतकें तरी ठरतो.

सुश्रतसंहितेचीही सामान्य हकीकत चरकाप्रमाणेंच आहे, असें म्हटलें तरी चालेल. ज्याप्रमाणें चरकसंहितेचें मूळ अग्निवेशानें केलेलें असून त्यावर प्रथम चरकानें व नंतर दृढबलानें संस्कार दिला, त्याप्रमाणें सुश्रुतसंहितेच्या पूर्वीं वृद्धसुश्रुतसंहिता होती, व उपलब्ध सुश्रुतसंहितेलाही नागार्जुनानें संस्कार दिला असून उत्तरतंत्राची पुरवणी जोडिली आहे. कविराज उमेशचंद्र हे वैद्यकशब्दसिंधूच्या प्रस्तावनेंत लिहितातः—

" It is said by Dalvanacharya, the commentator of Susruta, that at the time of war betwean the Buddhas and Hindus, the **सुश्रुततंत्र**, wss re-edited aud rendered more comprensive by the renowued chemist **सिद्धनागार्जुन** with a supplement called **उत्तरतंत्र**. Since that period it has been known by the name of **सुश्रुतसंहिता**."

अशा रीतीनें संस्कार देऊन तयार झालेल्या सुश्रुतांत पारिभाषिक शब्द वगैरे चरकांतीलच आहेत; तरी भाषापद्धति चरकापेक्षां

अर्वाचीन आहे. चरकामध्यें ज्याप्रमाणें एक विषय वर्णन करीत असतांना अन्य विषयांचेंहि वर्णन केलें आहे, तसें सुश्रुतांत फारसें नाहीं; व सुश्रुतांत चरकाप्रमाणें उगीच पाल्हाळानें वर्णन कोठेंहि न करितां थोडक्यांत व मुद्देसूद रीतीनें विषय मांडिले आहेत. व याचें कारणहि उघडच आहे. सिद्धनागार्जुन हा बौद्धकालांतील असल्यामुळें वैदिक भाषापद्धति जरा बदलत चालली होती, व तिचेंच प्रतिबिंब सुश्रुताच्या सिद्धनागार्जुनानें दिलेल्या संस्काराचे वेळीं पडलें असावें.

ज्याप्रमाणें चरक हा कायचिकित्सेवरील मुख्य ग्रंथ समजण्यांत येतो, त्याचप्रमाणें सुश्रुत हा शस्त्रचिकित्सेवरील मुख्य ग्रंथ समजण्यांत येतो. या ग्रंथाचे परिशीलनानें फार प्राचीन काळीं सुद्धां आर्य लोकांना शस्त्रांचा उपयोग चांगला माहीत होता असें दिसतें; व कायचिकित्सक आणि शल्यचिकित्सक (धान्वन्तरीय) हे चिकित्सकांचे दोन वर्ग चरकाचे वेळेससुद्धां प्रस्थापित झालेले होते. सुश्रुताचा काळ अंतर्गत प्रमाणांवरून ठरविणें फारच कठीण आहे. आज जी सुश्रुतसंहिता आपणांस उपलब्ध आहे, ती पुष्कळ संस्कारकांच्या हातून गेल्यानें तिचें मूळचें स्वरूप पुष्कळ बदललेलें आहे. तथापि इसवी सनापूर्वी सुमारें ७००|८०० वर्षें तरी व चरकाचे नंतर हा ग्रंथ लिहिला गेला असावा, असें आम्हांस वाटतें. चरकाचे नंतर, असें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, कांहीं ठिकाणीं सुश्रुतांत चरकाच्या भाषेचें अनुकरण केलेलें आढळतें. उदाहरणार्थ खालील स्थल पहाः—

**सूक्ष्माणि हि दोषभेषजदेशकालबलशरीराहारसात्म्यसत्वप्रकृतिवयसामवस्थान्तराणि यान्यनुचिन्त्यमानानि विमलविपुलबुद्धेरपि बुद्धिमाकुलीकुर्युः किं पुनरल्पबुद्धेः ॥**

चरक-सूत्र. अध्याय १५.

**सूक्ष्मा हि द्रव्यरसगुणवीर्यविपाकदोषधातुमलाशयमर्मशिरास्नायुसंध्यस्थिगर्भसंभवद्रव्यसमूहविभागा + + + ये विचिन्त्यमाना विमलविपुलबुद्धेरपि बुद्धिमाकुलीकुर्युः किं पुनरल्पबुद्धेः ॥**

सुश्रुत-सूत्र. अध्याय ४.

चरकांतील कासनिदान सुश्रुतांत जसेंच्या तसेंच घेतलें आहे. या प्रमाणावरून असें निश्चित सांगतां येईल कीं, मूळ सुश्रुतसंहिता ही चरकसंहितेनंतर पण इसवी सनापूर्वीं कमींत कमी ५०० वर्षांपूर्वीं तरी झाली असावी.

चरक व सुश्रुत यांच्या समकालीन असलेल्या भेडादि संहिता रचिल्या गेल्यावर आर्यवैद्यकावर स्वतंत्र ग्रंथ झालेच नाहींत, असें म्हटलें तरी चालेल. चरक व सुश्रुत यांच्यानंतर हिंदुस्तानांत जिकडे तिकडे बौद्धधर्माचा प्रचार सुरू झाला. याच बौद्धधर्माच्या अमदानींत आर्यवैद्यकास आणखी एका अंगाची—चिकित्सेसंबंधीं रसतंत्राची—जोड मिळाली. या रसतंत्राचा प्रचारक सिद्धनागार्जुन असून तो बौद्ध होता, ही गोष्ट आतां सर्वांना मान्य झालेलीच आहे. रसतंत्रांचा प्रचारक नागार्जुन होता व चरकादिकांस रसादि धातूंची मुळींच माहिती नव्हती, असें मात्र नाहीं; चरकादिकांनीं कांहीं ठिकाणीं पारा व इतर धातूंचा उपयोग सांगितला आहे. नागार्जुनादि बौद्धच रसशास्त्राचे प्रवर्तक होते, याला एक पुरावा देतात तो असा कीं, सर्व रसतंत्रांचे आरंभीं ग्रंथकर्त्यांनीं बुद्धालाच नमस्कार केला आहे. पुष्कळ रसतंत्रांचे आरंभीं रसशास्त्राच्या सत्तावीस प्रवर्तकांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांपैकीं बहुतेक बौद्धच असावेत असें दिसतें.

नागार्जुनानें कक्षपुटतंत्र, रसरत्नाकर व आरोग्यमंजरी हे तीन ग्रंथ केले आहेत. **आल्बेरुणी** वगैरे कांहीं संशोधक नागार्जुन हा आठव्या शतकांत झाला असें मानितात; पण प्रसिद्ध चिनी यात्रेकरू **हुएन्त्संग** यानें नागार्जुनाचा उल्लेख केला असल्यामुळें तो कमींत कमी सहाव्या शतकाच्या पूर्वीं ठरतो. कांहीं म्हटलें तरी किमयेचा प्रादुर्भाव आपल्याकडे झाल्याबरोबरच हळू हळू रसवैद्यकाची उत्पत्ति झाली असावी. व किमयेचा प्रसार हा आर्यवैद्यकानंतरचा आहे, ही गोष्ट प्रो. **प्रफुल्लचंद्र राय** यांसारख्या तज्ज्ञ विद्वानांनीं मान्य केलेली आहे.

आर्यवैद्यकांतील चिकित्सेच्या शाखेंत याप्रमाणें आणखी एका अंगाची भर पडली खरी, व या नवीन अंगाचा–रसवैद्यकाचा–पगडा त्यावर बसला खरा, पण याबरोबरच दुसऱ्या एका अंगाची–शस्त्र चिकित्सेची व वनस्पतिक्रियेचीही–थोडी थोडी अवनति होऊं लागली. बौद्धधर्माच्या प्रसारामुळें वेद व त्यांचीं अंगें यांविषयीं योग्य तो अभिमान कमी कमी होत चालला; वैदिक क्रिया जाऊन त्यांचे ऐवजीं बौद्ध धर्मांतील अनुष्ठानांचें व उपासनांचें बंड वाढूं लागलें; आणि "अहिंसा परमो धर्मः" हें धर्माचें प्रधान तत्त्व होऊन अहिंसाप्रधान तत्वांचें वर्चस्व सर्वत्र दिसूं लागलें. या अहिंसाप्रधान धर्मानें आर्यवैद्यकावर उपकार व अपकार या दोन्ही गोष्टी केल्या आहेत. प्राण्यांचें दुःखविमोचन हें प्रत्येक बौद्धधर्मीयाचें कर्तव्य बनून गेलें, आणि अशोकानें तर मनुष्य आणि जनावरें यांच्यासाठीं धर्मार्थ दवाखाने स्थापन केले असल्याचें त्याच्या शिलालेखांतील शासनांवरून सिद्ध होत आहे. अशाच एका शासनांत अशोकानें मनुष्यावर शस्त्रप्रयोग करण्याचा अत्यंत निषेध केला आहे. ( Vide gournal of Asiatic society Vol III 261 ) अशा शासनानें अर्थातच शस्त्रक्रियेची बंदी झाली; व शस्त्रक्रियाच बंद झाल्यामुळें तिच्यासंबंधीं अनुभव किंवा नवीन

१ अशीच शस्त्रक्रियेची बंदी युरोपखंडामध्यें सुद्धां तेराव्या व चौदाव्या शतकांत झाली होती. युरोपमध्यें शस्त्रक्रियेला सुरवातच मुळीं तेराव्या शतकांत झाल्यामुळें या प्रतिबंधानें तिकडील वैद्यांना फारच अडथळा झाला. वैद्यलोक मग अशा वेळेस प्रेतें चोरून आणीत असत. याबद्दल डॉक्टर पुशमन यांचा खालील लेख विचार करण्यासारखा आहे.

"Dissection of the Human subject was in the first centuries of the middle ages opposed by religious and political ordinances and also by social prejndices......."

"Many doctors provided themselves with bodies, when they could not get them in a legitimate way, by theft......"

"At Bologna dissections on the human subject were probably carried owt as early as the thirteenth century...."

"The senate of Venice, in 365, issued an order that dissection should be performed once a year."

(From Dr. Gananathseus Introductiou to प्रत्यक्षशारीरम्.)

शोध लागणें अशक्य झालें. आर्यवैद्यकाच्या अवनतीला जर कोठून प्रारंभ झाला असेल तर तो येथूनच होय. या कालाच्या पुढें आर्यवैद्यकावर स्वतंत्र विचारांनीं लिहिलेले ग्रंथ झाले नाहींत, असें मागें आम्हीं सांगितलेंच आहे. त्याशिवाय संग्रहग्रंथांनाही याच कालापासून सुरवात झाली आहे. या काळाच्या नंतर आर्यवैद्यकांतील शारीरशास्त्राच्या अवनतीला आरंभ झाला. शरीर फाडणें वगैरे क्रिया धर्मानेंच निषिद्ध मानल्यामुळें त्यांच्या अंगप्रत्यंगज्ञानाचा अभाव झाला; इतकेंच नव्हे तर कोणचा भाग कोणच्या ठिकाणीं असतो, याचेंही योग्य ज्ञान माहीत असणारा वैद्य दुर्मिळ झाला. पारिभाषिक शब्दांचे ठराविक अर्थ नाहींसे होऊन त्यांतील सूक्ष्म भेद कळेनासे झाले; नाडी, धमनी व शिरा म्हणजे एकच आहेत, अशी समजूत दृढमूल होऊन बसली. आज जर आर्यशारीरांत कांहीं उणीवा दिसत असतील, तर त्याचें कारण ही बदललेली परिस्थिति आहे. हाडांची संख्या एक २०० म्हणतो तर दुसरा ३६० म्हणतो. याचें कारण हाडें कोणास म्हणावें, यासंबंधीं ग्रंथकारांत असलेला मतभेद होय.

प्रस्तुत ग्रंथाचा कर्ता सिंहगुप्ताचा पुत्र वाग्भट हा असून तो सिंधमध्यें रहात असे. हा बौद्धधर्मीय असून आर्यधर्माविषयीं त्याच्या मनांत द्वेषबुद्धि नसावी असें दिसतें. हा इसवी सनाच्या पांचव्या किंवा सहाव्या शतकांत झाला असावा असें दिसतें; तथापि हा काल नक्की नाहीं. डॉ. कुंटे वाग्भटास इसवी सनापूर्वीं दोन शतकें घालतात, तर कॉर्डियर (Cordier) नांवाचे पाश्चात्य विद्वान् वाग्भट जयसिंह राजाच्या वेळेस होता (११९६ ते १२१८), असें ठरवितात. परंतु आम्ही त्यास पांचव्या शतकांत घालण्याचें कारण इत्सिंग (I'Tsing) नांवाच्या सातव्या शतकांतील चिनी

१. या विषयाच्या विशेष ज्ञानासाठीं संस्कृत जाणणाऱ्या मंडळींनीं कविराज वैद्यावतंस **गणनाथसेन** यांचें '**प्रत्यक्षशारीर**' हें पुस्तक अवश्य वाचून पहावें.

२. कित्येकांचें मतें हा ब्राह्मणधर्मीय असून त्याचेवर बौद्धमतांचा फक्त संस्कार झाला होता.

प्रवाशानें लिहून ठेविलेल्या हकीकतींत वाग्भटाचा अप्रत्यक्ष रीतीनें उल्लेख आला आहे, हें होय. तो लिहितोः—

"These eight arts formerly existed in eight books, but latety a man epitomised them and made them into one bundle

I' Tsing: Records of the Buddhist Religion by Takakasu.

म्हणजेः—पूर्वी या आठ अंगांवर आठ स्वतंत्र पुस्तकें होतीं, पण कांहीं वर्षांपूर्वी एकानें त्या आठही अंगांचा एकाच पुस्तकांत संग्रह केला आहे.

या हकीकतींत अष्टांगसंग्रहाचा किंवा अष्टांगहृदयाचाच उल्लेख केला आहे, असें आम्हांस वाटतें; व याच प्रमाणावरून वाग्भट हा निदान इसवी सनाच्या सातव्या शतकापूर्वी एकदोन शतकें तरी झाला असावा, असें आमचें मत आहे.

वाग्भटानें अष्टांगसंग्रह प्रथम रचिला. पण तोही ग्रंथ त्यास अतिविस्तृत वाटून त्यानें त्याचाच संक्षेप करून पुन्हा अष्टांगहृदय नांवाचा ग्रंथ तयार केला. अरुणदत्ताच्या टीकेंतील उल्लेखावरून यानेंच 'सिद्धसार' नांवाचा एक अत्यंत संक्षिप्त ग्रंथ लिहिला असावा, असें दिसतें. पण तो ग्रंथ अद्यापि उपलब्ध झालेला नाहीं. 'रसरत्नसमुच्चय' नांवाचा रसवैद्यकावरील ग्रंथही वाग्भटानेंच लिहिला आहे, पण तो वाग्भट संग्रहकार वाग्भटापेक्षां अन्य असावा, असें प्रो. रायप्रभृति विद्वानांप्रमाणें आम्हांसही वाटतें.

हा ग्रंथ ज्या वेळेस आर्यवैद्यकास उतरती कळा लागली होती तेव्हां लिहिलेला आहे. सर्व ग्रंथांचा झपाट्यानें नाश होत आहे असें पाहून, जे जे चांगले ग्रंथ आपल्या हातांत सांपडतील त्यांतील सार एकत्र आणावें, अशा बुद्धीनें वाग्भटानें हा ग्रंथ रचिला आहे. यांत प्रायः कांहीं बुद्धसांप्रदायिक मंत्र व प्रयोग यांखेरीज आर्यवैद्यकांत नसलेल्या कोणत्याही गोष्टींचा संग्रह केलेला नाहीं; अर्थातच जेथें जेथें आर्यवैद्यकग्रंथांत मतभेद दिसून आला, तेथें तेथें वाग्भटानें दोन्हीही मतें आपल्या ग्रंथांत लिहून ठेविलीं आहेत. उदाहरणार्थः—

अस्थ्नां शतानि षष्टिश्च त्रीणि दन्तनखैः सह ।
धन्वन्तरिस्तु त्रीण्याह सन्धीनां च शतद्वयम् ।
दशोत्तरं सहस्रे द्वे निजगादात्रिनन्दनः ॥

वा. शा. अ. ३-१६-१७.

या श्लोकांत ' चरकाच्या मतानें ३६० हाडें असून धन्वंतरीच्या मतानें ३०० च आहेत; व धन्वंतरीच्या मतानें संधि २१० असून आत्रेयाच्या [ चरकाच्या ] मतानें ते २००० आहेत, ' असें लिहिलें आहे. अनादिकालापासून मनुष्यशरीर एकच असून त्यांत एवढा प्रचंड फरक कां झाला, याचें कारण अस्थि व संधि या शब्दांच्या अर्थांतच आहे, हें आम्हीं मागें दर्शविलेंच आहे. या ठिकाणीं आम्हांस सांगावयाची गोष्ट ही कीं, वाग्भटानें या वादांत पडून निर्णय दिलेला नाहीं; आणि यावरून दुसरीही एक गोष्ट सिद्ध होते ती ही कीं, वादग्रस्थ स्थळीं वाग्भटानें प्रत्यक्ष प्रयोग करून खऱ्याखोट्याचा निर्णय करण्याचा प्रयत्नही केला नाहीं. हा एकच दोष सोडून दिला तर ऋषिप्रणीत वैद्यकाचें अष्टांगहृदयरूपी आरशांत पडलेल्या प्रतिबिंबाइतकें सत्य व सुंदर प्रतिबिंब आपणांस अन्यत्र आढळणार नाहीं; आणि याच एका गुणामुळें या पुस्तकाची इतकी मान्यता आहे. **आशाधरानें आशाधरी, चंद्रनंदनानें पदार्थचंद्रिका, अरुणदत्तानें सर्वांगसुंदरा व चतुर्वर्गचिंतामणिकार हेमाद्रि** या विद्वानांनीं यावर सर्वमान्य टीका लिहिल्या आहेत; आणि चरक व सुश्रुत यांच्याबरोबरच आठव्या शतकांत अरबी भाषेंत भाषांतर होण्याचा मान याच पुस्तकाला मिळालेला आहे.

या ग्रंथाची रचना बाह्यतः सुश्रुताच्या रचनेसारखी दिसते, पण नीट विचार केला तर रचनाचातुर्य वाग्भटाचेंच आहे, असें म्हटलें पाहिजे. याचीं सुश्रुताप्रमाणें सहा स्थानें [ भाग ] आहेत; व त्यांचीं नांवेंही सुश्रुतानें दिलेलींच आहेत; पण क्रम मात्र थोडा भिन्न आहे. पहिल्या पांच स्थानांत कायचिकित्सा व शल्यचिकित्सा यांचा संक्षेप केला असून उत्तरस्थानांत बाकीच्या सर्व अंगांचा संक्षेप केला आहे. सूत्रस्थानाची रचना वाग्भटानें फार कुशलतेनें केली

आहे. ‘सूत्रस्थाने तु वाग्भटः’ अशी प्रसिद्धि आहे, ती योग्य आहे. यांत चिकित्सेला आवश्यक असलेल्या सर्व शास्त्रार्थांचा उत्तम रीतीनें संग्रह केला असून विषयाची मांडणी पाश्चात्य तर्कशास्त्रांतील वर्गीकरणाच्या पद्धतीवर केली आहे. या पद्धतीचा अवलंब केल्यानें विषयाचें ज्ञान सुलभ होतें, हा अनुभव पुष्कळांना आलाच असेल. शारीरस्थानांत गर्भाची उत्पत्ति, वाढ, सूतिकापरिचर्या, शरीराचें अंगप्रत्यंगवर्णन, मर्में, मरणसूचक चिन्हें व शकुन यांचें वर्णन आहे. निदानस्थानांत सर्वांगव्यापी रोगांचें निदान व चिकित्सास्थानांत त्याच रोगांची चिकित्सा सांगितली आहे. कल्पस्थानांत वमन, विरेचन व बस्ति यांचीं औषधें तयार करण्याची रीत, त्यांच्या दुरुपयोगामुळें होणारे रोग व त्यांची चिकित्सा आणि औषधें, त्यांचे प्रकार, वजनें व मापें यांचें वर्णन आलें आहे; आणि उत्तरस्थानांत इतर सहा अंगांचीं सविस्तर माहिती आलेली आहे. याप्रमाणें या अष्टांगहृदय ग्रंथाचें स्वरूप आहे.

आतां या ग्रंथाचा अभ्यास करणारांना कांहीं सूचना कराव्या असें आम्हांस वाटतें. त्या त्यांनीं उपयोगांत आणल्यास त्यांना विषयाचें ज्ञान सहज व उत्तम होईल. सूत्रस्थानाचें नीट वाचन व मनन झाल्यावर आणि त्यांतील पारिभाषिक शब्द चांगले लक्षांत ठेवल्यावर वाचकांनीं शारीरस्थान वाचण्यास सुरवात न करितां अगोदर कल्पस्थान तयार करावें, व मग शारीर व निदान वाचावें. चिकित्सेच्या वर्णनांत ग्रंथकारानें प्रायः परिचारकांना उपयोगी असणारी रोग्याच्या अन्नपानादिकांची माहिती प्रथम दिली आहे; नंतर दोषानुरोधानें रोगांची चिकित्सा सांगितली आहे, आणि शेवटीं त्या त्या रोगांवरील सिद्ध व अनुभविक औषधें दिलीं आहेत. हे चिकित्सावर्णनाचे तीन भाग जर नीट लक्षांत ठेविले, तर असें कळेल कीं, पहिला भाग एकदां किंवा दोनदां वाचल्यास लक्षांत राहतो; आणि दुसरा व तिसरा भाग पुस्तकाच्या साहाय्यानें उपयोगांत आणितां येतो.

प्रस्तुत भाषांतर **अरुणदत्त व हेमाद्रि** या दोन टीकांच्या अनुरोधानें केलेलें असून प्रसंगविशेषीं मतभेद झाल्यास त्याच्या कारणांसुद्धां तो टीपेंत दिला आहे, व ज्या ज्या ठिकाणीं सामान्य वाचकांस नीट बोध होणार नाहीं असें आम्हांस वाटलें, त्या त्या ठिकाणीं स्पष्टीकरणार्थ टीपा दिल्या आहेत.

सरते शेवटीं हीं प्रस्तावना लिहिण्याच्या कामीं प्रो. प्रफुल्लचंद्रराय यांच्या "Hinbu Chemistry" या पुस्तकाचा, व वैद्यावतंस गणनाथसेन यांच्या "**प्रत्यक्ष शारीर**" या पुस्तकाचा बराच उपयोग झाला. याबद्दल त्यांचे आभार मानून ही प्रस्तावना पुरी करितों.

**परशराम लक्ष्मण वैद्य,**
संशोधक.

---



# भाग पहिला.
## अध्यायानुक्रमणिका.

श्रीशंकर.

# सार्थ वाग्भट.

## ( अष्टांगहृदय. )

## सूत्रस्थान.

### अध्याय पहिला.

रागादिरोगान्सततानुषक्तानशेषकायप्रसृतानशेषान् ।
औत्सुक्यमोहारतिदाञ्जघान योऽपूर्ववैद्याय नमोऽस्तु तस्मै ॥ १ ॥

प्राणिमात्राच्या देहामध्यें सदोदित वास करणारे आणि विषयासक्ति, मोह व अस्वस्थता उत्पन्न करणारे जे कामक्रोधादिक रोग[१], त्यांचा समूळ नाश करणारा अपूर्व वैद्य जो परमेश्वर त्यास नमस्कार असो.

अथात आयुष्कामीयमध्यायं व्याख्यास्यामः ।
इति ह स्माहुरात्रेयादयो महर्षयः ।

आतां आम्हीं आयुष्कामीय नांवाचा अध्याय सांगणार आहों. पूर्वीच्या आत्रेयादि ऋषींनींही असेंच सांगितलें आहे.

आयुः कामयमानेन धर्मार्थसुखसाधनम् ।
आयुर्वेदोपदेशेषु विधेयः परमादरः ॥ २ ॥

धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ साधण्यास अत्यंत आवश्यक साधन जें दीर्घ आयुष्य त्याची इच्छा करणाऱ्या मनु-

---

१ काम, क्रोध, लोभ, वगैरे जे मनोविकार आहेत त्यांच्या प्रेरणेनेंच आपले सर्व व्यवहार घडून, रोगांचाही उद्भव होतो. या मूळ कारणांचा नाश करण्यास परमेश्वराशिवाय दुसरा कोणी वैद्य समर्थ नाहीं, हें यावरून ध्वनित केलें. तापासारखे शारीरिक रोगही जुने झाले असतां, इतर वैद्य ते बरे करूं शकत नाहींत; आणि हा वैद्य, कामक्रोधांसारखे सूक्ष्म, मानसिक व सतत शरीरांत राहणारे रोगही समूळ नाहींसे करितो, ही अपूर्वता आहे.

ष्यांनीं, आयुष्यरक्षणाचे उपाय सांगणाऱ्या वैद्यशास्त्रांत प्रतिपादन केलेल्या गोष्टी समजून घेऊन त्याप्रमाणें वागण्याविषयीं झटून प्रयत्न करावा.

ब्रह्मा स्मृत्वायुषो वेदं प्रजापतिमजिग्रहत्।
सोऽश्विनौ तौ सहस्राक्षं सोऽत्रिपुत्रादिकान्मुनीन् ॥३॥
तेऽग्निवेशादिकांस्ते तु पृथक्तंत्राणि तेनिरे।

प्रथम ब्रह्मदेवानें आयुर्वेदाचें[1] स्मरण करून, तो प्रजापतीस शिकविला; प्रजापतीनें अश्विनीकुमारांस शिकविला; त्यांनीं इंद्रास शिकविला; इन्द्रानें आत्रेय वगैरे महर्षींस शिकविला. त्यानें अग्निवेश वगैरे शिष्यांस शिकविला. अग्निवेशप्रभृति शिष्यांनीं वैद्यकावर स्वतंत्र निरनिराळे ग्रंथ लिहिले.

तेभ्योऽतिविप्रकीर्णेभ्यः प्रायः सारतरोच्चयः ॥४॥
क्रियतेऽष्टांगहृदयं नातिसंक्षेपविस्तरम्।

या ग्रंथांची रचना फार अव्यवस्थित असल्यामुळें, त्यांतील सार काढून फार संक्षिप्त नाहीं व फार विस्तृतही नाहीं, असा हा अष्टांगहृदय[2] नांवाचा ग्रंथ मी तयार करितों.

कायबालग्रहोर्ध्वांगशल्यदंष्ट्राजरावृषान् ॥५॥
अष्टावंगानि तस्याहुश्चिकित्सा येषु संश्रिता।

काय, बाल, ग्रह, ऊर्ध्वांग, शल्य, दंष्ट्रा, जरा व वृष हीं आयुर्वेदाचीं आठ अंगें आहेत, या आठ अंगांसंबंधीं चिकित्सा[3] यांत सांगितली आहे.

---

१ वेद अनादि आहेत. त्यांचा कोणी कर्ता नाहीं. म्हणून "स्मरण करून" असा पदप्रयोग केला.

२ हा संग्रह वाग्भटांनीं केला, म्हणून या ग्रंथास वाग्भट असेंही दुसरें नांव आहे. सर्वांगांत जसें हृदय हें प्रधान अंग आहे, त्याप्रमाणें अष्टांग आयुर्वेदांत हा ग्रंथ प्रधान आहे.

३ कोठ्यांतील बिघाडानें होणाऱ्या ताप, अतिसार वगैरे सार्वदेहिक रोगांची चिकित्सा, ती कायचिकित्सा; भूत, पिशाच, गंधर्वादिकांपासून होणाऱ्या पीडेची चिकित्सा ती ग्रहचिकित्सा; छातीच्या वरील नाक, कान, डोळे, गळा वगैरे अंगांची चिकित्सा ती ऊर्ध्वांगचिकित्सा; हिला शालाक्यचिकित्साही म्हणतात. शल्यचिकित्सा म्हणजे शस्त्रक्रिया; स्थावर, जंगम, विषविकारांची चिकित्सा ती

वायुः पित्तं कफश्चेति त्रयो दोषाः समासतः ॥ ६ ॥

वायु, पित्त व कफ हे शरीरांत मुख्य तीन दोष[१] आहेत.

विकृताविकृता देहं घ्नंति ते वर्तयंति च ।

ते बिघडले असतां जीविताचा नाश करितात व स्वाभाविक स्थितींत असतां शरीरव्यापार चालवितात.

ते व्यापिनोऽपि हृन्नाभ्योरधोमध्योर्ध्वसंश्रयाः ॥ ७ ॥

ते सर्वशरीरभर पसरले आहेत. तरी बेंबीच्या खालचें ओटीपोट हें वायूचें मुख्य स्थान, हृदय व बेंबीचा मध्यभाग पित्ताचें मुख्य स्थान, आणि हृदयावरचा भाग छाती हें कफाचें मुख्य स्थान होय.

वयोऽहोरात्रिभुक्तानां तेऽन्तमध्यादिगाः क्रमात् ।

---

दंष्ट्राचिकित्सा; यास अगदवैद्यकही म्हणतात. वार्धक्य नाहींसें करून पुनः तारुण्य देणारी किंवा वार्धक्य मुळींच न येऊं देतां तारुण्य रक्षण करणारी ती जराचिकित्सा. हीस रसायनतंत्रही म्हणतात. आणि वीर्यवृद्धि करणारी ती वृषचिकित्सा. अथवा वाजीकरण.

१ रसादि सप्त धातूंना व मलांना दूषित करितात ते दोष. रक्तही एक चवथा दोष आहे, असा कित्येकांचा पक्ष आहे; व त्यासंबंधानें ते असें म्हणतात कीं, जसे वात-पित्त-कफ हे धातूंस दूषित करितात, तसेंच रक्तही करितें. वातादिकांप्रमाणें तें सर्वशरीरव्यापी असूनही यकृत् व कौळ हीं त्याचीं मुख्य स्थानें आहेत. वातादिकांप्रमाणेंच त्याचीं लक्षणें, कार्ये, चिकित्सा वगैरे घडतात. मग त्यास चवथा दोष कां मानूं नये? परंतु हें म्हणणें असार आहे. प्रथमतः रक्त हेंच सप्तधातूंपैकीं एक मानलेलें आहे, आणि पुन्हां रक्त, वातादिकांप्रमाणें स्वतंत्रपणें धातूंस दूषित करूं शकत नाहीं किंवा स्वतःही दूषित होऊं शकत नाहीं. वायु वगैरे दोष त्यास दूषित करितात. म्हणून तें दूष्य अर्थात् दूषित होणारें आहे; दोष नव्हे. यावरही असा आक्षेप आहे कीं, वातादि दोषही एकमेकांस दूषित करितात. तेव्हां तेही दूष्यच समजावे. परंतु हेंही म्हणणें निस्सार आहे. कारण, नेहमीं वातादिकच रसरक्तादि धातूंस दूषित करितात. रस-रक्त कधींही वातादिकांस दूषित करूं शकत नाहीं. यावरून धातु, दोष नसून दूष्यच आहेत हें निर्विवाद ठरतें. विसर्प वगैरे रोग रक्तज म्हटले जातात. परंतु वास्तविक रक्तस्थ वातादि दोषांच्या बिघडण्यानेंच ते उत्पन्न होतात. त्यांस रक्तजसंज्ञा घृतदग्धन्यायानें (गरम तुपानें हात पोळला असें म्हटलें म्हणजे तो तुपांतील अग्नीनें पोळला हा भावार्थ,) दिलेली आहे. शिवाय वात-पित्त-कफ-प्रकृतीच्या मनुष्याचीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्याप्रमाणें रक्तप्रकृतीच्या मनुष्याचीं कोठेंही सांगितलीं नाहींत. यावरूनही रक्त दोष नाहीं हें निष्पन्न होतें.

वय[1], दिवस, रात्र व अन्नाचा पाककाल या प्रत्येकाचे तीन तीन भाग करून, पहिल्यांत कफाचें, दुसऱ्यांत पित्ताचें व तिसऱ्यांत वायूचें प्राबल्य समजावें.

तैर्भवेद्विषमस्तीक्ष्णो मंदश्चाग्निः समैः समः ॥ ८ ॥

जठराग्नि चार प्रकारचा आहे; वाताधिक्यानें विषम, पित्ताधिक्यानें तीक्ष्ण, कफाधिक्यानें मंद आणि तिन्ही दोष सारखे असल्यास सम असतो.

कोष्ठः क्रूरो मृदुर्मध्यो मध्यः स्यात्तैः समैरपि ।

वातादि दोषांच्या योगानें, जठराग्नीप्रमाणें कोठाही चार प्रकारचा आहे. वाताधिक्यानें क्रूर, पित्ताधिक्यानें मृदु, कफाधिक्यानें मध्यम आणि तिन्ही दोष सारख्या प्रमाणांत असले म्हणजे कोठाही मध्यम[2] असतो.

शुक्रार्तवस्थैर्जन्मादौ विषेणेव विषक्रमेः ॥ ९ ॥
तैश्च तिस्रः प्रकृतयो हीनमध्योत्तमाः पृथक् ।

आर्तव व वीर्य यांत असलेल्या वातादि दोषांच्या कमीजास्त प्रमाणानुरूप मनुष्याची अनुक्रमें कनिष्ठ, मध्यम व उत्तम अशी तीन प्रकारची प्रकृति उत्पन्न होते. ( दोषांच्या कमीजास्तपणासच विकृति म्हणतात. तेव्हां दोष विकृतावस्थेंत असतांना उत्पत्ति कशी होऊं शकेल, अशी शंका येईल म्हणून दृष्टांत दिला कीं, ) ज्याप्रमाणें विष, उदाहरणार्थ बचनाग, हें जात्या मारणारें असूनही त्यांत कृमि उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें गर्भांतील विकृत वात-पित्त-कफांपासून

---

१ म्हणजे बाळपणीं कफाचा जोर, तरुणपणीं पित्ताचा जोर आणि वृद्धपणीं वायूचा जोर असतो. दिवसा व रात्रीं ६ ते १० वाजेपर्यंत कफाधिक्य; १० ते २ पर्यंत पित्ताधिक्य व २ ते ६ पर्यंत वाताधिक्य असतें. भोजन केल्यापासून तें जिरून पुन्हां भूक लागेपर्यंत जो वेळ जातो त्यांत तीन अवस्था होतात. पहिल्या अवस्थेंत जेवल्याबरोबर अन्नाचा मधुरीभाव होतो व अन्न फेसाळ होतें; ही कफाची क्रिया. दुसरी अवस्था अन्नाच्या विदाहाची, अर्थात् पचण्याची; यांत पित्ताचा जोर असतो. तिसऱ्या अवस्थेंत पचनक्रिया बहुतेक संपलेली असते. त्या वेळीं वायूचा जोर असतो.

२ कफाच्या आधिक्यामुळें जर कोष्ठ मध्यम असेल, तर त्या मनुष्याला वमन चांगलें लागू होतें; आणि कफ कमी असल्यास विरेचन चांगलें लागू होतें.

मनुष्यांची प्रकृति उत्पन्न होते. ( वाताधिक्यापासून कनिष्ठ, पित्ताधिक्यानें मध्यम व कफाधिक्यानें उत्तम प्रकृति उत्पन्न होते. )

समधातुः समस्तासु श्रेष्ठा निंद्या द्विदोषजाः ॥ १० ॥

सर्वांत समधातुप्रकृति श्रेष्ठ होय. द्विदोषजन्य प्रकृति सर्वांत निन्द्य समजाव्या.

तत्र रूक्षो लघुः शीतः खरः सूक्ष्मश्चलोऽनिलः ।

वायु रूक्ष, हलका, थंड, खरखरीत, सूक्ष्म, व गमनशील आहे.

पित्तं सस्नेहतीक्ष्णोष्णं लघु विस्रं सरं द्रवम् ॥ ११ ॥

पित्त किंचित् स्निग्ध, तीक्ष्ण (लवकर क्रिया करणारें), उष्ण, हलकें, दुर्गंधि—माशासारखा हिरवट वास येत असलेलें, पसरणारें व पातळ आहे.

स्निग्धः शीतो गुरुर्मंदः श्लक्ष्णो मृत्स्नः स्थिरः कफः ।

कफ स्निग्ध, थंड, जड, मंद ( सावकाश क्रिया करणारा ), मृदु, चिकट बुळबुळीत व दाट आहे.

संसर्गः संन्निपातश्च तद्द्वित्रिक्षयकोपतः ॥ १२ ॥

वातादि तीन दोषांपैकीं कोणत्याही दोन दोषांचा संयोग झाला असतां त्यास संसर्ग म्हणतात; आणि तिन्हींचा संयोग झाला असतां त्यास सन्निपात म्हणतात.

रसासृङ्मांसमेदोऽस्थिमज्जाशुक्राणि धातवः ।

रस, रक्त, मांस, मेद ( चरबी ), हाडें, मज्जा व वीर्य हे सात धातु शरीरांत आहेत. यांसच दूष्य अशीही संज्ञा आहे.

सप्त दूष्याः मला मूत्रशकृत्स्वेदादयोऽपि च ॥ १३ ॥

मूत्र, विष्ठा, घाम इत्यादिकांस मल म्हणतात.

वृद्धिः समानैः सर्वेषां विपरीतैर्विपर्ययः ।

---

१ या ठिकाणीं धातु शब्द वात-पित्तादि दोषांस लाविला आहे. कारण, धातु शब्दाचा अर्थ, धारण करणारें असा आहे. वात-पित्त-कफ आपल्या प्रकृतावस्थेंत असले म्हणजे शरीरास धारण करितात; म्हणून त्यांस धातुसंज्ञाही आहे. ते बिघडले म्हणजे शरीरास दूषित करितात; म्हणून त्यांस मग दोष ही संज्ञा प्राप्त होते.

वातादि दोष, रसादि धातु, व मूत्रादि मल, या सर्वांची समान गुणांच्या पदार्थांनीं वृद्धि होते व विरुद्ध गुणांच्या पदार्थांनीं त्यांचा क्षय होतो.

रसाः स्वाद्वम्ललवणतिक्तोषणकषायकाः ॥ १४ ॥
षड् द्रव्यमाश्रितास्ते तु यथापूर्वं बलावहाः ।

गोड, आंबट, खारट, कडू, तिखट व तुरट असे एकंदर सहा रस आहेत. ते पदार्थांचा आश्रय करून असतात; स्वतंत्र असत नाहींत. त्यांत पूर्वपूर्व रस उत्तरोत्तर रसांपेक्षां अधिक शक्तिदायक आहे.

तत्राद्या मारुतं घ्नंति त्रयस्तिक्तादयः कफम् ॥ १५ ॥
कषायतिक्तमधुराः पित्तमन्ये तु कुर्वते ।

---

१ समानत्व किंवा विरुद्धत्व हीं तीन प्रकारचीं असूं शकतात. १ द्रव्य, २ गुण, ३ क्रिया. रक्तानें रक्त वाढतें, मांसानें मांस वाढतें, दूध जलतत्वप्रधान असल्यामुळें जलतत्वप्रधान कफास वाढवितें, दुधापासून होणारें तूप वीर्यास वाढवितें, जीवंती, काकोली वगैरे सोमात्मक वनस्पति, सोमात्मक कफ धातूपासून उत्पन्न होणारीं स्नेह, शक्ति, पुरुषत्व, ओज यांस वाढवितात. मिरें, चवक, चित्रक वगैरे बुद्धि, मेधा अग्नि, इत्यादिकांस वाढवितात. हीं द्रव्याचया वृद्धीचीं उदाहरणें होत. खजूर, खारीक वगैरे पदार्थ पृथ्वीतत्वप्रधान असूनही गुणांनीं स्निग्ध, जड, शीत असल्यामुळें, याच गुणांच्या जलतत्वप्रधान कफास वाढवितात. हीं गुणसंबंधीं उदाहरणें होत. क्रिया दोन प्रकारच्या; शारीरिक व मानासिक. धांवणें, उड्या मारणें, चालणें, वगैरे शारीरिक क्रिया, आणि काम, शोक, चिंता वगैरे मानासिक क्रिया. वायूचा व धांवणें, उड्या मारणें इत्यादि क्रियांचा चलत्व हा एक सामान्य धर्म असल्यामुळें या क्रियांनीं वायु वाढतो. काम, शोक चिंता वगैरेनींही मनाचा क्षोभ होत असल्यामुळें वायु वाढतो. क्रोध, ईर्ष्या वगैरे क्रिया व पित्त या दोहोंत संताप उत्पन्न करण्याचा एक समान धर्म असल्यामुळें, क्रोध-ईर्ष्यादिकांपासून पित्त वाढतें. झोंप, आळस, एके जागीं बसून राहणें वगैरे स्थिरतेचीं कर्में आहेत. त्यायोगानें स्थिरकर्मा कफाची वृद्धि होते. ही समान गुणासंबंधीं उदाहरणें झालीं. आतां विरुद्ध गुणांची उदाहरणें:—वातात्मक करडईच्या धान्यापासून पार्थिव मांसादिकांचा क्षय होतो. अग्नितत्वप्रधान क्षारानें जलतत्वप्रधान कफाचा क्षय होतो. कांजी स्वतः जलतत्वप्रधान असूनही जलतत्वप्रधान कफाच्या विरुद्ध लघुता, रूक्षता, उष्णता वगैरे गुण तिच्यांत असल्यामुळें, ती कफाचा क्षय करिते. झोंप, आळस वगैरे स्थिर क्रिया असल्यामुळें त्या तद्विरुद्ध चलधर्मा वायूचा क्षय करितात.

त्यांपैकीं पहिले तीन रस म्हणजे गोड, आंबट व खारट हे वायूचा नाश करितात; आणि कडू, तिखट, तुरट हे त्याचा प्रकोप करितात. कडू, तिखट व तुरट हे कफाचा नाश करितात. व बाकीचे तीन—गोड, आंबट, खारट त्यास वाढवितात. तुरट, कडू व गोड हे पित्ताचें शमन करितात, व आंबट, खारट, व तिखट हे पित्त वाढवितात.

शमनं कोपनं स्वस्थहितं द्रव्यमिति त्रिधा ॥ १६ ॥

एकंदर द्रव्यें तीन प्रकारचीं आहेत. कांहीं दोषांस शमविणारीं, कांहीं त्यांस वाढविणारीं, आणि कांहीं आरोग्य रक्षण करणारीं.

उष्णशीतगुणोत्कर्षात्तत्र वीर्यं द्विधा स्मृतम् ।

पदार्थांत उष्ण व शीत या दोन प्रकारचें वीर्य अथवा शक्ति आहे; ज्या द्रव्यांत उष्णतेचें प्राधान्य असतें त्यास उष्णवीर्य व ज्यांत शीतता विशेष असते त्यास शीतवीर्य म्हणतात.

त्रिधा विपाको द्रव्यस्य स्वाद्वम्लकटुकात्मकः ॥ १७ ॥

विपाक तीन प्रकारचे; गोड, आंबट व तिखट.

गुरुमंदहिमस्निग्धश्लक्ष्णसांद्रमृदुस्थिराः ।
गुणाः ससूक्ष्मविशदा विंशतिः सविपर्ययाः ॥ १८ ॥

जड, मंद, थंड, स्निग्ध, गुळगुळीत, दाट, नरम, स्थिर, सूक्ष्म व स्वच्छ हे दहा; आणि यांच्याच उलट—म्हणजे अनुक्रमें हलका, तीक्ष्ण, उष्ण, रूक्ष, खरखरीत, पातळ, कठिण, पसरणारा, स्थूल व बुळबुळीत हे दहा, असे एकंदर वीस गुण आहेत.

कालार्थकर्मणां योगो हीनमिथ्यातिमात्रकः ।
सम्यग्योगश्च विज्ञेयो रोगारोग्यैककारणम् ॥ १९ ॥

शीतोष्णादि काल, शब्दस्पर्शादि विषय आणि शारीरिक, वाचिक व मानसिक कर्मे यांचा वाजवीपेक्षां कमी, चुकीचा किंवा अतिशय संबंध घडणें हेंच एकंदर रोगांचें मूळ कारण आहे. आणि त्यांचा यथोचित उपयोग करणें हेंच आरोग्याचें मुख्य कारण होय.

रोगस्तु दोषवैषम्यं दोषसाम्यमरोगता ।

वातादि दोषांची विषमता म्हणजे प्रमाणापेक्षां कमीजास्त होणें याचेंच नांव रोग, आणि दोषांची जी समानावस्था तिचें नांव आरोग्य.

**निजागंतुविभागेन तत्र रोगा द्विधा स्मृताः ॥ २० ॥**

रोग निज व आगन्तु असे दोन प्रकारचे आहेत.

**तेषां कायमनोभेदादधिष्ठानमपि द्विधा ।**

रोगांचें अधिष्ठान म्हणजे उत्पत्तिस्थानही दोन प्रकारचें आहे. एक शरीर व दुसरें मन.

**रजस्तमश्च मनसो द्वौ च दोषावुदाहृतौ ॥ २१॥**

रज व तम हे दोन मनाचे दोष आहेत.

**दर्शनस्पर्शनप्रश्नैः परीक्षेताथ रोगिणम् ।**
**रोगं निदानप्राग्रूपलक्षणोपशयाप्तिभिः ॥ २२ ॥**

डोळ्यांनीं पाहून, हातानें स्पर्श करून व प्रश्न विचारून रोग्यांची परीक्षा[१] करावी. रोगाची परीक्षा निदान, पूर्वरूप, लक्षण, उपशय व सम्प्राप्ति या साधनांनीं करावी.

**भूमिदेहप्रभेदेन देशमाहुरिह द्विधा ।**

वैद्यकांत दोन प्रकारचा देश मानला जातो. एक भूमिदेश व दुसरा देहदेश.

**जांगलं वातभूयिष्ठमनूपं तु कफोल्बणम् ।**
**साधारणं सममलं त्रिधा भूदेशमादिशेत् ॥ २३ ॥**

भूमिदेश तीन प्रकारचा आहे. जांगल, अनूप व साधारण. जांगल देशांत वायूचा जोर असतो. अनूपदेशांत कफाधिक्य असतें व साधारण देशांत वातादि तिन्ही दोष सारख्या प्रमाणांत असतात.

**क्षणादिर्व्याध्यवस्था च कालो भेषजयोगकृत् ।**

काल दोन प्रकारचा आहे. एक क्षण, घटका, प्रहर वगैरे वेळ; आणि दुसरा रोगांची निरनिराळी स्थिति. औषध बरोबर लागू पडण्यास या दोन्ही प्रकारच्या काळांचा विचार करून तें दिलें पाहिजे.

---

१ खोकल्यांत कफ, प्रमेहांत लघ्वी, अतिसारांत जुलाब यांचा रंग, आकार इत्यादि पाहून रोगपरीक्षा होते. तापाची उष्णता, गुल्माचा कठिणपणा, नरमपणा, लहानमोठा आकार वगैरे हस्तस्पर्शानें जाणतां येतात. शरीरांतील वेदना, रुचि-अरुचि, कोठ्याचा जड-हलकेपणा, जन्मापासून झालेले रोग, स्वप्न वगैरे गोष्टींची माहिती रोग्यास विचारूनच मिळविली पाहिजे.

**शोधनं शमनं चेति समासादौषधं द्विधा ॥ २४ ॥**

औषधें संक्षेपानें दोन प्रकारचीं. शोधन व शमन.

**शरीरजानां दोषाणां क्रमेण परमौषधम् ।**
**बस्तिर्विरेको वमनं तथा तैलं घृतं मधु ॥ २५ ॥**

शारीरिक ( वात-पित्त-कफ ) दोषांवर अनुक्रमें बस्ति, रेचन व वमन हीं तीन शोधन औषधें, आणि अनुक्रमें तेल, तूप व मध हीं शमन औषधें सर्वोत्तम आहेत.

**धीधैर्यात्मादिविज्ञानं मनोदोषौषधं परम् ।**

मानसिक विकारांवर श्रेष्ठ औषध म्हणजे विवेक, धैर्य, आत्मज्ञान वगैरेच होत.

**भिषग् द्रव्याण्युपस्थाता रोगी पादचतुष्टयम् ॥ २६ ॥**
**चिकित्सितस्य निर्दिष्टं प्रत्येकं तच्चतुर्गुणम् ।**

वैद्य, औषधें, सेवक व रोगी हे चिकित्सेचे चार पाद आहेत. या प्रत्येकांत चार चार गुण असले पाहिजेत.

**दक्षस्तीर्थात्तशास्त्रार्थो दृष्टकर्मा शुचिर्भिषक् ॥ २७ ॥**

वैद्य आपल्या क्रियेंत चतुर, गुरूजवळ वैद्यशास्त्र शिकलेला, शेंकडों रोगांची चिकित्सा केलेला—अनुभवी, व शुचिर्भूत असा पाहिजे.

**बहुकल्पं बहुगुणं संपन्नं योग्यमौषधम् ।**

औषध पुष्कळ रीतींनीं देतां येण्यासारखें, अनेक रोगांवर चालणारें, गुणयुक्त आणि योग्य असें असावें.

**अनुरक्तः शुचिर्दक्षो बुद्धिमान् परिचारकः ॥ २८ ॥**

सेवक रोग्यावर प्रीति करणारा, शुचिर्भूत, चतुर व बुद्धिमान् असा असावा.

**आढ्यो रोगी भिषग्वश्यो ज्ञापकः सत्त्ववानपि**

रोगी श्रीमंत, वैद्याचें ऐकणारा, वैद्यास आपली एकंदर सविस्तर हकीकत सांगणारा व धैर्यशील असा असावा.

**सर्वौषधक्षमे देहे यूनः पुंसो जितात्मनः ॥ २९ ॥**
**अमर्मगोऽल्पहेत्वग्ररूपरूपोऽनुपद्रवः ।**
**अतुल्यदूष्यदेशर्तुप्रकृतिः पादसंपदि ॥ ३० ॥**

ग्रहेष्वनुगुणेष्वेकदोषमार्गो नवः सुखः ।

सर्व प्रकारचीं औषधें सहन करूं शकणाऱ्या तरुण, जितेंद्रिय, अशा पुरुषास हृदय, मस्तक वगैरे मर्मस्थानें सोडून उत्पन्न झालेला; ज्याचीं कारणें, पूर्वरूपें व लक्षणें साधारण आहेत; ज्यांत उपद्रव झालेले नाहींत; ज्यांचे दूष्य, देश, ऋतु व प्रकृति हे असमान आहेत; ज्यांत पूर्वोक्त वैद्यादि पादचतुष्टय असावें तसें गुणवान् आहे; जो अनुकूल ग्रहदशेंत व एकाच दोषापासून उत्पन्न झाला आहे; जो बाह्य, आभ्यन्तर व मध्य या तिहींपैकीं कोणत्या तरी एकाच मार्गांत उत्पन्न झाला आहे, व जो नवा आहे, असा रोग सुखसाध्य समजावा.

शस्त्रादिसाधनः कृच्छ्रः संकरे च ततो गदः ॥ ३१ ॥

ज्या रोगांत, शस्त्र, दाह, क्षार वगैरे क्रिया कराव्या लागतात; अथवा ज्यांत वर सांगितलेल्या सुखसाध्य लक्षणांपैकीं कांहीं गोष्टी विपरीत असतात, तो कृच्छ्रसाध्य ( मोठ्या उपायांनीं व उशिरां बरा होणारा ) समजावा.

शेषत्वादायुषो याप्यः पथ्याभ्यासाद्विपर्यये ।

पूर्वोक्त सुखसाध्य लक्षणें वहुतेक उलट असतां, केवळ आयुष्य शिल्लक असल्यामुळें, हितकर आहारविहारांनीं जो रोग तात्पुरता दबला जातो त्यास याप्य म्हणतात.

अनुपक्रम एव स्यात्स्थितोऽत्यंतविपर्यये ॥ ३२ ॥
औत्सुक्यमोहारतिकृद्दृष्टरिष्टोऽक्षनाशनः ।

ज्या रोगांत वर सांगितलेलीं सर्वच लक्षणें अगदीं उलट असतात; रोग्यास विषयोत्कंठा लागते, चित्तभ्रम व अस्वस्थता हीं उत्पन्न होतात, मृत्युसूचक चिन्हें दिसूं लागतात, आणि इंद्रियांची शक्ति नष्ट होते, तो चिकित्सा करण्यास योग्य नाहीं असें समजावें.

त्यजेदार्तं भिषग्भूपैर्द्विष्टं तेषां द्विषं द्विषम् ॥ ३३ ॥
हीनोपकरणं व्यग्रमविधेयं गतायुषम् ।
चंडं शोकातुरं भीरुं कृतघ्नं वैद्यमानिनम् ॥ ३४ ॥

राजे ज्याचा द्वेष करितात किंवा जो स्वतः राजांचा द्वेष करितो, जो आपल्याशीं शत्रुता करितो, ज्याच्या जवळ पुरतीं साधनें नाहींत, ज्यास इतर कामें फार आहेत, जो रागीट, शोकातुर, भित्रा, कृतघ्न व उगीच वैद्यपणाची घमेंड बाळगतो, अशा रोग्याची चिकित्सा वैद्यानें करूं नये.

तंत्रस्यास्य परं चातो वक्ष्यतेऽध्यायसंग्रहः ।

आतां यापुढें या ग्रंथांतील एकंदर अध्यायांची अनुक्रमणिका सांगतों.

आयुष्कामदिनर्त्वीहारोगानुत्पादनद्रवाः ॥ ३५ ॥
अन्नज्ञानान्नसंरक्षामात्राद्रव्यरसाश्रयाः ।
दोषादिज्ञानतद्भेदतच्चिकित्साद्व्युपक्रमः ॥ ३६ ॥
शुद्ध्यादिस्नेहनस्वेदरेकास्थापननावनम् ।
धूमगंडूषदृक्सेकतृप्तियंत्रकशस्त्रकम् ॥ ३७ ॥
शिराविधिः शल्यविधिः शस्त्रक्षाराग्निकर्मकौ ।
सूत्रस्थानमिमेऽध्यायास्त्रिंशत्-

सूत्रस्थानांत एकंदर तीस अध्याय आहेत. त्यांचीं नांवें— १ आयुष्कामीय, २ दिनचर्या, ३ ऋतुचर्या, ४ रोगानुत्पादनीय ५ द्रवद्रव्यविज्ञानीय, ६ अन्नस्वरूपविज्ञानीय, ७ अन्नरक्षा, ८ मात्राशितीय, ९ द्रव्यादिविज्ञानीय, १० रसभेदीय, ११ दोषादिविज्ञानीय, १२ दोषभेदीय, १३ दोषोपक्रमणीय, १४ द्विविधोपक्रमणीय, १५ शोधनादिगणसंग्रह, १६ स्नेहविधि, १७ स्वेदविधि, १८ वमनविरेचनविधि, १९ बस्तिविधि, २० नस्यविधि, २१ धूमपानविधि, २२ गण्डूषादिविधि; २३ आश्चोतनाञ्जनविधि, २४ तर्पणपुटपाकविधि, २५ यंत्रविधि, २६ शस्त्रविधि, २७ सिराव्यधविधि, २८ शल्याहरणविधि, २८ शस्त्रकर्मविधि, ३० क्षाराग्निकर्मविधि.

शारीरमुच्यते ॥ ३८ ॥
गर्भावक्रांतितद्व्यापदंगमर्मविभागिकम् ।
विकृतिर्दूतजं षष्ठम्-

आतां शारीरस्थानांतील अध्याय सांगतों—१ गर्भावक्रांति, २

गर्भव्यापत्, ३ अंगविभाग, ४ मर्मविभाग, ५ विकृतिविज्ञानीय, व ६ दूतविज्ञानीय.

निदानं सार्वरौगिकम्॥ ३९ ॥
ज्वरासृक्श्वासयक्ष्मादिमदाद्यर्शोऽतिसारिणाम्।
मूत्राघातप्रमेहाणां विद्रध्याद्युदरस्य च ॥ ४० ॥
पांडुकुष्ठानिलार्तानां वातास्रस्य च षोडश।

निदानस्थानांत पुढील सोळा अध्याय आहेतः—१ सर्वरोग-निदान, २ ज्वरनिदान, ३ रक्तपित्तकासनिदान, ४ श्वासहिक्का-निदान, ५ राजयक्ष्मादिनिदान, ६ मदात्ययनिदान. ७ अर्शो-निदान. ८ अतिसारग्रहणीदोषनिदान, ९ मूत्राघातनिदान, १० प्रमेहनिदान, ११ विद्रधि-वृद्धि-गुल्मनिदान, १२ उदरनिदान, १३ पांडु-शोफ-विसर्पनिदान, १४ कुष्ट-श्वित्र-कृमिनिदान, १५ वातव्यधिनिदान, १६ वातशोणितनिदान.

चिकित्सितं ज्वरे रक्ते कासे श्वासे च यक्ष्मणि ॥ ४१ ॥
वमौ मदात्ययेऽर्शःसु विशि द्वौ द्वौ च मूत्रिते।
विद्रधौ गुल्मजठरपांडुशोफविसर्पिषु ॥ ४२ ॥
कुष्ठश्वित्रानिलव्याधिवातास्रेषु चिकित्सितम्।
द्वाविंशतिरिमेऽध्यायाः—

चिकित्सास्थानांत बावीस अध्याय आहेत. १ ज्वरचिकित्सा. २ रक्तपित्तचिकित्सा. ३ कासचिकित्सा. ४ श्वास-हिक्काचिकित्सा. ५ राजयक्ष्माचिकित्सा. ६ छर्दिहृद्रोगतृष्णाचिकित्सा. ७ मदात्ययाचि-कित्सा. ८ अर्शश्चिकित्सा. ९ अतिसारचिकित्सा. १० ग्रहणीचिकित्सा. ११ मूत्राघातचिकित्सा. १२ प्रमेहचिकित्सा. १३ विद्रधिवृद्धि-चिकित्सा. १४ गुल्मचिकित्सा. १५ उदरचिकित्सा. १६. पाण्डु-रोगचिकित्सा. १७ श्वयथुचिकित्सा. १८ विसर्पचिकित्सा. १९ कुष्ठचिकित्सा. २० श्वित्र-कृमिचिकित्सा. २१ वातव्याधि-चिकित्सा. २२ वातशोणितचिकित्सा.

कल्पसिद्धिरतः परम् ॥ ४३ ॥
कल्पो वमेर्विरेकस्य तत्सिद्धिर्बस्तिकल्पना।
सिद्धिर्बस्त्यापदां षष्ठो द्रव्यकल्पः—

आतां कल्पस्थानाचे अध्याय सांगतों. १ वमनकल्प, २ विरेचनकल्प, ३ वमनविरेचनव्यापत्तिसिद्धि, ४ बस्तिकल्प, ५ बस्तिव्यापत्तिसिद्धि, व ६ भेषजकल्प.

अत उत्तरम् ॥ ४४ ॥
बालोपचारे तद्व्याधौ तद्ग्रहे द्वौ च भूतगौ ।
उन्मादेऽथ स्मृतिभ्रंशे द्वौ द्वौ वर्त्मसु संधिषु ॥ ४५ ॥
दृक्कमोर्लिंगनाशेषु त्रयो द्वौ द्वौ च सर्वगौ ।
कर्णनासामुखशिरोव्रणे भग्ने भगंदरे ॥ ४६ ॥
ग्रंथ्यादौ क्षुद्ररोगेषु गुह्यरोगे पृथग्द्वयम् ।
विषे भुजंगे कीटेषु मूषकेषु रसायने ॥ ४७ ॥
चत्वारिंशोऽनपत्यानामध्यायो बीजपोषणः ॥ ४८ ॥

आतां उत्तरतंत्रांतील अध्याय सांगतों. १ बालोपचरणीय, २ बालामयप्रतिषेध, ३ बालग्रहप्रतिषेध, ४ भूतविज्ञानीय, ५ भूतप्रतिषेध, ६ उन्मादप्रतिषेध, ७ अपस्मारप्रतिषेध, ८ वर्त्मरोगविज्ञानीय, ९ वर्त्मरोगप्रतिषेध, १० संधिसितासितरोगविज्ञानीय, ११ संधिसितासितप्रतिषेध, १२ दृष्टिरोगविज्ञानीय, १३ तिमिरप्रतिषेध, १४ लिङ्गनाशप्रतिषेध, १५ सर्वाक्षिरोगविज्ञानीय, १६ सर्वाक्षिरोगप्रतिषेध, १७ कर्णरोगविज्ञान, १८ कर्णरोगप्रतिषेध, १९ नासारोगविज्ञान, २० नासारोगप्रतिषेध, २१ मुखरोगविज्ञान, २२ मुखरोगप्रतिषेध, २३ शिरोरोगविज्ञान, २४ शिरोरोगप्रतिषेध, २५ व्रणविज्ञानप्रतिषेध, २६ सद्योव्रणप्रतिषेध, २७ भंगप्रतिषेध, २८ भगंदरप्रतिषेध, २९ ग्रन्थ्यर्बुदश्लीपदादिविज्ञानीय, ३० ग्रन्थ्यर्बुदादिप्रतिषेध, ३१ क्षुद्ररोगविज्ञानीय, ३२ क्षुद्ररोगप्रतिषेध, ३३ गुह्यरोगविज्ञानीय, ३४ गुह्यरोगप्रतिषेध, ३५ विषप्रतिषेध, ३६ सर्पविषप्रतिषेध, ३७ कीटलूतादिविषप्रतिषेध, ३८ मूषिकालर्कविषप्रतिषेध, ३९ रसायनाध्याय, व ४० वाजीकरणाध्याय.

इत्यध्यायशतं विंशं षड्भिः स्थानैरुदीरितम् ॥ ४९ ॥

याप्रमाणें या ग्रंथाच्या सहा स्थानांत एकंदर १२० अध्याय सांगितले आहेत.

---

## अध्याय दुसरा.

अथातो दिनचर्याध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां आम्ही दररोज कसें वागावें, हें सांगणार आहों.

ब्राह्मे मुहुर्ते उत्तिष्ठेत्स्वस्थो रक्षार्थमायुषः ।
शरीरचिंतां निर्वर्त्य कृतशौचविधिस्ततः ॥ १ ॥
अर्कन्यग्रोधखदिरकरंजककुभादिकम् ।
प्रातर्भुक्त्वा च मृद्वग्रं कषायकटुतिक्तकम् ।
भक्षयेद्दंतधवनं दंतमांसान्यबाधयन् ॥ ३ ॥

निरोगी मनुष्यानें आपल्या शरीराचें रक्षण व्हावें यासाठीं, ब्राह्ममुहूर्तावर म्हणजे चार घटका रात्र असतां उठावें. नंतर रात्रीचें जेवण जिरलें न जिरलें याचा विचार करून, शौच-मुखमार्जन उरकून, रुई, वड, खैर, करंज, अर्जुनसादडा वगैरे तुरट, तिखट किंवा कडू वृक्षांच्या कोंवळ्या काड्यांचीं टोंकें चावून त्यांनीं हिरड्यांस इजा न होईल अशा रीतीनें दांत घांसावे. याप्रमाणें जेवल्यानंतरही पुन्हा करावें.

नाद्यादजीर्णवमथुश्वासकासज्वरार्दिती ।
तृष्णास्यपाकहृन्नेत्रशिरःकर्णामयी च तत् ॥ ४ ॥

अजीर्ण, वांति, दमा, खोकला, ताप, अर्दितवायु ( ज्यांत तोंड वाकडें होतें तो, ) तहान, तोंड येणें, हृद्रोग, नेत्ररोग, मस्तक रोग व कानाचे रोग, हे विकार ज्यास असतील त्यानें हें दंतधावन करूं नये.

सौवीरमंजनं नित्यं हितमक्ष्णोस्ततो भजेत् ।

दंतधावनानंतर नित्य डोळ्यांत सुरमा घालावा, तो डोळ्यांस हितकर आहे.

चक्षुस्तेजोमयं तस्य विशेषात् श्लेष्मणो भयम् ॥ ५ ॥
योजयेत्सप्तरात्रेऽस्मात्स्रावणार्थं रसांजनम् ।

डोळे तेजोमय असल्यामुळें, त्यांस विशेषतः सुरमा घातल्यामुळें कफदोषापासून भीति असते; करितां पाणी निघून जाण्यासाठीं

---

१ ब्रह्म=ज्ञान, त्याकरितां जें अध्ययन, चिंतन वगैरे करणें तेंही ब्रह्मच; त्याच्या योग्य जो काळ तो ब्राह्ममुहूर्त.

आठवड्यांतून एकदां डोळ्यांत रसांजन (दारुदळदीचा शिरा) घालावें.

ततो नावनगंडूषधूमतांबूलभाग्भवेत् ॥ ६ ॥

अंजनानंतर नस्य, गुळण्या, व धूम्रपान करावें व विडा खावा.

तांबूलं क्षतपित्तास्त्ररूक्षोत्कुपितचक्षुषाम् ।
विषमूर्छामदार्तानामपथ्यं शोषिणामपि ॥ ७ ॥

क्षत व रक्तपित्त झालेले, अंगीं विशेष रूक्षता असलेले, डोळे आलेले, विष, मूर्च्छा व मद यांनीं पीडित व क्षयी अशा मनुष्यांस विडा हितकर नाहीं.

अभ्यंगमाचरेन्नित्यं स जराश्रमवातहा ।
दृष्टिप्रसादपुष्ट्यायुःस्वप्नसुत्वक्त्वदार्ढ्यकृत् ॥ ८ ॥
शिरःश्रवणपादेषु तं विशेषेण शीलयेत् ।

रोज अभ्यंग (तेल चोळणें) करावा. तो म्हातारपण, श्रम व वायु यांचा नाश करून दृष्टि स्वच्छ करितो; पुष्टि देतो; आयुष्य वाढवितो; झोंप आणतो; अंगाची त्वचा नरम करितो व शरीर बळकट बनवितो. विशेषेंकरून डोकें, कान व पाय या ठिकाणीं तर तो नेहमीं अवश्य करावा.

वर्ज्योऽभ्यंगः कफग्रस्तकृतसंशुद्ध्यजीर्णिभिः ॥ ९ ॥

ज्यांस कफविकार झाले आहेत, ज्यांनीं वमन-विरेचन घेतलें आहे, व ज्यांस अजीर्ण झालें आहे, अशा मनुष्यांनीं अभ्यंग करूं नये.

लाघवं कर्मसामर्थ्यं दीप्तोऽग्निर्मेदसः क्षयः ।
विभक्तघनगात्रत्वं व्यायामादुपजायते ॥ १० ॥

व्यायाम[1] केल्यानें शरीर हलकें होतें; काम करण्याची शक्ति येते; अग्नि प्रदीप्त होतो; मेद झडतो आणि शरीर पिळदार व भरींव होतें.

वातपित्तामयी बालो वृद्धोऽजीर्णी च तं त्यजेत् ।

वात-पित्तरोगी आणि सोळा वर्षांपेक्षां कमी (मुलें) व सत्तरांपेक्षां जास्त वयाच्या (वृद्ध) मनुष्यांनीं व्यायाम करूं नये.

---

१ 'शरीरायासजनकं कर्म व्यायाम उच्यते' असें संग्रहांत व्यायामाचें लक्षण सांगितलें आहे. शरीराला श्रम होतील अशा क्रिया करणें, हा त्याचा अर्थ आहे.

अर्धशक्त्या निषेव्यस्तु बलिभिः स्निग्धभोजिभिः ॥ ११ ॥
शीतकाले वसंते च मंदमेव ततोऽन्यदा ।

बलिष्ठ व स्निग्ध भोजन करणाऱ्या मनुष्यांनीं शीतकाळीं व वसंत ऋतूंत आपल्या शक्तीच्या निम्मे[1] व्यायाम करावा, आणि इतर ऋतूंत तर अगदींच थोडा करावा.

तं कृत्वाऽनु सुखं देहं मर्दयेच्च समंततः ॥ १२ ॥

व्यायाम केल्यानंतर सुख होईल अशा रीतीनें सर्वांग रगडून घ्यावें.

तृष्णा क्षयः प्रतमको रक्तपित्तं श्रमः क्लमः ।
अतिव्यायामतः कासो ज्वरश्छर्दिश्च जायते ॥ १३ ॥

वाजवीपेक्षां फाजील व्यायाम केल्यानें तृषा, क्षय, तमकश्वास, रक्तपित्त, श्रम, ग्लानि, खोकला, ताप व उलटी हे विकार होतात.

व्यायामजागराध्वस्त्रीहास्यभाष्यादिसाहसम् ।
गजं सिंह इवाकर्षन् भजन्नति विनश्यति ॥ १४ ॥

व्यायाम, जागरण, मार्ग चालणें, स्त्रीसंग, हंसणें, बोलणें, इत्यादि साहसिक गोष्टी अतिशय केल्यानें, हत्तीला ओढूं पाहणाऱ्या सिंहाप्रमाणें[2] मनुष्याचा नाश होतो.

उद्वर्तनं कफहरं मेदसः प्रविलापनम् ।
स्थिरीकरणमंगानां त्वक्प्रसादकरं परम् ॥ १५ ॥

अंगास उटणें लावल्यानें कफ नाहींसा होतो, मेद झडतो, शरीर दृढ होतें आणि त्वचा फार नरम व निर्मल होते.

दीपनं वृष्यमायुष्यं स्नानमूर्जाबलप्रदम् ।
कंडूमलश्रमस्वेदतंद्रातृड्दाहपाप्मजित् ॥ १६ ॥

स्नानानें जठराग्नि, पुरुषत्व, आयुष्य, उत्साह व शक्ति यांची वृद्धि होते, आणि खाज, मळ, थकवा, घाम, झांपड, तहान, दाह व पाप यांचा परिहार होतो.

---

१ कपाळ, नाक, सांधे, व खांका यांना घाम आला म्हणजे अर्धी शक्ति झाली म्हणून समजावें. सुश्रुत.

२ सिंह जरी हत्तीला मारूं शकतो, तरी त्याच्यानें हत्तीला ओढून नेववणार नाहीं. जर त्यानें ओढून नेण्याचा साहसी प्रयत्न केला, तर त्याचा नाश होतो. याचप्रमाणें घाम आल्यावर व्यायाम करितां येणार नाहीं, असें नव्हे; तर केल्यास नाश होईल.

उष्णांबुनाधःकायस्य परिषेको बलावहः।
तेनैव चोत्तमांगस्य बलहृत्केशचक्षुषाम् ॥ १७ ॥

गळयाखालीं ऊन पाण्याचें स्नान केल्यानें शक्ति वाढते. परंतु डोक्यावरून ऊन पाणी घेतलें असतां केंस व डोळे यांस इजा होते.

स्नानमर्दितनेत्रास्यकर्णरोगातिसारिषु।
आध्मानपीनसाजीर्णभुक्तवत्सु च गर्हितम् ॥ १८ ॥

ज्यास अर्दित वायु, नेत्ररोग, कर्णरोग, अतिसार, पोटफुगी, पीनस व अजीर्ण हे रोग झाले असतील त्यानें, व जेवल्यावर कोणींही स्नान करूं नये.

जीर्णे हितं मितं चाद्यान्न वेगानीरयेद्बलात्।
न वेगितोऽन्यकार्यः स्यान्नाजित्वा साध्यमामयम् ॥ १९ ॥

पूर्वीचें जेवण जिरल्यानंतर हितकर अन्न योग्य प्रमाणानें खावें. अधोवायु, मलमूत्रादिकांचे वेग जोरानें प्रवृत्त करूं नये; व ते आले असतां थांबवून दुसरें काम करूं नये. तसेंच एखादा रोग झाल्यास तो साध्य असतां बरा केल्यावांचून दुसरें काम करूं नये.

सुखार्थाः सर्वभूतानां मताः सर्वाः प्रवृत्तयः।
सुखं च न विना धर्मात्तस्माद्धर्मपरो भवेत् ॥ २० ॥

प्राणिमात्राचे एकंदर प्रयत्न सुखाकरितां चालले आहेत; व सुख तर धर्मावांचून मिळत नाहीं; म्हणून सर्वांनीं नेहमीं धर्मनिष्ठ असावें.

भक्त्या कल्याणमित्राणि सेवेतेतरदूरगः।

आपलें खरें कल्याण इच्छिणाऱ्या सन्मित्रांशीं प्रेमानें व आदरानें स्नेह करावा आणि दुर्जनांपासून दूर असावें.

हिंसास्तेयान्यथाकामं पैशून्यं परुषानृते ॥ २१ ॥
संभिन्नालापव्यापादमभिध्यादृग्विपर्ययम्।
पापं कर्मेति दशधा कायवाङ्मानसैस्त्यजेत् ॥ २२ ॥

हिंसा, चोरी, व निषिद्ध कामवासना, ( हीं तीन शारीरिक ); चहाडी, कठोर, खोटें व असंबद्ध बोलणें ( हीं चार वाचिक );

---

१ यांत साधारण मार्ग म्हटला म्हणजे गळ्याखालच्या भागांवर चांगलें ऊन पाणी घ्यावें व डोक्यावर कोमट पाणी घ्यावें. म्हणजे अरुणदत्त, हेमाद्रि, यांच्या म्हणण्यास विरोध येणार नाहीं.

आणि दुसऱ्याचा घात करण्याची इच्छा, मत्सर व खोटी समजूत ( हीं तीन मानसिक ) अशीं एकंदर दहा पापकर्मे वर्ज्य करावीं.

अवृत्तिव्याधिशोकार्तानुवर्तेत शक्तितः।

गरीब निराधार, रोगग्रस्त व शोकपीडित अशा मनुष्यांस यथाशक्ति मदत करावी.

आत्मवत्सततं पश्येदपि कीटपिपीलिकम् ॥ २३ ॥

कीड-मुंगीस देखील नेहमीं आपल्यासारखें समजावें. ( म्हणजे त्यांनासुद्धां त्रास देऊं नये. )

अर्चयेद्देवगोविप्रवृद्धवैद्यनृपातिथीन्।
विमुखान्नार्थिनः कुर्यान्नावमन्येत नाक्षिपेत्॥ २४ ॥

देव, गाई, ब्राह्मण, वृद्ध, राजा, व अतिथि यांची पूजा करावी. याचकांना कांहीं न देतां विमुख घालवूं नये, त्यांचा अपमान करूं नये व कठोर शब्द बोलूं नये.

उपकारप्रधानः स्यादपकारपरेऽप्यरौ।

शत्रु जरी आपला अपकार करीत असला तरी आपण त्याच्यावर उपकारच करीत असावें.

संपद्विपत्स्वेकमना हेतावीर्ष्येत्फले न तु ॥ २५ ॥

संपत्ति व विपत्ति या दोन्ही अवस्थांत हर्ष किंवा विषाद न मानतां एकसारखी चित्तवृत्ति ठेवावी. दुसऱ्याच्या गुणांविषयीं ईर्षा बाळगावी. परंतु त्यापासून त्यास ऐश्वर्य मिळालें असल्यास त्या ऐश्वर्याची ईर्षा कधीं करूं नये.

काले हितं मितं ब्रूयादविसंवादि पेशलम्।

योग्यकाळीं, हितकर, थोडें, गोड व सत्य असें भाषण करावें.

पूर्वाभिभाषी सुमुखः सुशीलः करुणामृदुः ॥ २६ ॥
नैकः सुखी न सर्वत्र विश्रब्धो न च शंकितः।

कोणी भेटल्यास त्याला प्रसन्न मुद्रेनें, सुशीलतेनें, दयार्द्र अंतःकरणानें आपणच प्रथम कुशलप्रश्नादिक विचारावें. एकट्यानेंच सुखाचा वाटा घेऊं नये. सर्वांवरच विश्वास ठेवूं नये, तसेंच सर्वांविषयीं शंकाही घेऊं नये.

न कंचिदात्मनः शत्रुं नात्मानं कस्यचिद्रिपुम्॥ २७ ॥

प्रकाशयेन्नापमानं न च निःस्नेहतां प्रभोः ।

आपला कोणी शत्रु आहे, किंवा आपण कोणाचे शत्रु आहों, असें लोकांत प्रगट करूं नये. आपला अपमान झाला असतां तो सांगू नये. तसेंच आपल्या धन्याची आपल्यावर इतराजी झाली असतां तीही उघड करूं नये.

जनस्याशयमालक्ष्य यो यथा परितुष्यति ॥ २८ ॥
तं तथैवानुवर्तेत पराराधनपंडितः ।

दुसऱ्यास संतोष देण्यास तत्पर मनुष्यानें दुसऱ्याचें मन प्रसन्न राखण्याविषयीं नेहमीं काळजी घेऊन प्रत्येक मनुष्याचा अभिप्राय लक्ष्यांत आणून, त्यास संतोष होईल अशा रीतीनें वागावें.

न पीडयेदिंद्रियाणि न चैतान्यतिलालयेत् ॥ २९ ॥

इंद्रियांचा फार निग्रहही करूं नये व त्यांचे अतिशय लाडही करूं नयेत.

त्रिवर्गशून्यं नारंभं भजेत्तं चाविरोधयन् ।
अनुयायात्प्रतिपदं सर्वधर्मेषु मध्यमाम् ॥ ३० ॥

ज्यांत धर्म, अर्थ व काम यांपैकीं कोणताच पुरुषार्थ साधत नाहीं असा उद्योग करूं नये. यांचा परस्पर विरोध नसेल त्या ठिकाणीं सर्व धर्मांतील मध्यम मार्गाचें अनुसरण करावें.

नीचरोमनखश्मश्रुर्निर्मलांघ्रिमलायनः ।
स्नानशीलः सुसुरभिः सुवेषोऽनुल्बणोज्वलः ॥ ३१ ॥
धारयेत्सततं रत्नसिद्धमंत्रमहौषधीः ।

केंस, नखें, दाढी, मिशा फार वाढवूं नयेत. आणि पाय, कान, नाक वगैरे मलद्वारें निर्मळ ठेवावीं. प्रतिदिवशीं स्नान करून, सुगंधि द्रव्यें अंगास लावून चांगला शोभिवंत, साधा पण भपकेदार नसलेला स्वच्छ पोषाक करावा; आणि हिरे-मोतीं वगैरे रत्नें, सहदेव्यादि महौषधि व सिद्ध मंत्रांचे ताईत नेहमीं अंगावर धारण करावे.

सातपत्रपदत्राणो विचरेद्युगमात्रदृक् ॥ ३२ ॥
निशि चात्ययिके कार्ये दंडी मौली सहायवान् ।

डोक्यावर छत्री धरून व पायांत जोडा घालून पुढें चार हातांवर दृष्टि ठेवून चालावें. कांहीं बिकट प्रसंगीं रात्रीं बाहेर जाणें

झाल्यास हातांत काठी, डोक्यावर रुमाल वगैरे शिरोवेष्टन आणि बरोबर एखादा सोबती घेऊन जावें.

चैत्यपूज्यध्वजाशस्तच्छायाभस्मतुषाशुचीन् ॥ ३३ ॥
नाक्रामेच्छर्करालोष्टबलिस्नानभुवोऽपि च ।

पूज्य पिंपळ किंवा दुसरा एखादा देवताधिष्ठित पूज्य वृक्ष, गुरु गुरुपुत्र वगैरे पूज्यपुरुष, ध्वज, आणि चांडाळादि नीच लोक यांची सावली; राख, कोंडा व मलमूत्रादि गलिच्छ पदार्थ ओलांडून जाऊं नये. तसेंच रेती, ढेंकळाची जमीन, आणि पूजेची व स्नानाची जागा यांतूनही जाऊं नये.

नदीं तरेन्न बाहुभ्यां नाग्निस्कंधमभि व्रजेत् ॥ ३४ ॥
संदिग्धनावं वृक्षं च नारोहेद्दुष्टयानवत् ।

नदी पोहून परतीरीं जाऊं नये. अग्नीच्या ज्वाळेसमोर जाऊं नये. जी नाव बुडेल अशी शंका असेल तींत बसूं नये. जें झाड पडेल अशी शंका असेल त्यावर चढूं नये. तसेंच खोडकर जनावरावर बसूं नये.

नासंवृतमुखः कुर्यात्क्षुतिहास्यविजृंभणम् ॥ ३५ ॥

तोंडावर हात किंवा रुमाल धरल्यावांचून शिंकूं नये, हंसूं नये व जांभई देऊं नये.

नासिकां न विकुष्णीयान्नाकस्माद्विलिखेद्भुवम् ।
नांगैश्चेष्टेत विगुणं नासीतोत्कटकास्थितः ॥ ३६ ॥

उगीच एकसारखें नाक कोरीत बसूं नये, उगीच जमिनीवर रेखाटूं नये, वेडींवांकडीं अंगें करूं नयेत व फार वेळ उकिडवें बसूं नये.

देहवाक्चेतसां चेष्टाः प्राक् श्रमाद्विनिवर्तयेत् ।

शारीरिक, वाचिक व मानसिक क्रिया थकवा येण्यापूर्वीं बंद कराव्या.

नोर्ध्वजानुश्चिरं तिष्ठेत्

गुडघे वर करून फार वेळ बसूं नये.

नक्तं सेवेत न द्रुमम् ॥ ३७ ॥

रात्रीं झाडाखालीं राहूं नये.

तथा चत्वरचैत्यांतश्चतुष्पथसुरालयान् ।
सूनाटवीशून्यगृहश्मशानानि दिवापि न ॥ ३८ ॥

तसेंच अंगणांत, देवताधिष्ठित पिंपळ वगैरे पूज्य वृक्षाजवळ, चवाठ्यावर व देवळांत रात्रीं निजूं किंवा बसूं नये. व वधस्थान, अरण्य, ओसाड घर व स्मशान यांत दिवसाही निजूं किंवा बसूं नये.

सर्वथेक्षेत नादित्यं न भारं शिरसा वहेत् ।
नेक्षेत प्रततं सूक्ष्मदीप्तामेध्याप्रियाणि च ॥ ३९ ॥

सूर्याकडे मुळींच पाहूं नये. डोक्यावरून ओझें वाहूं नये. बारीक चकचकीत ( देदीप्यमान ), अपवित्र, व अप्रिय अशा पदार्थांकडे एकसारखें टक लावून पाहत राहूं नये.

मद्यविक्रयसंधानदानादानानि नाचरेत् ।

मद्य विकणें, तयार करणें, देणें व घेणें या गोष्टी करूं नयेत.

पुरोवातातपरजस्तुषारपरुषानिलान् ॥ ४० ॥
अनृजुः क्षवथूद्गारकासस्वप्नान्नमैथुनम् ।
कूलच्छायानृपद्विष्टव्यालदंष्ट्रिविषाणिनः ॥ ४१ ॥
हीनानार्यातिनिपुणसेवां विग्रहमुत्तमैः ।
संध्यास्वभ्यव्यहारस्त्रीस्वप्नाध्ययनचिंतनम् ॥ ४२ ॥
शत्रुसत्रगणाकीर्णगणिकापणिकाशनम् ।
गात्रवक्त्रनखैर्वाद्यं हस्तकेशावधूननम् ॥ ४३ ॥
तोयाग्निपूज्यमध्येन यानं धूमं शवाश्रयम् ।
मद्यातिसक्तिं विश्रंभस्वातंत्र्ये स्त्रीषु च त्यजेत् ॥ ४४ ॥

पूर्वेकडचा वारा, पूर्वेकडचें म्हणजे सकाळचें ऊन, धूळ, पाऊस व तीव्र वारा यांचें सेवन करूं नये. शरीर वेडेंवाकडें ठेवून शिंकणें, ढेंकर, खोकला, निद्रा, जेवण व मैथून या क्रिया करूं नयेत. नदीतीरावरील वृक्षाच्या सावलींत बसूं नये. राजाचा शत्रु, मस्त हत्ती, सर्प व शिंगांचे पशु यांपासून दूर असावें. हलक्या कुलशीलाचे, लबाड, व अति शहाणे अशा लोकांची सेवा करूं नये. आपल्यापेक्षां वरिष्ठाशीं तंटा करूं नये. संध्यासमयीं जेवण, स्त्रीसंग, झोंप, अध्ययन व चिंतन हीं करूं नयेत. शत्रु, यज्ञ, वेश्या व दुकानदार यांच्या येथील अन्न वर्ज्य करावें. भाट-चारणादिकांत बसून जेवूं नये. तोंडानें, नखानें वाद्य वाजवूं नये. हात व केंस उगीच

हालवूं नयेत. दोन प्रवाहांच्या मधून, दोहींकडे विस्तव असतां त्यांमधून, आणि दोन पूज्य मनुष्य बसले असतां त्यांच्या मधून (तसेंच पाणी व विस्तव यांच्या मधून, विस्तव व पूज्य यांच्या मधून किंवा पाणी व पूज्य मनुष्य यांच्यामधून) जाऊं नये. प्रेताचा धूर अंगास लागूं देऊं नये. अति मद्यपान करूं नये. स्त्रियांवर विश्वास ठेवून त्यांस स्वतंत्रता देऊं नये.

आचार्यः सर्वचेष्टासु लोक एव हि धीमतः।
अनुकुर्यात्तमेवातो लौकिकेऽर्थे परीक्षकः॥ ४५॥

सर्व गोष्टींत लोकच उपदेशक आहेत. म्हणून बुद्धिमान् मनुष्यानें व्यावहारिक गोष्टींत जसा लोकसमाज वागेल त्याचप्रमाणें वागावें.

आर्द्रसंतानता त्यागः कायवाक्चेतसां दमः।
स्वार्थबुद्धिः परार्थेषु पर्याप्तमिति सद्व्रतम्॥ ४६॥

प्राणिमात्रावर दया, दान, शरीर, वाणी व मन हीं स्वाधीन ठेवणें, आणि दुसऱ्याच्या फायद्यांतच आपला फायदा समजणें याचें नांव सद्वर्तन होय.

नक्तंदिनानि मे यांति कथंभूतस्य संप्रति।
दुःखभाङ् न भवत्येवं नित्यं संनिहितस्मृतिः॥ ५१॥

मीं हल्लीं कोठें आहें, काय करीत आहें, माझी स्थिति काय आहे इत्यादि गोष्टींचें नेहमीं स्मरण करीत असावें, म्हणजे दुःख होत नाहीं.

इत्याचारः समासेन संप्राप्नोति तमाचरन्।
आयुरारोग्यमैश्वर्यं यशो लोकांश्च शाश्वतान्॥ ५२॥

याप्रमाणें जो मनुष्य आपलें आचरण ठेवतो त्यास आयुष्य, आरोग्य, ऐश्वर्य, यश व शाश्वत स्वर्गब्रह्मादि लोकांची प्राप्ति होते.

---

## अध्याय तिसरा.

अथात ऋतुचर्याध्यायं व्याख्यास्यामः।

आतां प्रत्येक ऋतुमध्यें कसें वागावें हें सांगतों.

मासैर्द्विसंख्यैर्माघाद्यैः क्रमात् षड् ऋतवः स्मृताः।
शिशिरोऽथ वसंतश्च ग्रीष्मवर्षाशरद्धिमाः॥ १॥

माघापासून पौषापर्यंत दोन दोन महिन्यांचा एक असे वर्षाचे सहा ऋतु आहेत. त्यांचीं नांवें:--शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत् व हेमंत.

शिशिराद्यैस्त्रिभिस्तैस्तु विद्यादयनमुत्तरम् ।
आदानं च तदादत्ते नृणां प्रतिदिनं बलम् ॥ २ ॥
तस्मिन् ह्यत्यर्थतीक्ष्णोष्णरूक्षा मार्गस्वभावतः ।
आदित्यपवनाः सौम्यान् क्षपयंति गुणान् भुवः ॥ ३ ॥
तिक्तः कषायः कटुको बलिनोऽत्र रसाः क्रमात् ।
तस्मादादानमाग्नेयम्

शिशिर, वसंत व ग्रीष्म या तीन ऋतूंस उत्तरायण[1] म्हणतात. उत्तरायणास आदानकाल ह्मणतात. यांत सूर्य प्रतिदिवशीं मनुष्यांची शक्ति आकर्षण करून घेतो. उत्तरायणांत सूर्य व वारा हे मार्गस्वभावानें—म्हणजे सूर्य उत्तरेकडे गमन करीत असल्यामुळें—अतिशय तीव्र, ऊष्ण व रूक्ष होतात, व पृथ्वीच्या सौम्य ( चंद्रासंबंधी ) गुणांस नष्ट करितात. त्या योगानें या अयनाच्या तीन ऋतूंत अनुक्रमानें कडू, तुरट व तिखट हे रस बलवान् होतात. यामुळें आदानकालांत अग्नीचें प्राबल्य असतें.

ऋतवो दक्षिणायनम् ॥ ४ ॥
वर्षादयो विसर्गश्च यद्बलं विसृजत्ययम् ।
सौम्यत्वादत्र सोमो हि बलवान् हीयते रविः ॥ ५ ॥
मेघवृष्ट्यनिलैः शीतैः शांततापे महीतले ।
स्निग्धाश्चेहाम्ललवणमधुरा बलिनो रसाः ॥ ६ ॥

वर्षा, शरत् व हेमंत या तीन ऋतूंस दक्षिणायन व विसर्गकाल म्हणतात. कारण यांत सूर्य मनुष्यांस शक्ति देतो. विसर्गकालीं सौम्य गुणांचें प्राधान्य असल्यामुळें चंद्र बलवान् असतो व सूर्य क्षीण होतो. ( रात्र वाढते व दिवस लहान होतो. ) या कालीं पाऊस व थंड

---

१ अयन म्हणजे गमन. ज्या काळांत सूर्य विषुववृत्ताच्या उत्तरेकडील भागांत संचार करीत असतो, त्या कालास उत्तरायण म्हणतात. दक्षिणायणांत सूर्य विषुववृत्ताच्या दक्षिणकडे असतो. हें भारतवर्ष विषुववृत्ताच्या जवळ व उष्ण कटिबंधांत असल्यामुळें उत्तरायणांत उष्णता जास्त असते, आणि उष्णतेच्या आधिक्यामुळें वारेंहि रूक्ष होतात.

वारा यांच्या योगानें पृथ्वीवरील उष्णता शांत होऊन आंबट, खारट व गोड हे रस जोरदार व स्निग्ध होतात.

शीतेऽग्र्यं वृष्टिघर्मेऽल्पं बलं मध्यं तु शेषयोः ।

शीतकाळीं ( हेमंत व शिशिर ऋतूंत ) मनुष्यांच्या अंगीं उत्तम शक्ति असते. वर्षा व ग्रीष्म ऋतूंत कमी असते आणि बाकीच्या शरत् व हेमंत ऋतूंत मध्यम असते.

बलिनः शीतसंरोधाद्धेमंते प्रबलोऽनलः ॥ ७ ॥
भवत्यल्पेंधनो धातून् स पचेद्वायुनेरितः ।
अतो हिमेऽस्मिन्सेवेत स्वाद्वम्ललवणान्रसान् ॥ ८ ॥

हेमंत ऋतूंत थंडीच्या योगानें शरीरांतील स्रोतांचा संकोच होऊन बहिर्मार्ग बंद झाल्यामुळें बलवान् पुरुषाचा जठराग्नि आंतल्या आंत कोंडला जाऊन प्रदीप्त होतो. त्यास त्या वेळीं अन्नरूपी सर्पण पुरतें न मिळाल्यास तो वायूच्या जोरानें सर्व शरीरांत फिरून रसादि धातूंचें पचन करील. यास्तव या ऋतूंत गोड, आंबट व खारट पदार्थ खावेत.

दैर्घ्यान्निशानामेतर्हि प्रातरेव बुभुक्षितः ।
अवश्यकार्यं संभाव्य यथोक्तं शीलयेदनु ॥ ९ ॥
वातघ्नतैलैरभ्यंगं मूर्ध्नि तैलं विमर्दनम् ।
नियुद्धं कुशलैः सार्धं पादाघातं च युक्तितः ॥ १० ॥

या ऋतूंत रात्री मोठ्या असल्यामुळें सकाळीं उठल्याबरोबर भूक लागते. करितां उठतांक्षणीं शौच-मुखमार्जन वगैरे आवश्यक कामें उरकून प्रथम अभ्यंगादिकांचें सेवन करावें; वातनाशक औषधांनीं सिद्ध केलेलें तेल सर्वांगास चोळावें, टाळूवर जिरवावें, अंग रगडून घ्यावें, मल्लांबरोबर कुस्ती खेळावी व बेताबेतानें पायांनींही रगडून घ्यावें.

कषायापहृतस्नेहस्ततः स्नातो यथाविधि ।
कुंकुमेन सदर्पेण प्रदिग्धोऽगुरुधूपितः ॥ ११ ॥

नंतर तुरट पदार्थाच्या योगानें तेलाचा ओशटपणा काढून यथाविधि स्नान करावें. आणि अंगास केशर-कस्तुरीची उटी लावून कृष्णागुरूची धुरी घ्यावी.

रसान् स्निग्धान् पलं पुष्टं गौडमच्छसुरां सुराम् ।
गोधूमपिष्टमाषेक्षुक्षीरोत्थविकृतीः शुभाः ॥ १२ ॥
नवमन्नं वसां तैलं शौचकार्ये सुखोदकम् ।
प्रावाराजिनकौशेयप्रवेणीकौचवास्तृतम् ॥ १३ ॥
उष्णस्वभावैर्लघुभिः प्रावृतः शयनं भजेत् ।
युक्त्यार्ककिरणान् स्वेदं पादत्राणं च सर्वदा ॥ १४ ॥

नंतर पुष्कळशा तुपांत तयार केलेले मांसरस, चर्बीयुक्त मांस, गुळाची दारु, सुरामंड, धान्यादिकांची दारू, गहू, पीठ, उडीद, उंसाचा रस व दूध यांचीं उत्तमोत्तम पक्वान्नें, नवीन धान्यांपासून तयार केलेलें अन्न, चरबी व तेल, यांचें सेवन करावें. हातपाय वगैरे धुण्यास ऊन पाणी घ्यावें. चादर, हरिण वगैरेंचीं कातडीं, रेशमी गाद्या, गालिचे, कांबळीं यांच्या बिछान्यावर उबदार व हलकीं वस्त्रें पांघरून निजावें. ऊन व विस्तवाचा शेक हीं युक्तीनें सेवन करावीं. पायांत नेहेमीं जोडे घालावे.

पीवरोरुस्तनश्रोण्यः समदाः प्रमदाः प्रियाः ।
हरंति शीतमुष्णांग्यो धूपकुंकुमयौवनैः ॥ १५ ॥

ज्यांच्या मांड्या, स्तन व नितंब हे चांगले पुष्ट आहेत अशा कामोद्रेकानें मस्त झालेल्या आवडत्या स्त्रिया, अगुरूच्या धुऱ्या, केशराची उटी व तारुण्याचा बहार यामुळें अंगीं आलेल्या उष्णतेनें थंडी दूर करितात.

अंगारतापसंतप्तगर्भभूवेश्मचारिणः ।
शीतपारुष्यजनितो न दोषो जातु जायते ॥ १६ ॥

विस्तव पेटवून ऊब आणलेल्या तळघरांत हिंडणाऱ्यास कडक थंडी मुळींच बाधत नाहीं.

अयमेव विधिः कार्यः शिशिरेऽपि विशेषतः ।
तदा हि शीतमधिकं रौक्ष्यं चादानकालजम् ॥ १७ ॥

---

१ कुथक इति पाठभेदः । कुथकः कंबलः ।

२ अग्नि व ऊन यांच्या प्रत्यक्ष संसर्गानें अंग खरखरीत होतें. यासाठीं त्यांच्या जवळ बसून शेकूं नये. पण, जर एखादें वस्त्र मध्यें घालून त्यांतून येणाऱ्या उन्हांत बसलें, तर योग्य तितकी उष्णता मिळते. अशा तऱ्हेनें कांहीं तरी युक्तीनें प्रत्यक्ष शेक किंवा ऊन टाळावें.

शिशिरऋतूंतही याच पद्धतीनें वर्तन ठेवावें. परंतु त्या वेळीं थंडी अधिक असते व आदानकाळाच्या सुरवातीमुळें हवेंत रूक्षताही जास्त असते. म्हणून हेमंतांतील विधि शिशिरऋतूंत विशेषतः करावा.

कफश्चितो हि शिशिरे वसंतेऽर्कांशुतापितः ।
हत्वाऽग्निं कुरुते रोगानतस्तं त्वरया जयेत् ॥ १८ ॥

शिशिरऋतूंत सांठलेला कफ वसंतऋतूंतील उन्हानें पातळ होऊन जठराग्नीस मंद करून अनेक प्रकारचे रोग करितो. करितां त्याचा सत्वर प्रतिकार करावा.

तीक्ष्णैर्वमननस्याद्यैर्लघुरूक्षैश्च भोजनैः ।
व्यायामोद्वर्तनाघातैर्जित्वा श्लेष्माणमुल्बणम् ॥ १९ ॥
स्नातोऽनुलिप्तः कर्पूरचंदनागुरुकुंकुमैः ।
पुराणयवगोधूमक्षौद्रजांगलशूल्यभुक् ॥ २० ॥

तीव्र वमनें, नस्यें, हलकें व रूक्ष भोजन, व्यायाम, उटणीं, अंग रगडणें, इत्यादि उपायांनीं प्रकुपित कफ जिंकावा. स्नान करून कापूर, चंदन, अगुरू, केशर, यांची उटी लावावी. जुने जव व गहूं यांचे पदार्थ, मध व हरिण-ससा वगैरे जांगल जनावरांचें लोखंडाच्या सळईवर भाजलेलें मांस खावें.

सहकाररसोन्मिश्रानास्वाद्य प्रिययार्पितान् ।
प्रियास्यसंगसुरभीन् प्रियानेत्रोत्पलांकितान् ॥ २१ ॥
सौमनस्यकृतो हृद्यान्वयस्यैः सहितः पिबेत् ।
निर्गदानासवारिष्टसीधुमार्द्वीकमाधवान् ॥ २२ ॥
शृंगवेरांबु सारांबु मध्वंबु जलदांबु वा ।

ज्यांत आंब्याचा [१] रस घातलेला आहे, जीं प्राणप्रियेनें प्रथम स्वतः चाखून दिलीं आहेत, प्रियेच्या मुखसंसर्गानें ज्यांचा सुगंध वाढला आहे, व ज्यांत प्रियेच्या नेत्रकमलांचें जणुं काय प्रतिबिंब पडलें आहे व अशीं चित्त प्रसन्न करणारीं व हृदयास हितावह नानाप्रकारचीं निर्दोष मद्यें, आसवें, अरिष्टें, उंसाची दारू, द्राक्षांची

१ आंब्याचा रस म्हणजे आंब्याच्या मोहोरापासून काढलेलें अत्तर, असा अर्थ करणें हें ज्यास्त चांगलें आहे. याला आम्रासव म्हणतां येईल.

दारू, व मद्याची दारू मित्रमंडळीसह प्यावी. सुंठ, खैर वगैरे वृक्षांचा सार, किंवा नागरमोथा घालून कढविलेलें पाणी, किंवा मध-पाणी प्यावें.

दक्षिणानिलशीतेषु परितो जलवाहिषु ॥ २३ ॥
अदृष्टनष्टसूर्येषु मणिकुट्टिमकांतिषु ।
परपुष्टविघुष्टेषु कामकर्मांतभूमिषु ॥ २४ ॥
विचित्रपुष्पवृक्षेषु काननेषु सुगंधिषु ।
गोष्ठीकथाभिश्चित्राभिर्मध्याह्नं गमयेत्सुखी ॥ २५ ॥

ज्या ठिकाणीं दक्षिणेकडील गार वारा वाहत आहे; पाण्याचे पाट सर्व बाजूंनीं वाहत आहेत; (वृक्षांच्या दाट छायेमुळें) कोठें सूर्याचें मुळींच दर्शन होत नाहीं व कोठें यत्किंचित् ऊन पडत आहे; रत्नखचित किंवा उत्कृष्ट स्फटिकाचे चौथरे चकाकत आहेत; कोकिला मधुर ध्वनि करीत आहेत; रतिविलासाचीं योग्य स्थानें तयार आहेत, आणि चित्रविचित्र फुलझाडें चहूंकडे पसरलीं असून त्यांचा घमघमाट सुटत आहे, अशा उपवनांत नानाप्रकारच्या क्रीडा व गोष्टी करण्यांत दुपारची वेळ आनंदानें घालवावी.

गुरुशीतदिवास्वप्नस्निग्धाम्लमधुरांस्त्यजेत् ।

जड, थंड, स्निग्ध आंबट व गोड पदार्थ आणि दिवसा झोंप हीं वर्ज्य करावीं.

तीक्ष्णांशुरतितीक्ष्णांशुर्ग्रीष्मे संक्षिपतीव यत् ॥ २६ ॥
प्रत्यहं क्षीयते श्लेष्मा तेन वायुश्च वर्धते ।
अतोऽस्मिन् पटुकट्वम्लव्यायामार्ककरांस्त्यजेत् ॥ २७ ॥

ग्रीष्म ऋतूंत सूर्य आपल्या अतिप्रखर किरणांनीं पृथ्वीवरील रस शोषून घेतो, त्यामुळें प्रतिदिवशीं कफ कमी होऊन वायु वाढत जातो. म्हणून या ऋतूंत खारट, कडू व आंबट पदार्थ, व्यायाम व ऊन हीं वर्ज्य करावीं.

भजेन्मधुरमेवान्नं लघु स्निग्धं हिमं द्रवम् ।
सुशीततोयसिक्तांगो लिह्यात्सक्तून् सशर्करान् ॥ २८ ॥

मधुर, हलकें, स्निग्ध, थंड व पातळ असेंच अन्न खावें. गार पाण्यानें स्नान करून भाजलेल्या सातूचें पीठ साखर घालून खावें.

मद्यं न पेयं पेयं वा स्वल्पं सुबहुवारि वा।
अन्यथा शोफशैथिल्यदाहमोहान् करोति तत् ॥ २९ ॥

मद्य मुळींच पिऊं नये, किंवा पिणेंच असल्यास थोडें प्यावें, अथवा पुष्कळसें पाणी घालून प्यावें. असें न केल्यास तें सूज, शिथिलता, दाह व बुद्धिभ्रंश हे विकार करितें.

कुंदेंदुधवलं शालिमश्नीयाज्जांगलैः पलैः।

कुंदपुष्पासारखा किंवा चंद्रासारखा शुभ्र साळींचा भात जांगल मांसाच्या रसाबरोबर खावा.

पिबेद्रसं नातिघनं रसालां रागखांडवौ ॥ ३० ॥
पानकं पंचसारं वा नवमृद्भाजनस्थितम्।
मोचचोचदलैर्युक्तं साम्लं मृन्मयशुक्तिभिः ॥ ३१ ॥

फार दाट नाहीं असा मांसरस, श्रीखंड, मोरंबे व पंचामृत, हीं प्यावीं. ( द्राक्षें, मोहाचीं फुलें, खजूर, शिवणीचीं फळें व फालसा हीं समभाग घेऊन त्यांच्या रसांचें केलेलें, ) कोऱ्या मडक्यांत ठेवलेलें, केळ्याच्या फोडी व खोबऱ्याचे तुकडे किंवा फणसाचे गरे घातलेलें, व चिंच वगैरे पदार्थांनीं थोडें आंबट केलेलें पंचसार पन्हें मातीच्या भांड्यांतून प्यावें.

पाटलावासितं चांभः सकर्पूरं सुशीतलम्।
शशांककिरणान् भक्ष्यान् रजन्यां भक्षयन् पिबेत् ॥ ३२ ॥
ससितं माहिषं क्षीरं चंद्रनक्षत्रशीतलम्।

सुरंगीचीं फुलें व कापूर यांचा वास लावलेलें थंडगार पाणी प्यावें. रात्रीं शेवयाचें जेवण जेवून त्यावर, चांदण्यांत ठेवून गार झालेलें म्हशीचें दूध साखर घालून प्यावें.

अभ्रंकषमहाशालतालरुद्धोष्णरश्मिषु ॥ ३३ ॥
वनेषु माधवीश्लिष्टद्राक्षास्तबकशालिषु।
सुगंधिहिमपानीयसिच्यमानपटालिके ॥ ३४ ॥
कायमाने चिते चूतप्रवालफललुंबिभिः।
कदलीदलकल्हारमृणालकमलोत्पलैः ॥ ३५ ॥
कल्पिते कोमलैस्तल्पे हसत्कुसुमपल्लवे।
मध्यंदिनेऽर्कतापार्तः स्वप्याद्धारागृहेऽथवा ॥ ३६ ॥
पुस्तस्त्रीस्तनहस्तास्यप्रवृत्तोशीरवारिणि।

दुपारीं उन्हाचा ताप होऊं लागला म्हणजे ज्या ठिकाणीं मोठमोठ्या गगनचुंबित शाल, ताड वगैरे वृक्षांच्या योगानें उन्हाचा आंत प्रवेश होत नाहीं व जेथें मोगरीच्या वेलांनीं आलिंगिलेले द्राक्षांचे घोंस लोंबत आहेत, अशा वनांत सुगंधी व थंड पाणी शिंपलेले पडदे लावलेल्या आणि आम्रवृक्षाचे पल्लव व आंबे यांच्या घोंसांनीं लादलेल्या अशा मांडवांत केळीचीं पानें, सौगंधिक कमळ, कमळाची देंठी, पांढरें व निळें कमळ यांनीं तयार केलेल्या आणि त्यांवर प्रफुल्लित फुलें व पल्लव हीं पसरलेल्या शय्येवर, अथवा ज्या ठिकाणीं दगडाच्या पुतळ्यांच्या स्तनांतून, हातांतून व तोंडांतून वाळ्याच्या पाण्याचीं कारंजीं उडत आहेत अशा धारागृहांत जाऊन निजावें.

निशाकरकराकीर्णे सौधपृष्ठे निशासु च ॥ ३७ ॥
आसना

रात्रीं चांदणें पडत असेल अशा गच्चीवर जाऊन बसावें.

स्वस्थचित्तस्य चंदनार्द्रस्य मालिनः ।
निवृत्तकामतंत्रस्य सुसूक्ष्मतनुवाससः ॥ ३८ ॥
जलार्द्रास्तालवृंतानि विस्तृताः पद्मिनीपुटाः ।
उत्क्षेपाश्च मृदूत्क्षेपा जलवर्षिहिमानिलाः ॥ ३९ ॥
कर्पूरमल्लिका माला हाराः सहरिचंदनाः ।
मनोहरकलालापाः शिशवः सारिकाः शुकाः ॥ ४० ॥
मृणालवलयाः कांताः प्रोत्फुल्लकमलोज्ज्वलाः ।
जंगमा इव पद्मिन्यो हरंति दयिताः क्लमम् ॥ ४१ ॥

नंतर मदनव्यापारांतून निवृत्त होऊन चित्त स्वस्थ-शांत असतां अंगास चंदनाची उटी लावावी, व गळ्यांत सुगंधि पुष्पांच्या माळा घालाव्या. तलम सुताचीं व हलकीं वस्त्रें धारण करावीं. पाण्यानें भिजविलेले ताडाचे पंखे, मोठीं कमलपत्रें, हळू हळू हालणारे पाण्याचे तुषारयुक्त व गार वारा घालणारे मोठमोठे पंखे, कापराचे मणी व मोगरी यांच्या माळा, मोतीं वगैरे रत्नांचे हार, हरिचंदन, लहान मुलें, साळुंक्या व पोपट यांचे मधुर मनोहर स्वर, अति कोमल कमळाच्या देंठ्यांचीं कंकणें घातलेल्या व प्रफुल्लित कमळां-

प्रमाणें सुशोभित दिसणाऱ्या—जणुं काय बोलतीं चालतीं कमळेंच आहेत कीं काय अशा भासणाऱ्या स्त्रिया—यांचें सेवन केल्यानें थकवा दूर होतो.

आदानग्लानवपुषामग्निः सन्नोऽपि सीदति ।
वर्षासु दोषैः

आदानकाळांतील उष्णतेच्या योगानें मनुष्यांचीं शरीरें थकून जाऊन त्यांचा जठराग्नि अगोदरच मंद झालेला असतो, तो वर्षाऋतूंत दूषित झालेल्या वातादि दोषांच्या योगानें अधिकच मंद होतो.

दुष्यंति तेऽम्बुलंबांबुदेऽम्बरे ॥ ४२ ॥
सतुषारेण मरुता सहसा शीतलेन च ।
भूबाष्पेणाम्लपाकेन मलिनेन च वारिणा ॥ ४३ ॥
वह्निनैव च मंदेन

या ऋतूंत आकाश कृष्ण मेघांनीं व्याप्त असतें, एकाएकीं पाण्याच्या तुषारांनीं युक्त असा गार वारा सुटतो, तापलेल्या जमिनीवर पावसाचें पाणी पडल्यानें त्यांतून उष्ण वाफा निघतात, पावसाच्या योगानें नदी, तलाव वगैरेंचें पाणी गढूळ व अम्लविपाकी होतें, आणि अग्नि अतिशय मंद होतो. या सर्व कारणांनीं वातादि तिन्ही दोष दूषित[1] होतात.

तेष्वित्यन्योन्यदूषिषु ।
भजेत्साधारणं सर्वमूष्मणस्तेजनं च यत् ॥ ४४ ॥
आस्थापनं शुद्धतनुर्जीर्णं धान्यं रसान् कृतान् ।
जांगलं पिशितं यूषान् मध्वरिष्टं चिरंतनम् ॥ ४५ ॥
मस्तु सौवर्चलाढ्यं वा पंचकोलावचूर्णितम् ।
दिव्यं कौपं शृतं चांभः

हे तीन दोष पुन्हा आपसांत एकमेकांस दूषित करितात. म्हणून एकाच वेळीं तिन्ही दोषांस शमविणारे आणि जठराग्नीस

१ ग्रीष्म ऋतूच्या प्रखर उष्णतेनंतर एकाएकीं गार वारा सुटल्यानें वायु दूषित होतो; जमिनींतून गरम वाफा निघाल्यामुळें व अम्लविपाकी पाण्यानें पित्त दूषित होतें; मल-मूत्र, जीव-जंतु इत्यादिकांनीं कलुषित झालेल्या व कालस्वभावानें अतिशय मंद झालेल्या अग्नीनें कफ दूषित होतो.

प्रदीप्त करणारे असे आहार-विहार व औषध यांचें सेवन करावें. वमनविरेचनांनीं कोठा साफ करून आस्थापन बस्ति ( पिचकारी ) द्यावा. नंतर जुन्या धान्यांचे यूष, व पदार्थ, स्नेहयुक्त मांसरस, जांगल प्राण्याचें मांस, जुनें द्राक्षारिष्ट, पादेलोण किंवा पिंपळी, पिंपळीमूळ, चवक, चित्रक व सुंठ यांचें चूर्ण घातलेली दह्यावरची निवळी, पावसाचें, विहिरीचें व तापविलेलें पाणी हीं प्यावीं.

भोजनं त्वतिदुर्दिने ॥ ४६ ॥
व्यक्ताम्ललवणस्नेहं संशुष्कं क्षौद्रवल्लघु ।

ज्या दिवशीं आकाशांत ढग असतील, त्या दिवशीं विशेषतः आंबट, खारट, स्निग्ध, शुष्क, मधमिश्रित व हलकें भोजन करावें.

अपादचारी सुरभिः सततं धूपितांबरः ॥ ४७ ॥
हर्म्यपृष्ठे वसेद्बाष्पशीतशीकरवर्जिते ।

या ऋतूंत पायीं चालूं नये. नेहमीं सुगंधी पदार्थांचें सेवन करावें, सतत शेकविलेलीं वस्त्रें धारण करावीं, आणि ज्या ठिकाणीं वाफा निघत नाहींत, थंडी नाहीं व दंव पडत नाहीं अशा माडीवर रहावें.

नदीजलोदमंथाहःस्वप्नायासातपांस्त्यजेत् ॥ ४८ ॥

नदीचें पाणी पिऊं नये. भाजलेलें सातूचें पीठ पाण्यांत कालवून खाऊं नये; आणि निजणें, परिश्रम व ऊन हीं वर्ज्य करावीं.

वर्षाशीतोचितांगानां सहसैवार्करश्मिभिः ।
तप्तानां संचितं वृष्टौ पित्तं शरदि कुप्यति ॥ ४९ ॥

पावसाळ्याच्या थंडीचा संचय झाल्यामुळें मनुष्याचें शरीर शरदृतूंतील उन्हानें एकदम तापून जातें, व संचित पित्त प्रकुपित होतें.

तज्जयाय घृतं तिक्तं विरेको रक्तमोक्षणम् ।
तिक्तं स्वादु कषायं च क्षुधितोऽन्नं भजेल्लघु ॥ ५० ॥
शालिमुद्गसिताधात्रीपटोलमधुजांगलम् ।

त्यास शमविण्याकरितां तिक्तघृत ( कुष्ठचिकित्सोक्त ), रेचन व रक्त काढविणें हे उपाय करावे. भूक लागली असतां साळी, मूग, खडीसाखर, आंवळकठी, कडू पडवळ, मध, जांगल प्राण्यांचें मांस इत्यादि कडू, गोड, तुरट व हलकें अन्न खावें.

तप्तं तप्तांशुकिरणैः शीतं शीतांशुरश्मिभिः ॥ ५१ ॥
समंतादप्यहोरात्रमगस्त्योदयनिर्विषम् ।
शुचि हंसोदकं नाम निर्मलं मलजिज्जलम् ॥ ५२ ॥
नाभिष्यंदि न वा रूक्षं पानादिष्वमृतोपमम् ।

या ऋतूंत तलाव व सरोवर यांचें पाणी दिवसा सूर्याच्या उन्हानें तापतें व रात्रीं चंद्राच्या किरणांनीं थंड होतें. आणि अगस्ति नक्षत्राच्या उदयानें तें निर्विष व पवित्र होतें. यास हंसोदक असें म्हणतात. हें कफ पातळ करणारें किंवा रूक्षही नसून दोषांचें शमन करितें, व पिण्याच्या वगैरे कामीं अमृताप्रमाणें श्रेष्ठ असतें.

चंदनोशीरकर्पूरमुक्तास्रग्वसनोज्वलः ॥ ५३ ॥
सौधेषु सौधधवलां चंद्रिकां रजनीमुखे ।

प्रदोष-काळीं ( संध्याकाळीं ) चंदन, वाळा, कापूर यांची उटी लावून आणि मोत्यांचे हार व शुभ्र वस्त्रें धारण करून चुन्याप्रमाणें शुभ्र चांदण्यांत गच्चीवर बसावें.

तुषारक्षारसौहित्यदधितैलवसातपान् ॥ ५४ ॥
तीक्ष्णमद्यदिवास्वप्नपुरोवातान् परित्यजेत् ।

दंव, क्षार, पोटभर खाणें, दहीं, तेल, चरबी, ऊन, तीव्र दारू, दिवसा झोंप व पूर्वेकडील वारा या गोष्टी वर्ज्य कराव्या.

शीते वर्षासु चाद्यांस्त्रीन् वसंतेऽन्त्यान् रसान्भजेत् ।
स्वादुं निदाघे शरदि स्वादुतिक्तकषायकान् ॥ ५५ ॥

हेमंत, शिशिर व वर्षा या तीन ऋतूंत गोड, आंबट व खारट; वसंत ऋतूंत कडू, तिखट व तुरट; ग्रीष्म ऋतूंत गोड; आणि शरदृतूंत गोड, कडू व तुरट याप्रमाणें रसांचें सेवन करावें.

शरद्वसंतयो रूक्षं शीतं घर्मघनांतयोः ॥ ५६ ॥
अन्नपानं समासेन विपरीतमतोऽन्यदा ।

शरद् व वसंत ऋतूंत रूक्ष; आणि हेमंत, शिशिर, ग्रीष्म व वर्षा ऋतूंत याच्या उलट म्हणजे स्निग्ध; तसेंच ग्रीष्म व शरद् ऋतूंत थंड; आणि हेमंत, शिशिर, वर्षा व वसंत या ऋतूंत याच्या उलट म्हणजे उष्ण अन्नपान सेवन करावें.

नित्यं सर्वरसाभ्यासः स्वस्वाधिक्यमृतावृतौ ॥ ५७ ॥

नेहमीं सर्व रस खाण्याचा अभ्यास ठेवावा. मात्र प्रत्येक ऋतूंत त्या ऋतूस उचित अशा रसांचा अधिक उपयोग करावा.

ऋत्वोरंत्यादिसप्ताहावृतुसंधिरिति स्मृतः ।
तत्र पूर्वो विधिस्त्याज्यः सेवनीयोऽपरः क्रमात् ॥ ५८ ॥
असात्म्यजा हि रोगाः स्युः सहसा त्यागशीलनात् ।

एका ऋतूचा शेवटचा व दुसऱ्या ऋतूचा पहिला आठवडा यांस ऋतुसंधि म्हणतात. या संधींत पहिल्या ऋतूचा अन्नपानादि विधि हळुहळू सोडीत जाऊन पुढें येणाऱ्या ऋतूचा विधि तसाच क्रमानें सुरू करावा. कारण, कोणताही विधि एकदम सुरू किंवा बंद केल्यानें त्याचा अभ्यास ( सात्म्य ) नसल्यानें रोग होतात.

---

## अध्याय ४ था.

अथातो रोगानुत्पादनीयाध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां रोग न उत्पन्न होऊं देण्याविषयीं माहिती सांगतों.

वेगान्न धारयेद्वातविण्मूत्रक्षवतृट्क्षुधाम् ।
निद्राकासश्रमश्वासजृंभाश्रुच्छर्दिरेतसाम् ॥ १ ॥

अपान वायु, ढेंकर, मल, मूत्र, शिंक, तहान, भूक, झोंप, खोकला, श्रमानें लागलेला दम, जांभई, अश्रु, उलटी व वीर्य यांचे वेग थांबवूं नयेत.

अधोवातस्य रोधेन गुल्मोदावर्तरुक्क्लमाः ।
वातमूत्रशकृत्संगदृष्ट्यग्निवधहृद्गदाः ॥ २ ॥
स्नेहस्वेदविधिस्तत्र वर्तयो भोजनानि च ।
पानानि बस्तयश्चैव शस्तं वातानुलोमनम् ॥ ३ ॥

अधोवायु थांबवून धरल्यानें गुल्म, उदावर्त, पोटदुखी, ग्लानि, अधोवायु, मल व मूत्र यांचा अवरोध, दृष्टिमांद्य, अग्निमांद्य, व हृद्रोग हे विकार उत्पन्न होतात. यांवर स्नेहन-स्वेदन करावें, औषधी वाती गुदद्वारांत घालाव्या, वातहारक खाणें-पिणें, व वातनाशक

औषधांच्या पिचकाऱ्या माराव्या आणि वायूचें अनुलोमन करणारीं औषधें व इतर क्रिया कराव्या.

शकृतः पिंडिकोद्वेष्टप्रतिश्यायशिरोरुजः।
ऊर्ध्ववायुः परीकर्तो हृदयस्योपरोधनम् ॥ ४ ॥
मुखेन विट्प्रवृतिश्च पूर्वोक्ताश्चामयास्मृताः।

मलाचा अवरोध केल्यानें पोटऱ्यांत पेटके येतात; पडसें, डोकें दुखणें, वायु वर चढणें, मलद्वारांत कातरल्यासारखी पीडा होणें, छातींत धडा बसणें (कोंडणें), मलाची उलटी होणें, आणि वर सांगितलेले (गुल्म, उदावर्त वगैरे) विकार होतात.

अंगभंगाश्मरीबस्तिमेढ्रवंक्षणवेदनाः ॥ ५ ॥
मूत्रस्य रोधात्पूर्वे च प्रायो रोगास्तदौषधम्।
वर्त्यभ्यंगावगाहाश्च स्वेदनं बस्तिकर्म च ॥ ६ ॥
अन्नपानं च विड्भेदि विड्रोधोत्थेषु यक्ष्मसु।
मूत्रजेषु च पाने च प्राग्भक्तं शस्यते घृतम् ॥ ७ ॥
जीर्णांतिकं चोत्तमया मात्रया योजनाद्वयम्।
अवपीडकमेतच्च संज्ञितं

लघ्वी कोंडून धरल्यानें अधोवायु व मल ह्यांच्या अवरोधानें होणारे वर सांगितलेले बहुतेक विकार होऊन शिवाय अंग मोडून येतें, मुतखडा होतो आणि ओटीपोट, शिस्न व जांघाडें यांत वेदना होतात. या रोगांवर फलवर्ति, तेल चोळणें, वातनाशक औषधें घालून कढविलेल्या पाण्यांत बसून राहणें, शेकणें व पिचकाऱ्या मारणें हे उपाय योजावे. मलाच्या अवरोधानें झालेल्या रोगांवर वरील उपायांशिवाय सारक अन्नपानाची योजना करावी. मूत्ररोधानें होणाऱ्या रोगांवर, जेवणापूर्वी किंवा जेवण जिरल्यावर अहोरात्रींत पचेल इतकें तूप प्यावें. या दोन्ही प्रकारांस अवपीडक म्हणतात.

धारणात्पुनः ॥ ८ ॥
उद्गारस्यारुचिः कंपो विबंधो हृदयोरसोः।
आध्मानकासहिध्माश्च हिध्मावत्तत्र भेषजम् ॥ ९ ॥

ढेंकर बंद केल्यापासून अरुचि, कांपरें, हृदय व छाती कोंडणें, पोट फुगणें, खोकला व उचकी हे विकार होतात. यांवर उचकीसारखेच औषधोपचार करावे.

शिरोर्तींद्रियदौर्बल्यमन्यास्तंभार्दितं क्षुतेः ।
तीक्ष्णधूमांजनाघ्राणनावनार्कविलोकनैः ॥ १० ॥
प्रवर्तयेत्क्षुतिं सक्तां स्नेहस्वेदौ च शीलयेत् ।

शिंक बंद केल्यानें डोकें दुखणें, डोळे वगैरे इंद्रियांची अशक्तता, मान जखडणें व वायूनें तोंड वांकडें होणें, हे विकार उत्पन्न होतात. यांवर तीक्ष्ण धूम्रपान, अंजन, मिरें वगैरे तीक्ष्ण पदार्थ हुंगणें, तीव्र नस्य, व सूर्याकडे पाहणें, या उपायांनीं शिंका आणाव्या, व स्नेहन व स्वेदन द्यावें.

शोषांगसादबाधिर्यसंमोहभ्रमहृद्गदाः ॥ ११ ॥
तृष्णाया निग्रहात्तत्र शीतः सर्वो विधिर्हितः ।

तहान मारल्यानें शोष, अंग गळणें, बहिरेपणा, मोह, भोंवळ व हृद्रोग हे विकार होतात. यांवरची चिकित्सा शीत असावी.

अंगभंगारुचिग्लानिकार्श्यशूलभ्रमाः क्षुधः ॥ १२ ॥
तत्र योज्यं लघु स्निग्धमुष्णमल्पं च भोजनम् ।

भूक मोडल्यानें अंग मोडणें, अरुचि, ग्लानि, कृशता, पोट-शूळ व भोंवळ हे विकार होतात. यांवर हलकें, स्निग्ध व उष्ण असें थोडथोडें अन्न द्यावें.

निद्राया मोहमूर्धाक्षिगौरवालस्यजृंभिकाः ॥ १३ ॥
अंगमर्दश्च तत्रेष्टः स्वप्नः संवाहनानि च ।

झोंप मोडल्यानें मोह, डोकें व डोळे जड होणें, आळस, जांभया, व अंग मोडणें हे विकार होतात. यांवर झोंप व अंग रगडून घेणें हे उपाय करावे.

कासस्य रोधात्तद्वृद्धिः श्वासारुचिहृद्गामयाः ॥ १४ ॥
शोषो हिध्मा च कार्योऽत्र कासहा सुतरां विधिः ।

खोकला थांबवून धरिल्यानें तो वाढतो; दमा, अरुचि, हृद्रोग, शोष व उचकी हे विकार होतात. यांवर विशेषतः खोकल्यावर सांगितलेली चिकित्सा करावी.

गुल्महृद्रोगसंमोहाः श्रमश्वासाद्विधारितात् ॥ १५ ॥
हितं विश्रमणं तत्र वातघ्नश्च क्रियाक्रमः ।

श्रमानें लागलेला दम कोंडून धरिल्यानें गुल्म, हृद्रोग व मोह हे रोग होतात. यांवर विश्रांति द्यावी व वातनाशक चिकित्सा करावी.

जृंभायाः क्षववद्रोगाः सर्वश्चानिलजिद्विधिः ॥ १६ ॥

जांभई बंद केल्यानें शिंक बंद केल्यामुळें होणारेच रोग होतात. त्यांवर सर्व वातनाशक उपाय योजावे.

पीनसाक्षिशिरोहृद्रुङ्मन्यास्तंभारुचिभ्रमाः ।
सगुल्मा बाष्पतस्तत्र स्वप्नो मद्यं प्रियाः कथाः ॥ १७ ॥

अश्रुधारा बंद केल्यानें पीनस, डोळ्याचे व मस्तकाचे रोग, हृद्रोग, मान जखडणें, अरुचि, भ्रम व गुल्म हे रोग होतात. यांवर झोंप, मद्यपान, व आवडत्या गोष्टी ऐकणें हे उपाय योजावे.

विसर्पकोठकुष्ठाक्षिकंडूपांड्वामयज्वराः ।
सकासश्वासहृल्लासव्यंगश्वयथवो वमेः ॥ १८ ॥
गंडूषधूमानाहारा रूक्षं भुक्त्वा तदुद्गमः ।
व्यायामः स्रुतिरस्रस्य शस्तं चात्र विरेचनम् ॥ १९ ॥
सक्षारलवणं तैलमभ्यंगार्थं च शस्यते ।

उलटी बंद केल्यानें विसर्प, शीतपित्त ( अंगावर गांधी उठणें ), कुष्ठ, नेत्ररोग, कंडू, पांडुरोग, ताप, खोकला, दमा, मळमळ, वांग व सूज हे रोग होतात. यांवर गुळण्या, धूम्रपान, उपास, रूक्ष अन्न खाऊन त्याची उलटी करविणें, व्यायाम, रक्त काढणें, रेचन व क्षार-लवणमिश्रित तेल चोळणें हे उपाय सांगितले आहेत.

शुक्रात्तत्स्रवणं गुह्यवेदना श्वयथुर्ज्वरः ॥ २० ॥
हृद्व्यथा मूत्रसंगांगभंगवृद्ध्यश्मषंढताः ।
ताम्रचूडसुराशालिबस्त्यभ्यंगावगाहनम् ॥ २१ ॥
बस्तिशुद्धिकरैः सिद्धं भजेत्क्षीरं प्रियाः स्त्रियः ।

स्वाभाविक वीर्यस्राव होत असतां तो थांबविल्यानें अस्वाभाविक वीर्यस्राव, गुह्यस्थानीं वेदना व सूज, ताप, छातींत दुखणें, लघवी बंद होणें, अंग मोडून येणें, वृषण सुजणें, मुतखडा व नपुंसकत्व हे विकार होतात. यांवर कोंबड्याचें मांस, मद्य, साळीचा भात, बस्ति, तेल चोळणें, पाण्यांत बसणें, मूत्रशुद्धि करणाऱ्या कूष्मांड वगैरे औषधांनीं सिद्ध केलेलें दूध व आवडत्या स्त्रिया यांचें सेवन करावें.

तृट्शूलार्तं त्यजेत् क्षीणं विड्वमं वेगरोधिनम् ॥ २२ ॥

वर सांगितलेले वेग थांबविल्यापासून होणाऱ्या रोगांनीं पीडित मनुष्यास जर फार तहान लागत असेल, शूल होत असेल, तो फार क्षीण झाला असेल, व त्यास मलाची उलटी होत असेल तर त्यास असाध्य समजून औषध देऊं नये.

रोगाः सर्वेऽपि जायंते वेगोदीरणधारणैः ।
निर्दिष्टं साधनं तत्र भूयिष्ठं ये तु तान् प्रति ॥ २३ ॥

वेग बळेंच प्रवृत्त केल्यानें व उपस्थित वेग थांबविल्यानें वर सांगितलेलेच नव्हेत तर एकंदर रोग याच कारणानें उत्पन्न होतात. परंतु त्यांतल्या त्यांत जे विशेषतः या कारणांनीं होणारे रोग आहेत त्यांचेच उपाय येथें सांगितले आहेत.

ततश्चानेकधा प्रायः पवनो यत्प्रकुप्यति ।
अन्नपानौषधं तत्र युंजीतातोऽनुलोमनम् ॥ २४ ॥

वेग बळेंच प्रवृत्त केल्यानें किंवा थांबविल्यानें होणाऱ्या रोगांत अनेक प्रकारांनीं वायूचा प्रकोप होत असतो; म्हणून त्यांत वायूस मार्गास लावणारें अन्न, पान व औषध यांची योजना करावी.

धारयेत्तु सदा वेगान् हितैषी प्रेत्य चेह च ।
लोभेर्ष्याद्वेषमात्सर्यरागादीनां जितेंद्रियः ॥ २५ ॥

इहपरलोकीं आपलें कल्याण इच्छिणाऱ्या मनुष्यानें इन्द्रियनिग्रह करून लोभ, ईर्ष्या, द्वेष, मत्सर, राग आदि मनोविकार नेहमीं आवरून धरावे.

यतेत च यथाकालं मलानां शोधनं प्रति ।
अत्यर्थसंचितास्ते हि क्रुद्धाः स्युर्जीवितच्छिदः ॥ २६ ॥

वातादि दोष व मल-मूत्रादिक यांचें, त्या त्या योग्य काळीं शोधन करावें. कारण, ते अतिशय सांचून कुपित झाल्यास कदाचित् जीविताचाही नाश करितील.

दोषाः कदाचित्कुप्यंति जिता लंघनपाचनैः ।
ये तु संशोधनैः शुद्धा न तेषां पुनरुद्भवः ॥ २७ ॥

लंघन-पाचनानें दाबून ठेवलेले दोष कालान्तरानें पुन्हां उलटण्याचा संभव असतो. परंतु वमन-विरेचनादि उपायांनीं त्यांचें शोधन केलें असतां, ते पुन्हा उद्भवूं शकत नाहींत.

यथाक्रमं यथायोगमत ऊर्ध्वं प्रयोजयेत् ।
रसायनानि सिद्धानि वृष्ययोगांश्च कालवित् ॥ २८ ॥

शरीर शुद्ध झाल्यावर देश-कालादि जाणणाऱ्या वैद्यानें अनुभविक रसायनें व वाजीकरणप्रयोग यांची, विहित क्रमानें योजना करावी.

भेषजक्षपिते पथ्यमाहारैर्बृंहणं क्रमात् ।
शालिषष्टिकगोधूममुद्गमांसघृतादिभिः ॥ २९ ॥
हृद्यदीपनभैषज्यसंयोगाद्रुचिपक्तिदैः ।
साभ्यंगोद्वर्तनस्नाननिरूहस्नेहबस्तिभिः ॥ ३० ॥

वमन-विरेचनादिकांच्या योगानें निर्दोष परंतु अशक्त झालेल्या मनुष्यास, स्वादिष्ट व अग्निदीपक औषधें मिळवून तयार केलेले, रुचकर व पाचक असे, साळी, साठेसाळी, गहू, मूग, मांस, तूप वगैरे खाण्याचे पदार्थ आणि अभ्यंग, उटणें, स्नान आणि आस्थापन व अनुवासन बस्ति, यांच्या योगानें हळुहळू शक्ति व पुष्टि आणावी.

तथा स लभते शर्म सर्वपावकपाटवम् ।
धीवर्णेंद्रियवैमल्यं वृषतां दैर्घ्यमायुषः ॥ ३१ ॥

याप्रमाणें केल्यानें मनुष्यास आरोग्य प्राप्त होतें, शरीरांतील सर्व[1] अग्नि प्रदीप्त होतात, बुद्धि, कांति व इन्द्रियें तेजस्वी होतात, आणि पुरुषत्व व आयुष्य यांची वृद्धि होते.

ये भूतविषवाय्वग्निक्षतभंगादिसंभवाः ।
कामक्रोधभयाद्याश्च ते स्युरागंतवो गदाः ॥ ३२ ॥

भूतबाधा, विष, वारा, अग्नि, क्षत, अस्थिभंग, वगैरे कारणांनीं होणारे रोग व काम, क्रोध, भय इत्यादि मानसिक विकार, यांस आगन्तु रोग म्हणतात.

त्यागः प्रज्ञापराधानामिंद्रियोपशमः स्मृतिः ।
देशकालात्मविज्ञानं सद्वृत्तस्यानुवर्तनम् ॥ ३३ ॥

---

१ सुश्रुताच्या मतें शरीरांत पांच प्रकारचीं पित्तें आहेत, तेच सर्व अग्नि. अरुणदत्त व हेमाद्रि यांच्या मतें पांच महाभूतांतील पांच, सप्त धातूंतील सात व जठराग्नि, हे तेरा अग्नि.

अनुपत्त्यै समासेन विधिरेष प्रदर्शितः ।
निजागंतुविकाराणामुत्पन्नानां च शान्तये ॥ ३४ ॥

जाणून बुजून वाईट आचरण न करणें, इन्द्रियांचा संयम, गत गोष्टींचें स्मरण, देश, काल, प्रकृति वगैरे गोष्टींचें ज्ञान, आणि सद्वर्तन, इतक्या गोष्टी केल्या असतां बहुधा निज व आगन्तुक रोग उत्पन्न होणार नाहींत; व झाले असतां बरे होतील.

शीतोद्भवं दोषचयं वसंते
विशोधयन् ग्रीष्मजमभ्रकाले ।
घनात्यये वार्षिकमाशु सम्यक्
प्राप्नोति रोगानृतुजान्न जातु ॥ ३५ ॥

हेमंत व शिशिर ऋतूंत सांचलेले दोष वसंत ऋतूच्या आरंभीं, ग्रीष्म ऋतूंतील वर्षाऋतूच्या आरंभीं, आणि वर्षाऋतूंतील शरद्-ऋतूच्या आरंभीं, वमन-विरेचनादिकांच्या द्वारा काढून टाकले असतां ऋतुजन्य रोग कदापि होत नाहीं.

नित्यं हिताहारविहारसेवी
समीक्ष्यकारी विषयेष्वसक्तः ।
दाता समः सत्यपरः क्षमावा-
नाप्तोपसेवी च भवत्यरोगः ॥ ३६ ॥

जो मनुष्य नेहमीं हितकर आहारविहारांचें सेवन करितो, प्रत्येक कार्य विचारपूर्वक करितो, विषयांचे ठायीं आसक्त असत नाहीं; जो दाता, सर्वत्र समदृष्टि ठेवणारा, सत्यशील, क्षमाशील व आप्त पुरुषांच्या वाक्यावर विश्वास ठेवून त्याप्रमाणें वागणारा असतो, त्यांसि कधीं रोग होत नाहींत.

---

## अध्याय पांचवा.

अथातो द्रवद्रव्यविज्ञानीयमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां पातळ पदार्थांच्या गुणदोषांविषयीं माहिती सांगतों.

जीवनं तर्पणं हृद्यं ह्लादि बुद्धिप्रबोधनम् ।
तन्वव्यक्तरसं मृष्टं शीतं लघ्वमृतोपमम् ॥ १ ॥
गंगांबु नभसो भ्रष्टं स्पृष्टं त्वर्केंदुमारुतैः ।
हिताहितत्वे तद्भूयो देशकालावपेक्षते ॥ २ ॥

आकाशांतून पडणारें पावसाचें पाणी, जमिनीवर न पडूं देतां, वरच्यावर भांड्यांत धरलें तर तें ओज वाढविणारें, तृप्ति किंवा हुषारी देणारें, हृदयास हितकर, आल्हादकारक, बुद्धिदीपक, स्वच्छ, अव्यक्तरस ( ज्यांत सहाही रस अस्पष्टरूपांत आहेत असें ), स्वादिष्ट, थंड, हलकें व पिण्यास अमृतासारखें असतें. या पाण्यास गांगजल म्हणतात. तेंच पावसाचें पाणी जमिनीवर पडून त्यास सूर्य, चंद्र व वायु यांचा संसर्ग घडला म्हणजे त्याचे बरे-वाईट गुण, पुष्कळ अंशीं ज्या ठिकाणीं व ज्या काळीं तें पडलें असेल त्या स्थलावर व कालावर अवलंबून असतात.

येनाभिवृष्टममलं शाल्यन्नं राजतस्थितम् ।
अक्लिन्नमविवर्णं च तत्पेयं गांगम्

एका चांदीच्या भांड्यांत भात ठेवून त्यावर पावसाचें पाणी टाकावें. जर तो भात जशाचा तसा स्वच्छ राहून त्याचीं शितें व रंग हींही कायम राहिलीं, तर तें गांगजल आहे असें समजून, पिणें वगैरे कामीं वापरावें.

अन्यथा ॥ ३ ॥
सामुद्रं तन्न पातव्यं मासादाश्वयुजाद्विना ।

ही परीक्षा न पटल्यास तें सामुद्रजल आहे असें समजावें. सामुद्रजल आश्विन महिन्याशिवाय इतर वेळीं पिऊं नये.

ऐंद्रमंबु सुपात्रस्थमविपन्नं सदा पिबेत् ॥ ४ ॥
तदभावे च भूयिष्ठमंतरिक्षानुकारि यत् ।
शुचिपृथ्वसितश्वेते देशेऽर्कपवनाहतम् ॥ ५ ॥

पावसाचें पाणी चांगल्या भांड्यांत धरलेलें व स्वच्छ अ मिळेल तर नेहमीं प्यावें. तसें मिळत नसल्यास, त्या पाण्या बरेचसे गुण ज्यांत आहेत असें, स्वच्छ व काळ्या किंवा पांढऱ्य

१ सुश्रुताच्या मताप्रमाणें विचार केला, तर आश्विन महिन्यांत पडणारें पा बहुधा गांगोदकच असतें. आकाशांतून पडणारें पाणी नेहमीं गांगोदकच असे असा नियम नाहीं. आणि यासाठींच गांगोदकाची परीक्षा कशी करावी, सांगितलें आहे. ‘ प्रायश्चाश्वयुजे मासि गांगं वर्षति वारिदः ’ सुश्रुत.

विस्तृत जमिनीवरचें व ज्याला ऊन व वारा चहूंकडून लागत आहे असें दुसरें पाणी प्यावें.

न पिबेत्पंकशैवालतृणपर्णाविलास्तृतम् ।
सूर्येंदुपवनादृष्टमभिवृष्टं घनं गुरु ॥ ६ ॥
फेनिलं जंतुमत्तप्तं दंतग्राह्यतिशैत्यतः ।
अनार्तवं च यद्दिव्यमार्तवं प्रथमं च यत् ॥ ७ ॥
लूतादितंतुविण्मूत्रविषसंश्लेषदूषितम् ।

चिखलानें गढूळ झालेलें, शेवाळ, गवत, पानें वगैरेंनीं आच्छादित झालेलें, ज्यास सूर्याच्या व चंद्राच्या किरणांचें दर्शन व वायूचा स्पर्श कधीं होत नाहीं, नुकतेंच पडलेलें पावसाचें पाणी मिळून गढूळ झालेलें, जड, फेंस आलेलें, जीवजंतु पडलेलें, व दांतांस शिरशिरी बसण्याजोगें गार पाणी पिऊं नये. अवेळीं पडणाऱ्या पावसाचें पाणी गांग असलें तरीही पिऊं नये; त्याचप्रमाणें वर्षाऋतूमधीलही पहिल्या पावसाचें पाणी पिऊं नये; लूत वगैरे क्षुद्र जंतूंची लाळ, मल, मूत्र, विष हीं मिळालेलीं असल्यामुळें दूषित झालेलें पाणीही पिऊं नये.

पश्चिमोदधिगाः शीघ्रवहा याश्चामलोदकाः ॥ ८ ॥
पथ्याः समासात्ता नद्यो विपरीतास्त्वतोऽन्यथा ।

सामान्यतः पश्चिम समुद्रास जाऊन मिळणाऱ्या, जोरानें वाहणाऱ्या व ज्यांचें पाणी निर्मळ आहे अशा नद्यांचें पाणी हितकर असतें. यांच्या उलट लक्षणाच्या नद्यांचें पाणी अहितकर असतें.

उपलास्फालनाक्षेपविच्छेदैः खेदितोदकाः ॥ ९ ॥
हिमवन्मलयोद्भूताः पथ्यास्ता एव च स्थिराः ।
कृमिश्लीपदहृत्कंठशिरोरोगान् प्रकुर्वते ॥ १० ॥

हिमालयांतून किंवा मलयपर्वतापासून निघालेल्या, व ज्यांचें पाणी खडकावर आदळून उसळल्यामुळें क्षुब्ध व विच्छिन्न होऊन सोसाट्यानें वाहत जात आहे, अशा नद्यांचें पाणी हितकर असतें. त्याच ( हिमालय-मलयाचलांतून निघालेल्या ) नद्या संथ वाहणाऱ्या असल्यास त्यांचें पाणी कृमि, श्लीपद, हृद्रोग, कंठरोग व शिरोरोग उत्पन्न करितें.

प्राच्यीऽऽवंत्यपरांतोत्था दुर्नामानि महेंद्रजाः।
उदरश्लीपदातंकान् सह्यविंध्योद्भवाः पुनः॥ ११॥
कुष्ठपांडुशिरोरोगान् दोषघ्न्यः पारियात्रजाः।
बलपौरुषकारिण्यः

बंगाल, माळवा, व कोंकण या देशांतील नद्यांचें पाणी मूळव्याध उत्पन्न करितें. महेंद्र पर्वतापासून निघणाऱ्या नद्यांचें पाणी उदर व श्लीपद उत्पन्न करितें. सह्याद्रि व विन्ध्याद्रि पर्वतांतून निघणाऱ्या नद्यांच्या पाण्यानें कुष्ठ, पांडु व शिरोरोग होतात. पारियात्र ( विन्ध्याद्रीचा वायव्य प्रांत ) देशांतील नद्यांचें पाणी दोषघ्न व बल आणि पौरुष वाढविणारें असतें.

सागरांभस्त्रिदोषकृत् ॥ १२॥

समुद्राचें पाणी त्रिदोष वाढविणारें आहे.

विद्यात्कूपतडागादीन् जांगलानूपशैलतः।

विहीर, तलाव, सरोवर, झरे यांच्या पाण्याचे गुण जांगल, अनूप व पार्वत या देशभेदावर अवलंबून असतात.

नांबु पेयमशक्त्या वा स्वल्पमल्पाग्निगुल्मिभिः॥ १३॥
पांडूदरातिसारार्शोग्रहणीदोषशोथिभिः।
ऋते शरन्निदाघाभ्यां पिबेत्स्वस्थोऽपि चाल्पशः॥ १४॥

ज्यांचा अग्नि मंद आहे, आणि ज्यांस गुल्म, पांडु, उदर, अतिसार, मूळव्याध, संग्रहणी व सूज हे विकार झाले आहेत त्यांनीं पाणी पिऊं नये. तहान सहन नच झाल्यास थोडेंसें प्यावें. निरोगी मनुष्यानें देखील शरद् व ग्रीष्म ऋतूंखेरिज इतर ऋतूंत पाणी थोडें थोडें प्यावें.

समस्थूलकृशा भक्तमध्यांतप्रथमांबुपाः।

जेवणाच्या मध्यें पाणी प्याल्यानें मनुष्य सडपातळ होतो; शेवटीं प्याल्यानें स्थूल होतो आणि आरंभीं प्याल्यानें कृश होतो.

---

१ अनूप देशांतील विहिरींचें पाणी जड असतें, जांगल देशांत तें हलकें असतें, आणि डोंगराळ प्रदेशांत तें त्याहीपेक्षां हलकें असतें.

२ मध्यें पाणी प्याल्यानें धातुसाम्य होऊन मनुष्य सडपातळ होतो, शेवटीं प्याल्यानें आमाशयांत कफवृद्धि होऊन स्थूलता येते, आणि आरंभीं, जठराग्नीत अन्नरूपी सरपण नसल्यामुळें तो मंद होतो. त्यांत पाणी पडल्यानें तो अधिक मंद होतो. त्यामुळें अन्न बरोबर पचत नाहीं व म्हणून बरोबर पुष्टि येत नाहीं. ही याची युक्ति आहे.

शीतं मदात्ययग्लानिमूर्च्छाच्छर्दिश्रमभ्रमान् ॥ १५ ॥
तृष्णोष्णदाहपित्तास्रविषाण्यंबु नियच्छति ।

थंड पाण्यानें मदात्यय, ग्लानि, मूर्च्छा, उलटी, श्रम, भ्रम, तृषा, उष्णता, दाह, रक्तपित्त व विष हे विकार शमन पावतात.

दीपनं पाचनं कंठ्यं लघूष्णं बस्तिशोधनम् ॥ १६ ॥
हिध्माध्मानाऽनिलश्लेष्मसद्यःशुद्धे नवज्वरे ।
कासामपीनसश्वासपार्श्वरुक्षु च शस्यते ॥ १७ ॥

ऊन पाणी दीपक, पाचक, कंठास हितकर, हलकें व मूत्ररेचक असून उचकी, पोटफुगी, वायु, कफ, नवज्वर, खोकला, अजीर्ण, दम व बरगड्यांत दुखणें या विकारांवर आणि नुक्तेंच वमन—विरेचनादि घेतलेल्या मनुष्यास पथ्यकर आहे.

अनभिष्यंदि लघु च तोयं क्वथितशीतलम् ।
पित्तयुक्ते हितं दोषे व्यूषितं तत्रिदोषकृत् ॥ १८ ॥

तापवून निवविलेलें पाणी कफ करीत नाहीं व हलकें असतें. ज्या रोगांत पित्ताधिक्य असेल त्यांत तें हितकर आहे. परंतु तें शिळें असल्यास त्रिदोष उत्पन्न करितें.

नारिकेलोदकं स्निग्धं स्वादु वृष्यं हिमं लघु ।
तृष्णापित्तानिलहरं दीपनं बस्तिशोधनम् ॥ १९ ॥

नारळांतील पाणी स्निग्ध, मधुर, वीर्यवर्धक, थंड, हलकें, तृषा, पित्त व वायु यांचा नाश करणारें, दीपक व मूत्रशोधक असतें.

वर्षासु दिव्यनादेये परं तोये वरावरे ।

पावसाळ्यांत पावसाचें पाणी अत्यंत पथ्यकर व नदीचें पाणी अत्यंत अपथ्यकर असतें.

स्वादुपाकरसं स्निग्धमोजस्यं धातुवर्धनम् ॥ २० ॥
वातपित्तहरं वृष्यं श्लेष्मलं गुरु शीतलम् ।
प्रायः पयः

साधारणपणें कोणतेंही दूध पाककाळीं व रसकाळीं मधुर, स्निग्ध, ओज वाढविणारें, रसादि धातुवर्धक, वात-पित्त-नाशक, शुक्रोत्पादक, कफ करणारें, जड व थंड असतें.

अत्र गव्यं तु जीवनीयं रसायनम् ॥ २१ ॥
क्षतक्षीणहितं मेध्यं बल्यं स्तन्यकरं सरम् ।

श्रमभ्रममदालक्ष्मीश्वासकासातितृट्क्षुधः ॥ २२ ॥
जीर्णज्वरं मूत्रकृच्छ्रं रक्तपित्तं च नाशयेत् ।

त्यापैकीं गाईचें दूध ओज वाढविणारें, रस-रक्तादि धातु वाढविणारें, उरःक्षत व क्षीण झालेल्या मनुष्यास हितकर, धारणाशक्ति वाढविणारें, शक्तिवर्धक, स्त्रियांचें दूध वाढविणारें व सारक असून श्रम, भ्रम, मद, कांतिनाश, दमा, खोकला, अतिशय तृषा व भूक, जीर्णज्वर मूत्रकृच्छ्र व रक्तपित्त या विकारांचा नाश करितें.

हितमत्यग्न्यनिद्रेभ्यो गरीयो माहिषं हिमम् ॥ २३॥

म्हशीचें दूध गाईच्या दुधापेक्षां अधिक जड व थंड असून ज्यांस अतिशय भूक लागते व झोंप येत नाहीं त्यांस हितकर आहे.

अल्पांबुपानव्यायामकटुतिक्ताशनैर्लघु ।
आजं शोषज्वरश्वासरक्तपित्तातिसारजित् ॥ २४ ॥

शेळ्या पाणी थोडें पितात, मेहनत जास्त करितात आणि तिखट व कडू रसांचा पाला वगैरे खातात, म्हणून त्यांचें दूध हलकें, आणि क्षय, ताप, रक्तपित्त व अतिसार यांस नाहींसें करणारें आहे.[१]

ईषद्रूक्षोष्णलवणमौष्ट्रकं दीपनं लघु ।
शस्तं वातकफानाहकृमिशोफोदरार्शसाम् ॥ २५ ॥

उंटिणीचें दूध किंचित् रूक्ष, उष्ण, खारट, दीपक व हलकें असून वात, कफ, पोटफुगी, कृमि, सूज, उदर व मूळव्याध यांवर प्रशस्त आहे.

मानुषं वातपित्तासृगभिघाताक्षिरोगजित् ।
तर्पणाश्च्योतनैर्नस्यैः

स्त्रीच्या अंगावरचें दूध वात, पित्त, रक्तविकार, व अभिघात

---

१ या श्लोकांत बऱ्याच गोष्टींचें दिग्दर्शन केलें आहे. बकऱ्या जरी स्वभावतः मेहनती व हलका आहार करणाऱ्या आहेत, तरी ज्या वेळीं त्या याच्या उलट आहार करतील त्या वेळीं त्यांच्या दुधांत हे गुणही राहणार नाहींत. हाच नियम गाई वगैरेंसही लागू आहे. रात्रीं गाई, शेळ्या वगैरें जनावरें व्यायाम न करितां निश्चेष्ट बसतात. म्हणून त्यांचें सकाळीं काढलेलें दूध संध्याकाळीं काढलेल्या दुधापेक्षां अधिक जड असतें. दिवसा हिंडण्याबागडण्यानें दूध हलकें होतें.

( लागणें ) या कारणांनीं होणाऱ्या नेत्ररोगांस तर्पण[1] केल्यानें, डोळ्यांत घातल्यानें व नाकांत सोडल्यानें बरें करितें.

अहृद्यं तूष्णमाविकम् ॥ २६ ॥
वातव्याधिहरं हिध्माश्वासपित्तकफप्रदम् ।

मेंढीचें दूध रुचीस वाईट, उष्ण, वातरोगनाशक, आणि उचकी, दमा, पित्त व कफ यांना उत्पन्न करणारें आहे.

हस्तिन्याः स्थैर्यकृत्

हत्तिणीचें दूध शरीर मजबूत बनवितें.

बाढमुष्णं त्वैकशफं लघु ॥ २८ ॥
शाखावातहरं साम्ललवणं जडताकरम् ।

गाढवी, घोडी वगैरे एकखुरी जनावरांचें दूध अत्यंत उष्ण, हलकें, शाखागत वायूचें हरण करणारें, किंचित् आंबट, खारट व शरीर जड करणारें असतें.

पयोभिष्यंदि गुर्वामं युक्त्या शृतमतोऽन्यथा ॥ २८ ॥

निरसें[2] दूध जड असून कफ करितें. तें युक्तीनें[3] तापविलें असतां हलकें होऊन कफाचा नाश करितें.

भवेद्गरीयोऽतिशृतं

तें फार तापविलें असतां जड होतें.

धारोष्णममृतोपमम् ।

धारोष्ण दूध तर अमृततुल्य असतें.

अम्लपाकरसं ग्राहि गुरूष्णं दधि वातजित् ॥ २९ ॥
मेदःशुक्रबलश्लेष्मपित्तरक्ताऽग्निशोफकृत् ।
रोचिष्णु शस्तमरुचौ शीतके विषमज्वरे ॥ ३० ॥
पीनसे मूत्रकृच्छ्रे च रूक्षं तु ग्रहणीगदे ।

---

१ डोळ्यांच्या सभोंवतीं, भिजविलेल्या उडदाच्या पिठाची पाळ करून, तींत दूध किंवा तूप भरून ठेवणें, यास तर्पण म्हणतात.

२ निरसें दूध जड असून कफ करितें, असें जें सांगितलें, तें सामान्यतः म्हणून समजावें. स्त्रीचें दूध तापवावयाचें नाहीं. तें तापविल्याशिवायच उपयोगांत आणणें हितकारक आहे.

३ 'खरनादा'नें दूध कसें तापवावें हें सांगितलें आहे. दुधाच्या निम्में पाणी घालून तें आटेपर्यंत दूध तापविलें म्हणजे तें बरोबर तापविलें गेलें म्हणून समजावें.

दहीं पाककाळीं व रसकाळीं आंबट, स्तंभक, जड, उष्ण, वातहारक; मेद, वीर्य, शक्ति, कफ, पित्त, रक्त, अग्नि व सूज उत्पन्न करणारें आणि रुचकर असून अरुचि, शीतज्वर, विषमज्वर (वाताधिक), पीनस, मूत्रकृच्छ्र यांवर हितकर आहे. लोणी काढलें असतां तें संग्रहणीवरही उपयोगी आहे.

नैवाद्यान्निशि नैवोष्णं वसंतोष्णशरत्सु न ॥ ३१ ॥
नामुद्गसूपं नाक्षौद्रं तन्नाघृतसितोपलम् ।
न चानामलकं नापि नित्यं नामंदमन्यथा ॥ ३२ ॥
ज्वरासृक्पित्तवीसर्पकुष्ठपांडुभ्रमप्रदम् ।

रात्रीं दहीं कधीं खाऊं नये. तापलेलें दहीं खाऊं नये. वसंत, ग्रीष्म व शरदृतूंत खाऊं नये. मुगाचें वरण, मध, तूप, खडीसाखर किंवा आंवळकठी यांची जोड असल्यावांचून दहीं खाऊं नये. रोज दहीं खाऊं नये. [1]अदमुरें दहीं खाऊं नये. हे नियम न पाळतां दहीं खाल्यास तें ताप, रक्तपित्त, विसर्प, कुष्ठ, पांडु व भ्रम हे विकार उत्पन्न करितें.

तक्रं लघु कषायाम्लं दीपनं कफवातजित् ॥ ३३ ॥
शोफोदरार्शोग्रहणीदोषमूत्रग्रहारुचीः ।
प्लीहगुल्मघृतव्यापद्गरपांड्वामयान् जयेत् ॥ ३४ ॥

ताक हलकें, तुरट, आंबट, दीपक आणि कफ-वात-हारक असून सूज, उदर, मूळव्याध, संग्रहणी, लघ्वी कोंडणें, अरुचि, कौलूं, गुल्म, तूप ज्यास्त खाल्यानें होणारे विकार, कृत्रिम विषदोष व पांडुरोग यांस बरें करितें.

तद्वन्मस्तु सरं स्रोतःशोधि विष्टंभजिल्लघु ।

दह्यावरच्या निवळींत ताकासारखेच गुण असून, ती सारक, मार्ग मोकळे करणारी, वायु खुला करणारी व हलकी आहे.

---

१ अदमुरें दहीं हें पथ्यकर आहे, अशी अज्ञानमूलक समजूत लोकांत फार प्रचलित आहे, पण तसें दहीं खाणें हें फारच हानिकारक आहे. या दह्यामध्यें पुरतें न विरजल्यामुळें दह्याचे गुण नसतात, व दुधाचेही गुण नाहींसे झालेले असतात. शिवाय दुधांत ताकाचें मिश्रण झाल्यामुळें 'विरुद्धमम्लं पयसा' या नियमानें त्यांत विरुद्ध अन्नाचे दोष उत्पन्न झालेले असतात.

नवनीतं नवं वृष्यं शीतं वर्णबलाग्निकृत् ॥ ३५ ॥
संग्राहि वातापित्तासृक्क्षयार्शोर्दितकासजित् ।

दहीं घुसळून काढलेलें ताजें लोणी वीर्यवर्धक, थंड, शरीराचें तेज, शक्ति व जठराग्नि यांस वाढविणारें आणि स्तंभक असून, वात, पित्त, रक्तपित्त, क्षय, मूळव्याध, अर्दितवायु व खोकला या रोगांस नाहींसें करितें.

क्षीरोद्भवं तु संग्राहि रक्तपित्ताक्षिरोगजित् ॥ ३६ ॥

दूध घुसळून काढलेलें लोणी स्तंभक असून, रक्तपित्त व नेत्ररोग बरे करितें.

शस्तं धीस्मृतिमेधाग्निबलायुःशुक्रचक्षुषाम् ।
बालवृद्धप्रजाकांतिसौकुमार्यस्वरार्थिनाम् ॥ ३७ ॥
क्षतक्षीणपरीसर्पशस्त्राग्निग्लपितात्मनाम् ।
वातपित्तविषोन्मादशोषाऽलक्ष्मीज्वरापहम् ॥ ३८ ॥
स्नेहानामुत्तमं शीतं वयसः स्थापनं परम् ।
सहस्रवीर्यं विधिभिर्वृतं कर्मसहस्रकृत् ॥ ३९ ॥

तूप बुद्धि, स्मरणशक्ति, धारणशक्ति, जठराग्नि, शक्ति, आयुष्य, वीर्य व दृष्टि यांस वाढविणारें; आणि बालक, म्हातारे; संतति, कांति, सुकुमारपणा व सुस्वर यांची इच्छा करणारे व उरःक्षत, क्षय, विसर्प, शस्त्राघात किंवा अग्निदाह यांच्या योगानें थकलेले, अशा मनुष्यांस हितावह आहे. याशिवाय वात, पित्त, विष, उन्माद, शोष, पाप व ताप यांस दूर करितें. तें एकंदर स्नेहांत उत्तम, थंड, व उत्कृष्ट तारुण्य राखणारें असून, संयोग-संस्कारांनीं अनेक प्रकारची शक्ति उत्पन्न करितां येण्यासारखें असल्यामुळें अनेक रोगांवर उपयोगीं पडतें.

मदापस्मारमूर्च्छायशिरःकर्णाक्षियोनिजान् ।
पुराणं जयति व्याधीन् व्रणशोधनरोपणम् ॥ ४० ॥

( दहा पांच वर्षांचें ) जुनें तूप उन्माद, फेंपरें, मूर्च्छा, शिरोरोग, कर्णरोग, नेत्ररोग, व योनिरोग बरे करितें; आणि व्रण शुद्ध करून भरून आणितें.

बल्याः किलाटपीयूषकूर्चिकामोरणादयः ।
शुक्रनिद्राकफकरा विष्टंभिगुरुदोषलाः ॥ ४१ ॥

किलाट, खर्वस, कूर्चिका[1], मोरण[2] वगैरे दुधाचे व ताकाचे प्रकार बलकर, वीर्यप्रद, निद्रा आणणारे, अवष्टंभक, जड व दोष वाढविणारे आहेत.

**गव्ये क्षीरघृते श्रेष्ठे निंदिते चाविसंभवे ।**

गाईचें दूध व तूप सर्वांत उत्तम, व मेंढीचें दूध-तूप सर्वांत वाईट आहे.

**इक्षो रसो गुरुः स्निग्धो बृंहणः कफमूत्रकृत् ॥ ४२ ॥**
**वृष्यः शीतोऽस्रपित्तघ्नः स्वादुपाकरसः सरः ।**
**सोऽग्रे सलवणो दंतपीडितः शर्करासमः ॥ ४३ ॥**

उंसाचा रस जड, स्निग्ध, पौष्टिक, कफ व मूत्र वाढविणारा, वीर्यवर्धक, थंड, रक्तपित्तनाशक, पाककाळीं व रसकाळीं गोड व सारक आहे. शेंड्याकडच्या भागाचा रस किंचित् खारट असतो. दांतांनीं चावून खल्लेल्या उंसाचा रस गुणांनीं साखरेप्रमाणें आहे.

**मूलाग्रजंतुजग्धादिपीडनान्मलसंकरात् ।**
**किंचित्कालं विधृत्या च विकृतिं याति यांत्रिकः ॥ ४४ ॥**
**विदाही गुरुविष्टंभी तेनासौ**

चरकांत पिळून काढलेल्या उंसाचा रस, मूळ, शेंडा, किडलेला वगैरे भाग यांसह पिळला गेल्यामुळें, काढतांना त्यांत मळ मिसळल्यामुळें व कांहीं वेळपर्यंत हवेंत राहिल्यामुळें बिघडतो; व विदाही, जड व अवष्टंभक होतो.

**तत्र पौंड्रकः ।**
**शैत्यप्रसादमाधुर्यैर्वरस्तमनुवांशिकः ॥ ४५ ॥**
**शातपर्वककांतारनैपालाद्यास्ततः क्रमात् ।**
**सक्षाराः सकषायाश्च सोष्णाः किंचिद्विदाहिनः ॥ ४६ ॥**

पांढऱ्या उंसाचा रस थंड, स्वच्छ व मधुर असल्यामुळें सर्वोत्तम आहे. त्याच्या खालोखाल तांबडा ऊंस आहे. त्याच्या खालोखाल अनुक्रमें शातपर्वक ( पुष्कळ पेरांचा ), कांतार, नेपाळ वगैरे जातीचे ऊंस आहेत. ते किंचित् खारट, तुरट. उष्ण व विदाही असतात.

---

१ पुष्कळसें ताक घालून शिजविलेलें दूध. २ दहीं व ताक घालून शिजविलेलें दूध. ३ त्याचाच पातळ भाग.

फाणितं गुर्वभिष्यंदि चयकृन्मूत्रशोधनम् ।

काकवी अतिशय जड, कफ करणारी, त्रिदोषकारक व मूत्रशोधन आहे.

नातिश्लेष्मकरो धौतः सृष्टमूत्रशकृद्गुडः ॥ ४७ ॥

स्वच्छ गूळ किंचित् कफकारक, व मलमूत्रसारक आहे.

प्रभूतक्रिमिमज्जासृङ्मेदोमांसकफोऽपरः ।

मलिन गूळ कृमि, मज्जा, रक्त, मेद, मांस व कफ यांना वाढवितो.

हृद्यः पुराणः पथ्यश्च नवः श्लेष्माग्निसादकृत् ॥ ४८ ॥

जुना गूळ हृदयास हितकर व पथ्यकर आहे; आणि नवा गूळ कफ व अग्निमान्द्य करितो.

वृष्याः क्षतक्षीणहिता रक्तपित्तानिलापहाः ।
मत्स्यंडिकाखंडसिताः क्रमेण गुणवत्तमाः ॥ ४९ ॥

राब, पिठीसाखर व खडीसाखर वीर्यवर्धक, क्षत व क्षय झालेल्या रोग्यास हितावह, आणि रक्तपित्तनाशक व वायुहारक असून अनुक्रमें एकापेक्षां एक गुणानें श्रेष्ठ आहेत.[1]

तद्गुणा तिक्तमधुरा कषाया यासशर्करा ।

धमासाच्या[2] साखरेंत वरील सर्व गुण असून, ती किंचित् कडू व तुरट असते.

दाहतृट्छर्दिमूर्च्छासृक्पित्तघ्न्यः सर्वशर्कराः ॥ ५० ॥

सर्व प्रकारची साखर दाह, तहान, ओकारी, मूर्च्छा व रक्तपित्त यांचा नाश करिते.

शर्करेक्षुविकाराणां फाणितं च वरावरे ।

उंसाच्या रसापासून बनणाऱ्या एकंदर पदार्थांत खडीसाखर उत्तम व काकवी वाईट आहे.

---

१ उंसाच्या रसापासून तयार होणारे पदार्थ जसजसे अधिकाधिक स्वच्छ होत जातील, तसतसें त्यांचें शैत्य, स्वच्छपणा, गोडी हे गुण वाढत जातात, असा सामान्य नियमच आहे.

२ ही साखर पाचक व पौष्टिक असून ज्या लहान मुलांस पचन बरोबर होत नाहीं व जीं रोडवत जातात, त्यांस चांगली हितावह आहे. डाक्टर लोक 'म्याना' या नांवानें या साखरेचा पुष्कळ उपयोग करितात.

चक्षुष्यं छेदि तृट्श्लेष्मविषहिध्मास्रपित्तनुत् ॥ ५१ ॥
मेहकुष्ठकृमिच्छर्दिश्वासकासातिसारनुत् ।
व्रणशोधनसंधानरोपणं वातलं मधु ॥ ५२ ॥
रूक्षं कषायमधुरं तत्तुल्या मधुशर्करा ।

मध नेत्रांस हितकर, घट्ट जमलेल्या पदार्थांस पातळ करून झाडून काढणारा, तहान, कफ, विष, उचकी, रक्तपित्त, प्रमेह, कुष्ट, कृमि, उलटी, दमा, खोकला व अतिसार यांस नाहींसा करणारा, जखम शुद्ध करून आणि जुळवून भरून आणणारा, वातुळ, रूक्ष आणि रुचीनें तुरट व गोड असा आहे. मधाच्या साखरेंतही हेच गुण आहेत.

उष्णमुष्णार्तमुष्णे च युक्तं चोष्णैर्निहंति तत् ॥ ५३ ॥

मध तापवून, उष्णविकारांत, उष्ण देशांत, उष्णकाळीं व उष्णपदार्थाबरोबर सेवन केला असतां प्राणघात करितो.

प्रच्छर्दने निरूहे च मधूष्णं न निवार्यते ।
अलब्धपाकमाश्वेव तयोर्यस्मान्निवर्तते ॥ ५४ ॥

उलटीच्या व निरूहबस्तीच्या औषधांत ऊन मध वापरला तरी चालेल. कारण, त्याचें कोठ्यांत पचन न होतां तो लगेच उलटी किंवा बस्तीचीं औषधें यांबरोबर तसाच परत येतो.

तैलं स्वयोनिवत्

तेलाचे गुण ज्या पदार्थापासून तें काढलें असेल त्या पदार्थानुरूप असतात.

तत्र मुख्यं तीक्ष्णं व्यवायि च ।
त्वग्दोषकृदचक्षुष्यं सूक्ष्मोष्णं कफकृन्न च ॥ ५५ ॥
कृशानां बृंहणायालं स्थूलानां कर्शनाय च ।
बद्धविट्कं कृमिघ्नं च संस्कारात्सर्वदोषजित् ॥ ५६ ॥

त्यांपैकीं तिळाचें तेल तीक्ष्ण, शरीरभर लौकर पसरणारें, त्यापासून त्वचा दूषित करणारें, डोळ्यांस अपाय करणारें; शरीरांतील सूक्ष्म नाड्या, शिरा यांत प्रवेश करणारें; उष्ण व कफ न करणारें असें आहे. तें कृश मनुष्यांस पुष्ट करितें व स्थूल मनुष्यांस

कृश करितें. हें मळ घट्ट करणारें व कृमिनाशक असून निरनिराळ्या औषधांच्या संस्कारानें सर्व रोगांवर उपयोगीं पडतें.

सतिक्तोषणमैरंडं तैलं स्वादु सरं गुरु।
वर्ध्मगुल्मानिलकफानुदरं विषमज्वरम् ॥ ५७ ॥
रुक्शोफौ च कटीगुह्यकोष्ठपृष्ठाश्रयौ जयेत्।
तीक्ष्णोष्णं पिच्छिलं विस्रं रक्तैरंडोद्भवं त्वति ॥ ५८ ॥

एरंडेल तेल किंचित् कडू, तिखट, गुळचट, सारक व जड असून अंडवृद्धि, गुल्म, वात, कफ, उदर, विषमज्वर आणि कंबर, गुह्येन्द्रिय, कोठा व पाठ यांतील शूळ व सूज यांस नाहींसें करितें. तें तीक्ष्ण, उष्ण व बुळबुळीत असून त्यास उग्र वास यतो. तांबड्या एरंडाच्या तेलांत तर हे गुण अतिशयच आहेत.

कटूष्णं सार्षपं तीक्ष्णं कफशुक्रानिलापहम्।
लघुपित्तास्रकृत् कोठकुष्ठार्शोव्रणजंतुजित् ॥ ५९ ॥

शिरसेल किंवा मोहरींचें तेल तिखट, उष्ण, तीक्ष्ण; कफ, वीर्य व वायु यांचें नाशक, हलकें, रक्तपित्त करणारें; आणि अंगावरच्या गांधी, कुष्ठ, मूळव्याध, जखम व कृमि यांस बरें करणारें आहे.

आक्षं स्वादु हिमं केश्यं गुरु पित्तानिलापहम्।

बेहड्याचें तेल मधुर, थंड, केंस वाढविणारें, जड आणि वातपित्तनाशक आहे.

नात्युष्णं निंबजं तिक्तं कृमिकुष्ठकफप्रणुत् ॥ ६० ॥

कडुलिंबाच्या बियांचें तेल किंचित् उष्ण, कडू, आणि पहिल्या प्रतीचें कृमिनाशक, कुष्ठनाशक व कफनाशक आहे.

उमाकुसुंभजं चोष्णं त्वग्दोषकफपित्तकृत्।

अळशीचें व करडईचें तेल उष्ण असून त्वचेचे विकार व कफपित्त उत्पन्न करितें.

---

१ हे दोन गुण परस्परविरुद्ध दिसतात. तथापि त्यांतील मर्म असें आहे कीं, कृश मनुष्याचीं स्रोतें सुकल्यामुळें त्यांतून अन्नरस बरोबर जात नाहीं व धातूंचें पोषण न झाल्यामुळें मनुष्य कृश होतो. तेल तीक्ष्ण असल्यामुळें स्रोतें मोकळीं करितें व त्यांतून अन्नरस जाऊं लागला म्हणजे पुष्टि येते. तसेंच तेल सूक्ष्म असल्यामुळें सर्व स्रोतांत प्रवेश करून तीक्ष्णादि गुणयोगानें मेदास झाडून टाकितें. या योगानें मनुष्य कृश होतो.

वसा मज्जा च वातघ्नौ बलपित्तकफप्रदौ ॥ ६१ ॥
मांसानुगस्वरूपौ च विद्यान्मेदोऽपि ताविव ।

वसा ( शुद्ध मांसाचा स्नेह ), मज्जा ( हाडांतील स्नेह ) व चरबी हीं वातनाशक, बल, पित्त व कफ वाढविणारीं असून विशेष गुणांत त्या त्या प्राण्याच्या मांसाप्रमाणें असतात.

दीपनं रोचनं मद्यं तीक्ष्णोष्णं तुष्टिपुष्टिदम् ॥ ६२ ॥
सस्वादुतिक्तकटुकमम्लपाकरसं सरम् ।
सकषायं स्वरारोग्यप्रतिभावर्णकृल्लघु ॥ ६३ ॥
नष्टनिद्राऽतिनिद्रेभ्यो हितं पित्तास्रदूषणम् ।
कृशस्थूलहितं रूक्षं सूक्ष्मं स्रोतोविशोधनम् ॥ ६४ ॥
वातश्लेष्महरं युक्त्या पीतं विषवदन्यथा ।

मद्य दीपक, रोचक, तीक्ष्ण, उष्ण, आनंददायक, पौष्टिक, किंचित् गोड, कडू, तिखट, तुरट, पाककाळीं व रसकाळीं आंबट, सारक; स्वर, आरोग्य, बुद्धि व तेज वाढविणारें, हलकें, मुळींच झोंप न येणें किंवा अतिनिद्रा यांवर हितकर; रक्तपित्तदूषक, कृश व स्थूल मनुष्यांस हितकर; रूक्ष, सूक्ष्म, स्रोतें मोकळीं करणारें, व वातकफहारक आहे. परंतु हे गुण त्याचें विधियुक्त पान केल्यानेंच प्राप्त होतात. नाहींतर तें विषाप्रमाणें अपाय करितें.

गुरु त्रिदोषजननं नवं जीर्णमतोऽन्यथा ॥ ६५ ॥

नवें मद्य जड व त्रिदोषजनक असून जुनें याच्या उलट आहे.

पेयं नोष्णोपचारेण न विरिक्तक्षुधातुरैः ।
नात्यर्थतीक्ष्णमृद्वल्पसंभारं कलुषं न च ॥ ६६ ॥

जो नेहमीं उष्ण आहारविहार सेवन करितो, ज्यानें जुलाब घेतला आहे किंवा जो भुकेलेला आहे त्यानें, आणि अतिशय तीक्ष्ण, किंवा अतिशय मृदु, ज्यांत पुरता मसाला पडलेला नाहीं असें, व गढूळ मद्य पिऊं नये.

गुल्मोदरार्शोग्रहणीशोषहृत् स्नेहनी गुरुः ।
सुराऽनिलघ्नी मेदोसृक्स्तन्यमूत्रकफावहा ॥ ६७ ॥

धान्याची दारू गुल्म, उदर, मूळव्याध, संग्रहणी व राजयक्ष्मा हे विकार हरण करणारी, स्निग्धता आणणारी, जड, वातनाशक; आणि मेद, रक्त, स्त्रियांचें दूध, मूत्र व कफ वाढविणारी अशी आहे.

तद्गुणा वारुणी हृद्या लघुस्तीक्ष्णा निहंति च ।
शूलकासवमिश्वासविबंधाध्मानपीनसान् ॥ ६८ ॥

ताडी, माडी, व शिंदी यांचे गुण सुरेसारखेच असून शिवाय रुचकर, हलकी व तीक्ष्ण असून शूळ, खोकला, वांति, दमा, दोषांचा अवष्टंभ, पोटफुगी, व पीनस यांचा नाश करिते.

नातितीव्रमदा लघ्वी पथ्या बैभीतकी सुरा ।
व्रणे पांड्वामये कुष्ठे न चात्यर्थं विरुध्यते ॥ ६९ ॥

बेहड्यांची दारू हलकी व पथ्यकर असून फार तीव्र अम्मल आणीत नाहीं; आणि व्रण, पांडुरोग व कुष्ठ या विकारांत इतर मद्यांइतकी विशेष बाधक होत नाहीं.

यथाद्रव्यगुणोऽरिष्टः सर्वमद्यगुणाधिकः ॥ ७० ॥
ग्रहणीपांडुकुष्ठार्शःशोफशोषोदरज्वरान् ।
हंति गुल्मकृमिप्लीह्नः कषायकटुवातलः ॥ ७१ ॥

अरिष्टाचे गुण त्यांत पडणाऱ्या द्रव्यांसारखे असून त्यांत मद्याचे सर्व गुण अधिक प्रमाणांत असतात. तो तुरट, तिखट व वातुळ असून संग्रहणी, पांडु, कुष्ठ, मूळव्याध, सूज, क्षय, उदर, ताप, गुल्म, कृमि व पानथरी हे रोग बरे करितो.

मार्द्वीकं लेखनं हृद्यं नात्युष्णं मधुरं सरम् ।
अल्पपित्तानिलं पांडुमेहार्शःकृमिनाशनम् ॥ ७२ ॥

द्राक्षांचें मद्य दोष झाडणारें, रुचकर, बेताचें उष्ण, गोड, सारक, किंचित् वातपित्त करणारें, आणि पांडु, प्रमेह, मूळव्याध व कृमि यांचा नाश करणारें आहे.

अस्मादल्पांतरगुणं खार्जूरं वातलं गुरु ।

खजुराची दारू वातुळ व जड असून तिच्या व द्राक्षाच्या दारूच्या गुणांत थोडाच फरक आहे.

शार्करः सुरभिः स्वादुर्हृद्यो नातिमदो लघुः ॥ ७३ ॥

साखरेची दारू सुगंधी, मधुर, रुचकर, फार अम्मल न आणणारी व हलकी असते.

सृष्टमूत्रशकृद्वातो गौडस्तर्पणदीपनः ।

गुळाची दारू मलमूत्रसारक, वातोत्सर्जक, तृप्तिकारक व अग्नि-दीपक असते.

वातपित्तकरः सीधुः स्नेहश्लेष्मविकारहा ॥ ७४ ॥
मेदः शोफोदरार्शोघ्नस्तत्र पक्वरसो वरः[1]।

शिजविलेल्या किंवा बिनशिजविलेल्या उंसाच्या रसाची दारू वातपित्तकर असून तूप वगैरे पदार्थ जास्त खाल्ल्यानें होणारे विकार व कफविकार यांस नाहींशी करिते. परंतु शिजविलेल्या रसाची दारू गुणानें श्रेष्ठ असून मेद, सूज, उदर व मूळव्याध यांस नष्ट करिते.

छेदी मध्वासवस्तीक्ष्णो मेहपीनसकासजित् ॥ ७५ ॥

मधाची दारू दोषांचें छेदन करणारी व तीक्ष्ण असून प्रमेह, पीनस व खोकला यांस नष्ट करिते.

रक्तपित्तकफोत्क्लेदि शुक्तं वातानुलोमनम् ।
भृशोष्णतीक्ष्णरूक्षाम्लहृद्यं रुचिकरं सरम् ॥ ७६ ॥
दीपनं शिशिरस्पर्शं पांडुदृक्कृमिनाशनम् ।

सु-(शु-)क्त रक्त, पित्त व कफ यांस फार पातळ करणारें, वायूस आपल्या मार्गावर आणणारें, अत्यंत उष्ण, तीक्ष्ण, रूक्ष, आंबट, खाण्यास प्रिय, रुचिकर, सारक, अग्निदीपक, शीतस्पर्श, आणि पांडु, दृष्टि व कृमि यांचें नाशक आहे.

गुडेक्षुमद्यमार्द्वीकशुक्तं लघु यथोत्तरम् ॥ ७७ ॥

गूळ, उंसाचा रस, मद्य व द्राक्षासव यांची सुक्तें उत्तरोत्तर अनुक्रमें एकाहून एक हलकीं आहेत.

कंदमूलफलाद्यं च तद्वद्विद्यात्तदाऽसुतम् ।

या सुक्तांत कंद, मुळें, फळें वगैरे घालून ठेवलीं असतां त्यास आसुत म्हणतात. याचे गुण सुक्तासारखेच असतात.

शांडाकी चासुतं चान्यत्कालाम्लं रोचनं लघु ॥ ७८ ॥

---

१ उंसाचा रस, मध, गूळ, कांजी वगैरेंचें मिश्रण तीन दिवस धान्याच्या राशींत पुरून ठेविलें म्हणजे तयार होतें तें सुक्त. यास शिरका म्हणतां येईल.

शांडाकी[1] व कालाम्ल[2] आसुत रुचकर व हलकें असतें.

धान्याम्लं भेदि तीक्ष्णोष्णं पित्तकृत्स्पर्शशीतलम् ।
श्रमक्लमहरं रुच्यं दीपनं बस्तिशूलनुत् ॥ ८० ॥
शस्तमास्थापने हृद्यं लघु वातकफापहम् ।

धान्याम्ल ( आंबविलेली पेज, कांजी ) मलभेदक, तीक्ष्ण, उष्ण, पित्तकर, स्पर्शानें शीतळ, श्रम व ग्लानि दूर करणारें, रोचक, दीपक, बस्तिशूलनाशक, खाण्यास प्रिय, हलकें, वातकफनाशक आणि आस्थापन बस्तींत वापरण्यास प्रशस्त आहे.

मूत्रं गोऽजाविमहिषीगजाश्वोष्ट्रखरोद्भवम् ॥ ८१ ॥
पित्तलं रूक्षतीक्ष्णोष्णं लवणानुरसं कटु ।
कृमिशोफोदरानाहशूलपांडुकफानिलान् ॥ ८१ ॥
गुल्माऽरुचिविषश्वित्रकुष्ठार्शांसि जयेल्लघु ।

गाय, शेळी, मेंढी, म्हैस, हत्ती, घोडा, उंट व गाढव यांचें मूत्र पित्तकर, रूक्ष, तीक्ष्ण, उष्ण, तिखट, किंचित् खारट व हलकें असून कृमि, सूज, उदर, पोटफुगी, शूळ, पांडुरोग, कफ, वायु, गुल्म, अरुचि, विषविकार, सफेत कोड, कुष्ठ व मूळव्याध यांस नाहींसें करितें.

तोयक्षीरेक्षुतैलानां वर्गैर्मद्यस्य च क्रमात् ॥ ८३ ॥
इति द्रवैकदेशोऽयं यथास्थूलमुदाहृतः ॥

याप्रमाणें पाणी, दूध, ऊंस, तेल व मद्य या क्रमानें उक्त पांच वर्गांत द्रवद्रव्यांचें अंशतः व स्थूलमानानें वर्णन केलें.

---

## अध्याय सहावा.

अथातोऽन्नस्वरूपविज्ञानीयमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां या अध्यायांत भक्ष्य पदार्थांच्या गुणदोषांचें विवेचन करितों.

रक्तो महान् सकलमस्तूर्णकः शकुनाहृतः ।
सारामुखो दीर्घशूको रोध्रशूकः सुगंधकः ॥ १ ॥

---

१ मुळें, भाज्या, कंद वगैरे सुक्तांत घालून काळें जिरें, मोहऱ्या वगैरे मिळवून तयार केलेलें तें.

२ शाण्डाकी किंवा दुसरें कोणतेंही आसुत आंबट द्रव्यें न घालतां फक्त पुष्कळ दिवस राहिल्यानें आंबट झालेलें.

पतंगास्तपनीयाश्च ये चान्ये शालयः शुभाः ।
स्वादुपाकरसाः स्निग्धा वृष्या बद्धाल्पवर्चसः ॥ २ ॥
कषायानुरसाः पथ्या लघवो मूत्रला हिमाः ।
शूकजेषु

तांबड्या साळी, मोठ्या साळी ( पटणी ), कलम, तूर्णक, शकु[1]नाहृत, सारामुख[2] (कृष्ण शूक) दीर्घशूक[3], रोध्रशूक[4], सुगंधक[5], पतंग व तपनीय या व अशाच दुसऱ्या चांगल्या जातीच्या साळी शूक[6]धान्यांत (कणसांत होणाऱ्या) मोडतात. त्या पाककाळीं व रसकाळीं मधुर, स्निग्ध, वीर्यवर्धक, मळ थोडा व घट्ट ( खडा ) उत्पन्न करणाऱ्या, मागाहून किंचित् तुरट लागणाऱ्या, पथ्यकर, हलक्या, जास्त लघवी आणणाऱ्या व थंड आहेत.

वरस्तत्र रक्तस्तृष्णात्रिदोषहा ॥ ३ ॥

या सर्वांत तांबड्या साळी श्रेष्ठ असून तृषाशामक व त्रिदोषनाशक आहेत.

महांस्तस्यानुकलमस्तं चाप्यनु

त्याच्या खालोखाल मोठ्या साळी, त्याहून उतरत्या कलमसाळी आहेत.

ततः परे ।
यवका हायनाः पांसुबाष्पनैषधकादयः ॥ ४ ॥
स्वादूष्णा गुरवः स्निग्धाः पाकेऽम्लाः श्लेष्मपित्तलाः ।
सृष्टमूत्रपुरीषाश्च पूर्वं पूर्वं च निंदिताः ॥ ५ ॥

त्याच्या खालोखाल यवक, हायन, पांसु, बाष्प, नैषध, वगैरे जातीच्या साळी आहेत. त्या गोड, उष्ण, जड, पाककाळीं आंबट कफपित्त वाढविणाऱ्या व मलमूत्रसारक असून यांतील पूर्वींच्या पूर्वींच्या साळी जास्त दोषयुक्त आहेत.

---

१ बुद्धाच्या वेळेस उत्तर कुरुदेशांतून हंसांनीं मगध देशांत आपल्या चोंचींतून या जातीचें भात नेलें होतें, त्याची तेथें पेरणी करून पुढें पुष्कळ विस्तार झाला. म्हणून शकुनाहृत हें नांव पडलें. २ ज्याचीं कणसें काळीं होतात ते. ३ लांब कणसाचें. ४ लोध्राच्या फुलासारखीं याचीं कणसें असतात. ५ आंबेमोहर, कमोद वगैरे सुवासिक जाती. ६ ज्यांना कुसें असतात, त्या धान्यांना शूकधान्यें म्हणतात.

स्निग्धो ग्राही गुरुः स्वादुस्त्रिदोषघ्नः स्थिरो हिमः।
षष्टिको व्रीहिषु श्रेष्ठो गौरश्चासितगौरतः॥ ६॥

व्रीहि ( लवकर पिकून तयार होणाऱ्या—हळव्या ) भातांत साठेसाळी श्रेष्ठ असून स्निग्ध, स्तंभक, हलक्या, गोड, त्रिदोषनाशक, शरीर दृढ करणाऱ्या व थंड आहेत. साठेसाळींत पांढऱ्या व काळसरपांढऱ्या अशा दोन जाती आहेत. त्यांत काळसरपांढऱ्यांपेक्षां पांढऱ्या गुणांनीं श्रेष्ठ आहेत.

ततः क्रमान्महाव्रीहिकृष्णव्रीहिजतूमुखाः।
कुक्कुटांडकपालाख्यपारावतकशूकराः॥ ७॥
वरकोद्दालकोज्वालचीनशारददुर्दराः।
गंधनाः कुरुविंदाश्च गुणैरल्पांतराः स्मृताः॥८॥

त्याच्या खालोखाल क्रमानें महाव्रीहि, कृष्णव्रीहि, जतुमुख, कुक्कुटांड, कपाल, पारावतक, शूकर, वरक, उद्दालक, उज्वाल चीन, शारद, दुर्दर, गंधन व कुरुविंद या जाती आहेत व या, सर्वांच्या गुणांत थोडेंच अंतर आहे.

स्वादुरम्लविपाकोऽन्यो व्रीहिः पित्तकरो गुरुः।

या शिवाय इतर जातीचे व्रीहि मधुर, अम्लविपाकी, पित्तकर व जड आहेत.

बहुमूत्रपुरीषोष्मा त्रिदोषस्त्वेव पाटलः॥ ९॥

पाटलजातीय व्रीहि ( पाडळीच्या फुलासारखा ) मलमूत्र व उष्णता वाढविणारा व त्रिदोषवर्धक आहे.

कंगुकोद्रवनीवारश्यामाकादि हिमं लघु।
तृणधान्यं पवनकृल्लेखनं कफपित्तहृत्॥ १०॥

राळे, हरीक, देवभात, सांवे वगैरे तृणधान्यें थंड, हलकीं, वात वाढविणारीं, दोषांचें छेदन करणारीं व कफपित्तनाशक आहेत.

भग्नसंधानकृत्तत्र प्रियंगुर्बृंहणी गुरुः।

त्यांपैकीं राळे मोडलेलें हाड सांधणारे, पौष्टिक व जड आहेत.

कोरदूषः परं ग्राही स्पर्शशीतो विषापहः॥ ११॥

हरीक अत्यंत स्तंभक, शीतस्पर्श व विषहारक आहेत.

रूक्षः शीतो गुरुः स्वादुः सरो विड्वातकृद्यवः।

वृष्यः स्थैर्यकरो मूत्रमेदःपित्तकफान् जयेत् ॥ १२ ॥
पीनसश्वासकासोरुस्तंभकंठत्वगामयान् ।

जव रूक्ष, थंड, जड, गोड, सारक, मळ व वायु वाढविणारे, वीर्यवर्धक, व शरीरास बळकटी आणणारे असून मूत्रविकार, मेद, पित्तकफविकार, पीनस, दमा, खोकला, मांड्या जखडणें आणि गळ्याचे व त्वचेचे रोग यांस बरें करितात.

न्यूनो यवादन्ययवः

जवांपेक्षां निःशूक ( बिनकणसांचे ) जव गुणांनें कमी आहेत.

रूक्षोष्णो वंशजो यवः ॥ १६ ॥

वेणुयव रूक्ष व उष्ण आहे.

वृष्यः शीतो गुरुः स्निग्धो जीवनो वातपित्तहा ।
संधानकारी मधुरो गोधूमः स्थैर्यकृत्सरः ॥ १४ ॥

गहूं वीर्यवर्धक, थंड, जड, स्निग्ध, ओज वाढविणारा, वातपित्त-नाशक, मोडलेलें हाड सांधणारा, गोड, बलकर व सारक आहे.

पथ्या नंदीमुखी शीता कषायमधुरा लघुः ।

लांबट व बारीक जातीचे गहूं ( नंदीमुखी ) थंड, तुरटगोड व हलके असतात.

मुद्गाढकीमसूरादि शिंबीधान्यं विबंधकृत् ॥ १५ ॥
कषायं स्वादु संग्राहि कटुपाकं हिमं लघु ।
मेदःश्लेष्मास्रपित्तेषु हितं लेपोपसेकयोः ॥ १६ ॥

मूग, तुरी, मसुरा, वगैरे शिंबीधान्यें[1] स्रोतांचा अवरोध करणारीं, तुरट, गोड, स्तंभक, पाककाळीं तिखट, थंड, हलकीं, मेद, कफ व रक्तपित्त या विकारांवर हितकर असून पोटीस व आमटी किंवा वरण करण्यास प्रशस्त आहेत.

वरोऽत्र मुद्गोल्पचलः कलायस्त्वतिवातलः ।

सर्व द्विदल धान्यांत मूग श्रेष्ठ असून किंचित् वातुळ आहेत. आणि वाटाणा अतिशय वातुळ आहे.

राजमाषोऽनिलकरो रूक्षो बहुशकृद्गुरुः ॥ १७ ॥

चवळ्या वातुळ, रूक्ष, मळवर्धक, व जड आहेत.

---

१ शेंगांत होणारीं धान्यें.

उष्णा कुलत्थाः पाकेऽम्लाः शुक्राश्मश्वासपीनसान्।
कासार्शःकफवातांश्च घ्नंति पित्तास्रदाः परम् ॥ १८ ॥

कुळीथ उष्ण, पाककाळीं आंबट व अत्यंत रक्तपित्त वाढविणारे असून वीर्य, मुतखडा, दमा, पीनस, खोकला, मूळव्याध व कफवातविकार यांचा नाश करितात.

निष्पावो वातपित्तास्रस्तन्यमूत्रकरो गुरुः।
सरो विदाही दृक्शुक्रकफशोफविषापहः ॥ १९ ॥

पावटे वातुळ, पित्तकर, रक्त, दूध व मूत्र वाढविणारे, जड, सारक व विदाही असून दृष्टि, वीर्य, कफ, सूज व विषविकार, यांस नाहींसें करितात.

माषः स्निग्धो बलश्लेष्ममलपित्तकरः सरः।
गुरूष्णोऽनिलहा स्वादुः शुक्रवृद्धिविरेककृत् ॥ २० ॥

उडीद स्निग्ध, बलकर, कफवर्धक, मलवर्धक, पित्तकर, सारक, जड, गरम, वातहारक, गोड आणि वीर्यवर्धक व वीर्यरेचक आहेत.

फलानि माषवद्विद्यात्काकांडोलात्मगुप्तयोः।

गोड्या व खाजऱ्या कुहिलीच्या बियांचे गुण उडदाप्रमाणेंच जाणावे.

उष्णस्त्वच्यो हिमः स्पर्शे केश्यो बल्यस्तिलो गुरुः ॥२१॥
अल्पमूत्रः कटुः पाके मेधाग्निकफपित्तकृत्।

तीळ उष्ण त्वचा व केसांस हितकर, स्पर्शानें शीतळ, बलकर, जड, लघ्वी कमी करणारा, पाककाळीं तिखट आणि बुद्धिवर्धक, अग्निदीपक व कफपित्त करणारा आहे.

स्निग्धोमा स्वादुतिक्तोष्णा कफपित्तकरी गुरुः ॥ २२ ॥
दृक्शुक्रहृत्कटुः पाके

अळशी स्निग्ध, गोड, कडू, उष्ण, कफपित्तकर, जड, आणि दृष्टि व वीर्य यांस अपाय करणारी आणि पाककाळीं तिखट आहे.

तद्वद्बीजं कुसुंभजम्।

करडईच्या बियांचेही हेच गुण आहेत.

माषोऽत्र सर्वेऽष्ववरो यवकः शूकजेषु च ॥ २३ ॥

सर्व द्विदल धान्यांत उडीद आणि कणसांत होणाऱ्या धान्यांत यवक निकृष्ट आहेत.

नवं धान्यमभिष्यंदि लघु संवत्सरोषितम् ।
शीघ्रजन्म तथा सूप्यं निस्तुषं युक्तिभर्जितम् ॥ २४ ॥

नवें धान्य कफ वाढवितें. एक वर्षाचें जुनें धान्य हलकें असतें. थोड्या दिवसांत तयार झालेलें, किंवा सालपटें काढून युक्तिपूर्वक भाजलेलें द्विदल धान्य हलकें असतें.

मंडपेयाविलेपीनामोदनस्य च लाघवम् ।
यथापूर्वम्

पेज, कण्हेरी, पातळसा भात व भात हे क्रमानें पूर्वपूर्व लघु आहेत.

शिवस्तत्र मंडो वातानुलोमनः ॥ २५ ॥
तृड्ग्लानिदोषशेषघ्नः पाचनो धातुसाम्यकृत् ।
स्रोतोमार्दवकृत्स्वेदी संधुक्षयति चानलम् ॥ २६ ॥

त्यांपैकीं पेज पथ्यकर, वाताचें अनुलोमन करणारी, तृषा, ग्लानि व वमन-विरेचनानंतर शिल्लक राहिलेल्या दोषांचें शमन करणारी, पाचक, धातुसाम्य करणारी, धातुमार्ग मृदु करणारी, घाम आणणारी व अग्निदीपक आहे.

क्षुत्तृष्णाग्लानिदौर्बल्यकुक्षिरोगज्वरापहा ।
मलानुलोमनी पथ्या पेया दीपनपाचनी ॥ २७ ॥

कण्हेरी भूक व तहानेनें आलेली ग्लानि, अशक्तता, अपचन, वगैरे पक्वाशयाचे रोग व ताप यांस दूर करणारी, दोषांचें अनुलोमन करणारी, पथ्यकर, आणि दीपक व पाचक आहे.

विलेपी ग्राहिणी हृद्या तृष्णाघ्नी दीपनी हिता ।
व्रणाक्षिरोगसंशुद्धदुर्बलस्नेहपायिनाम् ॥ २८ ॥

पातळ भात स्तंभक, खाण्यास प्रिय, तृषाशामक, दीपक, आणि व्रण, नेत्ररोग, यांवर तसेंच वमन विरेचन झालेल्या, आणि अशक्त व स्नेहपान करणाऱ्या मनुष्यांस हितकर आहे.

सुधौतः प्रस्रुतः स्विन्नोऽत्यक्तोष्मा चौदनो लघुः ।
यश्चाग्नेयौषधक्वाथसाधितो भृष्टतंडुलः ॥ २९ ॥

धुतलेल्या तांदळांचा, पेज काढलेला, चांगला शिजलेला[1] व

---

१ "चांगला शिजलेला" हें मुळांतील स्विन्न शब्दाचें भाषांतर म्हणून पुष्कळांनीं दिलेलें आहे. परंतु स्विन्न शब्दाच्या अर्थाची योग्य कल्पना 'वाफेवर शिजविलेला' यानें जशी येईल, तशी दुसऱ्यानें येणार नाहीं. शिवाय, वाफेवर शिजविलेला भात अतिशय हलका असतो, असा इतर डॉक्टरांप्रमाणें आमचाही अनुभव आहे.

वाफ बाहेर न जाऊं दिलेला असा भात हलका असतो. तसेंच दीपक औषधांच्या काढ्यांत शिजविलेला किंवा तांदूळ भाजून केलेला भातही हलका असतो.

विपरीतो गुरुः क्षीरमांसाद्यैर्यश्च साधितः ॥ २९ ॥

दूध, मांसरस वगैरे द्रव पदार्थांत शिजविलेला व वर सांगितलेल्या कृतीप्रमाणें न केलेला भात जड असतो.

इति द्रव्यक्रियायोगमानाद्यैः सर्वमादिशेत् ॥ ३० ॥

याच रीतीनें कोणत्याही पदार्थाचे गुणदोष ठरविणें झाल्यास मूळ पदार्थ, त्याची तयार करण्याची कृति, त्यांत मिळविलेले पदार्थ व त्यांचें प्रमाण, इत्यादि गोष्टींचा विचार केला पाहिजे.

बृंहणः प्रीणनो वृष्यश्चक्षुष्यो व्रणहा रसः ।

मांसरस पौष्टिक, तृप्तिकारक, वीर्यवर्धक, डोळ्यांस हितकर व व्रण-नाशक आहे.

मौद्गस्तु पथ्यः संशुद्धव्रणकंठाक्षिरोगिणाम् ॥ ३१ ॥

मुगांचें कढण पथ्यकर, आणि व्रण, कंठरोग व डोळ्यांचे रोग, यांस, तसेंच वमन-विरेचन झालेल्या मनुष्यांस हितावह आहे.

वातानुलोमी कौलत्थो गुल्मतूनिप्रतूनिजित् ।

कुळथांचें कढण वाताचें अनुलोमन करणारें असून गुल्म आणि तूनि व प्रतूनि या वातरोगांचा नाश करितें.

तिलपिण्याकविकृतिः शुष्कशाकं विरूढकम् ॥ ३२ ॥
शांडाकी वटकं दृग्घ्नं दोषलं ग्लपनं गुरु ।

तिळांचे व पेंडीचे पदार्थ, सुक्या भाज्या, कोंब आलेलें धान्य, व शांडाकी आसुतांत घालण्याकरितां केलेले वडे-सांडगे वगैरे पदार्थ दृष्टीस अपाय करणारे, त्रिदोषकारक, ग्लानि उत्पन्न करणारे व जड असतात.

रसाला बृंहणी वृष्या स्निग्धा बल्या रुचिप्रदा ॥ ३३ ॥

श्रीखंड पौष्टिक, वीर्यवर्धक, स्निग्ध, बलकर व रुचकर आहे.

---

१ उदा०( १ द्रव्य ) नव्या तांदुळांच्या भातापेक्षां जुन्या तांदुळांचा भात हलका असतो; ( २ क्रिया ) भाजलेल्या तांदुळांचा भात साध्या भातापेक्षां हलका असतो; ( ३ योग ) खिचडीपेक्षां नुसता भात हलका असतो, आणि ( ४ मान ) तांदुळाचें प्रमाण कमी असलेली कण्हेरी भातापेक्षां हलकी असते.

श्रमक्षुत्तृट्क्लमहरं पानकं प्रीणनं गुरु ।
विष्टंभि मूत्रलं हृद्यं यथाद्रव्यगुणं च तत् ॥ ३४ ॥

पन्हें सामान्यतः श्रम, भूक, तहान व ग्लानि यांचा परिहार करणारें, तृप्तिकारक, जड, अवष्टंभक, मूत्र वाढविणारें, व प्यावयास स्वादिष्ट असतें. त्याचे विशेष गुण ज्या पदार्थांपासून तें केलें असेल तदनुरूप जाणावे.

लाजास्तृट्छर्द्यतीसारमेहमेदःकफच्छिदः ।
कासपित्तोपशमना दीपना लघवो हिमाः ॥ ३५ ॥

लाह्या ( साळीच्या ) तहान, उलटी, अतिसार, प्रमेह, मेद व कफ यांचा नाश करणाऱ्या, खोकला व पित्त यांचें शमन करणाऱ्या, दीपक, हलक्या व थंड आहेत.

पृथुका गुरवो बल्याः कफविष्टंभकारिणः ।

पोहे जड, बलकर, आणि कफ व अवष्टंभ करणारे आहेत.

धाना विष्टंभिनी रूक्षा तर्पणी लेखनी गुरुः ॥ ३६ ॥

चणे-कुरमुरे वगैरे भाजलेलें धान्य अवष्टंभक, रूक्ष, तृप्तिकर, दोषच्छेदक व जड असतें.

सक्तवो लघवः क्षुत्तृट्श्रमनेत्रामयव्रणान् ।
घ्नंति संतर्पणाः पानात्सद्य एव बलप्रदाः ॥ ३७ ॥
नोदकांतरितान्न द्विर्न निशायां न केवलान् ।
न भुक्त्वा न द्विजैश्छित्त्वा सक्तूनद्यान्न वा बहून् ॥ ३८ ॥

भाजलेल्या सातूचें पीठ हलकें, भूक, तहान, नेत्ररोग व व्रण यांचें शमन करणारें, तूप व पाणी मिळवून खाल्लें असतां तत्काल तृप्ति व हुषारी आणणारें आहे. तें खात असतांना मध्यें पाणी पिऊं नये. तें दिवसांतून दोनदां, रात्रीं, नुस्तेंच, जेवणानंतर, दांतांनीं हातांतील पिठाचा गोळा तोडून, व फार खाऊं नये.

पिण्याको ग्लपनो रूक्षो विष्टंभी दृष्टिदूषणः ।

पेंड ग्लानि करणारी, रूक्ष, अवष्टंभक व डोळ्यांस अपाय करणारी आहे.

वेसवारो गुरुः स्निग्धो बलोपचयवर्धनः ॥ ३९ ॥

मांसाचा कीमा ( बारीक कुटलेल्या मांसाची उसळ ) जड, स्निग्ध, आणि शक्ति व पुष्टि देणारा आहे.

मुद्गादिजास्तु गुरवो यथाद्रव्यगुणानुगाः ।

मूग वगैरे धान्यांची उसळ जड असून तिचे इतर गुण त्या त्या धान्याप्रमाणें असतात.

कुकूलकर्परभ्राष्ट्रकंदुंगारविपाचितान् ॥ ४० ॥
एकयोनींल्लघून्विद्यादपूपानुत्तरोत्तरम् ।

एकाच धान्याच्या पोळ्या, रानशेणींचा विस्तव, खापर, कढई, तवा व निखारे या निरनिराळ्या प्रकारांनीं भाजल्या असतां त्या उत्तरोत्तर एकाहून एक हलक्या[1] असतात.

हरिणैणकुरंगर्क्षगोकर्णमृगमातृकाः ॥ ४१ ॥
शशशंबरचारुष्कशरभाद्या मृगाः स्मृताः ।

हरिण, काळविट, कुरंग, ऋक्ष, गोकर्ण, मृगमातृक, ससा, सांबर, चारुष्क, शरभ वगैरे पशूंस मृग असें म्हणतात[2].

लाववर्तीकवार्तीररक्तवर्मककुक्कुभाः ॥ ४२ ॥
कपिंजलोपचक्राख्यचकोरकुरुबाहवः ।
वर्तको वर्तिका चैव तित्तिरिः क्रकरः शिखी ॥ ४३ ॥
ताम्रचूडाख्यबकरगोनर्दगिरिवर्तिकाः ।
तथा शारपदेंद्राभवारटाश्चेति विष्किराः ॥ ४४ ॥

लावा, रानचिमणी, गांजीण, पाणकोंबडा, रानकोंबडा, पांढरा तित्तिर, उपचक्र ( एक जातीचा चक्रवाक ) चकोर, कुरकुरपक्षी वर्तक, वर्तिका, तित्तिर, करढोंक, मोर, कोंबडा, बकर, सारस, पहाडी तित्तिर, सारपद, इंद्राभ ( कंकपक्ष्याची जात ) व हंस या पक्ष्यांस विष्किर[3] ( पायानें भक्ष्य उकरून खाणारे ) असें म्हणतात.

---

१ निखाऱ्यावर भाजलेली सर्वांत हलकी व शेणींवर भाजलेली सर्वांत जड असते.

२ काळविट काळ्या रंगाचा, कुरंग तांबडा नाहीं व पांढरा नाहीं असा लहान आकाराचा चपळ व सुंदर, ऋक्ष निळ्या अंगाचा, गोकर्ण गाईप्रमाणें कानाचा व खेंचराप्रमाणें आकाराचा, मृगमातृक मोठ्या पोटाचा कस्तूरीमृग, शरभ काश्मीरांत होणारा उंच व मोठ्या शिंगाचा व आठ पायांचा असतो.

३ हेमाद्रीनें यांचीं लक्षणें अशीं दिलीं आहेतः–रानचिमण्यांचे लहान लहान कळप उडतात. गांजीण पांढऱ्या तित्तिरासारखी व लहान असते. रानकोंबड्याचा आकार चिमणीसारखा, गळ्याचा रंग काळा व अंग निळसर असतें. कुरकुर पक्ष्याच्या डोक्यावर तांबडा तुरा असतो, पंख पांढरे असतात व गळा निळ्या रंगाचा असतो. वर्तक व वर्तिका हे गांजीण पक्ष्यापेक्षां लहान असतात. तित्तिर प्रसिद्धच आहे. करढोंकाची पाठ तांबडी असते, गळा पिवळट काळा असतो, चोंच व पाय काळे असतात आणि तो करकर शब्द करितो. बकर बगळ्यासारखा असतो.

जीवंजीवकदात्यूहभृंगाह्वशुकसारिकाः ।
लट्वाकोकिलहारीतकपोतचटकादयः ॥ ४५ ॥
प्रतुदाः

जीवंजीवक, दात्यूह, भृंगाह्व, पोपट, साळुंखी, लट्वा, कोकिळा, कबूतर, चिमणी वगैरे पक्ष्यांची[१] प्रतुद वर्गांत ( चोंचीनें टोंचून खाणारे ) गणना होते.

भेकगोधाहिश्वाविदाद्या बिलेशयाः ।

बेडूक, घोरपड, सर्प, साळई वगैरे प्राण्यांना बिलेशय ( बिळांत राहणारे ) अशी संज्ञा आहे.

गोखराश्वतरोष्ट्राश्वद्वीपिसिंहर्क्षवानराः ॥ ४६ ॥
मार्जारमूषिकव्याघ्रवृकबभ्रूतरक्षवः ।
लोपाकजंबुकश्येनचाषवांतादवायसाः ॥ ४७ ॥
शशघ्नीभासकुररगृध्रोलूककुलिंगकाः ।
धूमिका मधुहा चेति प्रसहा मृगपक्षिणः ॥ ४८ ॥

गाय, गाढव, खेंचर, उंट, घोडा, चित्ता, सिंह, आस्वल, वानर, मांजर, उंदीर, वाघ, लांडगा, मुंगूस, तरस, खोकड, कोल्हा, ससाणा, चाषपक्षी, कुत्रा, कावळा, बहिरीससाणा, पाणकावळा, कुरर, गिधाड, घुबड, काळी चिमणी, धूमिका, मधुहा इत्यादि पशु-पक्षी प्रसह ( बलात्कारानें घेऊन खाणारे ) वर्गांत मोडतात.

वराहमहिषन्यंकुरुरुरोहितवारणाः ।
सृमरश्चमरः खड्गो गवयश्च महामृगाः ॥ ४९ ॥

डुक्कर, रेडा, सांबर, रोहें, रोहित, हत्ती, मत्स्याकार मोठें डुक्कर, रानगाय, गेंडा, व गवा हे महामृग होत.

हंससारसकादंबबककारंडवप्लवाः ।
बलाकोत्क्रोशचक्राह्वमद्गुक्रौंचादयोऽप्चराः ॥ ५० ॥

हंस, सारस, बदक, करडुवा, पाणकोंबडा, प्लव, बाळढोक, उत्क्रोश, चक्रवाक, पाणकावळा, करकुंचा इत्यादि पक्षी जलचर होत.

---

१ यांचें स्वरूपवर्णन येणेंप्रमाणें—जीवंजीवकास दोन डोकीं असतात, लट्व्याच्या पंखांचा खालचा भाग ताम्र असतो. भृंगाह्व पक्षी चिमणीसारखा व कृष्णवर्णाचा असतो.

मत्स्या रोहितपाठीनकूर्मकुंभीरकर्कटाः ।
शुक्तिशंखोद्रशंबूकशफरीवर्मिचंद्रिकाः ॥ ५१ ॥
चुलूकीनक्रमकरशिशुमारतिमिंगिलाः ।
राजीचिलिचिमाद्याश्च

रोही, पाठीन, कांसव, कुंभीर, खेंकडा ( कुरली ), कालव, शंख, उद्र, शंबूक, शफरी, वर्मि,[1] चन्द्रिका,[2] चुलूकी,[3] सुसर, मगर, शिशुमार, तिमिंगल, राया, वेंगसा वगैरे जळजंतूंस मत्स्य अशी संज्ञा आहे.

मांसमित्याहुरष्टधा ॥ ५२ ॥

याप्रमाणें आठप्रकारचें मांस आहे.

योनिष्वजावी व्यामिश्रगोचरत्वादनिश्चिते ।

बकरी व मेंढी यांच्या ठायीं मिश्र लक्षणें असल्यामुळें त्यांचा वर्ग ठरवितां येत नाहीं.

आद्यांत्या जांगलानूपा मध्यौ साधारणौ स्मृतौ ॥ ५४ ॥

मृग, विष्किर व प्रतुद वर्गांतील प्राणी जांगल वर्गांत मोडतात. महामृग, जलचर व मत्स्य हे अनूप होत. आणि, बिलेशय व प्रसह यांस साधारण संज्ञा आहे.

तत्र बद्धमलाः शीता लघवो जांगला हिताः ।
पित्तोत्तरे वातमध्ये सन्निपाते कफानुगे ॥ ५५ ॥

त्यांपैकीं जांगल प्राण्यांचें मांस मळाचा खडा करणारें, थंड, हलकें आणि ज्यांत पित्ताचा जोर आहे, वात मध्यम प्रमाणांत आहे आणि कफदोष थोडा आहे अशा सन्निपातांत हितकर आहे.

दीपनः कटुकः पाके ग्राही रूक्षो हिमः शशः ।

सशाचें मांस दीपक, पाककाळीं तिखट, स्तंभक, रुक्ष व थंड आहे.

ईषदुष्णगुरुस्निग्धा बृंहणा वर्तकादयः ॥ ५६ ॥

---

१ सर्पाकार. २ गोल असून सभोंवार कांटे असतात. ३ हत्तीप्रमाणें आकाराचा. ४ याच्या सर्वांगावर तांबड्या रेघा असून डोकेंही तांबडें असतें. ५बकऱ्या व मेंढ्या जांगल देशांतही होतात व अनूपांतही होतात. यामुळें त्यांचा उत्पत्तिदेश अमुकच असें ठरवितां येत नाहीं.

वर्तकापासून प्रतुद वर्गाच्या शेवटीं चिमणीपर्यंत सांगितलेल्या सर्व पक्ष्यांचें मांस किंचित् उष्ण, जड, स्निग्ध, व पौष्टिक आहे.

तित्तिरिस्तेष्वपि वरो मेधाग्निबलशुक्रकृत्।
ग्राही वर्ण्योऽनिलोद्रिक्तसन्निपातहरः परम् ॥ ५७ ॥

त्या सर्वांतही तित्तिराचें मांस गुणांनीं उत्तम असून बुद्धि, जठराग्नि, शक्ति व वीर्य वाढविणारें, स्तंभक, कांति वाढविणारें आणि वाताधिक सन्निपातांत अत्यंत हितावह आहे.

नातिपथ्यः शिखी पथ्यः श्रोत्रस्वरवयोदृशाम् ।

मोराचें मांस फारसें पथ्यकर नाहीं; तथापि कान, स्वर, आयुष्य व दृष्टि यांस हितकर आहे.

तद्वच्च कुक्कुटो वृष्यः

रानकोंबडयाच्या मांसाचे गुण मोराप्रमाणेंच असून शिवाय तें वीर्यवर्धक आहे.

ग्राम्यस्तु श्लेष्मलो गुरुः ॥ ५८ ॥

गांवकोंबडयाचें मांस कफकर व जड असतें.

मेधाऽनलकरा हृद्याः क्रकराः सोपचक्रकाः ।

करढोंक व उपचक्र पक्ष्यांचें मांस जड, बुद्धिवर्धक व अग्नि-दीपक असून रुचिकर असतें.

गुरुः सलवणः काणकपोतः सर्वदोषकृत् ॥ ५९ ॥

कवडयाचें मांस जड, किंचित् खारट व त्रिदोषकर आहे.

चटकः श्लेष्मलः स्निग्धो वातघ्नः शुक्रलः परम्।

चिमण्यांचें मांस कफवर्धक, स्निग्ध, वातनाशक व अत्यंत वीर्यवर्धक आहे.

गुरूष्णस्निग्धमधुरा वर्गाश्चातो यथोत्तरम् ॥ ६० ॥
मूत्रशुक्रकृतो बल्या वातघ्नाः कफपित्तलाः ।

यानंतर जे बिलेशयादि वर्ग येतात त्यांचें मांस क्रमानें अधिक जड, उष्ण, स्निग्ध, गोड, मूत्रवर्धक, बलकर, वातनाशक आणि कफपित्तकर आहे.

शीता महामृगास्तेषु क्रव्यादाः प्रसहाः पुनः ॥ ६१ ॥
लवणानुरसाः पाके कटुका मांसवर्धनाः।
जीर्णार्शोग्रहणीदोषशोषार्तानां परं हिताः॥ ६२ ॥

त्यांपैकीं महामृगाचें मांस थंड आहे. प्रसह वर्गांतील मांजर, गिधाड घुबड वगैरे मांस खाणाऱ्या प्राण्यांचें मांस किंचित् खारट, पाककाळीं तिखट, मांसवर्धक, आणि फार दिवसांची मूळव्याध, संग्रहणी व क्षय या विकारांवर फार हितावह आहे.

नातिशीतं गुरु स्निग्धं मांसमाजमदोषलम् ।
शरीरधातुसामान्यादनभिष्यंदि बृंहणम् ॥ ६३ ॥

बकऱ्यांचें मांस किंचित् थंड, जड, स्निग्ध, निर्दोष, आणि मनुष्याच्या मांसाशीं समगुण असल्यामुळें पौष्टिक आहे व कफ पातळ करीत नाहीं.

विपरीतमतो ज्ञेयमाविकं बृंहणं तु तत् ।

मेंढ्याच्या मांसाचे गुण याच्या उलट असून तें फक्त पौष्टिक आहे.

शुष्ककासश्रमाऽत्यग्निविषमज्वरपीनसान् ॥ ६४ ॥
कार्श्यं केवलवातांश्च गोमांसं संनियच्छति ।

गोमांस कोरडी ढास, श्रम, अतिशय भूक, विषमज्वर, पीनस, कृशता व केवल वातविकार यांस नाहींसें करितें.

उष्णो गरीयान्महिषः स्वप्नदाढर्यबृहत्त्वकृत् ॥ ६५ ॥

रेड्याचें मांस उष्ण, जड, झोंप आणणारें आणि शरीर दृढ व स्थूल करणारें आहे.

तद्वद्वराहः श्रमहा रुचिशुक्रबलप्रदः ।

डुकराच्या मांसांत हे सर्व गुण असून शिवाय तें श्रम हरण करणारें, रोचक आणि वीर्य व शक्ति वाढविणारें आहे.

मत्स्याः परं कफकराः

मत्स्यमांस अत्यंत कफकर आहे.

चिलिचीमस्त्रिदोषकृत् ॥ ६६ ॥

वेगसा मासा तर त्रिदोषकारक आहे.

लावरोहितगोधैणाः स्वे स्वे वर्गे वराः परम् ।

विष्किर वर्गांत लाव्याचें, मत्स्यांत रोहिताचें, बिलेशयांत घोरपडीचें आणि मृगांत काळविटाचें मांस सर्वोत्कृष्ट समजावें.

मांसं सद्योहतं शुद्धं वयःस्थं च भजेत्

मांस खावयाचें तें ताजें, आंतडीं, हाडें वगैरे काढून साफ केलेलें व तरुण प्राण्याचें असावें.

त्यजेत् ॥ ६७ ॥

मृतं कृशं भृशं मेद्यं व्याधिवारिविषैर्हतम् ।

आपोआप, रोगानें, पाण्यांत बुडून अथवा विषानें मेलेलें, कृश प्राण्याचें अथवा फार चरबीयुक्त प्राण्याचें मांस खाऊं नये.

पुंस्त्रियोः पूर्वपश्चार्धे गुरुणी गर्भिणी गुरुः ॥ ६८ ॥

नराच्या पुढील अर्ध्या अंगाचें आणि मादीच्या मागील अर्ध्या भागाचें मांस जड असतें. मादी गर्भिणी असल्यास तिचें मांस जड असतें.

लघुर्योषिच्चतुष्पात्सु विहंगेषु पुनः पुमान् ।

चतुष्पाद प्राण्यांत मादीचें आणि पक्ष्यांत पुरुषाचें मांस हलकें असतें.

शिरःस्कंधोरुपृष्ठस्य कट्याः सक्थ्नोश्च गौरवम् ॥ ६९ ॥
तथामपक्काशययोर्यथापूर्वं विनिर्दिशेत् ।
शोणितप्रभृतीनां च धातूनामुत्तरोत्तरम् ॥ ७० ॥

डोकें, खांदे, मांड्या, पाठ, कंबर व पोटऱ्या यांचें मांस अनुक्रमें एकाहून एक हलकें असतें. पक्काशयापेक्षां आमाशयाचें मांस जड असतें. रक्तादि धातु उत्तरोत्तर जड आहेत.

मांसाद्गरीयो वृषणमेढ्रवृक्कयकृद्गुदम् ।

मांसापेक्षां वृषण, त्यापेक्षां शिश्न, त्याहून मूत्रपिंड, त्यापेक्षां यकृत् आणि त्याहीपेक्षां गुद अधिक जड आहे.

शाकं पाठाशठीसूषासुनिषण्णसतीनजम् ॥ ७१ ॥
त्रिदोषघ्नं लघु ग्राहि सराजक्षववास्तुकम् ।

पहाडवेल, कचोरा, सूषा ( एक जातीचा कासविंदा ) कुरडू, विष्णुक्रांता, दुधी व चाकवत या भाज्या त्रिदोषनाशक, हलक्या व ग्राही आहेत.

सुनिषण्णोऽग्निकृद्वृष्यस्तेषु

यांपैकीं कुरडूची भाजी भूक वाढविणारी व वीर्यवर्धक आहे.

राजक्षवः परम् ॥ ७२ ॥

ग्रहण्यर्शोविकारघ्नः

दुधी संग्रहणी व मूळव्याध यांवर उत्कृष्ट गुणदायक आहे.

वर्चोभेदि तु वास्तुकम् ।

चाकवताच्या भाजीनें शौचास साफ होतें.

हंति दोषत्रयं कुष्ठं वृष्या सोष्णा रसायनम् ॥ ७३ ॥
काकमाची सरा स्वर्या

काकमाची त्रिदोषनाशक, कुष्ठनाशक, वीर्यवर्धक, उष्ण, रसायन, सारक आणि आवाज खुलविणारी आहे.

चांगेर्यम्लाऽग्निदीपनी ।
ग्रहण्यर्शोऽनिलश्लेष्महितोष्णा ग्राहिणी लघुः ॥ ७४ ॥

चुक्याची भाजी आंबट, अग्निदीपक, उष्ण, स्तंभक, हलकी, आणि संग्रहणी, मूळव्याध, व वातकफविकार यांवर हितकर आहे.

पटोलं सप्तलारिष्टशार्ङ्गेष्टावल्गुजामृताः ।
वेत्राग्रं बृहती वासा कुंतली तिलपर्णिका ॥ ७५ ॥
मंडूकपर्णी कर्कोटकारवेल्लकपर्पटाः ।
नाडीकलायं गोजिह्वा वार्ताकं वनतिक्तकम् ॥ ७६ ॥
करीरं कुलकं नंदी कुचेला शकुलादनी ।
कठिल्लं केम्बुकं शीतं सकोशातककर्कशम् ॥ ७७ ॥
तिक्तं पाके कटु ग्राहि वातलं कफपित्तजित् ।

कडू पडवळ, शिकेकाई, कडुलिंब, मोठा करंज, बावची, गुळवेल, वेताचे कोंब, डोरली, अडूळसा, रानतीळ, तिळवण, मंडूकपर्णी, करटोली, कारली, पित्तपापडा, नाडीकलाय, पायरी, वांगें, कडू किराईत, नेपती, काकटेंभुर्णी, मेढशिंगी, पहाडवेल, कुटकी, तांबडी घेटुळी, कोबी, दोडकी, व कपिला या भाज्या कडू, पाककाळीं तिखट, स्तंभक, वातुळ व कफपित्तनाशक आहेत.

हृद्यं पटोलं क्रिमिनुत्स्वादुपाकं रुचिप्रदम् ॥ ७८ ॥

त्यांपैकीं कडूपडवळ हृदयास हितकर, क्रमिनाशक, पाककाळीं मधुर, आणि रुचकर आहे.

पित्तलं दीपनं भेदि वातघ्नं बृहतीद्वयम् ।

रिंगणी व डोरली पित्तकर, अग्निदीपक, मलादिकांस पातळ करणारी व वातनाशक आहे.

वृषं तु वमिकासघ्नं रक्तपित्तहरं परम् ॥ ७९ ॥

अडूळसा वांति व खोकला नाहींसे करणारा आणि पहिल्या प्रतीचा रक्तपित्तनाशक आहे.

कारवेल्लं सकटुकं दीपनं कफजित्परम् ।

कारलें किंचित् तिखट, अग्निदीपक, आणि कफनाशक आहे.

वार्ताकं कटुतिक्तोष्णं मधुरं कफवातजित् ॥ ८० ॥
सक्षारमग्निजननं हृद्यं रुच्यमपित्तलम् ।

वांगें तिखट, कडू, मधुर, उष्ण, कफवातनाशक, किंचित् क्षारयुक्त, अग्निदीपक, चवदार, रुचकर, व किंचित् पित्त करणारें आहे.

करीरमाध्मानकरं कषायस्वादुतिक्तकम् ॥ ८१ ॥

नेपती तुरट, गोड व कडू असून तीपासून पोटांत वायु धरतो.

कोशातकावल्गुजकौ भेदनावग्निदीपनौ ।

दोडका व बांवच्या मळादिकांस पातळ करणाऱ्या व अग्निदीपक आहेत.

तंडुलीयो हिमो रूक्षः स्वादुपाकरसो लघुः ॥ ८२ ॥
मदपित्तविषास्रघ्नः

तांदुळजा थंड, रूक्ष, पाककाळीं व रसकाळीं गोड, हलका आणि मद, पित्त, विषविकार व रक्तदोष यांचा नाश करितो.

मुंजातं वातपित्तजित् ।
स्निग्धं शीतं गुरु स्वादु बृंहणं शुक्रकृत्परम् ॥ ८३ ॥

कणगी वातपित्तहारक, स्निग्ध, थंड, जड, गोड, पौष्टिक व अत्यंत वीर्यवर्धक आहे.

गुर्वी सरा तु पालक्या

पालख जड व सारक आहे.

मदघ्नी चाप्युपोदका ।

थोरमयाळ जड व सारक असून शिवाय मदनाशक आहे.

पालक्यावस्मृतश्चंचुः स तु संग्रहणात्मकः ॥ ८४ ॥

चंचूच्या भाजीचे इतर गुण पालखासारखेच आहेत. मात्र ती सारक नसून स्तंभक आहे.

**विदारी वातपित्तघ्ना मूत्रला स्वादुशीतला ।**
**जीवनी बृंहणी कंठ्या गुर्वी वृष्या रसायनम् ॥ ८५ ॥**

भुईकोहळा वातपित्तनाशक, मूत्र वाढविणारा, गोड, थंड, जीवनीय, पौष्टिक, आवाज खुलविणारा, जड, वीर्यवर्धक व रसादि धातूंस वाढविणारा आहे.

**चक्षुष्या सर्वदोषघ्नी जीवंती मधुरा हिमा ।**

हरणवेल नेत्रांस हितावह, त्रिदोषनाशक, गोड व थंड आहे.

**कूष्मांडतुंबकालिंगकर्कार्वेर्वारुतिंडिशम् ॥ ८६ ॥**
**तथा त्रपुसचीनाकचिर्भटं कफवातकृत् ।**
**भेदि विष्टम्भ्यभिष्यंदि स्वादुपाकरसं गुरु ॥ ८७ ॥**

कोहळा, दूधभोपळा, कलिंगड, खरबूज, कांकडी, भेंडशी, वाळूक ( तवसें ), टरकांकडी, व तांबडा भोंपळा, हीं कफवात उत्पन्न करणारीं, मळादिकांस पातळ करणारीं, अवष्टंभक, कफस्राव उत्पन्न करणारीं, पाककाळीं व रसकाळीं मधुर व जड आहेत.

**वल्लीफलानां प्रवरं कूष्माडं वातपित्तजित् ।**
**बस्तिशुद्धिकरं वृष्यम्**

वेलींवर लागणाऱ्या एकंदर फळांत कोहळा सर्वोत्कृष्ट असून वातपित्तनाशक, मूत्रशोधक व वीर्यवर्धक आहे.

**त्रपुसं त्वातिमूत्रलम् ॥ ८८ ॥**

वाळूक अत्यंत मूत्रल आहे.

**तुंबं रूक्षतरं ग्राहि**

दुध्या भोंपळा वरील इतर फळांपेक्षां अधिक रूक्ष व स्तंभक आहे.

**कालिंगैर्वारुचिर्भटम् ।**
**बालं पित्तहरं शीतं विद्यात्पक्वमतोऽन्यथा ॥ ८९ ॥**

कलिंगड, कांकडी, व चिबूड हीं कोंवळीं असतां पित्तनाशक व थंड आहेत आणि पक्व झालीं असतां पित्तकर व उष्ण होतात.

---

१ या श्लोकाचा मतांतरानें असा अर्थ होतो.—कलिंगड, कांकडी व चिबूड हीं स्तंभक आहेत. वर सांगितलेलीं कोहळा वगैरे फळें कोवळीं असतां पित्तशामक व थंड असतात आणि तीं पक्व झालीं असतां पित्तकर व उष्ण होतात.

शीर्णवृंतं तु सक्षारं पित्तलं कफवातजित् ।
रोचनं दीपनं हृद्यमष्ठीलाऽऽनाहनुल्लघु ॥ ९० ॥

चिबूड किंचित् क्षारयुक्त, पित्तकर, कफवातनाशक, रुचकर, अग्निदीपक, चवदार, आणि अष्ठीला व आनाह नामक पोटांतील रोग बरे करणारें व हलकें आहे.

मृणालबिसशालूककुमुदोत्पलकंदकम् ।
नंदीमाषककेलूटशृंगाटककशेरुकम् ॥ ९१ ॥
क्रौंचादनं कलोड्यं च रूक्षं ग्राहि हिमं गुरु ।

लहान मोठ्या कमळांच्या देंठ्या, कमळमूळ, पांढऱ्या व निळ्या कमळाचे कंद, नदीमाष व केलूकंद, शिंगाडे, कचरा, कमळाक्ष व पद्मबीज रूक्ष, स्तंभक, थंड व जड आहेत.

कलंबनालिकामार्षकुटिंजरकुतुंबकम् ॥ ९२ ॥
चिल्लीलट्वाकलोणीकाकुरूटकगवेधुकम् ।
जीवंतझुंझ्वेडगजयवशाकसुवर्चलम् ॥ ९३ ॥
आलुकानि च सर्वाणि तथा सूप्यानि लक्ष्मणम् ।
स्वादु रूक्षं सलवणं वातश्लेष्मकरं गुरु ॥ ९४ ॥
शीतलं सृष्टविण्मूत्रं प्रायो विष्टभ्य जीर्यति ।

जलशाक, नाडी, माठ, रानपोकळा, कुंभा, चील, धाकटी कर्डई, घोळ, कुरडू, कसई, तांबडा माठ, झुंझुरकी, टाकळा, यवशाक, सूर्यमुखी, सर्वजातींचीं रताळीं, कणगीं, अळवाच्या मुळकुंड्या, मूग, मठ, चवळ्या, वाटाणे इत्यादिकांचा पाला व शेंगा आणि ज्येष्ठमध या भाज्या गोड, किंचित् खारट, रूक्ष, वातकफकर, जड, व मलमूत्रसारक असून बहुतेक फार वेळानें व पोटांत वायु धरून पचतात.

स्विन्नं निष्पीडितरसं स्नेहाढ्यं नातिदोषलम् ॥ ९५ ॥

या वाफवून, रस पिळून काढून, तेलाची किंवा तुपाची चांगली फोडणी देऊन तयार केल्या असतां फारशा बाधत नाहींत.

---

१ शीर्णवृंताचे दोन अर्थ आहेत. एक चिबूड व दुसरा डेंखांपासून गळून पडलेलें फळ. वर सांगितलेलीं सर्व फळें कोंवळीं असतांना पित्तशामक व थंड असतात. आणि पक्व फलाचे गुण याच्या उलट असतात, असा अर्थ घेतला तर शीर्णवृंताचा अर्थ डेंखांपासून सुटलेलें असा घेणें जास्त योग्य आहे.

लघुपत्रा तु या चिल्ली सा वास्तुकसमा मता।

धाकट्या पानाच्या चिलाचे गुण चंदनबटव्यासारखेच आहेत.

तर्कारीवरणं स्वादु सतिक्तं कफवातजित् ॥ ९६ ॥

ऐरण व वायवरणा या भाज्या कडवट-गोड आणि कफवात-नाशक आहेत.

वर्षाभ्वौ कालशाकं च सक्षारं कटुतिक्तकम्।
दीपनं भेदनं हंति गरशोफकफानिलान् ॥ ९७ ॥

तांबडा व पांढरा पुनर्नवा आणि उन्हाळी या भाज्या किंचित् क्षारयुक्त, तिखट, कडू, अग्निदीपक व मलभेदक असून कृत्रिम विषदोष, सूज, कफ व वायु यांचा नाश करितात.

दीपनाः कफवातघ्नाश्चिरिबिल्वांकुराः सराः।

घाणेऱ्या करंजाचे अंकुर अग्निदीपक, कफवातनाशक व सारक आहेत.

शतावर्यंकुरास्तिक्ता वृष्या दोषत्रयापहाः ॥ ९८ ॥

शतावरीचे अंकुर कडू, वीर्यवर्धक व त्रिदोषनाशक आहेत.

रूक्षो वंशकरीरस्तु विदाही वातपित्तलः।

वेळूचे कोंब रूक्ष, विदाही व वातपित्तकर आहेत.

पत्तुरो दीपनास्तिक्तः प्लीहार्शःकफवातजित् ॥ ९९ ॥

पत्तुर अग्निदीपक व कडू असून पानथरी, मूळव्याध, कफ व वायु यांचा नाश करितो.

कृमिकासकफोत्क्लेदान् कासमर्दो जयेत्सरः।

कासविंदा सारक आणि कृमि, खोकला व स्रोतांचे ठायीं बसलेला कफाचा चिकटा नाहींसा करणारा आहे.

रूक्षोष्णमम्लं कौसुंभं गुरु पित्तकरं सरम् ॥ १०० ॥

करडईची भाजी रूक्ष, उष्ण, आंबट, जड, पित्तकर व सारक आहे.

गुरूष्णं सार्षपं बद्धविण्मूत्रं सर्वदोषकृत्।

मोहरीची भाजी जड, उष्ण, मलमूत्र कोंडणारी व त्रिदोष उत्पन्न करणारी आहे.

---

१ उत्तरहिंदुस्थानांत यांचें लोणचें घालतात व तें मोठें स्वादिष्ट समजलें जातें.

यद्बालमव्यक्तरसं किंचित्क्षारं सतिक्तकम् ॥ १०१ ॥
तन्मूलकं दोषहरं लघु सोष्णं नियच्छति ।
गुल्मकासक्षयश्वासव्रणनेत्रगलामयान् ॥ १०२ ॥
स्वराग्निसादोदावर्तपीनसांश्च

ज्यांत कोणताही रस स्पष्ट उत्पन्न झालेला नाहीं, जो किंचित् क्षारयुक्त व कडवट लागतो, असा कोंवळा मुळा त्रिदोषहारक, हलका व किंचित् उष्ण असून गुल्म, खोकला, क्षय, दमा, व्रण, नेत्ररोग, गळ्याचे रोग, आवाज बसणें, अग्निमांद्य, उदावर्त व पीनस या रोगांचा नाश करितो.

महत्पुनः ।
रसे पाके च कटुकमुष्णवीर्यं त्रिदोषकृत् ॥ १०३ ॥
गुर्वभिष्यंदि च

तोच जून झाला असतां पाककाळीं व रसकाळीं तिखट, उष्ण-वीर्य, त्रिदोषकारक, जड व कफस्राव उत्पन्न करणारा होतो.

स्निग्धस्विन्नं तदपि वातजित् ।

परंतु तो फोडणी देऊन शिजविला असतां वातहारक होतो.

वातश्लेष्महरं शुष्कं सर्वम्

मुळा जून असो किंवा कोंवळा असो, तो सुकाविला असतां वातकफाचें हरण करितो.

आमं तु दोषलम् ॥ १०४ ॥

हिरवा खाल्ला असतां तो कसाही असला तरी दोष उत्पन्न करितो.

कटूष्णो वातकफहा पिंडालुः पित्तवर्धनः ।

डुकरकंद तिखट, उष्ण, वातकफनाशक व पित्तवर्धक आहे.

कुठेरशिग्रुसुरससुमुखासुरिभूस्तृणम् ॥ १०५ ॥
फणिज्झार्जकजंबीरप्रभृति ग्राहि शालनम् ।
विदाहि कटु रूक्षोष्णं हृद्यं दीपनरोचनम् ॥ १०६ ॥
दृक्शुक्रकृमिहृत्तीक्ष्णं दोषोत्क्लेशकरं लघु ।

काळा आजवला, शेवगा, तुळस, सुगंधी आजवला, मोहऱ्या, रोहीस गवत, मरवा, सबजा, लिंबू वगैरे पदार्थांचीं केलेलीं तोंडी-लावणीं ( चटण्या, कोशिंबिरी, रायतीं वगैरे ) ग्राहक, विदाही

तिखट, रूक्ष, उष्ण, चवदार, दीपक, रुचिकर; दृष्टि, वीर्य व कृमि यांस इजा पोंचविणारीं, हलकीं आणि दोषांस चाळविणारीं आहेत.

हिध्मकासश्रमश्वासपार्श्वरुक्पूतिगंधहा ॥ १०७ ॥
सुरसः

तुळस उचकी, खोकला, श्रम, दमा, बरगड्या दुखणें, आणि दुर्गंधी यांचा नाश करिते.

सुमुखो नातिविदाही गरशोफहा ।

सुगंधी आजवला फार विदाही नसून, विषदोष व सूज नाहींशी करितो.

आर्द्रिका तिक्तमधुरा मूत्रला न च पित्तकृत् ॥ १०८ ॥

कोथिंबीर कडवट, गोड व मूत्ररेचक असून पित्तकर नाहीं.

लशुनो भृशतीक्ष्णोष्णः कटुपाकरसः सरः
हृद्यः केश्यो गुरुर्वृष्यः स्निग्धो रोचनदीपनः ॥ १०९ ॥
किलासकुष्ठगुल्माऽर्शोमेहक्रिमिकफाऽनिलान् ।
सहिध्मपीनसश्वासकासान् हंति रसायनम् ॥ ११० ॥

लसूण अत्यंत तीक्ष्ण, उष्ण, पाककाळीं व रसकाळीं तिखट, सारक, चवदार, केंसांस हितकर, जड, कामवर्धक, स्निग्ध, रुचकर, दीपक व रसादिधातुवर्धक असून किलास, कुष्ठ, गुल्म, मूळव्याध प्रमेह, कृमि, कफ, वात, उचकी, पीनस, दमा व खोकला यांचा नाश करितो.

पलांडुस्तद्गुणन्यूनः श्लेष्मलो नाऽतिपित्तलः ।
कफवातार्शसां पथ्यः स्वेदेऽभ्यवहृतौ तथा ॥ १११ ॥

कांद्यांत हेच गुण कमी प्रमाणांत असून तो कफवर्धक, किंचित् पित्तकर आणि कफजन्य व वातजन्य मूळव्याधीवर खाण्यास व शेकण्यास प्रशस्त आहे.

तीक्ष्णो गृंजनको ग्राही पित्तिनां हितकृन्न सः ।

गाजर तीक्ष्ण व ग्राहक असून पित्तविकारावर किंवा पित्तप्रकृतीच्या मनुष्यास पथ्यकर नाहीं.

दीपनः सूरणो रुच्यः कफघ्नो विशदो लघुः ॥ ११२ ॥
विशेषादर्शसां पथ्यः

सुरण अग्निदीपक, रुचकर, कफनाशक, चिकटा काढून स्रोतें साफ करणारा आणि मूळव्याधीवर फार प्रशस्त आहे.

भूकंदस्त्वतिदोषलः ।

भूकंद अत्यंत दोषोत्पादक आहे.

**पत्रे पुष्पे फले नाले कंदे च गुरुता क्रमात् ॥ ११३ ॥**

पाल्याहून फुलें, फुलांहून फळें, फळांहून देंठ्या, ( जशी कमळाचीं भिसें ) आणि देंठ्यांहून कंद यांची भाजी अधिक जड असते.

**वरा शाकेषु जीवंती सर्षपास्त्ववराः परम् ।**

सर्व भाज्यांत हरणदोडी श्रेष्ठ आणि मोहरीची भाजी कनिष्ठ जाणावी.

**द्राक्षा फलोत्तमा वृष्या चक्षुष्या सृष्टमूत्रविट् ॥ ११४ ॥**
**स्वादुपाकरसा स्निग्धा सकषाया हिमा गुरुः ।**
**निहंत्यनिलपित्तास्रतिक्तास्यत्वमदात्ययान् ॥ ११५ ॥**
**तृष्णाकासश्रमश्वासस्वरभेदक्षतक्षयान् ।**

द्राक्षें सर्व फळांत उत्तम, वीर्यवर्धक, नेत्रांस हितकर, मलमूत्रसारक, पाककाळीं व रसकाळीं मधुर, स्निग्ध, किंचित् तुरट, थंड व जड असून वातपित्त, रक्तपित्त, तोंडाचा कडवटपणा, मदात्यय, तहान, खोकला, श्रम, दमा, आवाज बसणें, उरःक्षत व क्षय या रोगांस नाहींसे करितात.

**उद्रिक्तपित्तान् जयति त्रीन् दोषान् स्वादु दाडिमम् ॥ ११६ ॥**
**पित्ताविरोधि नात्युष्णमम्लं वातकफापहम् ।**
**सर्वं हृद्यं लघु स्निग्धं ग्राहि रोचनदीपनम् ॥ ११७ ॥**

गोड डाळिंब पित्ताधिक सन्निपाताचें शमन करितें. आंबट डाळिंब साधारण उष्ण, व वातकफनाशक असून पित्तास अविरुद्ध असतें, म्हणजे पित्त करीतही नाहीं किंवा शमवीतही नाहीं. सर्व प्रकारचीं डाळिंबें मनास आवडणारीं, हलकीं, स्निग्ध, ग्राहक, रुचिकर, व अग्निदीपक असतात.

**मोचखर्जूरपनसनालिकेरपरूषकम् ।**
**आम्राततालकाश्मर्यराजादनमधूकजम् ॥ ११८ ॥**
**सौवीरबदरांकोल्लफल्गुश्लेष्मातकोद्भवम् ।**
**वातामाभिषुकाक्षोडमुकूलकनिकोचकम् ॥ ११९ ॥**

---

१ यास अपवाद मुळा आहे. त्याचा कंद इतर भागापेक्षां हलका असतो.

उरुमाणं प्रियालं च बृंहणं गुरु शीतलम् ।
दाहक्षतक्षयहरं रक्तपित्तप्रसादनम् ॥ १२० ॥
स्वादु पाकरसं स्निग्धं विष्टंभि कफशुक्रकृत् ।

केळें, खजूर, फालसा, फणस, नारळ, आंबाडा, ताडफळ, शिवणफळ, खिरणी, मोहाचीं फळें, रानबोर, बोर, अंकोलीचें फळ, काळें उंबर, भोंकरीचीं फळें, बदाम, अभिषुक, अक्रोड, पिस्ता, निकोचक, उरुमाण व चारोळी हीं फळें पौष्टिक, जड व थंड; दाह, क्षत यांचा नाश करणारीं, रक्तपित्तशुद्धिकर, पाककाळीं व रसकाळीं मधुर, अवष्टंभक आणि कफ व वीर्य यांना वाढविणारीं आहेत.

फलं तु पित्तलं तालम्

ताडगोळे पित्तकर आहेत.

सरं काश्मर्यजं हिमम् ॥ १२१ ॥
शकृन्मूत्रविबंधघ्नं केश्यं मेध्यं रसायनम् ।

शिवणीचीं फळें सारक, थंड, मलमूत्रांचा अवष्टंभ मोडणारीं, केंसांस हितकर, बुद्धिवर्धक व रसादि धातूंस वाढविणारीं आहेत.

वातामाद्युष्णवीर्यं तु कफपित्तकरं सरम् ॥ १२२ ॥
परं वातहरं स्निग्धमनुष्णं तु प्रियालजम् ।

बदाम वगैरे फळें उष्ण, कफपित्तकर, सारक, अत्यंत वातनाशक व स्निग्ध आहेत. त्यांपैकीं फक्त चारोळी मात्र उष्ण नाहीं.

प्रियालमज्जा मधुरो वृष्यः पित्तानिलापहः ॥ १२३ ॥

चारोळ्यांच्या बियांतील मगज मधुर, वीर्यवर्धक व वातपित्तनाशक आहे.

कोलमज्जा गुणैस्तद्वत्तृट्छर्दिकासजिच्च सः ।

बोराच्या बियांतील मगजाचे गुणही याचप्रमाणें असून तो तृषा ओकारी, व खोकला यांस शमवितो.

पक्वं सुदुर्जरं बिल्वं दोषलं पूतिमारुतम् ॥ १२४ ॥
दीपनं कफवातघ्नं बालं ग्राह्युभयं हि तत् ।

पिकलेलें बेलफळ पचण्यास फार जड, दोषकारक व अधो-

---

१ कित्येकांच्या मतें बेलफळ.

वायूस दुर्गंधी उत्पन्न करणारें आहे. तेंच कच्चें असतां दीपक व कफवातनाशक आहे. दोन्ही प्रकारचीं बेलफळें स्तंभक आहेत.

कपित्थमामं कंठघ्नं दोषलं दोषघाति तु ॥ १२५ ॥
पक्कं हिध्मावमथुजित्सर्वं ग्राहि विषापहम् ।

कच्चें कवठ आवाज बसविणारें व त्रिदोषकारक आहे, आणि पक्कें त्रिदोषनाशक असून उचकी व वांति बसवितें. दोन्ही प्रकारचें कवठ स्तंभक व विषहारक आहे.

जांबवं गुरु विष्टंभि शीतलं भृशवातलम् ॥ १२६ ॥
संग्राहि मूत्रशकृतोरकंठ्यं कफपित्तनुत् ।

जांभळें जड, अवष्टंभक, थंड, अतिशय वातुळ, मलमूत्रस्तंभक, घशास अपायकारक, आणि कफपित्तनाशक आहेत.

वातपित्तास्रकृद्बालं बद्धास्थि कफपित्तकृत् ॥ १२७ ॥
गुर्वाम्रं वातजित्पक्कं स्वाद्वम्लं कफशुक्रकृत् ।

आंब्याची कैरी ( बिनकोयीची ) वातुळ व रक्तपित्त करणारी आहे. कोय झालेला कच्चा आंबा कफपित्त करणारा आहे. पिकलेला आंबा जड, वातहारक, आंबटगोड आणि कफवर्धक व वीर्यवर्धक आहे.

वृक्षाम्लं ग्राहि रूक्षोष्णं वातश्लेष्महरं लघु ॥ १२८ ॥
आमसोलें ग्राहक, रूक्ष, उष्ण, वातकफहारक व हलकीं आहेत.

शम्या गुरूष्णं केशघ्नं रूक्षम्
शमीचीं फळें जड, उष्ण, केशनाशक, व रूक्ष आहेत.

पीलु तु पित्तलम् ।
कफवातहरं भेदि प्लीहार्शःकृमिगुल्मनुत् ॥ १२९ ॥
सतिक्तं स्वादु यत्पीलु नात्युष्णं तत्त्रिदोषजित् ।

पीलूचीं फळें कडू असल्यास पित्तकर, कफवातहारक, मलभेदक, असून पानथरी, मूळव्याध, कृमि व गुल्म यांचा नाश करितात. आणि तींच किंचित् कडवट असून गोड असल्यास साधारण उष्ण असून त्रिदोषनाश करितात.

त्वक्तिक्तकटुका स्निग्धा मातुलुंगस्य वातजित् ॥ १३० ॥
बृंहणं मधुरं मांसं वातपित्तहरं गुरु ।

लघु तत्केसरं कासश्वासहिध्मामदात्ययान् ॥ १३१ ॥
आस्यशोषानिलश्लेष्मविबंधच्छर्द्यरोचकान् ।
गुल्मोदरार्शःशूलानि मंदाग्नित्वं च नाशयेत् ॥ १३२ ॥

महाळुंगाची साल कडवट, तिखट, स्निग्ध व वातनाशक आहे. त्याचा गीर पौष्टिक, गोड, वातपित्तनाशक व जड आहे. त्याचें केशर हलकें असून खोकला, दमा, उचकी, मदात्यय, तोंडास कोरड, वातकफावष्टंभ, उलटी, अरुचि, गुल्म, उदर, मूळव्याध, शूळ व अग्निमान्द्य यांचा नाश करितें.

भल्लातकस्य त्वङ्मांसं बृंहणं स्वादु शीतलम् ।
तदस्थ्यग्निसमं मेध्यं कफवातहरं परम् ॥ १३३ ॥

बिब्याच्या बोंडाची साल व गीर पौष्टिक, गोड व थंड आहे. आणि बिबा अग्नीप्रमाणें अत्यंत उष्ण, बुद्धिवर्धक आणि अत्यंत कफवातहारक आहे.

स्वाद्वम्लं शीतमुष्णं च द्विधा पालेवतं गुरु ।
रुच्यमत्यग्निशमनम्

पालेवत दोन प्रकारचें. गोड तें जर्दाळु व आंबट तें आलुबुखार. जर्दाळू थंड असून आलुबुखार उष्ण आहे; आणि दोन्ही जड, रुचकर व अतिक्षुधेची शांति करणारीं आहेत.

रुच्यं मधुरमारुकम् ॥ १३४ ॥
पक्वमाशु जरां याति नात्युष्णं गुरु दोषलम् ।

हिरवें सप्ताळू रुचकर व गोड असतें. व तें पिकलें असतां किंचित् उष्ण, जड व दोष करणारें असून लवकर पचतें.

द्राक्षापरूषकं चार्द्रमम्लं पित्तकफप्रदम् ॥ १३५ ॥
गुरूष्णवीर्यं वातघ्नं सरं च करमर्दकम् ।

द्राक्षें, फालसा व करवंदें हीं ओलीं व आंबट असतां पित्तकफ करणारीं, जड, उष्ण, वातनाशक व सारक असतात.

तथाऽम्लं कोलकर्कंधूलकुचाम्रातमारुकम् ॥ १३६ ॥
ऐरावतं दंतशठं सतूदं मृगलिंडिकम् ।

बोरें, रानबोरें, ओटीचीं फळें, आंबाडा व सप्ताळू, नारिंग, लिंबू, तूत व कांकडें हीं फळें ( हिरवीं व ) आंबट असतां त्यांचे गुण द्राक्षादिकांच्या गुणासारखेच असतात.

नातिपित्तकरं पक्वं शुष्कं च करमर्दकम् ॥ १३७ ॥

पिकलेलीं व सुकलेलीं करवंदें फारसें पित्त करीत नाहींत.

दीपनं भेदनं शुष्कमम्लीकाकोलयोः फलम् ।
तृष्णाश्रमक्लमच्छेदि लघ्विष्टं कफवातयोः ॥ १३८ ॥

वाळलेली चिंच व बोरें दीपक, सारक; तृषा, श्रम व ग्लानि दूर करणारीं, हलकीं आणि कफवातविकारांवर प्रशस्त आहेत.

फलानामवरं तत्र लकुचं सर्वदोषकृत् ।

सर्व फळांत ओटीचें फळ वाईट असून त्रिदोष उत्पन्न करितें.

हिमानलोष्णदुर्वातव्याललालादिदूषितम् ॥ १३९ ॥
जंतुजुष्टं जले मग्नमभूमिजमनार्तवम् ।
अन्यधान्ययुतं हीनवीर्यं जीर्णतयाऽपि च ॥ १४० ॥
धान्यं त्यजेत्तथा शाकं रूक्षसिद्धमकोमलम् ।
असंजातरसं तद्वच्छुष्कं चान्यत्र मूलकात् ॥ १४१ ॥
प्रायेण फलमप्येवं तथामं बिल्ववर्जितम् ।

दंव, अग्नि, ऊन, वाईट वारा व सर्प वगैरे विषारी प्राण्यांची लाळ यांनीं दूषित झालेलें, कीड लागलेलें, पाण्यांत बुडालेलें, भलत्याच जमिनींत व भलत्याच वेळीं झालेलें, विजातीय धान्यासह पेरलेलें, किंवा फार दिवस शेतांत राहूं दिल्यामुळें हीनवीर्य झालेलें असें धान्य वर्ज्य करावें. त्याचप्रमाणें (उक्तदोषयुक्त) व फोडणी न देतां शिजविलेल्या, जून, रसोत्पत्ति न झालेल्या व वाळलेल्या भाज्याही खाऊं नयेत. मुळे मात्र वाळलेले घेण्यास हरकत नाहीं. बहुतेक फळांसही हेच नियम लागू आहेत. फरक इतकाच कीं, बेलफळाशिवाय इतर फळें कोंवळीं घेऊं नयेत.

विष्यंदि लवणं सर्वं सूक्ष्मं सृष्टमलं विदुः ॥ १४२ ॥
वातघ्नं पाकि तीक्ष्णोष्णं रोचनं कफपित्तकृत् ।

सर्व प्रकारचें मीठ कफादिकांस पातळ करणारें, सूक्ष्म स्रोतांमध्येंही प्रवेश करणारें, सारक, वातनाशक, पाचक, तीक्ष्ण, उष्ण, रुचकर आणि कफपित्त वाढविणारें आहे.

---

१ द्राक्षें, फालसा वगैरे फळें सुकलेलीं घेण्यास हरकत नाहीं.

सैंधवं तत्र सस्वादु वृष्यं हृद्यं त्रिदोषनुत् ॥ १४३ ॥
लघ्वनुष्णं दृशः पथ्यमविदाह्यग्निदीपनम् ।

त्यांपैकीं सैंधव किंचित् गुळचट, वृष्य, हृदयास हितकर, त्रिदोषनाशक, हलकें, किंचित् उष्ण, डोळ्यांस हितकर, पथ्यकर, किंचित् विदाही व अग्निदीपक आहे.

लघु सौवर्चलं हृद्यं सुगंध्युद्गारशोधनम् ॥ १४४ ॥
कटुपाकं विबंधघ्नं दीपनीयं रुचिप्रदम् ।

पादेलोण हलकें, हृदयास हितकर, सुगंधी, वाईट ढेंकर शुद्ध करणारें, पाककाळीं अवष्टंभनाशक, दीपक व रुचकर आहे.

ऊर्ध्वाधः कफवातानुलोमनं दीपनं बिडम् ॥ १४५ ॥
विबंधानाहविष्टंभशूलगौरवनाशनम् ।

बिडलोण कफवातांस वरच्या व खालच्या दोन्ही मार्गांनीं प्रवृत्त करणारें व दीपक असून स्रोतांमध्यें बांध पडणें, पोटफुगी, मलावष्टंभ, शूळ व जाडय यांचा नाश करितें.

विपाके स्वादु सामुद्रं गुरु श्लेष्मविवर्धनम् ॥ १४६ ॥

समुद्राचें मीठ पाककाळीं गोड, जड व कफवर्धक आहे.

सतिक्तकटुकक्षारं तीक्ष्णमुत्क्लेदि चौद्भिदम् ।

औद्भिद मीठ किंचित् कडवट, तिखट, क्षारयुक्त, तीक्ष्ण व दोषांचा उत्क्लेश करणारें आहे.

कृष्णे सौवर्चलगुणा लवणे गंधवर्जिताः ॥ १४७ ॥

काळें मीठ, वास खेरीज करून इतर गुणांनीं पादेलोणासारखेंच आहे.

रोमकं लघु पांसूत्थं सक्षारं श्लेष्मलं गुरु ।

सांभरमीठ हलकें आणि खारीमीठ किंचित् क्षारयुक्त, कफवर्धक व जड असतें.

लवणानां प्रयोगे तु सैंधवादीन् प्रयोजयेत् ॥ १४८ ॥

ज्या औषधांत अनेक लवणांचा उपयोग सांगितला असेल त्यांत तीं सैंधवापासून आरंभ करून क्रमानें जितकीं सांगितलीं असतील तितकीं घ्यावीं.

---

१ जेथें नुसतें लवण सांगितलें असेल, तेथें सैंधव; दोन सांगितलीं असतां सैंधव व पादेलोण, तीन सांगितलीं असतां सैंधव, पादेलोण व बिडलोण याप्रमाणें घ्यावीं.

गुल्महृद्ग्रहणीपांडुप्लीहानाहगलामयान् ।
श्वासार्शःकफकासांश्च शमयेद्यवशूकजः ॥ १४९ ॥

यवक्षार ( जवखार ) गुल्म, छाती कोंडणें, संग्रहणी, पांडुरोग, पानथरी, पोटफुगी, गळ्याचे रोग, दमा, मूळव्याध, कफ व खोकला या रोगांचें शमन करितो.

क्षारः सर्वश्च परमं तीक्ष्णोष्णः कृमिजिल्लघुः ।
पित्तासृग्दूषणः पाकी छेद्यहृद्यो विदारणः ॥ १५० ॥
अपथ्यः कटुलावण्याच्छुक्रौजःकेशचक्षुषाम् ।

सर्व जातीचे क्षार अत्यंत तीक्ष्ण, उष्ण, कृमिनाशक, हलके, रक्तपित्तदूषक, पाचक; मेद व कफ यांच्या गांठी मोडणारे, बेचव आणि पिकलेलीं गळवें वगैरे फोडणारे असून तिखट व खारट असल्यामुळें वीर्य, ओज, केंस व डोळे यांस अपाय करितात.

हिंगु वातकफानाहशूलघ्नं पित्तकोपनम् ॥ १५१ ॥
कटुपाकरसं रुच्यं दीपनं पाचनं लघु ।

हिंग वातकफ, पोटफुगी व शूळ यांचा नाश करणारा, पित्त वाढविणारा, पाकानें व रसानें तिखट, रुचकर, दीपक, पाचक व हलका आहे.

कषाया मधुरा पाके रूक्षा विलवणा लघुः ॥ १५२ ॥
दीपनी पाचनी मेध्या वयसः स्थापनी परा ।
उष्णवीर्या सराऽयुष्या बुद्धींद्रियबलप्रदा ॥ १५३ ॥
कुष्ठवैवर्ण्यवैस्वर्यपुराणविषमज्वरान् ।
शिरोऽक्षिपांडुहृद्रोगकामलाग्रहणीगदान् ॥ १५४ ॥
सशोषशोफातीसारमेदमोहवमिक्रिमीन् ।
श्वासकासप्रसेकार्शःप्लीहानाहगरोदरम् ॥ १५५ ॥
विबंधं स्रोतसां गुल्ममूरुस्तंभमरोचकम् ।
हरीतकी जयेद्व्याधींस्तांस्तांश्च कफवातजान् ॥ १५६ ॥

हिरडा रसकाळीं अतिशय तुरट, पाककाळीं मधुर, रूक्ष, खारटाशिवाय इतर पांचही ( गोड, आंबट, तिखट, कडू व तुरट ) रसांनीं युक्त, हलका, दीपक, पाचक, बुद्धिवर्धक, अत्यंत तारुण्य-रक्षक, उष्णवीर्य, रेचक, आयुष्यास हितकर, आणि बुद्धि व इंद्रि-यांची शक्ति वाढविणारा असून कुष्ठ, निस्तेजपणा, स्वरभेद, जीर्ण-ज्वर, विषमज्वर, मस्तकरोग, नेत्ररोग, पांडुरोग, हृद्रोग, कावीळ,

संग्रहणी, क्षय, सूज, अतिसार, मेदोरोग, मूर्च्छा, उलटी, कृमि, दमा, खोकला, लाळ गळणें, मूळव्याध, पानथरी, पोटफुगी, कृत्रिम विषविकार, उदर, स्रोतांचा अवरोध, गुल्म, ऊरुस्तंभरोग, अरुचि, आणि इतर अनेक प्रकारचे कफवातजन्य विकार यांचा नाश करितो.

तद्वदामलकं शीतमम्लं पित्तकफापहम् ।

आंवळयाचे गुणही याचप्रमाणें असून तो थंड, आंबट आणि पित्तकफनाशक आहे.

कटु पाके हिमं केश्यमक्षमपिच्च तद्गुणम् ॥ १५७ ॥

बेहडा पाकसमयीं तिखट, थंड व केंसास हितकर असून त्याचे इतर गुण कांहींसे हिरडा व आंवळा यांच्याप्रमाणेंच आहेत.

इयं रसायनवरा त्रिफलाऽक्ष्यामयापहा ।
रोपणी त्वग्गदक्लेदमेदोमेहकफास्रजित् ॥ १५८ ॥

हिरडा, आंवळा व बेहडा या तिहींच्या मिश्रणास त्रिफळा अशी संज्ञा आहे. ही त्रिफळा रसायनांत उत्कृष्ट, नेत्ररोगनाशक, व्रण भरून आणणारी आणि कुष्ठ वगैरे त्वचेचे रोग, व्रणांचा स्राव, मेदोरोग, प्रमेह, कफविकार व रक्तविकार यांची नाशक आहे.

सकेसरं चतुर्जातं त्वक्पत्रैलं त्रिजातकम् ।
पित्तप्रकोपि तीक्ष्णोष्णं रूक्षं दीपनरोचनम् ॥ १५९ ॥

दालचिनी, तमालपत्र व वेलदोडे या तिहींच्या मिश्रणास त्रिजात आणि त्यांत नागकेशर मिळविलें म्हणजे त्यास चतुर्जात म्हणतात. हीं उभय मिश्रणें पित्तकर, तीक्ष्ण, उष्ण, रूक्ष, दीपक व रुचिकर आहेत.

रसे पाके च कटुकं कफघ्नं मरिचं लघु ।

मिरें गुणांनीं तशींच असून पाककाळीं व रसकाळीं तिखट आणि हलकीं व कफनाशक आहेत.

श्लेष्मला स्वादुशीताद्रा गुर्वी स्निग्धा च पिप्पली ॥१६०॥
सा शुष्का विपरीताऽतः स्निग्धा वृष्या रसे कटुः ।
स्वादुपाकाऽनिलश्लेष्मश्वासकासापहा सरा ॥ १६१ ॥
न तामत्युपयुंजीत रसायनविधिं विना ।

ओली पिंपळी कफवर्धक, गोड, थंड, जड व स्निग्ध आहे.

सुकलेल्या पिंपळीचे गुण याच्या उलट असून ती स्निग्ध, शुक्र-वर्धक, रुचीनें तिखट व पाककाळीं गोड; वात, कफ, दमा, खोकला यांची नाशक आणि सारक आहे. रसायनप्रयोगाशिवाय पिंपळी फार उपयोगांत आणूं नये.

नागरं दीपनं वृष्यं ग्राहि हृद्यं विबंधनुत् ॥ १६२ ॥
रुच्यं लघु स्वादुपाकं स्निग्धोष्णं कफवातजित् ।

सुंठ दीपक, शुक्रवर्धक, स्तंभक, हृदयास हितकर व खाण्यास प्रिय, अवरोध नाहींशी करणारी, रुचकर, हलकी, पाककाळीं गोड, स्निग्ध, उष्ण, आणि कफवातनाशक आहे.

तद्वादार्द्रकम्

आल्याचेही गुण असेच आहेत.

एतच्च त्रयं त्रिकटुकं जयेत् ॥ १६३ ॥
स्थौल्याग्निसदनश्वासकासश्लीपदपीनसान् ।

( सुंठ, मिरें व पिंपळी ) या तिहींस त्रिकटु म्हणतात व तें स्थूलपणा, अग्निमांद्य, दमा, खोकला, श्लीपद व पीनस या रोगांस नष्ट करितें.

चविका पिप्पलीमूलं मरिचाल्पांतरं गुणैः ॥ १६४ ॥

चवक व पिंपळमूळ यांचे गुण जवळजवळ मिऱ्यांसारखेच आहेत.

चित्रकोऽग्निसमः पाके शोफार्शःकृमिकुष्ठहा ।

चित्रक अग्नीप्रमाणें अत्यंत तीक्ष्ण पाचक असून सूज, मूळव्याध, कृमि व कुष्ठ यांचा नाश करितो.

पंचकोलकमेतच्च मरिचेन विना स्मृतम् ॥ १६५ ॥
गुल्मप्लीहोदरानाहशूलघ्नं दीपनं परम् ।

मिरें सोडून बाकीच्या पांच औषधांच्या ( चवक, चित्रक, पिंपळी, पिंपळीमूळ, सुंठ ) समूहास पंचकोल अशी संज्ञा आहे. हें अत्यंत अग्निदीपक असून गुल्म, पानथरी, उदर, पोटफुगी, पोटशूळ यांचा परिहार करितें.

बिल्वकाश्मर्यतर्कारीपाटलाटुंटुकैर्महत् ॥ १६६ ॥
जयेत्कषायतिक्तोष्णं पंचमूलं कफानिलौ ।

बेल, शिवण, ऐरण, पाडळ व टेंटु या पांच वृक्षांच्या मुळांस मोठें पंचमूळ म्हणतात. तें तुरट, कडू, उष्ण व कफवातनाशक आहे.

ह्रस्वं बृहत्यंशुमतीद्वयगोक्षुरकैः स्मृतम् ॥ १६७ ॥
स्वादुपाकरसं नातिशीतोष्णं सर्वदोषजित् ।

रिंगणी, डोरली, सालवण, पिठवण व गोखरू यांच्या मुळांस लघुपंचमूळ म्हणतात. तें रसकाळीं व पाककाळीं गोड, त्रिदोषनाशक आणि फार थंडही नाहीं व फार उष्णही नाहीं असें आहे.

बलापुनर्नवैरंडशूर्पपर्णीद्वयेन तु ॥ १६८ ॥
मध्यमं कफवातघ्नं नाऽतिपित्तकरं सरम् ।

चिकणा, पुनर्नवा, एरंड, रानमूग व रानउडीद, यांच्या मुळांस मध्यमपंचमूळ म्हणतात. तें कफवातनाशक, किंचित् पित्तकारक व सारक आहे.

अभीरुवीराजीवंतीजीवकर्षभकैः स्मृतम् ॥ १६९ ॥
जीवनाख्यं च चक्षुष्यं वृष्यं पित्तानिलापहम् ।

शतावरी, काकोली, जीवंती, जीवक व ऋषभक, या पांचांस जीवनपंचमूळ म्हणतात; तें डोळ्यास हितावह, वीर्यवर्धक, व वातपित्तनाशक आहे.

तृणाख्यं पित्तजिद्दर्भकासेक्षुशरशालिभिः ॥ १७० ॥

दर्भ, कसई, ऊंस, रामबाण व भात यांच्या मुळांस तृणपंचमूळ म्हणतात; तें पित्तहारक आहे.

शूकशिंबीजपक्वान्नमांसशाकफलौषधैः ।
वर्गितैरन्नलेशोऽयमुक्तो नित्योपयोगिकः ॥ १७१ ॥

याप्रमाणें नित्य उपयोगांत येणाऱ्या भक्ष्य पदार्थांचे शूकधान्य, शिंबीधान्य, शिजविलेलें अन्न, मांस, भाज्या, फळें व औषधें असे वेगवेगळे वर्ग करून वर्णन केलें आहे.

---

## अध्याय सातवा.

अथातोऽन्नरक्षाध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां अन्नरक्षणासंबंधीं विवेचन करितों.

राजा राजगृहासन्ने प्राणाचार्यं निवेशयेत् ।
सर्वदा स भवत्येवं सर्वत्र प्रतिजागृविः ॥ १ ॥

राजानें वैद्यास नेहमीं आपल्या घराजवळ राहण्यास जागा

द्यावी. म्हणजे त्यास राजाचें खाणें-पिणें, वस्त्र-पात्र वगैरे गोष्टींविषयीं नेहमीं खबरदारी बाळगतां येते.

अन्नपानं विषाद्रक्षेद्विशेषेण महीपतेः ।
योगक्षेमौ तदायत्तौ धर्माद्या यन्निबंधनाः ॥ २ ॥

अन्नपानाचें विषापासून रक्षण करावें. त्यांतही राजाच्या अन्नपानाविषयीं विशेष खबरदारी बाळगावी. कारण, आपल्याजवळ नसलेल्या पदार्थांची प्राप्ति व मिळालेल्या वस्तूंचें रक्षण राजावर अवलंबून आहे. आणि चतुर्विध पुरुषार्थ आपल्या प्राप्तीवर व तिच्या सुरक्षिततेवर अवलंबून आहेत.

ओदनो विषवान् सांद्रो यात्यविस्राव्यतामिव ।
चिरेण पच्यते पक्वो भवेत्पर्युषितोपमः ॥ ३ ॥
मयूरकंठतुल्योष्मा मोहमूर्च्छाप्रसेककृत् ।
हीयते वर्णगंधाद्यैः क्लिद्यते चंद्रकांचितः ॥ ४ ॥

विषयुक्त भात शिजत असतां, त्यांत पाण्याचा अंश असूनही तो दाट भाताप्रमाणें होतो; ( म्हणजे त्याचीं शितें निरनिराळीं दिसत नाहींत व त्यांतून पेज निघत नाहीं. ) तो उशिरां शिजतो. शिजतांक्षणींच शिळ्याभाताप्रमाणें दिसतो. त्यांतून मोराच्या गळ्याच्या रंगाप्रमाणें निळसर रंगाच्या वाफा निघतात. तो खाल्ला असतां भ्रम व मूर्च्छा येते आणि तोंडावाटे लाळ गळते. त्याचा स्वाभाविक रंग, वास, रस, स्पर्श वगैरे नाहींसे होतात, त्यास पाणी सुटतें आणि पाण्यांत टाकलेल्या तेलाच्या थेंबाप्रमाणें त्यावर निरनिराळ्या रंगांची झांक मारणारीं मंडलें उमटतात.

व्यंजनान्याशु शुष्यंति ध्यामक्राथानि तत्र च ।
हीनातिरिक्ता विकृता छाया दृश्येत नैव वा ॥ ५ ॥
फेनोर्ध्वराजीसीमंततंतुबुद्बुदसंभवः ।
विच्छिन्नविरसा रागाः खांडवाः शाकमामिषम् ॥ ६ ॥

तोंडीं लावण्याचे पदार्थ विषयुक्त असतील तर, लवकर लवकर वाळतात, त्यांतील रस मळकट दिसतो. पातळ पदार्थांत आपली पडछाया लहान, मोठी, किंवा विकृत म्हणजे जींत डोकें किंवा दुसरा कोणताही अवयव नाहीं अशी दिसते, किंवा पडछाया

मुळींच दिसत नाहीं. त्यावर फेंस, रेषा, तार व बुडबुडे उत्पन्न होतात आणि भेगा पडतात. रायतीं, पंचामृतें, भाज्या व मांस हे पदार्थ चिथडतात आणि त्यांची चव नाहींशी होते.

नीला राजी रसे ताम्रा क्षीरे दध्नि दृश्यते ।
श्यावा पीताऽसिता तक्रे घृते पानीयसन्निभा ॥ ७ ॥
काली मद्यांभसोः क्षौद्रे हरित्तैलेऽरुणोपमा ।

विषयुक्त मांसरसावर निळ्या रंगाच्या रेषा उमटतात. दुधावर तांबड्या, दह्यावर काळसर, ताकावर पिंवळ्या-काळ्या, तुपावर पाण्यासारख्या, दारूवर व पाण्यावर काळ्या, मधावर हिरव्या व तेलावर पिंगट रेषा उमटतात.

पाकः फलानामामानां पक्कानां परिकोथनम् ॥ ८ ॥
द्रव्याणामार्द्रशुष्काणां स्यातां म्लानिविवर्णते ।
मृदूनां कठिनानां च भवेत्स्पर्शविपर्ययः ॥ ९ ॥

कच्चीं फळें पिकतात; पिकलेलीं कुजतात; ओलीं द्रव्यें कोमेजतात; वाळलेल्यांचा रंग बदलतो; नरम असलेलीं टणक होतात व टणक नरम होतात.

माल्यस्य स्फुटिताग्रत्वं म्लानिर्गंधांतरोद्भवः ।

विषयुक्त फुलांच्या पाकळ्यांना भेगा पडतात, तीं कोमेजतात; त्यांचा वास बदलतो.

ध्याममंडलता वस्त्रे शदनं तंतुपक्ष्मणाम् ॥ १० ॥
धातुमौक्तिककाष्ठाश्मरत्नादिषु मलाक्तता ।
स्नेहस्पर्शप्रभाहानिः सप्रभत्वं तु मृन्मये ॥ ११ ॥

विषयुक्त वस्त्रावर मळकट डाग पडतात, सुतें व दशा गळूं लागतात. धातु, मोत्यें, लांकूड, दगड, रत्नें यांवर मळकट डाग पडतात, आणि त्यांचा तुकतुकीतपणा व तेज हीं नाहींशी होतात. मातीचें भांडें विषदूषित झालें असतां त्यास चकाकी येते.

विषदः श्यावशुष्कास्यो विलक्षो वीक्षते दिशः ।
स्वेदवेपथुमांस्त्रस्तो भीतः स्खलति जृंभते ॥ १२ ॥

विष घालणाऱ्या मनुष्याचें तोंड काळें व कोरडें पडतें. त्याची दृष्टि चंचल होते. तो चोहोंकडे पहात असतो. त्यास घाम येतो

व कांपरें सुटतें; भीतीनें कावराबावरा होतो; चालतांना अडखळतो आणि वरचेवर जांभया देतो.

प्राप्यान्नं सविषं त्वग्निरेकावर्तः स्फुटत्यति ।
शिखिकंठाभधूमार्चिरनर्चिर्वोग्रगंधवान् ॥ १३ ॥

विषयुक्त भात विस्तवावर टाकला असतां तो अतिशय फडफडतो व त्यापासून ज्वाळेचा एकदम एकच भडका उठतो. धूर व ज्वाळेचा रंग मोराच्या गळ्यासारखा चित्रविचित्र असतो; किंवा मुळींच ज्वाळा निघत नाहीं, आणि उग्र घाण येते.

म्रियंते मक्षिकाः प्राश्य काकः क्षामस्वरो भवेत् ।
उत्क्रोशंति च दृष्ट्वैतच्छुकदात्यूहसारिकाः ॥ १४ ॥
हंसः प्रस्खलति ग्लानिर्जीवंजीवस्य जायते ।
चकोरस्याऽक्षिवैराग्यं क्रौंचस्य स्यान्मदोदयः ॥ १५ ॥
कपोतपरभृद्दक्षचक्रवाका जहत्यसून् ।
उद्वेगं याति मार्जारः शकृन्मुंचति वानरः ॥ १६ ॥
हृष्येन्मयूरस्तद्दृष्ट्या मंदतेजो भवेद्विषम् ।

विषयुक्त अन्नावर माशा बसल्या तर त्या तत्काल मरतात. तें कावळ्यानें खाल्लें असतां त्याचा स्वर क्षीण होतो. विषयुक्त अन्न पाहून पोपट, चातक व साळुंकी हे पक्षी मोठ्यानें ओरडूं लागतात, हंस अडखळतो, जीवंजीवपक्ष्यास ग्लानि येते, चकोराच्या डोळ्याची लाली नाहींशी होते, क्रौंच पक्ष्यास मद येतो, कबूतर, कोकिला, कोंबडीं व चक्रवाक प्राणत्याग करितात, मांजर उद्विग्न होतें, वानर हगूं लागतो, मोरास हर्ष होतो व त्याच्या दृष्टीनें विषाचा जोर कमी होतो.

इत्यन्नं विषवज्ज्ञात्वा त्यजेदेवं प्रयत्नतः ॥ १७ ॥
यथा तेन विपद्येरन्नपि न क्षुद्रजंतवः ।

या लक्षणांवरून अन्न विषारी आहे, असें समजल्यावर तें अशा बंदोबस्तानें टाकून द्यावें कीं, त्याच्या योगानें किडे, मुंगी यांसारखे क्षुद्र जीव देखील मरणार नाहींत.

स्पृष्टे तु कंडूदाहोषाज्वरार्तिस्फोटसुप्तयः ॥ १८ ॥
नखरोमच्युतिः शोफः सेकाद्या विषनाशनाः ।

शस्तास्तत्र प्रलेपाश्च सेव्यचंदनपद्मकैः ॥ १९ ॥
ससोमवल्कतालीसपत्रकुष्ठामृतानतैः ।

विषारी अन्नाच्या स्पर्शानें खाज, सर्वांगाचा किंवा एकांगाचा दाह, ताप, शूळ, फोड, स्पर्श न कळणें, नखें व केंस गळणें व सूज हे विकार होतात. यांवर विषनाशक औषधांचा परिषेक करावा. वाळा, चंदन, पद्मकाष्ठ, कायफळ, तालिसपत्र, कोष्ठ, गुळवेल व तगर यांचा लेप प्रशस्त आहे.

लालाजिह्वौष्ठयोर्जाड्यमूषा चिमिचिमायनम् ॥ २० ॥
दंतहर्षो रसाज्ञत्वं हनुस्तंभश्च वक्त्रगे ।
सेव्याद्यैस्तत्र गंडूषाः सर्वं च विषजिद्धितम् ॥ २१ ॥

विषारी अन्न तोंडांत गेलें असतां लाळ गळूं लागते, जीभ व ओंठ जड होतात, आग व चुणचुण होते, दातांना शिरशिरी येते, चव कळत नाहींशी होते व दांतखिळी बसते. या विकारांवर वर सांगितलेल्या वाळा वगैरे औषधांच्या गुळण्या कराव्या आणि इतरही विषनाशक उपचार करावे.

आमाशयगते स्वेदमूर्च्छाध्मानमदभ्रमाः ।
रोमहर्षो वमिर्दाहश्चक्षुर्हृदयरोधनम् ॥ २२ ॥
बिंदुभिश्चाचयोऽगानाम्

तें आमाशयांत ( पोटांत ) गेलें असतां घाम सुटतो, मूर्च्छा येते, पोट फुगतें, अंमल येतो, घेरी येते, अंगावर शहारे येतात, उलटी होते, अंगाची आग होते, डोळे ताठतात, छाती भरते, व अंगावर अनेक रंगांच्या गांधी उठतात.

पक्वाशयगते पुनः ।
अनेकवर्णं वमति मूत्रयत्यतिसार्यते ॥ २३ ॥
तंद्रा कृशत्वं पांडुत्वमुदरं बलसंक्षयः ।

तें पक्वाशयांत गेलें असतां अनेक रंगांच्या उलट्या, लघ्वी, जुलाब, झांपड, कृशता, पांडुता, उदर व शक्तिक्षय हे विकार होतात.

तयोर्वांतविरिक्तस्य हरिद्रे कटभीं गुडम् ॥ २४ ॥
सिंदुवारितनिष्पावबाष्पिकाशतपर्विकाः ।

तंडुलीयकमूलानि कुक्कुटांडमवल्गुजम् ॥ २५ ॥
नावनांजनपानेषु योजयेद्विषशांतये ।

यांवर विषाचें शमन होण्याकरितां वमनविरेचन देऊन हळद, दारुहळद, किनही, गूळ, निर्गुडी, पावटे, बाफळी, वेखंड, तांदुळज्याचीं मुळें, कोंबडीचें अंडें व बांवच्या या औषधांचा नस्य, अंजन व पान यांत उपयोग करावा.

विषभुक्ताय दद्याच्च शुद्धायोर्ध्वमधस्तथा ॥ २६ ॥
सूक्ष्मं ताम्ररजः काले सक्षौद्रं हृद्विशोधनम् ।

विष खाल्लेल्या मनुष्यास वमनविरेचनानंतर देशकाल पाहून हृदयशुद्धीकरितां ताम्रभस्म मधांतून द्यावें.

शुद्धे हृदि ततः शाणं हेमचूर्णस्य दापयेत् ॥ २७ ॥
न सज्जते हेमपांगे पद्मपत्रेऽबुवद्विषम् ।
जायते विपुलं चायुर्गरेऽप्येष विधिः स्मृतः ॥ २८ ॥

हृदयशोधनानंतर चार मासे सोन्याचा वर्ख द्यावा. कमळपत्रावर जसें पाणी चिकटून राहत नाहीं, त्याप्रमाणें सोनें खाणाराच्या अंगांत विष भिनून रहात नाहीं, आणि आयुष्य वाढतें. कृत्रिम विषावरही हेच उपचार करावे.

विरुद्धमपि चाहारं विद्याद्विषगरोपमम् ।

विरुद्धभोजनाचे परिणामही विष किंवा कृत्रिम विष यांसारखेच आहेत.

आनूपमामिषं माषक्षौद्रक्षीरविरूढकैः ॥ २९ ॥
विरुध्यते सह बिसैर्मूलकेन गुडेन वा ।

पाणथळ जनावरांचें मांस उडीद, मध, दूध, कोंब आलेलें धान्य भिसें, मुळे व गूळ यांच्याशीं परस्परविरुद्ध आहे.

विशेषात्पयसा मत्स्या मत्स्येष्वपि चिलीचिमः ॥ ३०॥

दुधाबरोबर मासे विरुद्ध आहेत, त्यांतही वेगसा मासा अतिशय विरुद्ध आहे.

विरुद्धमम्लं पयसा सह सर्वं फलं तथा ।
तद्वत्कुलत्थवरककंगुवल्लमकुष्टकाः ॥ ३१ ॥

दुधाचा एकंदर आंबट पदार्थांबरोबर व ( आंबाडा, ओंट, करवंद, जांभूळ, कवठ, चिंच वगैरे कांहीं ) फळांशीं विरोध आहे. तसेंच

कुळीथ, वऱ्याचे तांदूळ, राळे, वाल व मटक्या यांच्याशींही दूध विरुद्ध आहे.

भक्षयित्वा हरितकं मूलकादि पयस्त्यजेत् ।

मुळे, कोथिंबीर, आलें वगैरे शाकवर्गांत सांगितलेल्या पदार्थांस हरितक म्हणतात. हे खाऊन वर दूध पिऊं नये.

वाराहं श्वाविधा नाद्याद्दध्ना पृषतकुक्कुटौ ॥ ३२ ॥

डुकराचें व साळइचें मांस परस्परविरुद्ध आहे, म्हणून तीं बरोबर खाऊं नयेत; पृषतमृग व कोंबडा यांचें मांस दह्याबरोबर खाऊं नये.

आममांसानि पित्तेन माषसूपेन मूलकम् ।
अविं कुसंभशाकेन बिसैः सह विरूढकम् ॥ ३३ ॥
माषसूपगुडक्षीरदध्याज्यैलाकुचं फलम् ।
फलं कदल्यास्तक्रेण दध्ना तालफलेन वा ॥ ३४ ॥
कणोषणाभ्यां मधुना काकमाचीं गुडेन वा ।
सिद्धां वा मत्स्यपचने पचने नागरस्य वा ॥ ३५ ॥
सिद्धामन्यत्र वा पात्रे कामात्तामुषितां निशाम् ।

कच्चें मांस पित्ताशीं खाऊं नये. उडदाच्या वरणाबरोबर मुळा, करडईच्या भाजीबरोबर मेंढ्यांचें मांस, भिश्याबरोबर मोड आलेलें धान्य; उडदाचें वरण, गूळ, दूध, दहीं व तूप यांच्याबरोबर ओंठीचें फळ; ताक, दहीं किंवा ताडगोळा यांबरोबर केळें; पिंपळी, मिरें, मध किंवा गूळ यांच्याबरोबर काकमाची, तसेंच मासे किंवा सुंठ शिजविण्याच्या भांड्यांत शिजविलेली काकमाची; व रात्रीची शिळी काकमाचीची भाजीही खाऊं नये.

मत्स्यनिस्तलनस्नेहसाधिताः पिप्पलीस्त्यजेत् ॥ ३६ ॥

मासे तळून शिल्लक राहिलेल्या तेलांत सिद्ध केलेली पिंपळी खाऊं नये.

कांस्ये दशाहमुषितं सर्पिरुष्णं त्वरुष्करे ।

कांशाच्या भांड्यांत दहा दिवसपर्यंत ठेवलेलें तूप खाऊं नये. बिब्याबरोबर ऊन किंवा उष्णवीर्य पदार्थ खाऊं नये.

भासो विरुध्यते शूल्यः कांपिल्लस्तक्रसाधितः ॥ ३७ ॥

लोखंडी सळईवर भाजलेलें भासपक्ष्याचें मांस व ताकांत शिजविलेली कपिला भाजी खाऊं नये.

एकध्यं पायससुराकृशराः परिवर्जयेत् ।

खीर, दारू व खिचडी एका वेळीं खाऊं नयेत.

मधुसर्पिर्वसातैलपानीयानि द्विशस्त्रिशः ॥ ३८ ॥
एकत्र वा समांशानि विरुध्यंते परस्परम् ।

मध, तूप, वसा व पाणी यांपैकीं कोणत्याही दोहोंचा, तिहींचा, किंवा सर्वांचा समभागसंयोग परस्परविरुद्ध आहे.

भिन्नांशे अपि मध्वाज्ये दिव्यवार्यनुपानतः ॥ ३९ ॥

पावसाच्या पाण्याबरोबर मध व तूप कमीजास्त प्रमाणानें देखील एकत्र मिळवून खाऊं नयेत.

मधुपुष्करबीजं च मधुमैरेयशार्करम् ।
मंथानुपानः क्षैरेयो हारिद्रः कटुतैलवान् ॥ ४० ॥

कमळकाकडी मधाबरोबर खाऊं नये. मध्वासव, खर्जूरासव व शर्करासव हीं एके जागीं मिळवून पिऊं नयेत. खिरीवर सातूचें पीठ तूपपाणी मिळवून खाऊं नये. हारिद्रकंदाची भाजी शिरसेलाची फोडणी देऊन खाऊं नये.

उपोदकातिसाराय तिलकल्केन साधिता ।

तिळांची चटणी घालून केलेली थोरमयाळीची भाजी खाल्ली असतां अतिसार होतो.

बलाका वारुणीयुक्ता कुल्माषैश्च विरुध्यते ॥ ४१ ॥
भृष्टा वराहवसया सैव सद्यो निहंत्यसून् ।

बगळ्याचें मांस वारुणी व उसळ यांच्याशीं विरुद्ध आहे. तेंच डुकराच्या वसेंत तळून खाल्लें असतां तत्काल प्राणनाश करितें.

तद्वत्तित्तिरिपत्राढ्यगोधालावकपिंजलाः ॥ ४२ ॥
ऐरंडेनाग्निना सिद्धास्तत्तैलेन विमूर्छिताः ।

तसेंच तित्तिर, मोर, घोरपड, लावा व कवडा यांचें मांस, एरंडेल तेलाची फोडणी देऊन एरंडाच्या लांकडांच्या विस्तवावर तयार करून खाल्लें असतां तत्काल प्राण घेतें.

हारीतमांसं हारिद्रशूलकप्रोतपाचितम् ॥ ४३ ॥
हारिद्रवह्निना सद्यो व्यापादयति जीवितम् ।
भस्मपांशुपरिध्वस्तं तदेव च समाक्षिकम् ॥ ४४ ॥

तिलगिरु पक्ष्याचें मांस दारुहळदीच्या सळईवर लावून दारुहळदीच्याच लांकडाच्या विस्तवावर भाजून खाल्लें असतां तत्काल

प्राणहरण करितें. त्यास राख व धूळ लागली असून तें मधाशीं खाल्लें असतांही प्राणनाश करितें.

यत्किंचिद्दोषमुत्क्लेश्य न हरेत्तत्समासतः।
विरुद्धं शुद्धिरत्रेष्टा शमो वा तद्विरोधिभिः॥ ४५॥
द्रव्यैस्तैरेव वा पूर्वं शरीरस्याऽभिसंस्कृतिः।

सारांश, जे जे पदार्थ वातादि दोषांस आपापल्या स्थानापासून सोडवितात, परंतु त्यांस बाहेर काढून टाकीत नाहींत, ते सर्व विरुद्ध समजावे. अशा विरुद्ध पदार्थांपासून होणाऱ्या विकारांवर सामान्य उपाय म्हणजे वमन-विरेचन किंवा विरुद्ध उपचारांनीं शमन हे होत. किंवा विकार झाल्यानंतर जीं शमन औषधें द्यावयाचीं, तींच पूर्वींपासून घेण्याचा अभ्यास ठेवावा.

व्यायामस्निग्धदीप्ताग्निवयःस्थबलशालिनाम्॥ ४६॥
विरोध्यपि न पीडायै सात्म्यमल्पं च भोजनम्।

नेहमीं व्यायाम करणारे, स्निग्ध भोजन करणारे, प्रदीप्त कोठ्याचे, तरुण व बलिष्ठ अशा मनुष्यांनीं विरुद्ध आहार केला तरी तो त्यांस बाधत नाहीं. तसेच विरुद्ध पदार्थ संवय करून व थोडे थोडे खाल्ले असतांही अपाय करीत नाहींत.

पादेनापथ्यमभ्यस्तं पादपादेन वा त्यजेत्॥ ४७॥
निषेवेत हितं तद्वदेकद्वित्र्यंतरीकृतम्।

अपथ्य आहारविहारांची संवय झाली असतां ती एकदम न सोडतां, चतुर्थांशानें, किंवा एकदम तितकीही सोडवत नसल्यास षोडशांशानें सोडीत जावी. आणि त्यांच्या जागीं, संवय नसलेल्या पथ्यकर आहाराचें सेवन करावयाचें तेंही त्याच क्रमानें करीत जावें. पण हा क्रम [१]एकसारखा चालू न ठेवतां मध्यें एक, दोन किंवा तीन दिवसांचें अथवा तितक्याच जेवणांचें अंतर टाकीत जावें.

---

१ एका मनुष्यास जवांच्या भाकरी खाण्याची संवय आहे. परंतु त्यापासून त्यास कांहीं विकार होण्याचीं चिन्हें दिसूं लागल्यामुळें तो ती सवय मोडून साळींचा भात खाण्याची संवय करूं इच्छितो. तर ती त्यानें पुढील क्रमानें केली पाहिजे. असें समजा कीं, तो मनुष्य दर वेळीं ४० तोळे जवांच्या भाकरी खातो. तर त्यानें पहिल्या वेळीं ३० तोळे भाकरी व १० तोळे साळींचा भात जेवावा. दुसऱ्या वेळीं पूर्वींप्रमाणें ४० तोळे भाकरी खाव्या. तिसऱ्या वेळीं २० तोळे भाकरी व

अपथ्यमपि हि त्यक्तं शीलितं पथ्यमेव वा ॥ ४८ ॥
सात्म्यासात्म्यविकाराय जायते सहसाऽन्यथा ।

या क्रमाचें उल्लंघन करून एकदम संवयीचें अपथ्य सोडलें किंवा एकदम बिनसंवयीचें पथ्य सुरू केलें, तर त्यापासून सात्म्य-असात्म्यासंबंधानें होणारे विकार उद्भवतात.

क्रमेणापचिता दोषाः क्रमेणोपचिता गुणाः ॥ ४९ ॥
नाप्नुवंति पुनर्भावमप्रकंप्या भवंति च ।

अपथ्याभ्यासाचे दोष क्रमानें कमी करीत जाऊन, पथ्यसेवनाचें गुण क्रमानेंच वाढवीत गेलें असतां, गेलेले दोष पुन्हा उद्भवत नाहींत व मिळविलेले गुण कायम राहतात.

अत्यंतसन्निधानानां दोषाणां दूषणात्मनाम् ॥ ५० ॥
अहितैर्दूषणं भूयो न विद्वान् कर्तुमर्हति ।

वातादि दोषांचा शरीराशीं फार निकट संबंध असून, दूषित करणें हा त्यांचा स्वभावधर्मच आहे. अशांत आणखी अपथ्य आहार-विहारांनीं त्यांस अधिकच दूषित करणें जाणत्यास शोभत नाहीं.

आहारशयनाब्रह्मचर्यैर्युक्त्या प्रयोजितैः ॥ ५१ ॥
शरीरं धार्यते नित्यमागारमिव धारणैः ।

आहार, झोंप व स्त्रीसंग या तीन गोष्टींचा योग्य उपयोग केल्यास घरास जसे खांब, तशाच त्या शरीरास धारण करितात.

आहारो वर्णितस्तत्र तत्र तत्र च वक्ष्यते ॥ ५२ ॥

यांपैकीं आहाराचें वर्णन मागें केलेंच आहे. व पुढेंही त्या त्या प्रसंगीं करण्यांत येईल.

निद्रायत्तं सुखं दुःखं पुष्टिः कार्श्यं बलाबलम् ।
वृषता क्लीबता ज्ञानमज्ञानं जीवितं न च ॥ ५३ ॥

सुख, दुःख, पुष्टि, कृशता, शक्ति, अशक्तता, पुरुषत्व, नपुंसकत्व, ज्ञान, अज्ञान, जीवन, मरण, या सर्व गोष्टी निद्रेवर अवलंबून आहेत.

---

२० तोळे भात खावा. आणि चवथ्या व पांचव्या या दोन्ही वेळीं सर्वच भाकरी खाव्या. पुन्हा सहाव्या वेळीं १० तोळे भाकरी व ३० तोळे भात खावा; आणि ७–८–९ या तिन्ही वेळीं सर्व भाकरीच खाव्या. आणि दहाव्या वेळीं सर्व भातच जेवावा. अशा रीतीनें अपथ्य सुटून पथ्याची संवय जडते. षोडशांशाच्या चढ-उताराचीही अशीच पद्धति आहे.

अकालेऽतिप्रसंगाच्च न च निद्रा निषेविता ।
सुखायुषी पराकुर्यात्कालरात्रिरिवाऽपरा ॥ ५४ ॥

अवेळीं निद्रा, अतिनिद्रा व फार थोडी निद्रा या सुख व आयुष्य यांची हानि करण्यांत जणूं काय दुसऱ्या काळरात्रीच आहेत.

रात्रौ जागरणं रूक्षं स्निग्धं प्रस्वपनं दिवा ।
अरूक्षमनभिष्यंदि त्वासीनप्रचलायितम् ॥ ५५ ॥

रात्रीं जागरण रूक्ष आहे. तसेंच दिवसा झोंप स्निग्ध आहे. बसल्या बसल्या डुकल्या घेण्यानें रूक्षताही वाढत नाहीं किंवा स्निग्धताही येत नाहीं. ( दिवसा झोंप घेणें झाल्यास अशी बसूनच घ्यावी. )

ग्रीष्मे वायुचयादानरौक्ष्यरात्र्यल्पभावतः ।
दिवास्वप्नो हितोऽन्यस्मिन्कफपित्तकरो हि सः ॥ ५६ ॥

ग्रीष्म ऋतूंत वायूचा संचय होतो, आदानकालामुळें हवा रूक्ष होते व रात्री लहान असतात. यामुळें या ऋतूंत दिवसा निजणें हितकर आहे. इतर ऋतूंत निजल्यानें कफ-पित्तांचा जोर वाढतो.

मुक्त्वा तु भाष्ययानाध्वमद्यस्त्रीभारकर्मभिः ।
क्रोधशोकभयैः क्लांतान् श्वासहिध्मातिसारिणः ॥ ५७ ॥
वृद्धबालाबलक्षीणक्षततृट्शूलपीडितान् ।
अजीर्णाभिहतोन्मत्तान् दिवास्वप्नोचितानपि ॥ ५८ ॥
धातुसाम्यं तथा ह्येषां श्लेष्मा चांऽगानि पुष्यति ।

परंतु बोलणें; घोडा, उंट वगैरे वाहनांवर बसून फिरणें, मार्ग चालणें, मद्यपान, मैथुन, ओझें वाहणें, या कर्मांनीं किंवा क्रोध, शोक, भीति या मनोविकारांनीं थकलेले, ज्यांस दमा, उचकी व अतिसार हे विकार आहेत असे, आणि म्हातारे, अशक्त; जखम, तृषा शूळ, अजीर्ण, अभिघात, उन्माद या विकारांनीं पीडित व ज्यांस झोपेची संवय पडली असेल, असे मनुष्य व मुलें यांस हा नियम लागू नाहीं. त्यांस दिवसा निजणें हितावह असतें. कारण त्यायोगानें त्यांचे धातु समस्थितींत राहून कफ त्यांचें शरीर पुष्ट करितो.

बहुमेदःकफाः स्वप्युः स्नेहनित्याश्च नाऽहनि ॥ ५९ ॥
विषार्तः कंठरोगी च नैव जातु निशास्वपि ।

ज्यांच्या अंगांत मेद व कफ फार आहे, व जे नेहमीं स्निग्ध आहार करितात, त्यांनीं ग्रीष्म ऋतूंत देखील दिवसा निजूं नये.

ज्यांस विषविकार किंवा कंठरोग झाले असतील त्यांनीं तर रात्रीं देखील निजूं नये.

अकालशयनान्मोहज्वरस्तैमित्यपीनसाः ॥ ६० ॥
शिरोरुक्शोफहृल्लासस्रोतोरोधाग्निमंदताः।

अवेळीं निजल्यानें मोह, ताप, जडपणा, पीनस, डोकें दुखणें, सूज, मळमळ, स्रोतांचा अवरोध व अग्निमांद्य हे विकार होतात.

तत्रोपवासवमनस्वेदनावनमौषधम् ॥ ६१ ॥

त्यावर उपास वमन, स्वेदन व नस्य हे उपाय करावे.

योजयेदतिनिद्रायां तीक्ष्णं प्रच्छर्दनांजनम्।
नावनं लंघनं चिंतां व्यवायं शोकभीक्रुधः॥ ६२ ॥

अतिशय झोंप येत असल्यास तीव्र वमन, अंजन, नस्य, लंघन, काळजी, मैथुन, शोक, भय व क्रोध हे उपाय योजावे.

एभिरेव च निद्राया नाशः श्लेष्मातिसंक्षयात्।

यांच्याच योगानें कफाचा क्षय होऊन निद्रानाश होतो.

निद्रानाशादंगमर्दशिरोगौरवजृंभिकाः ॥ ६३ ॥
जाड्यं ग्लानिभ्रमापक्तितंद्रा रोगाश्च वातजाः।

नाशानें अंग मोडणें, डोकें जड होणें, जांभया येणें, अंग जड होणें, निद्रा, ग्लानि, श्रम, अपचन, तंद्रा व वातरोग उत्पन्न होतात.

यथाकालमतो निद्रां रात्रौ सेवेत सात्म्यतः ॥ ६४ ॥

म्हणून रात्रीं योग्यकाळीं प्रत्येकानें आपल्या संवयीप्रमाणें झोंप घ्यावी.

असात्म्याज्जागरादर्धं प्रातः स्वप्यादभुक्तवान्।

रोजच्या संवयीपेक्षां जितकें जास्त जागरण रात्रीं होईल, त्याच्या निम्यानें दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेवणापूर्वीं झोंप घ्यावी.

शीलयेन्मंदनिद्रस्तु क्षीरमद्यरसान् दधि ॥ ६५ ॥
अभ्यंगोद्वर्तनस्नानमूर्धकर्णाक्षितर्पणम्।

ज्यास चांगली झोंप येत नसेल त्यानें दूध, मद्य, मांसरस, दहीं, अभ्यंग, उटणें, स्नान, टाळूवर तेल जिरविणें, कानांत तेल घालणें, डोळ्यांवर घड्या घालणें, हे उपाय करावे.

कांताबाहुलताश्लेषो निर्वृतिः कृतकृत्यता॥ ६६ ॥
मनोनुकूला विषयाः कामं निद्रासुखप्रदाः।

कांतेच्या भुजलतेनें आलिंगन, सुख, कृतकृत्यता व आवडत्या गोष्टी यांपासून यथेच्छ निद्रासुख मिळतें.

ब्रह्मचर्यरतेर्ग्राम्यसुखनिस्पृहचेतसः ॥ ६७ ॥
निद्रा संतोषतृप्तस्य स्वं कालं नातिवर्तते ।

ब्रह्मचर्यांत आनंद मानणारा, मैथुनाची अपेक्षा न बाळगणारा व नेहमीं संतोषवृत्तीनें राहणारा, अशा मनुष्यास वेळच्या वेळीं झोंप येते.

ग्राम्यधर्मे त्यजेन्नारीमनुत्तानां रजस्वलाम् ॥ ६८ ॥
अप्रियामप्रियाचारां दुष्टसंकीर्णमेहनाम् ।
अतिस्थूलकृशां सूतां गर्भिणीमन्ययोषितम् ॥ ३९ ॥
वर्णिनीमन्ययोनिं च गुरुदेवनृपालयम् ।
चैत्यश्मशानाऽयतनचत्वरांबुचतुष्पथम् ॥ ७० ॥
पर्वाण्यनंगं दिवसं शिरोहृदयताडनम् ।

उपडी निजलेली, विटाळशी, नावडती, अप्रिय वर्तनाची, दुष्ट व संकुचित योनीची, फार लठ्ठ, फार कृश, बाळंत झालेली, गर्भवती, परक्याची, ब्रह्मचारिणी; व हैस, बकरी वगैरे प्राण्यांच्या योनीप्रमाणें अमानुष योनि असलेली, अशा स्त्रीशीं मैथुन करूं नये. गुरुगृह, देऊळ, राजवाडा, पिंपळ, स्मशान, शिक्षास्थान, स्थंडिल, पाणवठा व चवाठा या ठिकाणीं मैथुन करूं नये. पौर्णिमा, अमावास्या वगैरे पर्वकाळीं मैथुन करूं नये. योनीशिवाय गुदद्वार, तोंड वगैरे स्थानीं व दिवसा मैथुन करूं नये. मैथुन करतांना डोकें व छाती आपटूं नये.

अत्याशितोऽधृतिः क्षुद्वान् दुःस्थितांगः पिपासितः ७२
बालो वृद्धोऽन्यवेगार्तस्त्यजेद्रोगी च मैथुनम् ।

फार जेवलेला, घाबरलेला, भुकेलेला, वेडा वांकडा बसलेला, तृषार्त, सोळा वर्षांपेक्षां कमी वयाचा, म्हातारा, मलमूत्रादिकांच्या वेगांनीं व्याकुळ व रोगी, अशा मनुष्यानें स्त्रीसंग करूं नये.

सेवेत कामतः कामं तृप्तो वाजीकृतां हिमे ॥ ७२ ॥
त्र्यहाद्वसंतशरदोः पक्षाद्वर्षानिदाघयोः ।

हेमंत व शिशिर ऋतूंत वाजीकरण औषधांनीं पुष्ट होऊन यथेच्छ स्त्रीसंग करावा. वसंत व शरद् ऋतूंत तीन दिवसांआड, आणि वर्षा व ग्रीष्म ऋतूंत पंधरा दिवसांनीं एकदां स्त्रीसंग करावा.

भ्रमक्लमोरुदौर्बल्यबलधात्विंद्रियक्षयः ॥ ७३ ॥
अपर्वमरणं च स्यादन्यथा गच्छतः स्त्रियम् ।

या नियमांचें उल्लंघन करून जे स्त्रीसंग करितील, त्यांस भ्रम, ग्लानि, मांड्या गळणें, अशक्तता, धातु व इंद्रियांची क्षीणता हे विकार होतात आणि शेवटीं अकालीं मरणही येतें.

स्मृतिमेधायुरारोग्यपुष्टींद्रिययशोबलैः ।
अधिका मंदजरसो भवंति स्त्रीषु संयताः ॥ ७४ ॥

पूर्वोक्त नियमानें स्त्रीसंग केल्यास स्मृति, बुद्धि, आयु, आरोग्य, पुष्टि, इंद्रियें, यश व शक्ति हीं वाढतात, आणि वार्धक्य लवकर येत नाहीं.

स्नानानुलेपनहिमानिलखंडखाद्य-
शीतांबुदुग्धरसयूषसुराप्रसन्नाः ।
सेवेत चानु शयनं विरतौ रतस्य
तस्यैवमाशु वपुषः पुनरेति धाम ॥ ७५ ॥

स्त्रीसंग केल्यावर स्नान, उटी, गार वारा, मिष्टान्न, थंड पाणी, दूध, मांसरस, कढणें, सुरा व प्रसन्ना यांचें यथायोग्य सेवन करून नंतर झोंप घ्यावी, म्हणजे नष्ट झालेलें शारीरिक तेज पुन्हा लवकरच परत येतें.

श्रुतचरितसमृद्धे कर्मदक्षे दयालौ
भिषजि निरनुबंधं देहरक्षां निवेश्य ।
भवति विपुलतेजःस्वास्थ्यकीर्तिप्रभावः
स्वकुशलफलभोगी भूमिपालश्चिरायुः ॥ ७६ ॥

पूर्ण विद्वान्, सदाचारी, क्रियादक्ष व दयाळु अशा वैद्यावर आपल्या शरीररक्षणाचा भार सर्वस्वीं सोंपवून दिल्यानें राजा उत्तम प्रकारें तेजस्वी, निरोगी, कीर्तिवान्, प्रभावशाली, आपल्या पुण्यफलाचा उपभोग घेणारा व दीर्घायु होतो.

---

# अध्याय आठवा.

अथातो मात्राशितीयमध्यायं व्याख्यास्यामः।

आतां मिताहाराविषयींचा अध्याय सांगतों.

मात्राशी सर्वकालं स्यान्मात्रा ह्यग्नेः प्रवर्तिका।
मात्रां द्रव्याण्यपेक्षंते गुरूण्यपि लघून्यपि ॥ १ ॥

मनुष्यानें नेहमीं मिताहारी असावें. मिताहारच जठराग्नीस प्रदीप्त ठेवितो. अन्न जड असो किंवा हलकें असो, तें मितप्रमाणानेंच घेतलें पाहिजे.

गुरूणामर्धसौहित्यं लघूनां नातितृप्तता।
मात्राप्रमाणं निर्दिष्टं सुखं यावद्विजीर्यति ॥ २ ॥

जड अन्नाचें मितप्रमाण म्हणजे अर्धें पोट भरेपर्यंत जेवणें; हलक्या अन्नाचें प्रमाण पोटभर जेवणें; किंबहुना किंचित् जागा राखून जेवणें. जितकें अन्न सुखानें जिरेल तितकेंच त्याचें मितप्रमाण समजावें.

भोजनं हीनमात्रं तु न बलोपचयौजसे।
सर्वेषां वातरोगाणां हेतुतां च प्रपद्यते ॥ ३ ॥

योग्य प्रमाणापेक्षां कमी आहार केला असतां शक्ति, पुष्टि व ओज हीं उत्पन्न होत नाहींत, आणि त्यापासून सर्व वातरोगांची उत्पत्ति होते.

अतिमात्रं पुनः सर्वानाशु दोषान् प्रकोपयेत्।

अतिशय आहार केल्यानें सर्व दोष तत्काल प्रकुपित होतात.

पीड्यमाना हि वाताद्या युगपत्तेन कोपिताः ॥ ४ ॥
आमेनान्नेन दुष्टेन तदैवाविश्य कुर्वते।
विष्टंभयंतोऽलसकं च्यावयंतो विषूचिकाम् ॥ ५ ॥
अधरोत्तरमार्गाभ्यां सहसैवाजितात्मनः।

अन्नाचा पाक न झाल्यामुळें तें बिघडतें, व वातादि दोष अवरुद्ध झाल्यामुळें ते सर्व एकदम कुपित होतात; आणि त्याच दुष्ट अन्नांत प्रवेश करून त्यास स्रोतांतल्या स्रोतांत बंद करून अलसक उत्पन्न करितात; किंवा खालच्या व वरच्या दोन्ही मार्गांनीं त्याचा

एकदम निचरा सुरू करून त्या असंयमी मनुष्यावर पटकीची धाड आणितात.

प्रयाति नोर्ध्वं नाधस्तादाहारो न च पच्यते ॥ ६ ॥
आमाशयेऽलसीभूतस्तेन सोऽलसकः स्मृतः ।

खाल्लेलें अन्न वांतीवाटेही पडत नाहीं, जुलाब होऊनही जात नाहीं, पचतही नाहीं, आमाशयांत जागच्या जागीं (आळशासारखें) दडपून बसतें, म्हणून या रोगास अलसक म्हणतात.

विविधैर्वेदनोद्भेदैर्वाय्वादिभृशकोपतः ॥ ७ ॥
सूचीभिरिव गात्राणि विध्यतीति विषूचिका ।

वातादि त्रिदोषांच्या अत्यंत प्रकोपानें नाना प्रकारच्या वेदना होऊन सर्वांगास सुया टोंचल्याप्रमाणें यातना होतात. म्हणून त्या रोगास विषूचिका म्हणतात.

तत्र शूलभ्रमाऽनाहकंपस्तंभादयोऽनिलात् ॥ ८ ॥
पित्ताज्ज्वरातिसारांतर्दाहतृट्प्रलयादयः ।
कफाच्छर्द्यंगगुरुतावाक्संगष्ठीवनादयः ॥ ९ ॥

विषूचिकेंत शूळ, भ्रम, पोटफुगी, कांपरें, अंग ताठणें इत्यादि विकार वायूपासून होतात. ताप, जुलाब, अन्तर्दाह, तहान, मूर्च्छा इत्यादि विकार पित्तापासून होतात. कफाधिक्यानें उलटी, अंग जड होणें, वाचा बंद होणें, थुंका सुटणें इत्यादि विकार होतात.

विशेषादुर्बलस्याऽल्पवह्नेर्वेगविधारिणः ।
पीडितं मारुतेनान्नं श्लेष्मणा रुद्धमंतरा ॥ १० ॥
अलसं क्षोभितं दोषैः शल्यत्वेनैव संस्थितम् ।
शूलादीन्कुरुते तीव्रांश्छर्द्यतीसारवर्जितान् ॥ ११ ॥
सोऽलसः

विशेषेंकरून अशक्त, मंदाग्नि व नेहमीं मलमूत्रादिकांचे वेग थांबविणाऱ्या लोकांस अलस रोग होतो. प्रकुपित वायूनें दाबलेलें अन्न कफानें आंतल्या आंत कोंडलें जाऊन स्तब्ध होऊन एखाद्या शल्याप्रमाणें तीव्र शूळ वगैरे विकार उत्पन्न करितें. यास अलस म्हणतात. यांत फक्त उलटी व जुलाब हीं नसतात.

अत्यर्थदुष्टास्तु दोषा दुष्टामबद्धखाः ।
यांतास्तिर्यक्तनुं सर्वां दंडवत्स्तंभयंति चेत् ॥ १२ ॥

दंडकालसकं नाम तं त्यजेदाशुकारिणम् ।

दोष अतिशय कुपित झाले म्हणजे ते दुष्ट आमानें स्रोतें बंद करून सर्वांग एखाद्या दंडाप्रमाणें ताठ करितात; यास दंडकालस म्हणतात. हा सत्वर प्राणहरण करणारा आहे, करितां याची चिकित्सा करूं नये.

विरुद्धाध्यशनाजीर्णशीलिनो विषलक्षणम् ॥ १३ ॥
आमदोषं महाघोरं वर्जयेद्विषसंज्ञकम् ।
विषरूपाशुकारित्वाद्विरुद्धोपक्रमत्वतः ॥ १४ ॥

ज्यास विरुद्ध भोजनाची, जेवणावर पुन्हा जेवण्याची व अजीर्णाची संवय असते, त्यास आमविषसंज्ञक महाभयंकर आमदोष उत्पन्न होतो. हा विषरूप व त्वरित प्राण घेणारा असल्यानें आणि त्याची चिकित्सा परस्परविरुद्ध[1] करावी लागत असल्यामुळें वैद्यानें यावर औषध देऊं नये.

अथाऽममलसीभूतं साध्यं त्वरितमुल्लिखेत् ।
पीत्वा सोग्रापटुफलं वार्युष्णं योजयेत्ततः ॥ १५ ॥
स्वेदनं फलवर्तिं च मलवातानुलोमनीम् ।
नाम्यमानानि चांगानि भृशं स्विन्नानि वेष्टयेत् ॥ १६ ॥

आम दोष स्तब्ध असून साध्य असल्यास ताबडतोब वांतिद्वारें पाडून टाकावा. वेखंड, सैंधव व गेळफळ यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर दिल्यानें वांति होते. नंतर पोट शेकून, मलवायूचें अनुलोमन करणारी औषधी वात गुदांत घालावी. हातापायांस पेटके येऊं लागल्यास ते खूप शेकून वस्त्रानें गुंडाळावे.

विसूच्यामतिवृद्धायां पार्ष्णयोर्दाहः प्रशस्यते ।
तदहश्चोपवास्यैनं विरिक्तवदुपाचरेत् ॥ १७ ॥

पटकी फारच वाढली असल्यास रोग्याच्या टांचांना डाग द्यावा, आणि त्या दिवशीं उपास करवून रेचन घेतलेल्या रोग्याप्रमाणें त्याची खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवावी.

तीव्रार्तिरपि नाजीर्णी पिबेच्छूलघ्नमौषधम् ।
आमसन्नोऽनलो नालं पक्तुं दोषौषधाशनम् ॥ १८ ॥

---

१ आमदोष असल्यामुळें त्यावर उष्ण उपचार करणें भाग आहे. परंतु तो दोष विषरूप असल्यामुळें उष्ण उपचार न करितां शीतोपचारच करावा लागतो. अशा रीतीनें परस्परविरुद्ध चिकित्सा करावी लागते.

अजीर्णांत कितीही तीव्र शूळ होत असला तरी तो बंद करणारीं औषधें देऊं नयेत. कारण आमानें मंद झालेला अग्नि दोष, औषध व अन्न यांचें पचन करूं शकत नाहीं.

निहन्यादपि चैतेषां विभ्रमः सहसाऽतुरम्।

पचन न झाल्यानें त्यांचा कोप होऊन तीं तावडतोब रोग्याचा प्राण देखील घेतात.

जीर्णाशने तु भैषज्यं युंज्यात् स्तब्धगुरूदरे ॥ १९ ॥
दोषशेषस्य पाकार्थमग्नेः संधुक्षणाय च।

पोटांतील अन्नाचें पचन होऊन त्यांत फक्त ताठरपणा व जडपणा राहिला आहे, अशा स्थितींत शिल्लक राहिलेल्या दोषांचें पचन करण्याकरितां व अग्नि प्रदीप्त करण्याकरितां औषध द्यावें.

शांतिरामविकाराणां भवति त्वपतर्पणात् ॥ २० ॥
त्रिविधं त्रिविधे दोषे तत्समीक्ष्य प्रयोजयेत्।

आमदोष, अजीर्ण यांपासून होणाऱ्या विकारांचें उत्कृष्ट शमन लंघनानें होतें. लंघन दोषांच्या कमीजास्त प्रमाणानें तीन प्रकारचें आहे. त्याची दोषतारतम्यानुरूप योजना करावी.

तत्राऽल्पे लंघनं पथ्यं मध्ये लंघनपाचनम् ॥ २१ ॥
प्रभूते शोधनं तद्धि मूलादुन्मूलयेन्मलान्।

अल्पदोषांत फक्त उपासानेंच काम होतें. दोषांचें प्रमाण मध्यम असल्यास उपास करवून शिवाय पाचक औषधें द्यावीं. आणि दोषांचें प्रमाण फारच असल्यास वमन-विरेचनादिक दिलें पाहिजे. तें दोषांस समूळ काढून टाकितें.

एवमन्यानपि व्याधीन् स्वनिदानविपर्ययात् ॥ २२ ॥
चिकित्सेदनुबंधे तु सति हेतुविपर्ययम्।
त्यक्त्वा यथायथं वैद्यो युंज्याद्व्याधिविपर्ययम् ॥ २३ ॥

याचप्रमाणें इतर रोगांची चिकित्साही त्या त्या रोगाच्या कारणांच्या विरुद्ध उपचारांनीं करावी. याप्रमाणें कारणविरुद्ध चिकित्सा करून रोगाचें शमन न झाल्यास ही क्रिया बंद करून खुद्द रोगाच्या विरुद्ध चिकित्सा सुरू करावी.

वायुः पित्तं कफश्चेति त्रयो दोषाः समासतः ॥ ६ ॥

वायु, पित्त व कफ हे शरीरांत मुख्य तीन दोष[२] आहेत.

विकृताविकृता देहं घ्नंति ते वर्तयंति च ।

ते बिघडले असतां जीविताचा नाश करितात व स्वाभाविक स्थितींत असतां शरीरव्यापार चालवितात.

ते व्यापिनोऽपि हृन्नाभ्योरधोमध्योर्ध्वसंश्रयाः ॥ ७ ॥

ते सर्वशरीरभर पसरले आहेत. तरी बेंबीच्या खालचें ओटीपोट हें वायूचें मुख्य स्थान, हृदय व बेंबीचा मध्यभाग पित्ताचें मुख्य स्थान, आणि हृदयावरचा भाग छाती हें कफाचें मुख्य स्थान होय.

वयोऽहोरात्रिभुक्तानां तेऽन्तमध्यादिगाः क्रमात् ।

---

दंष्ट्राचिकित्सा; यास अगदवैद्यकही म्हणतात. वार्धक्य नाहींसें करून पुनः तारुण्य देणारी किंवा वार्धक्य मुळींच न येऊं देतां तारुण्य रक्षण करणारी ती जराचिकित्सा. हीस रसायनतंत्रही म्हणतात. आणि वीर्यवृद्धि करणारी ती वृषचिकित्सा. अथवा वाजीकरण.

१ रसादि सप्त धातूंना व मलांना दूषित करितात ते दोष. रक्तही एक चवथा दोष आहे, असा कित्येकांचा पक्ष आहे; व त्यासंबंधानें ते असें म्हणतात कीं, जसे वात-पित्त-कफ हे धातूंस दूषित करितात, तसेंच रक्तही करितें. वातादिकांप्रमाणें तें सर्वशरीरव्यापी असूनही यकृत् व कौळू हीं त्यांचीं मुख्य स्थानें आहेत. वातादिकांप्रमाणेंच त्याचीं लक्षणें, कार्यें, चिकित्सा वगैरे घडतात. मग त्यास चवथा दोष कां मानूं नये? परंतु हें म्हणणें असार आहे. प्रथमतः रक्त हेंच सप्तधातूंपैकीं एक मानलेलें आहे, आणि पुन्हां रक्त, वातादिकांप्रमाणें स्वतंत्रपणें धातूंस दूषित करूं शकत नाहीं किंवा स्वतःही दूषित होऊं शकत नाहीं. वायु वगैरे दोष त्यास दूषित करितात. म्हणून तें दूष्य अर्थात् दूषित होणारें आहे; दोष नव्हे. यावरही असा आक्षेप आहे कीं, वातादि दोषही एकमेकांस दूषित करितात. तेव्हां तेही दूष्यच समजावे. परंतु हेंही म्हणणें निरसार आहे. कारण, नेहमीं वातादिकच रसरक्तादि धातूंस दूषित करितात. रस–रक्त कधींही वातादिकांस दूषित करूं शकत नाहीं. यावरून धातु, दोष नसून दूष्यच आहेत हें निर्विवाद ठरतें. विसर्प वगैरे रोग रक्तज म्हटले जातात. परंतु वास्तविक रक्तस्थ वातादि दोषांच्या बिघडण्यानेंच ते उत्पन्न होतात. त्यांस रक्तजसंज्ञा घृतदग्धन्यायानें (गरम तुपानें हात पोळला असें म्हटलें म्हणजे तो तुपांतील अग्नीनें पोळला हा भावार्थ,) दिलेली आहे. शिवाय वात-पित्त-कफ-प्रकृतीच्या मनुष्याचीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्याप्रमाणें रक्तप्रकृतीच्या मनुष्याचीं कोठेंही सांगितलीं नाहींत. यावरूनही रक्त दोष नाहीं हें निष्पन्न होतें.

वय[1], दिवस, रात्र व अन्नाचा पाककाल या प्रत्येकाचे तीन तीन भाग करून, पहिल्यांत कफाचें, दुसऱ्यांत पित्ताचें व तिसऱ्यांत वायूचें प्राबल्य समजावें.

तैर्भवेद्विषमस्तीक्ष्णो मंदश्चाग्निः समैः समः ॥ ८ ॥

जठराग्नि चार प्रकारचा आहे; वाताधिक्यानें विषम, पित्ताधिक्यानें तीक्ष्ण, कफाधिक्यानें मंद आणि तिन्ही दोष सारखे असल्यास सम असतो.

कोष्ठः क्रूरो मृदुर्मध्यो मध्यः स्यात्तैः समैरपि।

वातादि दोषांच्या योगानें, जठराग्नीप्रमाणें कोठाही चार प्रकारचा आहे. वाताधिक्यानें क्रूर, पित्ताधिक्यानें मृदु, कफाधिक्यानें मध्यम आणि तिन्ही दोष सारख्या प्रमाणांत असले म्हणजे कोठाही मध्यम[2] असतो.

शुक्रार्तवस्थैर्जन्मादौ विषेणेव विषक्रमेः ॥ ९ ॥
तैश्च तिस्रः प्रकृतयो हीनमध्योत्तमाः पृथक् ।

आर्तव व वीर्य यांत असलेल्या वातादि दोषांच्या कमीजास्त प्रमाणानुरूप मनुष्याची अनुक्रमें कनिष्ठ, मध्यम व उत्तम अशी तीन प्रकारची प्रकृति उत्पन्न होते. ( दोषांच्या कमीजास्तपणासच विकृति म्हणतात. तेव्हां दोष विकृतावस्थेंत असतांना उत्पत्ति कशी होऊं शकेल, अशी शंका येईल म्हणून दृष्टांत दिला कीं, ) ज्याप्रमाणें विष, उदाहरणार्थ बचनाग, हें जात्या मारणारें असूनही त्यांत कृमि उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें गर्भांतील विकृत वात-पित्त-कफांपासून

---

१ म्हणजे बाळपणीं कफाचा जोर, तरुणपणीं पित्ताचा जोर आणि वृद्धपणीं वायूचा जोर असतो. दिवसा व रात्रीं ६ ते १० वाजेपर्यंत कफाधिक्य; १० ते २ पर्यंत पित्ताधिक्य व २ ते ६ पर्यंत वाताधिक्य असतें. भोजन केल्यापासून तें जिरून पुन्हां भूक लागेपर्यंत जो वेळ जातो त्यांत तीन अवस्था होतात. पहिल्या अवस्थेंत जेवल्याबरोबर अन्नाचा मधुरीभाव होतो व अन्न फेसाळ होतें; ही कफाची क्रिया. दुसरी अवस्था अन्नाच्या विदाहाची, अर्थात् पचण्याची; यांत पित्ताचा जोर असतो. तिसऱ्या अवस्थेंत पचनक्रिया बहुतेक संपलेली असते. त्या वेळीं वायूचा जोर असतो.

२ कफाच्या आधिक्यामुळें जर कोष्ठ मध्यम असेल, तर त्या मनुष्याला वमन चांगलें लागू होतें; आणि कफ कमी असल्यास विरेचन चांगलें लागू होतें.

काले सात्म्यं शुचि हितं स्निग्धोष्णं लघु तन्मनाः ॥ ३५ ॥
षड्रसं मधुरप्रायं नातिद्रुतविलंबितम् ।
स्नातः क्षुद्वान् विविक्तस्थो धौतपादकराननः ॥ ३६ ॥
तर्पयित्वा पितॄन् देवानतिथीन् बालकान्गुरून् ।
प्रत्यवेक्ष्य तिरश्चोऽपि प्रतिपन्नपरिग्रहान् ॥ ३७ ॥
समीक्ष्य सम्यगात्मानमनिंदन्नब्रुवन् द्रवम् ।
इष्टमिष्टैः सहाश्नीयाच्छुचिभक्तजनाहृतम् ॥ ३८ ॥

स्नान करून; हात, पाय व तोंड धुऊन; पितर, देव, अतिथि, मुलें व गुरू यांस तृप्त करून; घरांतील गाय, बैल, घोडा, वगैरे जनावरांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करून, आपल्या प्रकृतीचा विचार करून, योग्यकाळीं, भूक लागल्यावर, एकांत स्थानीं, आपल्या इष्टमित्रांसह, आपल्यावर प्रीति करणाऱ्या मनुष्यांनीं शुचिर्भूत होऊन वाढलेलें, आपल्या प्रकृतीस मानवणारें, आवडतें, पवित्र, स्निग्ध, ऊन, हलकें, विशेष पातळ पदार्थांनीं युक्त व मधुरप्रधान षड्रसयुक्त असें अन्न, न बोलतां, दोष न काढतां, फक्त खाण्यावर लक्ष्य ठेवून, फार घाईनें नाहीं व फार सावकाशही नाहीं अशा तऱ्हेनें खावें.

भोजनं तृणकेशादिजुष्टमुष्णीकृतं पुनः ।
शाकावरान्नभूयिष्ठमत्युष्णलवणं त्यजेत् ॥ ३९ ॥

केरकचरा, केंस वगैरे पडलेलें; निवल्यावर पुन्हा ऊन केलेलें; फार भाज्या व उडीद वगैरे कडधान्यांनीं युक्त आणि फार ऊन व फार खारट असें अन्न खाऊं नये.

किलाटदधिकूर्चीकाक्षारशुक्तामकमूलकम् ।
कृशशुष्कवराहाविगोमत्स्यमहिषामिषम् ॥ ४० ॥
माषनिष्पावशालूकबिसपिष्टविरूढकम् ।
शुष्कशाकानि यवकान् फाणितं च न शीलयेत् ॥ ४१ ॥

किलाट, कूर्चिका वगैरे ताकाचे पदार्थ; दहीं, क्षार, शुक्त, हिरवे मुळे, रोडावलेल्या जनावराचें व सुकलेलें मांस; डुकर, मेंढा, गाय, मासे व म्हैस यांचें मांस; उडीद, पावटे, कमळकंद, कमळाचीं भिसीं, पिठाचे पदार्थ, मोड आलेलें धान्य, सुक्या भाज्या, यवळसाळी व काकवी या पदार्थांचें सतत सेवन करूं नये.

शीलयेच्छालिगोधूमयवषष्टिकजांगलम् ॥ ४२ ॥

पथ्यामलकमृद्वीकापटोलीमुद्गशर्कराः ।
घृतदिव्योदकक्षीरक्षौद्रदाडिमसैंधवम् ॥ ४३ ॥
त्रिफलां मधुसर्पिर्भ्यां निशि नेत्रबलाय च ।
स्वास्थ्यानुवृत्तिकृद्यच्च रोगोच्छेदकरं च यत् ॥ ४४ ॥

साळींचे तांदूळ, गहूं, जव, साठेसाळी, जांगल जनावरांचें मांस, हिरडा, आंवळा, द्राक्षें, परवर, मूग, साखर, तूप, पावसाचें पाणी, दूध, मध, डाळिंब व सैंधव यांचें नेहमीं सेवन करावें. रात्रीं दृष्टि तेजस्वी होण्याकरितां मध व तूप यांशीं त्रिफळाचूर्ण खावें. याशिवाय आरोग्यरक्षण करणारीं व रोगांचा नाश करणारीं अथवा रोग न होऊं देणारीं किंवा त्यांस बीजावस्थेंतच नाहींशीं करणारीं अशीं जीं कांहीं द्रव्यें असतील तींही नित्य सेवन करावीं.

बिसेक्षुमोचचोचाम्रमोदकोत्कारिकादिकम् ।
अद्याद्द्रव्यं गुरु स्निग्धं स्वादु मंदं स्थिरं पुरः ॥ ४५ ॥
विपरीतमतश्चांते मध्येऽम्ललवणोत्कटम् ।

जेवतांना भिशीं, उंस, केळीं, फणस, आंबा, लाडू, पुऱ्या वगैरे जड, स्निग्ध, गोड, उशिरां पचणारे व दाट पदार्थ अगोदर खावे. याच्या उलट गुणांचे पदार्थ शेवटीं खावे. आणि आंबट व मिठाचे पदार्थ मध्यें खावे.

अन्नेन कुक्षेर्द्वावंशौ पानेनैकं प्रपूरयेत् ॥ ४६ ॥
आश्रयं पवनादीनां चतुर्थमवशेषयेत् ।

पोटाचे चार भाग करून त्यांपैकीं दोन भाग अन्नानें भरावे, एक पाण्यानें भरावा आणि चवथा वायु वगैरे दोषांच्या संचाराकरितां रिकामा ठेवावा.

अनुपानं हिमं वारि यवगोधूमयोर्हितम् ॥ ४७ ॥
दध्नि मद्ये विषे क्षौद्रे

जव व गहू यांच्या पदार्थांवर; तसेंच दहीं, मद्य, विष व मध यांवर थंड पाणी पिणें हितकर आहे.

कोष्णं पिष्टमयेषु तु ।

पिठाच्या पदार्थांवर कोमट पाणी प्यावें.

शाकमुद्गादिविकृतौ मस्तुतक्राम्लकांजिकम् ॥ ४८ ॥

भाज्या आणि मूग वगैरे डाळींचे पदार्थ यांवर दह्याची निवळ, ताक व आंबट कांजी प्यावी.

सुरा कृशानां पुष्ट्यर्थं स्थूलानां तु मधूदकम् ।

कृश मनुष्यांनीं पुष्ट होण्याकरितां सुरा प्यावी; आणि स्थूल असतील त्यांनीं कृश होण्याकरितां मद्य व पाणी मिळवून प्यावें.

शोषे मांसरसः

क्षयांत मांसरस प्यावा.

मद्यं मांसे स्वल्पे च पावके ॥ ४९ ॥

मांसावर व अग्निमांद्यांत मद्य प्यावें.

व्याध्यौषधाध्वभाष्यस्त्रीलंघनातपकर्मभिः ।
क्षीणे वृद्धे च बाले च पयः पथ्यं यथाऽमृतम् ॥ ५० ॥

रोग, औषध, मार्ग चालणें, फार व मोठ्यानें बोलणें, मैथुन, उपास, ऊन व परिश्रम यांच्या योगानें क्षीण झालेल्यास, म्हातान्यास व लहान मुलांस दूध हें अमृताप्रमाणें गुणदायक आहे.

विपरीतं यदन्नस्य गुणैः स्यादविरोधि च ।
अनुपानं समासेन सर्वदा तत्प्रशस्यते ॥ ५१ ॥

थोडक्यांत सांगायचें म्हणजे गुणानें अन्नाच्या विपरीत असूनही जें त्याच्याशीं संयोगानें विरुद्ध होत नाहीं, असें अनुपान नेहमीं प्रशस्त समजावें.

अनुपानं करोत्यूर्जां तृप्तिं व्याप्तिं दृढांगताम् ।
अन्नसंघातशैथिल्यविक्लित्तिजरणानि च ॥ ५२ ॥

अनुपानानें मनास उल्हास, तृप्ति, अन्नाचा सर्व शरीरभर फैलाव, शरीराची दृढता, घट्ट अन्नाचें शिथिलीकरण, शुष्काचें द्रवीकरण व पचन या गोष्टी होतात.

नोर्ध्वजत्रुगदश्वासकासोरःक्षतपीनसे ।
गीतभाष्यप्रसंगे च स्वरभेदे च तद्धितम् ॥ ५३ ॥

ऊर्ध्वांगरोग, दमा, खोकला, उरःक्षत, पीनस, सतत गायन किंवा भाषण केल्यावर, व स्वरभेद यांत अनुपान हितकर नाहीं.

प्रक्लिन्नदेहमेहाक्षिगलरोगव्रणातुराः ।
पानं त्यजेयुः

ज्यांच्या शरीरांत क्लेद फार आहे व ज्यांस प्रमेह, नेत्ररोग, गळ्याचे रोग व व्रण झाले असतील, त्यांनीं पाणी देखील पिऊं नये.

सर्वश्च भाष्याध्वशयनं त्यजेत् ।
पीत्वा भुक्त्वाऽतपं वह्निं यानं प्लवनवाहनम् ॥ ५४ ॥

खाण्यापिण्यावर बोलणें, चालणें, निजणें, उन्हांत जाणें, शेक घेणें, गाडींत बसणें, पोहणें व घोड्यावर बसणें वगैरे गोष्टी सर्वांनाच वर्ज्य आहेत.

प्रसृष्टे विण्मूत्रे हृदि सुविमले दोषे स्वपथगे
विशुद्धे चोद्गारे क्षुदुपगमने वातेऽनुसरति ।
तथाऽग्नावुद्रिक्ते विशदकरणे देहे च सुलघौ
प्रयुंजीताहारं विधिनियमितः कालः स हि मतः ॥ ५५ ॥

मलमूत्रांची प्रवृत्ति आहे, हृदय निर्मल आहे, दोष आपापल्या मार्गानें संचार करीत आहेत, ढेंकर शुद्ध येत आहे, भूक लागली आहे, वायु आपल्या मार्गानें जात आहे, अग्नि प्रदीप्त आहे, इंद्रियें निर्मळ आहेत आणि शरीर हलकें आहे, अशा स्थितींत भोजन करावें.ह्याच काळ भोजनाकरितां विहित मानला आहे.

---

## अध्याय नववा.

अथातो द्रव्यादिविज्ञानीयमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां द्रव्यादिकांच्या वर्णनाचा अध्याय सांगतों.

द्रव्यमेव रसादीनां श्रेष्ठं ते हि तदाश्रयाः ।
पंचभूतात्मकं तत्तु

रसवीर्यविपाकांपेक्षां द्रव्यच श्रेष्ठ आहे. कारण रसवीर्यादिक त्याच्याच आश्रयानें रहातात. तें द्रव्य पंचभूतात्मक आहे.

क्ष्मामधिष्ठाय जायते ॥ १ ॥
अंबुयोन्यग्निपवननभसां समवायतः ।
तन्निर्वृत्तिर्विशेषश्च व्यपदेशस्तु भूयसा ॥ २ ॥

पृथ्वी हा त्याचा मूळ आधार आहे. पाणी द्रव्योत्पत्तीला मदत करितें; अग्नि, वायु व आकाश यांच्या योगानें द्रव्य तयार होतें;

व त्याचे निरनिराळे भेद होतात. (अशा रीतीनें प्रत्येक द्रव्याच्या उत्पत्तीला जरी पंचमहाभूतांची मदत लागते, तरी) ज्या भूताचा अंश पुष्कळ प्रमाणानें असतो, तें भूत तें द्रव्य उत्पन्न करितें, असें म्हटलें जातें.

तस्मान्नैकरसं द्रव्यं भूतसंघातसंभवात् ।
नैकदोषास्ततो रोगाः

पंचभूतांच्या संयोगापासून सर्व द्रव्यांची उत्पत्ति होत असल्यामुळें कोणतेंही द्रव्य एकरसात्मक नसतें; आणि म्हणूनच रोगही एकदोषात्मक नसतात.

तत्र व्यक्तो रसः स्मृतः ॥ ३ ॥

कोणताही पदार्थ तोंडांत टाकल्याबरोबर जो स्वाद व्यक्त होतो, त्यास रस म्हणतात.

अव्यक्तोऽनुरसः किंचिदंते व्यक्तोऽपि चेष्यते ।

तोच रस अस्पष्ट असेल किंवा पदार्थ तोंडांत घातल्यानंतर बऱ्याच वेळानें मागून किंचित् व्यक्त होत असेल, तर त्यास अनुरस म्हणतात.

गुर्वादयो गुणा द्रव्ये पृथिव्यादौ रसाश्रये ॥ ४ ॥
रसेषु व्यपदिश्यंते साहचर्योपचारतः ।

गुरु, लघु वगैरे गुण तत्वतः पृथिव्यादि महाभूतांपासून उत्पन्न झालेल्या, व रसाला सुद्धां आश्रयभूत असलेल्या द्रव्यांत असतात; असें असूनें (मधुर रस जड, व आंबट रस हलका, अशा तऱ्हेनें) रसानुरूप जो गुणांचा निर्देश करितात, तो फक्त रस व द्रव्य हीं दोन्ही एकत्र रहात असल्यामुळें होय.

तत्र द्रव्यं गुरुस्थूलस्थिरगंधगुणोल्बणम् ॥ ५ ॥
पार्थिवं गौरवस्थैर्यसंघातोपचयावहम् ।

ज्या द्रव्यांत जडपणा, स्थूलत्व, अचलत्व व गंध, हे गुण विशेष असतात तें पार्थिव समजावें. या गुणाच्या योगानें त्या द्रव्यांत जडपणा, घनत्व, कठिणपणा व स्थूलपणा हे धर्म येतात.

द्रवशीतगुरुस्निग्धमंदसांद्रगुणोल्बणम् ॥ ६ ॥
आप्यं स्नेहनविष्यंदक्लेदप्रल्हादबंधकृत् ।

पातळ, थंड, जड, गुळगुळीत, मंद व ओलसर हे गुण ज्यांत प्रधान असतील, तें आप्य द्रव्य समजावें. त्याच्या योगानें स्निग्धता, स्राव, ओलसरपणा, आल्हाद व संधान ( जोडणें ) हे धर्म उत्पन्न होतात.

रूक्षतीक्ष्णोष्णविशदसूक्ष्मरूपगुणोल्बणम् ॥ ७ ॥
आग्नेयं दाहभावर्णप्रकाशपचनात्मकम् ।

रूक्षता, तीक्ष्णता, उष्णता, स्वच्छता, सूक्ष्मत्व व रूपवत्व हे गुण ज्यांत प्रमुखत्वानें असतील तें आग्नेय द्रव्य जाणावें. यांत दाह, कांति, वर्ण, प्रकाश व पचन हे धर्म आहेत.

वायव्यं रूक्षविशदलघुस्पर्शगुणोल्बणम् ॥ ८ ॥
रौक्ष्यलाघववैशद्यविचारग्लानिकारकम् ।

रूक्षता, स्वच्छता, हलकेपणा व स्पर्शवत्व हे गुण प्रधान असून जें रूक्षता, हलकेपणा, स्वच्छता, विचार व ग्लानि उत्पन्न करितें, तें वायवीय द्रव्य जाणावें.

नाभसं सूक्ष्मविशदलघुशब्दगुणोल्बणम् ॥ ९ ॥
सौषिर्यलाघवकरम्

सूक्ष्मता, स्वच्छता, हलकेपणा व शब्दोत्पादकता हे गुण मुख्य असून जें पोकळी व हलकेपणा उत्पन्न करितें, तें आकाशात्मक द्रव्य जाणावें.

जगत्येवमनौषधम् ।
न किंचिद्विद्यते द्रव्यं वशान्नानार्थयोगयोः ॥ १० ॥

सर्व पदार्थांत पंचमहाभूतांचे गुण असल्यामुळें औषध नाहीं असा जगांत पदार्थच नाहीं. निरनिराळ्या प्रयोजनाकरितां व निरनिराळ्या योजनेनें उपयोग केला असतां प्रत्येक पदार्थ औषध आहे.

द्रव्यमूर्ध्वगमं तत्र प्रायोऽग्निपवनोत्कटम् ।
अधोगामि च भूयिष्ठं भूमितोयगुणाधिकम् ॥ ११ ॥

ऊर्ध्वगामी पदार्थांत ( वांति करणारें गेळफळ वगैरे ) बहुतकरून अग्नि व वायु यांचें प्राधान्य असतें. अधोगामी ( रेचक ) पदार्थांत बहुशः पृथ्वी व उदक यांचें प्राधान्य असतें.

इति द्रव्यं रसान्भेदैरुत्तरत्रोपदेक्ष्यते ।

येथपर्यंत द्रव्यांचें वर्णन केलें. रसांचे भेद पुढील अध्यायांत ांगणार आहों.

वीर्यं पुनर्वदंत्येके गुरुस्निग्धहिमं मृदु ॥ १२ ॥
लघुरूक्षोष्णतीक्ष्णं च तदेवं मतमष्टधा ।

वीर्य कित्येकांच्या मतें जड, स्निग्ध, थंड, मृदु, हलकें, रूक्ष, ़ष्ण व तीक्ष्ण असें आठ प्रकारचें आहे.

चरकस्त्वाह वीर्यं तद्येन या क्रियते क्रिया ॥ १३ ॥
नावीर्यं कुरुते किंचित्सर्वा वीर्यकृता हि सा ।
गुर्वादिष्वेव वीर्याख्या तेनान्वर्थेति वर्ण्यते ॥ १४ ॥
समग्रगुणसारेषु शक्त्युत्कर्षविवर्तिषु ।
व्यवहाराय मुख्यत्वाद्बह्वग्रग्रहणादपि ॥ १५ ॥
अतश्च विपरीतत्वात्संभवंत्यपि नैव सा ।
विवक्ष्यते रसाद्येषु वीर्यं गुर्वादयो ह्यतः ॥ १६ ॥

चरकाचार्यांचें तर असें मत आहे कीं, ज्याच्या योगानें क्रिया घडते तें वीर्य. वीर्यावांचून कांहीं होऊं शकत नाहीं. सर्व गोष्टी वीर्यानेंच घडतात. म्हणून उपरोक्त गुर्वादि गुणांनाच वीर्य ही अन्वर्थक संज्ञा प्राप्त होते. कारण पदार्थांतील एकंदर गुणांमध्यें यांच्याच अंगीं चिरस्थायित्व व शक्त्युत्कर्ष आढळतात. शिवाय पदार्थांचे गुणधर्म वगैरे सांगण्यांत यांचाच विशेष उपयोग होतो. तसेंच एकंदर गुणसमूहांत विशेषतः व पहिल्यानें यांचाच नामनिर्देश होतो. रसादिकांची स्थिति याच्या उलट असल्यामुळें त्यांस वीर्य ही संज्ञा एक प्रकारें प्राप्त होत असूनही आम्ही ती स्वीकारीत नाहीं; आणि गुर्वादि गुणांसच वीर्य ही संज्ञा कायम करितों.

उष्णं शीतं द्विधैवाऽन्ये वीर्यमाचक्षतेऽपि च ।

इतर कांहीं आचार्यांच्या मतें उष्ण व शीत अशीं दोनच वीर्यें मानलीं असतां काम भागतें.

नानात्मकमपि द्रव्यमग्नीषोमौ महाबलौ ॥ १७ ॥
व्यक्ताव्यक्तं जगदिव नातिक्रामति जातुचित् ।

कारण जगांत जरी नाना प्रकारचे (स्थावर-जंगम, जड-चेतन) पदार्थ आहेत, तरी त्यांपैकीं एकही पदार्थ महाबलवान् असे अग्नि व सोम यांस सोडून नाहीं. जसें हें चराचर जगत् व्यक्त व

अव्यक्त पदार्थांनीं भरलेलें आहे, तद्वत् सर्व पदार्थ अग्नीषोमात्मकच आहेत.

तत्रोष्णं भ्रमतृड्ग्लानिस्वेददाहाशुपाकिताः ॥ १८ ॥
शमं च वातकफयोः करोति

त्यांपैकीं उष्णवीर्य द्रव्य, भ्रम, तृषा, ग्लानि, घाम, दाह, शीघ्रपचन आणि वात व कफ यांचें शमन करितें.

शिशिरं पुनः ।
ह्लादनं जीवनं स्तंभं प्रसादं रक्तपित्तयोः ॥ १९ ॥

शीतवीर्य पदार्थ आल्हादकारक, उत्साह देणारे, स्तंभक आणि रक्तपित्तशोधक असतात.

जाठरेणाऽग्निना योगाद्यदुदेति रसांतरम् ।
रसानां परिणामांते स विपाक इति स्मृतः ॥ २० ॥

जठराग्नीच्या संयोगानें खाल्लेल्या रसांचा परिपाक होऊन शेवटीं जो एक निराळा रस उत्पन्न होतो, त्यास विपाक म्हणतात.

स्वादुः पटुश्च मधुरमम्लोऽम्लं पच्यते रसः ।
तिक्तोषणकषायाणां विपाकः प्रायशः कटुः ॥ २१ ॥
रसैरसौ तुल्यफलः

गोड व खारट पदार्थांचा विपाक बहुतकरून गोड, आंबटांचा आंबट; आणि कडू, तिखट व तुरट यांचा तिखट होतो. विपाकाचे गुण रसाप्रमाणेंच आहेत.

तत्र द्रव्यं शुभाशुभम् ।
किंचिद्रसेन कुरुते कर्म पाकेन वाऽपरम् ॥ २२ ॥
गुणांतरेण वीर्येण प्रभावेणैव किंचन ।

एखादें द्रव्य आपल्या आंगच्या रसानें बरी वाईट क्रिया करितें, एखादें विपाकानें, एखादें गुणानें, एखादें वीर्यानें व एखादें प्रभावानें करितें.

यद्यद्द्रव्ये रसादीनां बलवत्त्वेन वर्तते ॥ २३ ॥
अभिभूयेतरांस्तत्तत्कारणत्वं प्रपद्यते ।

पदार्थांतील रस, वीर्य, विपाक व प्रभाव यांपैकीं ज्याचा जोर अधिक असेल, तो गुण इतरांस मागें सारून आपलेंच काम करितो.

विरुद्धगुणसंयोगे भूयसाऽल्पं हि जीयते ॥ २४ ॥

विरुद्धगुणी पदार्थांचा संयोग झाला असतां जो गुण अधिक असेल तो विरोधी दुर्बल गुणांचा पराभव करितो.

**रसं विपाकस्तौ वीर्यं प्रभावस्तान्व्यपोहति।**
**बलसाम्ये रसादीनामिति नैसर्गिकं बलम् ॥ २५ ॥**

रसवीर्यादिकांचें सारखें प्रमाण असल्यास स्वभावतःच विपाक रसाचा, वीर्य विपाकाचा, आणि प्रभाव वीर्याचा पराभव करितो.

**रसादिसाम्ये यत्कर्म विशिष्टं तत्प्रभावजम्।**

एकसारखे रसवीर्यविपाक असलेल्या निरानिराळ्या द्रव्यांच्या क्रियेंत जो फरक असतो, त्याचें कारण प्रभाव होय.

**दंती रसाद्यैस्तुल्याऽपि चित्रकस्य विरेचनी ॥ २६ ॥**
**मधुकस्य च मृद्वीका घृतं क्षीरस्य दीपनम्।**

दंती व चित्रक यांचे रसवीर्यविपाक सारखेच आहेत; परंतु दंतीमूळ रेचक आहे, व चित्रक रेचक नाहीं. तसेंच ज्येष्ठमध व द्राक्षें या दोहोंचे रसवीर्यविपाक सारखेच आहेत; परंतु द्राक्षें रेचक आहेत, व ज्येष्ठमध तसा नाहीं. तूप व दूध रसवीर्य-विपाकांनीं समान आहेत, परंतु तुपाप्रमाणें दूध दीपक नाहीं. (हा जो गुणभेद तो प्रभावनिमित्तक होय.)

**इति सामान्यतः कर्म द्रव्यादीनां पुनश्च तत् ॥ २७ ॥**
**विचित्रप्रत्ययारब्धद्रव्यभेदेन भिद्यते।**

हीं पदार्थांचीं सामान्य कर्में सांगितलीं. परंतु कांहीं द्रव्यांचा[1] प्रादुर्भाव अथवा रचना कांहीं विचित्र रीतीनें झाली असल्यामुळें त्यांच्या कर्मांत फरक पडतो.

**स्वादुर्गुरुश्च गोधूमो वातजिद्वातकृद्यवः ॥ २८ ॥**
**उष्णा मत्स्याः पयः शीतं कटुः सिंहो न शूकरः।**

---

१ कांहीं पदार्थ असे असतात कीं, त्यांच्या घटकावयवांचा प्रादुर्भाव निराळ्या महाभूतापासून झालेला असतो, आणि रसवीर्यादिकांची उत्पत्ति निराळ्या महाभूतापासून झालेली असते. असे पदार्थ आपल्या रसवीर्यादिकांच्या अनुरूप कर्में करीत नाहींत. यांस विचित्रप्रत्ययारब्ध म्हणतात. आणि ज्या पदार्थांत द्रव्य व रसादिकांची उत्पत्ति समान तत्वांपासून झालेली असते, त्यांस समानप्रत्ययारब्ध म्हणतात, आणि त्यांचीं कर्में रसादिकांच्या अनुरूप घडतात.

उदाहरणार्थ गहू व जव घ्या. दोन्ही गोड व जड आहेत. परंतु गहू मधुर रसाचें जें वातघ्न कर्म करितात, तें त्याच गुणाचे जव करूं शकत नाहींत. मासे व दूध याच गुणाचे आहेत. परंतु मासे उष्णवीर्य व दूध शीतवीर्य आहे. सिंह व डुक्कर या दोहोंचें मांस गोड व जड आहे. परंतु सिंहाच्या मांसाचा विपाक तिखट होतो आणि डुकराच्या मांसाचा गोड होतो.

---

## अध्याय दहावा.

अथाऽतो रसभेदीयमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां रसांचे निरनिराळे भेद सांगतों.

क्ष्मांभोऽग्निक्ष्मांऽबुतेजःखवाय्यग्न्यनिलगोऽनिलैः ।
द्वयोल्बणैः क्रमाद्भूतैर्मधुरादिरसोद्भवः ॥ १ ॥

मधुर, आंबट, खारट, कडू, तिखट व तुरट हे सहा रसही (द्रव्याप्रमाणें) पांचभौतिकच आहेत. परंतु प्रत्येक रसांत दोन दोन महाभूतांचें प्रमाण अधिक असतें. पृथ्वी व जल, अग्नि व पृथ्वी, जल व अग्नि, आकाश व वायु, अग्नि व वायु आणि पृथ्वी व वायु या सहा जोड्यांच्या अधिकांशानें वरील सहा रस उत्पन्न होतात.

तेषां विद्याद्रसं स्वादुं यो वक्त्रमनुलिंपति ।
आस्वाद्यमानो देहस्य ह्लादनोऽक्षप्रसादनः ॥ २ ॥
प्रियः पिपीलिकादीनाम्

जो खातांना तोंडास चिकटतो, शरीरास आल्हाद व इंद्रियांस प्रसन्नता देतो, आणि जो मुंग्या वगैरे प्राण्यांना आवडतो, तो मधुर रस जाणावा.

अम्लः क्षालयते मुखम् ।
हर्षणो रोमदंतानामक्षिभ्रुवनिकोचनः ॥ ३ ॥

आंबट रसानें तोंडांस पाणी सुटतें, दांत शिवशिवतात, अंगावर शहारे येतात; आणि डोळे व भिवया संकोच पावतात.

लवणः स्यंदयत्यास्यं कपोलगलदाहकृत् ।

लवण रसानें तोंडास पाणी सुटतें आणि गाल व गळा यांचा दाह होतो.

तिक्तो विशदयत्यास्यं रसनं प्रतिहंति च ॥ ४ ॥

कडू रसानें तोंडाचा बुळबुळीतपणा जातो आणि थोडा वेळ पावेतों इतर रसांचें ज्ञान होत नाहीं.

उद्वेजयति जिव्हाग्रं कुर्वंश्चिमिच्चिमां कटुः।
स्त्रावयत्यक्षिनासास्यं कपोलौ दहतीव च ॥ ५ ॥

तिखट रसानें जिभेच्या टोंकाची आग होते, चुणचुण होते, नाक, डोळे व तोंड यांतून स्त्राव होतो, आणि गालांची आग होते.

कषायो जडयेज्जिह्वां कंठस्त्रोतोविबंधकृत् ।

तुरट रसानें जीभ जड होते, आणि गळा व स्त्रोत यांचा अवरोध होतो.

रसानामिति रूपाणि

हीं रसांचीं लक्षणें सांगितलीं.

कर्माणि

आतां कर्में सांगतों.

मधुरो रसः ॥ ६ ॥
आजन्मसात्म्यात्कुरुते धातूनां प्रबलं बलम् ।
बालवृद्धक्षतक्षीणवर्णकेशेंद्रियौजसाम् ॥ ७ ॥
प्रशस्तो बृंहणः कंठ्यः स्तन्यसंधानकृद्गुरुः ।
आयुष्यो जीवनः स्निग्धः पित्तानिलविषाऽपहः ॥ ८ ॥
कुरुतेऽत्युपयोगेन स मेदःकफजान् गदान् ।
स्थौल्याग्निसादसंन्यासमेहगंडार्बुदादिकान् ॥ ९ ॥

मधुर रसाची जन्मापासून संवय असल्यामुळें तो धातूंस खूप बलिष्ठ करितो. मुलें, म्हातारे, उरःक्षती, क्षयी; कांति, केंस, इंद्रियें व ओज यांस हितकर आहे. तो पौष्टिक, कंठास हितकर, स्त्रियांचें दूध वाढविणारा, कोठें भेग पडली असल्यास कातडी जोडणारा, जड, आयुर्वर्धक, आरोग्यरक्षक, स्निग्ध; पित्त, वायु व विष यांचा नाशक, असा आहे. त्याचा फार उपयोग केला असतां स्थूलता, अग्निमांद्य, संन्यास (मूर्च्छाभेद,) प्रमेह, गळवें, अर्बुदें वगैरे कफज व मेदोजन्य रोग उत्पन्न होतात.

अम्लोऽग्निदीप्तिकृत्स्निग्धो हृद्यः पाचनरोचनः ।
उष्णवीर्यो हिमस्पर्शः प्रीणनो भेदनो लघुः ॥ १० ॥
करोति कफपित्तास्रं मूढवातानुलोमनम् ।
सोऽत्यभ्यस्तस्तनोः कुर्याच्छैथिल्यं तिमिरं भ्रमम् ॥११॥
कंडुपांडुत्ववीसर्पशोफविस्फोटतृड्ज्वरान् ।

आंबट रस अग्निदीपक, स्निग्ध, मनःप्रिय, पाचक, रोचक, उष्णवीर्य, शीतस्पर्श, तृप्तिकर, मळ पातळ करणारा, हलका; कफ, पित्त व रक्त यांस वाढविणारा, आणि उन्मार्गगामी वायूस रस्त्यावर आणणारा आहे. त्याचा अतिशय उपयोग केल्यास देहशैथिल्य, तिमिरनामक नेत्ररोग, भोंवळ, कंड, पांडुरकेपणा, विसर्प, सूज, फोड, तहान व ताप हे उत्पन्न होतात.

लवणः स्तंभसंघातबंधविध्मापनोऽग्निकृत् ॥ १२ ॥
स्नेहनः स्वेदनस्तीक्ष्णो रोचनश्छेदभेदकृत् ।
सोऽतियुक्तोऽस्रपवनं खलतिं पलितं वलिम् ॥ १३ ॥
तृट्कुष्ठविषवीसर्पान् जनयेत्क्षपयेद्बलम् ।

खारट रस स्तंभ ( ताठरपणा ), काठिणपणा, आणि स्रोतांचा अवरोध यांचा नाश करणारा, अग्निदीपक, नरमपणा आणणारा, स्वेदोत्पादक, तीक्ष्ण, रुचकर आणि छेदन व भेदन ( व्रणादिकांचें ) करणारा आहे. त्याच्या अतिशय उपयोगानें वातरक्त, टक्कल, केंस पिकणें, अंगावर सुरकुत्या पडणें, तहान, कुष्ट, विषासारखे विकार, विसर्प इत्यादि विकार उत्पन्न होऊन शक्तिपात होतो.

तिक्तः स्वयमरोचिष्णुररुचिं कृमितृड्विषम् ॥ १४ ॥
कुष्ठमूर्च्छाज्वरोत्क्लेशदाहपित्तकफान् जयेत् ।
क्लेदमेदोवसामज्जशकृन्मूत्रोपशोषणः ॥ १५ ॥
लघुर्मेध्यो हिमो रूक्षः स्तन्यकंठविशोधनः ।
धातुक्षयाऽनिलव्याधीनतियोगात्करोति सः ॥ १६ ॥

कडू रस स्वतः चवीनें वाईट असूनही तोंडास रुचि देतो; आणि कृमि, तृषा, विषदोष, कुष्ठ, मूर्च्छा, ज्वर, उम्हासे, दाह, पित्त व कफ यांस नाहींसें करितो. तो शरीरांतील क्लेद, मेद, वसा, मज्जा, मल, मूत्र यांचें शोषण करणारा, हलका, थंड, रूक्ष आणि

दूध व कंठ यांची शुद्धि करणारा आहे. याच्या अतिसेवनानें धातुक्षय व वातरोग उत्पन्न होतात.

कटुर्गलामयोदर्दकुष्ठालसकशोफजित्।
व्रणावसादनस्नेहमेदःक्लेदोपशोषणः ॥ १७ ॥
दीपनः पाचनो रुच्यः शोधनोऽन्नस्य शोषणः।
छिनत्ति बंधान् स्रोतांसि विवृणोति कफापहः ॥ १८ ॥
कुरुते सोऽतियोगेन तृष्णां शुक्रबलक्षयम्।
मूर्च्छामाकुंचनं कंपं कटिपृष्ठादिषु व्यथाम् ॥ १९ ॥

तिखट रस गळ्याचे रोग, अंगावर उठणाऱ्या गांधी, कुष्ठ, अलसक व सूज यांस नष्ट करणारा, जखम भरून आणणारा; स्नेह, मेद, क्लेद यांचें शोषण करणारा, दीपक, पाचक, रुचकर, शोधक व अन्नाचें शोषण करणारा, बंध नाहींसे करणारा, स्रोतोमार्ग मोकळे करणारा आणि कफनाशक आहे. याच्या आतिसेवनानें तहान, वीर्य व शक्ति यांचा क्षय, मूर्च्छा, शिरासंकोच, कंप आणि कंबर, पाठ वगैरे अवयवांत वेदना, हे विकार उत्पन्न होतात.

कषायः पित्तकफहा गुरुरस्रविशोधनः।
पीडनो रोपणः शीतः क्लेदमेदोविशोषणः ॥ २० ॥
आमसंस्तंभनो ग्राही रूक्षोऽतित्वक्प्रसादनः।
करोति शीलितः सोऽतिविष्टंभाध्मानहृद्रुजः ॥ २१ ॥
तृट्कार्श्यपौरुषभ्रंशस्रोतोरोधमलग्रहान्।

तुरट रस पित्तकफहारक, जड, रक्तशुद्धिकर, लेप लावण्यास व जखम भरून आणण्यास उपयोगी, थंड, क्लेद व मेद यांचें शोषण करणारा, आमाचा अवष्टंभ करणारा, स्तंभक, रूक्ष आणि त्वचेस फारच निर्मळ व मऊ करणारा असा आहे. त्याच्या अतिसेवनानें वातावरोध, पोटफुगी, हृद्रोग, तहान, कृशता, नपुंसकत्व, स्रोतावरोध आणि मलावष्टंभ हे विकार होतात.

घृतहेमगुडाक्षोडमोचचोचपरूषकम् ॥ २२ ॥
अभीरुवीरापनसराजादनबलात्रयम्।
मेदे चतस्रः पर्ण्यो जीवंती जीवकर्षभौ ॥ २३ ॥
मधूकं मधुकं बिंबी विदारी श्रावणीयुगम्।

क्षीरशुक्ला तुगाक्षीरी क्षीरिण्यौ काश्मरी सहे ॥ २
क्षीरेक्षुगोक्षुरक्षौद्रद्राक्षादिर्मधुरो गणः ।

तूप, सोनें, गूळ, अक्रोड, केळें, नारळ, फालसा, श
काकोली, फणस, खिरणी, बला, अतिबला, नागबला,
महामेदा, सालवण, पिठवण, रानमूग, रानउडीद, जीवंती,
ऋषभक, मोहाचीं फुलें, ज्येष्ठमध, तोंडलीं, भुईकोहळा,
गोरखमुंडी, पांढरा भुईकोहळा, वंशलोचन, पिसोळा, दुधी,
णीचीं फळें, सहा, महासहा, दूव, ऊंस, गोखरूं, मध,
इत्यादि द्रव्यें मधुरवर्गांत येतात.

अम्लो धात्रीफलाम्लीकामातुलुंगाम्लवेतसम् ॥ २
दाडिमं रजतं तक्रं चुक्रं पालेवतं दधि ।
आम्रमाम्रातकं भव्यं कपित्थं करमर्दकम् ॥ २६ ॥

आंवळा, चिंच, महाळुंग, अम्लवेतस, डाळिंब, रुपें,
चुका, अलूबुखार, दहीं, आंबा, आंबाडा, नींब, कंवठ, करवं
पदार्थ अम्लवर्गांत येतात.

वरं सौवर्चलं कृष्णं विडं सामुद्रमौद्भिदम् ।
रोमकं पांसुजं शीसं क्षारश्च लवणो गणः ॥ २७ ॥

सैंधव, पादेलोण, काळें मीठ, बिडलोण, समुद्राचें मीठ,
मीठ, सांबरमीठ, खारीमीठ, शिसें व क्षार हे लव
मोडतात.

तिक्तः पटोली त्रायंती वालकोशीरचंदनम् ।
भूनिंबनिंबकटुकातगरागुरुवत्सकम् ॥ २८ ॥
नक्तमालद्विरजनीमुस्तमूर्वाटरूषकम् ।
पाठापामार्गकांस्यायोगुडूचीधन्वयासकम् ॥ २९
पंचमूलं महद्व्याघ्र्यौ विशालाऽतिविषा वचा ।

कडू पडवळ, त्रायमाण, सुगंधी वाळा, काळा वाळा,
किराईत, कडूलिंब, कुटकी, तगर, अगर, कुडा, करंज,
दारूहळद, नागरमोथा, मोरवेल, अडूळसा, पहाडमूळ,
कांसें, लोखंड, गुळवेल, धमासा, बृहत्पंचमूळ, रिंगणी,
इंद्रायण, अतिविष, वेखंड वगैरे तिक्तवर्गांत येतात.

कटुको हिंगुमरिचकृमिजित्पंचकोलकम् ॥ ३० ॥
कुठेराद्या हरीतकाः पित्तं मूत्रमरुष्करम् ।

हिंग, मिरें, वावडिंग, सुंठ, चवक, चित्रक, पिंपळी, पिंपळमूळ, कुठेरादि भाज्या, पित्त, मूत्र व बिबा हे पदार्थ कटुवर्गांत येतात.

वर्गः कषायः पथ्याक्षं शिरीषः खदिरो मधु ॥ ३१ ॥
कदंबोदुंबरं मुक्ताप्रवालांजनगैरिकम् ।
बालं कपित्थं खर्जूरं बिसपद्मोत्पलादि च ॥ ३२ ॥

हिरडा, बेहडा, शिरस, खैर, मध, कळंब, उंबर, मोतीं, पोवळें, सुरमा, गेरू, कोंवळें कवठ, खारीक, भिशीं, पांढरें व निळें कमळ वगैरे पदार्थ कषायवर्गांत येतात.

मधुरं श्लेष्मलं प्रायो जीर्णाच्छालियवादृते ।
मुद्गाद्गोधूमतः क्षौद्रात्सितया जांगलामिषात् ॥ ३३ ॥

जुने तांदुळ, जव, मूग, गहूं, मध, साखर व जांगल जनावरांचें मांस खेरीजकरून मधुर पदार्थ बहुधा कफकारक असतात.

प्रायोऽम्लं पित्तजननं दाडिमामलकादृते ।

डाळिंब व आंवळे खेरीजकरून प्रायः आंबट पदार्थ पित्तकारक असतात.

अपथ्यं लवणं प्रायश्चक्षुषोऽन्यत्र सैंधवात् ॥ ३४ ॥

सैंधव खेरीजकरून बाकी सर्व लवणवर्गांतील पदार्थ डोळ्यांस अपथ्यकर आहेत.

तिक्तं कटु च भूयिष्ठमवृष्यं वातकोपनम् ।
ऋतेऽमृतापटोलीभ्यां शुंठीकृष्णारसोनतः ॥ ३५ ॥

गुळवेल, कडू पडवळ, सुंठ, पिंपळी व लसूण हीं खेरीजकरून बाकी बहुतेक सर्व कडू व तिखट पदार्थ वीर्यास हानिकर व वातकारक आहेत.

कषायं प्रायशः शीतं स्तंभनं चाऽभयामृते ।

हिरड्याशिवाय बहुतेक सर्व तुरट पदार्थ थंड व स्तंभक आहेत.

रसाः कट्वम्ललवणा वीर्येणोष्णा यथोत्तरम् ॥ ३६ ॥
तिक्तः कषायो मधुरस्तद्वदेव च शीतलाः

तिखट, आंबट, व खारट हे रस अनुक्रमें एकाहून एक उष्ण-

वीर्य आहेत. तसेच कडू, तुरट व गोड हे पदार्थ एकाहून एक शीत-वीर्य आहेत.

तिक्तः कटुः कषायश्च रूक्षा बद्धमलास्तथा ॥ ३७ ॥
पट्वम्लमधुराः स्निग्धाः सृष्टविण्मूत्रमारुताः ।

कडू, तिखट व तुरट हे रस एकाहून एक रूक्ष व मलावष्टंभक आहेत. लवण, आंबट व मधुर हे स्निग्ध आणि मल, मूत्र व वायू यांचें अनुलोमन करणारे आहेत.

पटोः कषायस्तस्माच्च मधुरः परमं गुरुः ॥ ३८ ॥

खारट, तुरट व गोड हे रस उत्तरोत्तर एकाहून एक जड आहेत.

लघुरम्लः कटुस्तस्मात्तस्मादपि च तिक्तकः ।

आंबट, तिखट व कडू हे अनुक्रमें एकाहून एक हलके आहेत.

संयोगाः सप्तपंचाशत्कल्पना तु त्रिषष्टिधा ॥ ३९ ॥
रसानां यौगिकत्वेन यथास्थूलं विभज्यते ।

औषधयोजनेसंबंधानें व स्थूल दृष्टीनें पाहतां रसांचे संयोग सत्तावन व सहा निरानिराळे मूळ रस मिळून एकंदर त्रेसष्ट प्रकार होतात.

एकैकहीनांस्तान्पंच पंच यांति रसा द्विके ॥ ४० ॥
त्रिके स्वादुर्दशाम्लः षट् त्रीन्पटुस्तिक्त एककम् ।
चतुष्केषु दश स्वादुश्चतुरोऽम्लः पटुः सकृत् ॥ ४१ ॥
पंचकेष्वेकमेवाम्लो मधुरः पंच सेवते ।
द्रव्यमेकं षडास्वादमसंयुक्ताश्च षड्रसाः ॥ ४२ ॥

दोन दोन रसांचे संयोग—मधुर, अम्ल, लवण, तिक्त व कटु यांचे अनुक्रमें ५।४।३।२।१ मिळून पंधरा होतात. प्रत्येक रस आपल्या पुढील रसाशीं संयोग पावतो. ( म्हणजे मधुर पुढील पांचांशीं, अम्ल पुढील चोहोंशीं, लवण पुढील तिहींशीं, तिक्त दोहोंशीं आणि कटु एकाशीं. ) तीन तीन रसांच्या संयोगांत मधुर रस दहा, अम्ल सहा, लवण तीन व तिक्त एकच संयोग पावतो. चार रसांच्या संयोगांत मधुर दहा, अम्ल चार, व लवण एकच संयोग पावतो. पांचांच्या संयोगांत अम्ल एक व मधुर पांच संयोग पावतो. सहांचा संयोग एक व निरनिराळे सहा रस मिळून सर्व ६३.

षट्पंचकाः षट् च पृथग्रसाः स्यु-
श्चतुर्द्विकौ पंचदशप्रकारौ ।
भेदास्त्रिका विंशतिरेकमेवं
द्रव्यं षडास्वादमिति त्रिषष्टिः ॥ ४३ ॥

पांच रसांचे संयोग सहा, निरनिराळे रस सहा, चोहोंचे व दोहोंचे संयोग पंधरा, तिहींचे वीस व सहांचा एक, असे एकंदर ६३ प्रकार होतात.

ते रसानुरसतो रसभेदास्तारतम्यपरिकल्पनया च ।
संभवंति गणनां समतीता दोषभेषजवशादुपयोज्याः ॥

रस, अनुरस व त्यांचें तारतम्य हें पाहूं गेलें असतां रसांचे भेद असंख्य होतील. त्यांचा उपयोग करणें तो दोष व औषधिद्रव्यें यांस अनुसरून करावा.

---

१—१ मधुराम्ल. २ म० लवण. ३ म० तिक्त. ४ म० कटुक. ५ म० कषाय. ६ अम्ललवण. ७ अ० तिक्त. ८ अ० कटु. ९ अ० कषाय. १० लवणतिक्त. ११ ल० कटु. १२ ल०कषाय. १३ तिक्तकटु. १४ ति० कषाय. १५ कटुकषाय. १६ मधुराम्ललवण. १७ मधुराम्लतिक्त. १८ मधुराम्लकटुक. १९ मधुराम्लकषाय. २० मधुरलवणतिक्त. २१ मधुरलवणकटु. २२ मधुरलवणकषाय. २३ मधुरतिक्तकटु. २४ मधुरतिक्तकषाय. २५ मधुरकटुकषाय. २६ अम्ललवणतिक्त. २७ अम्ललवणकटु. २८ अम्ललवणकषाय. २९ अम्लतिक्तकटु. ३० अम्लतिक्तलवण ३१ अम्लकटुकषाय. ३२ लवणतिक्तकटु. ३३ लवणतिक्तकषाय. ३४ लवणकटुकषाय. ३५ तिक्तकटुकषाय. ३६ मधुराम्ललवणतिक्त. ३७ मधुराम्ललवणकटु. ३८ मधुराम्ललवणकषाय. ३९ मधुरलवणतिक्तकटु. ४० मधुरलवणतिक्तकषाय. ४१ मधुरलवणकटुकषाय. ४२ मधुरतिक्तकटुकषाय. ४३ मधुराम्लतिक्तकटु. ४४ मधुराम्लतिक्तकषाय. ४५ मधुराम्लकटुकषाय. ४६ अम्ललवणतिक्तकटुक. ४७ अम्ललवणतिक्तकषाय. ४८ अम्लतिक्तकटुकषाय. ४९ अम्ललवणकटुकषाय. ५० लवणतिक्तकटुकषाय. ५१ अम्ललवणतिक्तकटुकषाय. ५२ मधुरलवणतिक्तकटुकषाय. ५३ मधुराम्लतिक्तकटुकषाय. ५४ मधुराम्ललवणकटुकषाय. ५५ मधुराम्ललवणतिक्तकषाय. ५६ मधुराम्ललवणकटुतिक्त. ५७ मधुराम्ललवणकटुतिक्तकषाय. आणि ५८ ते ६३ मधुरादि सहा रस.

# अध्याय अकरावा.

अथाऽतो दोषादिविज्ञानीयमध्यायं व्याख्यास्यामः।

आतां दोषादिकांविषयीं विशेष माहिती सांगतों.

दोषधातुमला मूलं सदा देहस्य

वातादिदोष, रसादि धातु व विष्ठा वगैरे मल हे या शरीराचा पाया आहेत.

तं चलः।
उत्साहोच्छ्वासनिश्वासचेष्टावेगप्रवर्तनैः ॥ १ ॥
सम्यग्गत्या च धातूनामक्षाणां पाटवेन च।
अनुगृह्णात्यविकृतः

वायु बिघडलेला नसला म्हणजे उत्साह, श्वासोच्छ्वास, शारीरिक, वाचिक व मानसिक क्रिया, मलमूत्रादिकांची प्रवृत्ति, धातूंचें नियमित मार्गानें गमन आणि इंद्रियांना चलाखी, हीं कामें करून जीवनव्यापार चालवितो.

पित्तं पक्त्यूष्मदर्शनैः ॥ २ ॥
क्षुत्तृड्रुचिप्रभामेधाधीशौर्यतनुमार्दवैः।

तसेंच अविकृत पित्त, अन्नपचन, उष्णता, दृष्टि, भूक, तहान, रुचि, कांति, धारणा, बुद्धि, शौर्य व शरीराची मृदुता या गोष्टींनीं जीवनव्यापारास साहाय्य करितें.

श्लेष्मा स्निग्धत्वस्थिरत्वसंधिबंधक्षमादिभिः ॥ ३ ॥

कफ शरीराची दृढता, स्निग्धता, संधिबंधन, शांति वगैरे गोष्टींनीं शरीरव्यापारास मदत करितो.

प्रीणनं जीवनं लेपः स्नेहो धारणपूरणे।
गर्भोत्पादश्च धातूनां श्रेष्ठं कर्म क्रमात्स्मृतम् ॥ ४ ॥

प्रसन्नता, जीवनव्यापार चालविणें, लिंपणें ( वेष्टन ), स्निग्धता, धारण, अस्थींचें पूरण आणि गर्भोत्पादन हीं रसादि सात धातूंचीं अनुक्रमें मुख्य सात कर्में आहेत.

अवष्टंभः पुरीषस्य मूत्रस्य क्लेदवाहनम्।
स्वेदस्य क्लेदविधृतिः

देहधारणा करणें, द्रव पदार्थ बाहेर काढून टाकणें, आणि क्लेदाचें रक्षण करणें हीं अनुक्रमें मल, मूत्र व स्वेद यांचीं प्रधान कर्मे आहेत.

वृद्धस्तु कुरुतेऽनिलः ॥ ५ ॥
कार्श्यकार्ष्ण्योष्णकामित्वकंपाऽनाहशकृद्ग्रहान् ।
बलनिद्रेंद्रियभ्रंशप्रलापभ्रमदीनताः ॥ ६ ॥

वायु वाढला असतां तो कृशता, काळसरपणा, उष्ण पदार्थांवर इच्छा, कंप, पोटफुगी, मलावष्टंभ, शक्तिपात, निद्रानाश अवयव गळल्याप्रमाणें होणें, बडबड, भ्रम व उद्विग्नता हे विकार उत्पन्न करितो.

पीतविण्मूत्रनेत्रत्वक्क्षुत्तृड्दाहाऽल्पनिद्रताः ।
पित्तम्

पित्त वाढलें असतां मल, मूत्र, डोळे, त्वचा यांस पिंवळटपणा येतो, भूक तहान वाढते, दाह होतो, व झोंप कमी होते.

श्लेष्माऽग्निसदनप्रसेकालस्यगौरवम् ॥ ७ ॥
श्वैत्यशैत्यश्लथांगत्वं श्वासकासातिनिद्रताः ।

कफ वाढल्यानें अग्निमांद्य, लाळ गळणें, आळस, जडत्व, अंगाचा पांढरेपणा व शिथिलता, थंडी, दमा, खोकला व अतिनिद्रा हे विकार होतात.

रसोऽपि श्लेष्मवत्

रस वाढला असतांही कफवृद्धिसारखेच विकार होतात.

रक्तं विसर्पप्लीहविद्रधीन् ॥ ८ ॥
कुष्ठवातास्रपित्तास्रगुल्मोपकुशकामलाः ।
व्यंगाग्निनाशसंमोहरक्तत्वङ्नेत्रमूत्रताः ॥ ९ ॥

रक्तवृद्धीनें विसर्प, प्लीहा, विद्रधि, कुष्ठ, वातरक्त, रक्तपित्त, गुल्म, हिरड्या सुजणें, कावीळ, वांग, अग्निमांद्य, मूर्च्छा, आणि त्वचा, डोळे व मूत्र यांची आरक्तता हे विकार होतात.

---

१ शरीरांतील त्याज्य म्हणून मानल्या जाणाऱ्या पुरीषाचें काम देहधारण करणें आहे, असें वाचून आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. अतिसारांत किंवा रेचक दिल्यावर शरीरांत येणारी अशक्तता पुरीष कमी झाल्यामुळें असते. क्षयांत तर रोग्याचें जीवित पुरीषावर अवलंबून असतें, असें सांगितलें आहे. “ उपस्तब्धः स शकृता केवलं वर्तते क्षयी । ” ( निदान. ५. २२ )

मांसं गंडार्बुदग्रंथिगंडोरूदरवृद्धताः ।
कंठादिष्वधिमांसं च

मांसवृद्धीनें गंडमाळा, गलगंड, अर्बुद, गळवें, गाल, मांडया, पोट हीं वाढणें, आणि गळा वगैरे ठिकाणीं मांसवृद्धि हे रोग उत्पन्न होतात.

तद्वन्मेदस्तथा श्रमम् ॥ १० ॥
अल्पेऽपि चेष्टिते श्वासं स्फिक्स्तनोदरलंबनम् ।

मेद वाढला असतां थोडया श्रमानें देखील थकवा येतो, दम लागतो; आणि कुले, स्तन व पोट हीं लोंबूं लागतात.

अस्थ्यध्यस्थ्यधिदंतांश्च

अस्थिवृद्धीनें हाडांवर हाडें व दातांवर दांत येतात.

मज्जा नेत्रांगगौरवम् ॥ ११ ॥
पर्वसु स्थूलमूलानि कुर्यात्कृच्छ्राण्यरूंषि च ।

मज्जा वाढली असतां डोळे व अंग हीं जड होतात, आणि पेरांवर जाड मुळांचे व कृच्छ्रसाध्य फोड उत्पन्न होतात.

अतिस्त्रीकामतां वृद्धं शुक्रं शुक्राश्मरीमपि ॥ १२ ॥

वीर्यवृद्धीनें मैथुनेच्छा अतिशय वाढते आणि शुक्राश्मरी उत्पन्न होते.

कुक्षावाध्मानमाटोपं गौरवं वेदनां शकृत् ।

मळ वाढला असतां पोट फुगतें, त्यांत गुरगुर शब्द होतो, जडत्व येतें आणि दुखतें.

मूत्रं तु बस्तिनिस्तोदं कृतेऽप्यकृतसंज्ञताम् ॥ १३ ॥

मूत्र वाढलें असतां बस्तींत (ओटीपोटांत) दुखतें, आणि एकदां लघ्वी केली तरी न केल्यासारखें वाटून पुन्हा करावीशी वाटते.

स्वेदोऽतिस्वेददौर्गंध्यकंडूः

स्वेद वाढला म्हणजे अतिशय घाम येतो आणि अंगास दुर्गंधी व खाज सुटते.

एवं च लक्षयेत् ।
दूषिकादीनपि मलान् बाहुल्यगुरुतादिभिः ॥ १४ ॥

डोळे, नाक, कान वगैरे ठिकाणचा मळ वाढला असतां त्या त्या

ठिकाणीं त्याची वृद्धि आणि जडत्व, खाज वगैरे लक्षणांवरून तो ओळखावा.

लिंगं क्षीणेऽनिलेऽगस्य सादोल्पं भाषितेहितम् ।
संज्ञामोहस्तथा श्लेष्मवृद्धोक्तामयसंभवः ॥ १५ ॥

हातपाय गळाल्यासारखें होणें, शारीरिक व वाचिक कर्मं कमी होणें, बुद्धिभ्रंश आणि कफवृद्धिजन्य पूर्वोक्त रोगांचा उद्भव हीं क्षीण-वायूचीं लक्षणें होत.

पित्ते मंदोऽनलः शीतं प्रभाहानिः

पित्त क्षीण झालें असतां अग्निमांद्य, थंडी व निस्तेजता हीं होतात.

कफे भ्रमः ।
श्लेष्माशयानां शून्यत्वं हृद्रवश्लथसंधिताः ॥ १६ ॥

कफ क्षीण झाल्यास भ्रम; छाती, मस्तक, सांधे वगैरे कफ-स्थानें रिकामीं झाल्यासारखें वाटणें; छाती धडधडणें आणि सांधे ढिले पडणें हीं लक्षणें होतात.

रसे रौक्ष्यं श्रमः शोषो ग्लानिः शब्दासहिष्णुता ।

रस क्षीण झाला असतां रूक्षता, थकवा, शोष ग्लानि, हीं लक्षणें होतात, आणि शब्द सहन होत नाहीं.

रक्तेऽम्लशिशिरप्रीतिशिराशैथिल्यरूक्षताः ॥ १७ ॥

रक्तक्षयांत आंबट व थंड पदार्थांची आवड, शिरांची शिथिलता, आणि रूक्षता हे विकार होतात.

मांसेऽक्षग्लानिगंडस्फिक्शुष्कतासंधिवेदनाः ।

मांसक्षयांत इंद्रियें निःशक्त होतात, गाल व ढुंगण हीं वाळतात आणि सांधे दुखतात.

मेदसि स्वपनं कट्याः प्लीह्नो वृद्धिः कृशांगता ॥ १८ ॥

मेदःक्षयांत कंबर बधिर होते, पानथरी वाढते, शरीर कृश होतें.

अस्थ्न्यस्थितोदः शदनं दंतकेशनखादिषु ।

अस्थिक्षयांत हाडें दुखतात, व दांत, केंस, नखें हीं गळून पडतात.

अस्थ्नां मज्जनि सौषिर्यं भ्रमस्तिमिरदर्शनम् ॥ १९ ॥

मज्जाक्षयांत हाडें पोकळ होतात, घेरी येते आणि डोळ्यांपुढें अंधेरी येते.

शुक्रे चिरात् प्रसिच्येत शुक्रं शोणितमेव वा ।
तोदोऽत्यर्थं वृषणयोर्मेढ्रं धूमायतीव च ॥ २० ॥

वीर्यक्षयांत संभोगकाळीं वीर्यपतन उशिरां होतें, किंवा वीर्याऐवजीं रक्त पडतें; वृषणांत अत्यंत ठणका होतो आणि शिस्नांतून वाफा निघाल्याप्रमाणें वाटतें.

पुरीषे वायुरन्त्राणि सशब्दो वेष्टयन्निव ।
कुक्षौ भ्रमति यात्यूर्ध्वं हृत्पार्श्वे पीडयन् भृशम् ॥ २१ ॥

मलक्षयांत वायु गुरगुर शब्द व आंतड्यास वेढल्याप्रमाणें करून पोटांत सगळीकडे फिरतो, आणि ऊर्ध्वगामी होऊन हृदय व बरगड्या यांत अतिशय वेदना उत्पन्न करितो.

मूत्रेऽल्पं मूत्रयेत्कृच्छ्राद्विवर्णं सास्रमेव वा ।

मूत्रक्षयांत लघ्वी थोडी व कष्टानें होते, तिचा रंग बदलतो किंवा लघ्वींतून रक्त पडतें.

स्वेदे रोमच्युतिः स्तब्धरोमता स्फुटनं त्वचः ॥२२॥

स्वेदक्षयांत केंस गळतात किंवा ताठरतात; आणि चामडीवर भेगा पडतात.

मलानामतिसूक्ष्माणां दुर्लक्ष्यं लक्षयेत् क्षयम् ।
स्वमलायनसंशोषतोदशून्यत्वलाघवैः ॥ २३ ॥

डोळे, नाक, कान वगैरे ठिकाणच्या अतिसूक्ष्म मलांचा क्षय स्वरूपतः जाणणें कठिण आहे. तरी त्या त्या मलद्वाराची शुष्कता, ठणका, शून्यता व हलकेपणा यावरून तो ओळखावा.

दोषादीनां यथास्वं च विद्याद्वृद्धिक्षयौ भिषक् ।
क्षयेण विपरीतानां गुणानां वर्धनेन च ॥ २४ ॥
वृद्धिं मलानां संगाच्च क्षयं चाऽतिविसर्गतः ।

दोष, धातु वगैरेंची वृद्धि व क्षय हीं त्यांच्या विपरीत गुणांच्या[१] क्षयवृद्धीवरून वैद्यानें जाणावीं. याशिवाय मलबद्धतेनें त्यांची वृद्धि व अतिप्रवृत्तीनें क्षय जाणावा.

मलोचितत्वाद्देहस्य क्षयो वृद्धेस्तु पीडनः ॥ २५ ॥

मलांचा सहवास शरीरास नेहमीं असल्यामुळें वृद्धीपेक्षां क्षय जास्त पीडाकारक आहे.

तत्राऽस्थनि स्थितो वायुः पित्तं तु स्वेदरक्तयोः ।
श्लेष्मा शेषेषु

१ रूक्षता, लघुता, शीत हे वायूचे गुण आहेत. यांच्या उलट स्निग्धता, गुरुत्व व उष्णता या गुणांची वृद्धि झाली असतां वायूचा क्षय जाणावा.

वायु अस्थींत रहातो. स्वेद व रक्त यांत पित्त राहतें. आणि रस, वगैरे इतर धातु व मल यांत कफ राहतो.

तेनैषामाश्रयाश्रयिणां मिथः ॥ २६ ॥
यदेकस्य तदन्यस्य वर्धनक्षपणौषधम् ।

याप्रमाणें धातु व दोष एकमेकांचा आश्रय करून राहिल्यामुळें जें औषध एकाची वृद्धि किंवा क्षय करितें, तेंच तदाश्रित दोषांची व मलांची वृद्धि किंवा क्षय करितें.

अस्थिमारुतयोर्नैवं प्रायो वृद्धिर्हि तर्पणात् ॥ २७ ॥
श्लेष्मणाऽनुगता तस्मात् संक्षयस्तद्विपर्ययात् ।
वायुनाऽनुगतः

मात्र हा नियम अस्थि व वायु यांस लागू पडत नाहीं. कारण दोष व धातु यांची वृद्धि बहुधा बृंहणापासून होते व बृंहणानें कफ वाढतो अर्थात् वायूचा क्षय होतो; आणि लंघनानें बहुशः दोषधातूंचा क्षय होतो व वायूचा जोर वाढतो.

अस्माच्च वृद्धिक्षयसमुद्भवान् ॥ २८ ॥
विकारान् साधयेच्छीघ्रं क्रमाल्लंघनबृंहणैः ।
वायोरन्यत्र तज्जांस्तु तैरेवोत्क्रमयोजितैः ॥ २९ ॥

म्हणून वृद्धिक्षयजन्य रोगांवर अनुक्रमें लंघन व बृंहण हे उपचार शीघ्र करावे. वातरोगांवर मात्र याच्या उलट क्रमानें म्हणजे वातवृद्धीवर बृंहण व वातक्षयावर लंघनात्मक उपचार करावे.

विशेषाद्रक्तवृद्ध्युत्थान् रक्तस्रुतिविरेचनैः ।

विशेषतः रक्तवृद्धिजन्य रोगांवर रक्त काढणें व विरेचन हे उपचार करावे.

मांसवृद्धिभवान् रोगान् शस्त्रक्षाराग्निकर्मभिः ॥ ३० ॥

मांसवृद्धिजन्य रोगांची शस्त्र, क्षार व डाग या उपायांनीं चिकित्सा करावी.

स्थौल्यकार्श्योपचारेण मेदोजान्

मेदाच्या वृद्धीनें झालेल्या रोगांवर स्थौल्यचिकित्सा व क्षयानें झालेल्या रोगांवर कार्श्यचिकित्सा करावी.

अस्थिसंक्षयात् ।
जातान् क्षीरघृतैस्तिक्तसंयुतैर्बस्तिभिस्तथा ॥ ३१ ॥

अस्थिक्षयजन्य रोगांवर कडू औषधांनीं मिश्रित क्षीरें, घृतें व बस्ति यांचा उपयोग करावा.

विड्वृद्धिजानतीसारक्रियया विट्क्षयोद्भवान् ।
मेषाजमध्यकुल्माषयवमाषद्वयादिभिः ॥ ३२ ॥

मलवृद्धिजन्य रोगांवर अतिसारचिकित्सा करावी. मलक्षयजन्य विकारांवर मेंढा व बकरा यांचा कोठा; वाटाणे, हरभरे वगैरे धान्यांची उसळ, जव, उडीद, चवळ्या इत्यादि पदार्थ खावे.

मूत्रवृद्धिक्षयोत्थांश्च मेहकृच्छ्रचिकित्सया ।

मूत्रवृद्धिजन्य विकारांवर प्रमेहचिकित्सा आणि मूत्रक्षयजन्य विकारांवर मूत्रकृच्छ्रचिकित्सा करावी.

व्यायामाऽभ्यंजनस्वेदमद्यैः स्वेदक्षयोद्भवान् ॥ ३३ ॥

स्वेदक्षयास व्यायाम, अभ्यंग, वाफारा व मद्य हे उपाय योजावे.

स्वस्थानस्थस्य कायाग्नेरंशा धातुषु संश्रिताः ।
तेषां सादातिदीप्तिभ्यां धातुवृद्धिक्षयोद्भवः ॥ ३४ ॥

आमाशय व पक्काशय यांमध्यें राहणाऱ्या अग्नीचे सूक्ष्म अंश, सर्व सप्त धातूंत मिसळलेले असतात. त्यामुळें जठराग्नीची मंदता किंवा प्रखरता होण्यावर धातूंची वृद्धि किंवा क्षय हे अवलंबून असतात.

पूर्वो धातुः परं कुर्याद्वृद्धः क्षीणश्च तद्विधम् ।

रस, रक्त, मांस वगैरे जे सात धातु, त्यांपैकीं अनुक्रमाप्रमाणें पूर्वींच्या धातूची वृद्धि किंवा क्षय झाल्यानें त्याच्या नंतरच्या धातूचीही वृद्धि किंवा क्षय होतो.

दोषा दुष्टा रसैर्धातून् दूषयंत्युभये मलान् ॥ ३५ ॥

षड्रसांच्या कमीजास्त उपयोगानें बिघडलेले दोष धातूंना बिघडवितात. नंतर ते दोघेही मलांना बिघडवितात.

अधो द्वे सप्त शिरसि खानि स्वेदवहानि च ।
मला मलायनानि स्युर्यथास्वं तेष्वतो गदाः ॥ ३६ ॥

मलांचीं स्थानें येणेंप्रमाणें:—खालीं दोन ( गुद व मूत्रमार्ग ); मस्तकांत सात ( दोन कान, दोन नाकपुड्या, दोन नेत्र व एक

मुख ) आणि त्याशिवाय घाम येणारीं शरीरावरील छिद्रें. मलस्थानें दूषित झाल्यानें त्या त्या स्थानीं रोग होतात.

**ओजस्तु तेजो धातूनां शुक्रांतानां परं स्मृतम्।**
**हृदयस्थमपि व्यापि देहस्थितिनिबंधनम् ॥ ३७ ॥**
**स्निग्धं सोमात्मकं शुद्धमीषल्लोहितपीतकम्।**
**यन्नाशे नियतं नाशो यस्मिंस्तिष्ठति तिष्ठति ॥ ३८ ॥**
**निष्पद्यंते यतो भावा विविधा देहसंश्रयाः।**

रसापासून वीर्यपर्यंत जे सप्तधातु, त्यांच्यांतील जें सत्वमय तेज त्याला ओज म्हणतात. तें मुख्यत्वेंकरून हृदयांत असतें; तथापि तें सर्वदेहव्यापी असून, देहाला चालविणारें व त्याला नियामक आहे. तें स्निग्ध, सोमात्मक ( शीतगुणप्रधान ), शुद्ध व किंचित् तांबूस-पिवळें असें आहे. याचा नाश होण्यानें देहाचा नाश होतो; हें असल्यानेंच प्राण रहातो, व शरीरासंबंधीं हरएक क्रिया याच्या योगानेंच होतात.

**ओजः क्षीयेत कोपक्षुद्ध्यानशोकश्रमादिभिः ॥ ३९ ॥**

कोप, क्षुधा, चिंता, शोक, श्रम इत्यादि शारीरिक किंवा मानसिक विकारांच्या योगानें ओजाचा क्षय होतो.

**बिभेति दुर्बलोऽभीक्ष्णं ध्यायति व्यथितेंद्रियः।**
**विच्छायो दुर्मना रूक्षो भवेत्क्षामश्च तत्क्षये ॥ ४० ॥**

त्यामुळें माणूस दुर्बळ, भित्रा, आणि चिंताक्रांत होतो. त्याचीं इंद्रियें क्लेश पावतात; शरीराचा वर्ण बिघडतो; उत्साह रहात नाहीं आणि त्याचें शरीर कृश व रूक्ष होतें.

**जीवनीयौषधक्षीररसाद्यास्तत्र भेषजम्।**

ओजाचा क्षय झाल्यास जीवनीयगणांतील औषधें, दूध, मांसरस, इत्यादि औषधांची योजना करावी.

**ओजोविवृद्धौ देहस्य तुष्टिपुष्टिबलोदयः ॥ ४१ ॥**

ओजाची वृद्धि झाली असतां संतोष, पुष्टि आणि बल हीं प्राप्त होतात.

**यदन्नं द्वेष्टि यदपि प्रार्थयेताविरोधि तु।**
**तत्तत्त्यजन् समश्नंश्च तौ तौ वृद्धिक्षयौ जयेत् ॥ ४२ ॥**

कोणचाही दोष वाढल्यास किंवा त्याचा क्षय झाल्यास अप्रिय व विरुद्ध अन्नांचा त्याग करावा; व प्रिय परंतु परस्परविरोधी नसेल अशा अन्नांचें सेवन करावें. अशा रीतीनें त्यांचे वृद्धिक्षय जिंकावे.

कुर्वते हि रुचिं दोषा विपरीतसमानयोः ।
वृद्धाः क्षीणाश्च भूयिष्ठं लक्षयंत्यबुधास्तु न ॥ ४३ ॥

दोष वाढले असतां विरुद्ध गुणांच्या पदार्थांची इच्छा उत्पन्न करितात, व क्षीण झाले असतां समान गुणाच्या पदार्थांची इच्छा उत्पन्न करितात; असा बहुतकरून नियम आहे. पण अज्ञान लोकांच्या हें सहज लक्षांत येत नाहीं.

यथाबलं यथास्वं च दोषा वृद्धा वितन्वते ।
रूपाणि जहति क्षीणाः समाः स्वं कर्म कुर्वते ॥ ४४ ॥

दोष आपल्या बलाप्रमाणें व गुणाप्रमाणें समस्थितींत असले म्हणजे यथायोग्य क्रिया करतात. वाढले म्हणजे वृद्धि करतात, व कमी झाले म्हणजे कमी करतात.

य एव देहस्य समा विवृद्ध्यै
त एव दोषा विषमा वधाय ।
यस्मादतस्ते हितचर्ययैव
क्षयाद्विवृद्धेरिव रक्षणीयाः ॥ ४५ ॥

जे दोष सम असले म्हणजे देहाची वृद्धि करतात, तेच दोष विषम झाले म्हणजे देहाचा नाश करतात. म्हणून हितकर वर्तनानें, क्षयापासून व वृद्धीपासून त्यांचें रक्षण करून त्यांना समप्रमाणांत ठेवावें.

---

## अध्याय बारावा.

अथाऽतो दोषभेदीयाध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां स्थानभेदानें किंवा क्रियाभेदानें होणारे दोषांचे भेद सांगतों.

पक्काशयकटीसक्थिश्रोत्राऽस्थिस्पर्शनेंद्रियम् ।
स्थानं वातस्य तत्रापि पक्काधानं विशेषतः ॥ १ ॥

पक्काशय ( आंतडीं ), कंबर, मांड्या, कान, हाडें व स्पर्शे-

द्रियें हीं वातदोषाचीं स्थानें आहेत; तथापि त्यांतही वाताचें मुख्य स्थान पक्काशय होय.

नाभिरामाशयः स्वेदो लसीका रुधिरं रसः ।
दृक् स्पर्शनं च पित्तस्य नाभिरत्र विशेषतः ॥ २ ॥

नाभि, आमाशय, स्वेद (घाम), लस, रक्त, रस, दृष्टि व स्पर्शेंद्रिय हीं पित्ताचीं स्थानें आहेत; तथापि त्यांतही विशेषेंकरून नाभि हें पित्ताचें मुख्य स्थान आहे.

उरःकंठशिरःक्लोमपर्वाण्यामाशयो रसः ।
मेदो घ्राणं च जिह्वा च कफस्य सुतरामुरः ॥ ३ ॥

ऊर, कंठ, मस्तक, क्लोम (तृषास्थान), संधि, आमाशय, रस, मेद, नाक व जीभ हीं कफाचीं स्थानें असून, त्यांत ऊर हें मुख्य-स्थान आहे.

प्राणादिभेदात्पंचात्मा वायुः

वायूचे प्राण वगैरे पांच भेद आहेत.

प्राणोऽत्र मूर्धगः ।
उरःकंठचरो बुद्धिहृदयेंद्रियचित्तधृक् ॥ ४
ष्ठीवनक्षवथूद्गारनिःश्वासान्नप्रवेशकृत् ।

त्यांत प्राणवायु मस्तकांत राहून, ऊर व कंठ यांत फिरत असतो. तो बुद्धि, हृदय, इंद्रियें, व यांचा आधार आहे. हा थुंकणें, शिंकणें, ढेंकर देणें, श्वास घेणें व गिळणें या क्रिया करितो.

उरःस्थानमुदानस्य नासानाभिगलांश्चरेत् ॥ ५ ॥
वाक्प्रवृत्तिप्रयत्नोर्जाबलवर्णस्मृतिक्रियः ।

ऊर हें उदानाचें स्थान असून, नाक, गळा व नाभि इतक्या प्रदेशांत तो फिरत असतो; आणि बोलणें, इच्छा, उत्साह, बल, वर्ण, स्मृति या क्रिया करितो.

व्यानो हृदि स्थितः कृत्स्नदेहचारी महाजवः ॥ ६ ॥
गत्यपक्षेपणोत्क्षेपनिमेषोन्मेषणादिकाः ।
प्रायः सर्वाः क्रियास्तस्मिन् प्रतिबद्धाः शरीरिणाम् ॥ ७

व्यानवायु हा हृदयांत राहून एकंदर सर्व देहांत फिरत असतो; याचा वेग फार मोठा आहे. गति, आकुंचन, प्रसारण, पापण्या

झांकणें व उघडणें इत्यादि–किंबहुना प्राण्यांच्या सर्व क्रिया या वायूवर अवलंबून आहेत.

समानोऽग्निसमीपस्थः कोष्ठे चरति सर्वतः।
अन्नं गृह्णाति पचति विवेचयति मुंचति ॥ ८ ॥

समानवायु जठराग्नीजवळ राहून सर्व कोठ्यांत फिरत असतो. अन्न आमाशयांत घेणें त्याचें पचन करणें, त्यांतून सत्वांश व त्याज्यांश निराळे करणें, आणि मल बाहेर टाकणें हीं कामें तो करतो.

अपानोऽपानगः श्रोणिबस्तिमेढ्रोरुगोचरः।
शुक्रार्तवशकृन्मूत्रगर्भनिष्क्रमणक्रियः ॥ ९ ॥

अपानवायु गुदस्थानीं राहून, कुले, बस्ति, शिस्न व मांड्या या स्थानांत फिरतो; आणि वीर्य, आर्तव, मल, मूत्र व गर्भ यांना बाहेर काढतो.

पित्तं पंचात्मकं

पित्ताचे पांच प्रकार आहेत.

तत्र पक्वामाशयमध्यगम्।
पंचभूतात्मकत्वेऽपि यत्तैजसगुणोदयात् ॥ १० ॥
त्यक्तद्रवत्वं पाकादिकर्मणाऽनलशब्दितम्।
पचत्यन्नं विभजते सारकिट्टौ पृथक् तथा ॥ ११ ॥
तत्रस्थमेव पित्तानां शेषाणामप्यनुग्रहम्।
करोति बलदानेन पाचकं नाम तत्स्मृतम् ॥ १२ ॥

त्यांत पक्वाशय व आमाशय यांच्यामध्यें पाचक पित्त असतें. तें पंचमहाभूतात्मक असून, त्यांत तेजोगुणाचा विशेष उदय असल्यामुळें, पित्तांत असलेला द्रवत्वगुण त्यांत नाहीं. पचनादि कर्मं करितें म्हणून त्याला अग्नि ( जठराग्नि ) असें नांव प्राप्त झालें आहे; पाचक पित्त पचन करतें, सारभाग व त्याज्यभाग ( मल ) यांचें पृथक्करण करतें, आणि आपल्या जागींच राहून इतर चार पित्तभेदांना बल देतें.

आमाशयाश्रयं पित्तं रंजकं रसरंजनात्।

रंजक पित्त आमाशयांत राहून तेथील रसाला रंग आणतें.

बुद्धिमेधाऽभिमानाद्यैरभिप्रेतार्थसाधनात् ॥ १३ ॥
साधकं हृद्गतं पित्तम्

साधक पित्त हृदयांत राहून बुद्धि, मेधा ( धारणाशक्ति ), अहं-
कार इत्यादिकांच्या योगानें इच्छित कार्य करितें.

रूपालोचनतः स्मृतम् ।
दृक्स्थमालोचकं

आलोचक पित्त नेत्रांत राहून पहाण्याची क्रिया करितें.

त्वक्स्थं भ्राजकं भ्राजनात्त्वचः ॥ १४ ॥

भ्राजक पित्त त्वचेंत राहून तिला तकाकी देतें.

श्लेष्मा तु पंचधा

कफाचे पांच प्रकार आहेत.

उरःस्थः स त्रिकस्य स्ववीर्यतः ।
हृदयस्यान्नवीर्याच्च तत्स्थ एवांबुकर्मणा ॥ १५ ॥
कफधाम्नां च शेषाणां यत्करोत्यवलंबनम् ।
अतोऽवलंबकः श्लेष्मा

अवलंबक कफ उरांत राहून, आपल्या सामर्थ्यानें त्रिकाचें ( माकडहाडाचें ) रक्षण करितो. तसेंच अन्नवीर्यानें व आपल्या बलानें हृदयाचें रक्षण करतो; आणि क्लेदन व पूरण इत्यादि जीं उदकाचीं कर्में, तीं यामध्यें असल्यामुळें इतर कफस्थानांना पुरवठा करितो.

यस्त्वामाशयसंस्थितः ॥ १६ ॥
क्लेदकः सोऽन्नसंघातक्लेदनात्

क्लेदक कफ आमाशयांत राहून अन्नसमुदायाला पातळ करितो.

रसबोधनात् ।
बोधको रसनस्थायी

बोधक कफ हा जिभेंत राहून रसज्ञान उत्पन्न करितो.

शिरःसंस्थोक्षतर्पणात् ॥ १७ ॥
तर्पकः

तर्पक कफ हा मस्तकांत राहून सर्व इंद्रियांना तृप्ति देतो.

संधिसंश्लेषाच्छ्लेषकः संधिषु स्थितः ।

श्लेषक कफ हा सर्व सांध्यांत राहून त्यांचें रक्षण करितो.

इति प्रायेण दोषाणां स्थानान्यविकृतात्मनाम् ॥ १८ ॥
व्यापिनामपि जानीयात्कर्माणि च पृथक्पृथक् ।

वातादि दोष जरी सर्वदेहव्यापी आहेत, तथापि जेव्हां ते

दूषित झालेले नसतील, त्या वेळचीं त्यांचीं स्थानें व कर्में सामान्यतः वर लिहिल्याप्रमाणें समजावीं.

उष्णेन युक्ता रूक्षाद्या वायोः कुर्वंति संचयम् ॥ १९ ॥
शीतेन कोपमुष्णेन शमं स्निग्धाद्यो गुणाः ।

रूक्षादि वायूच्या गुणांनीं युक्त असलेले पदार्थ जर उष्ण असले तर ते वायूचा चय करितात, थंड असतील तर प्रकोप करितात; पण जर वायूच्या गुणांच्या विरुद्ध असलेल्या स्निग्धादि गुणांनीं युक्त पदार्थ उष्ण असतील, तर ते वायूचें शमन करितात.

शीतेन युक्तास्तीक्ष्णाद्याश्चयं पित्तस्य कुर्वते ॥ २० ॥
उष्णेन कोपं मंदाद्याः शमं शीतोपसंहिताः ।

तीक्ष्णादि गुण शीत गुणानें युक्त असल्यास पित्ताचा चय होतो; उष्णानें युक्त असतील तर प्रकोप होतो, आणि शीत गुणानें युक्त अशा मंदादि गुणांनीं पित्ताचा शम होतो.

शीतेन युक्ताः स्निग्धाद्याः कुर्वते श्लेष्मणश्चयम् ॥ २१ ॥
उष्णेन कोपं तेनैव गुणा रूक्षादयः शमम् ।

शीत गुणानें युक्त स्निग्धादि गुण कफाचा क्षय करितात; उष्ण-गुणयुक्त झाल्यास प्रकोप करितात; आणि उष्णगुणयुक्त रूक्षादि गुण शम करितात.

चयो वृद्धिः स्वधाम्न्येव प्रद्वेषो वृद्धिहेतुषु ॥ २२ ॥
विपरीतगुणेच्छा च

आपापल्या स्थानांत राहूनच दोष वाढल्यास त्याला चय म्हण-तात; आणि वृद्धि होण्याच्या करणांविषयीं द्वेष उत्पन्न होऊन विपरीत गुणांची इच्छा उत्पन्न होते.

कोपस्तून्मार्गगामिता ।
लिंगानां दर्शनं स्वेषामस्वास्थ्यं रोगसंभवः ॥ २३ ॥

वाढलेले दोष आपलीं स्थानें सोडून जाऊं लागले म्हणजे त्याला कोप म्हणतात. आणि असें झालें म्हणजे ते आपापलीं लक्षणें दाखवूं लागतात, अस्वस्थता उत्पन्न करितात व रोगांची उत्पत्ति करितात.

चयप्रकोपप्रशमा वायोर्ग्रीष्मादिषु त्रिषु ॥ २४ ॥
वर्षादिषु तु पित्तस्य श्लेष्मणः शिशिरादिषु ।

सहा ऋतूंच्या गुणधर्मानुरोधानें वायूचे चय, प्रकोप व प्रशम, अनुक्रमेंकरून ग्रीष्म, वर्षा व शरत् या ऋतूंत होतात; पित्ताचे वर्षा, शरत् व हेमंत या ऋतूंत, आणि कफाचे शिशिर, वसंत व ग्रीष्म या ऋतूंत होतात.

चीयते लघुरूक्षाभिरोषधीभिः समीरणः ॥ २५ ॥
तद्विधस्तद्विधे देहे कालस्यौष्ण्यान्न कुप्यति ।

ग्रीष्म ऋतूंत खाद्य पदार्थ लघु व रूक्ष असतात, व देहही तसाच बनतो; वायूचे गुणही तसेच आहेत; म्हणून त्या ऋतूंत वायूचा संचय होतो. मात्र त्या वेळीं उष्णता असल्यामुळें कोप होत नाहीं.

अद्भिरम्लविपाकाभिरोषधीभिश्च तादृशम् ॥ २६ ॥
पित्तं याति चयं कोपं न तु कालस्य शैत्यतः ।

वर्षाऋतूंतील आहारपदार्थ व जल अम्लविपाकी असल्यामुळें, देहही तसाच बनल्यामुळें व पित्तही तसेंच असल्यामुळें त्याचा चय होतो; मात्र त्या वेळेस गारठा असल्यामुळें प्रकोप होत नाहीं.

चीयते स्निग्धशीताभिरुदकौषधिभिः कफः ॥ २७ ॥
तुल्येऽपि काले देहे च स्कन्नत्वान्न प्रकुप्यति ।

शिशिर ऋतूंत आहारपदार्थ व जल स्निग्ध व शीत असल्यामुळें देहही त्या गुणांचा होतो; आणि कफही तसाच आहे, म्हणून कफाचा संचय होतो; मात्र थंडीनें तो घट्ट झाला असल्यामुळें त्याचा कोप होत नाहीं.

इति कालस्वभावोऽयम्

याप्रमाणें हा कालस्वभावानें फेरफार होतो.

आहारादिवशात्पुनः ॥ २८ ॥
चयादीन् यांति सद्योऽपि दोषाः कालेऽपि वा न तु ।

तथापि त्या त्या प्रकारचे आहारविहार घडले असतां पाहिजे त्या वेळीं चय, प्रकोप व प्रशम होऊं शकतात. किंवा त्या त्या ऋतूंत होणारे संचयादि फेरफारही होऊं शकत नाहींत.

व्याप्नोति सहसा देहमापादतलमस्तकम् ॥ २९ ॥
निवर्तते तु कुपितो मलोऽल्पाल्पं जलौघवत् ।

कुपित झालेला दोष एकदम सर्व शरीर व्यापून टाकितो; परंतु ज्याप्रमाणें नदीला आलेल्या पुराचें पाणी हळुहळू ओसरत जातें, त्याप्रमाणें दोषांचा उतारमात्र हळुहळू होतो.

नानारूपैरसंख्येयैर्विकारैः कुपिता मलाः ॥ ३० ॥
तापयंति तनुं तस्मात्तद्धेत्वाकृतिसाधनम् ।
शक्यं नैकैकशो वक्तुमतः सामान्यमुच्यते ॥ ३१ ॥

कुपित झालेले दोष निरनिराळे व पुष्कळ त्रासदायक व्याधि उत्पन्न करितात; त्या प्रत्येकाचें कारण व लक्षण यांचें निरनिराळें वर्णन करणें शक्य नाहीं; म्हणून येथें त्यांचें सामान्य वर्णन केलें आहे.

दोषा एव हि सर्वेषां रोगाणामेककारणम् ।
यथा पक्षी परिपतन् सर्वतः सर्वमप्यहः ॥ ३२ ॥
छायामत्येति नात्मीयां यथा वा कृत्स्नमप्यदः ।
विकारजातं विविधं त्रीन् गुणान्नाऽतिवर्तते ॥ ३३ ॥
तथा स्वधातुवैषम्यनिमित्तमपि सर्वदा ।
विकारजातं त्रीन्दोषान्

सर्व रोगांचें मूळ व मुख्य कारण तिन्ही दोष होत. ज्याप्रमाणें एकादा पक्षी सर्वत्र आणि सर्व दिवसभर जरी संचार करून आला, तरी त्याची छाया जशी त्याला सोडून असत नाहीं; किंवा एकंदर जगांतील कोणताही पदार्थ सत्त्व, रज, तम या तीन गुणांव्यतिरिक्त असूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें स्वतःच्या धातुवैषम्यापासून उत्पन्न होणारा रोगही तीन दोषांना सोडून असूं शकत नाहीं.

तेषां कोपे तु कारणम् ॥ ३४ ॥
अर्थैरसात्म्यैः संयोगः कालः कर्म च दुष्कृतम् ।
हीनातिमिथ्यायोगेन भिद्यते तत्पुनस्त्रिधा ॥ ३५ ॥

शब्द, स्पर्श वगैरे जे इंद्रियाचे धर्म त्यांचा अयोग्य संबंध, दुष्ट काल ( ऋतु ), आणि अयोग्य कर्म, हीं दोषांचे कोप होण्याचीं कारणें होत. याप्रमाणें हीं तीन मुख्य कारणें दोषांचा बिघाड करणारीं असून, या प्रत्येकाचे हीनयोग, अतियोग व मिथ्यायोग असे तीन भेद आहेत.

हीनोऽर्थेनेंद्रियस्याऽल्पः संयोगः स्वेन नैव वा ।

शब्दादि विषयांचा त्या त्या इंद्रियांशीं कमी योग होणें किंवा मुळींच न होणें याला हीनयोग म्हणतात.

अतियोगोऽतिसंसर्गः

त्यांचा जास्त योग होणें याला अतियोग म्हणतात.

सूक्ष्मभासुरभैरवम् ॥ ३६ ॥
अत्यासन्नाऽतिदूरस्थं विप्रियं विकृतादि च ।
यदक्ष्णा वीक्ष्यते रूपं मिथ्यायोगः स दारुणः ॥ ३७ ॥

अतिसूक्ष्म, अति तेजस्वी, भयंकर, फार जवळ, फार दूर, अप्रिय, विकृत इत्यादि प्रकारचें पहाणें हा नेत्रेंद्रियाचा मिथ्यायोग होय.

एवमत्युच्चपूत्यादीनिंद्रियार्थान् यथायथम् ।
विद्यात्

याचप्रमाणें अति दुर्गंधी इत्यादि विषय त्या त्या इंद्रियांचे मिथ्यायोग होत.

कालस्तु शीतोष्णवर्षभेदात्रिधा मतः ॥ ३८ ॥

काळ हा शीत, उष्ण व पर्जन्य या भेदांनीं त्रिविध आहे.

स हीनो हीनशीतादिरतियोगोऽतिलक्षणः ।
मिथ्यायोगस्तु निर्दिष्टो विपरीतस्वलक्षणः ॥ ३९ ॥

थंडी वगैरे कमी असल्यास अयोग; अतिशय असल्यास अतियोग; व थंडी वगैरे मुळींच न पडतां इतर उन्हाळ्याचीं वगैरे लक्षणें, हा मिथ्यायोग होय.

कायवाक्चित्तभेदेन कर्माऽपि विभजेत्रिधा ।

शरीर, वाचा व चित्त यांचे योगानें कर्मांचे तीन भेद आहेत.

कायादिकर्मणां हीना प्रवृत्तिर्हीनसंज्ञिका ॥ ४० ॥
अतियोगोऽतिवृत्तिस्तु वेगोदीरणधारणम् ।
विषमांगक्रियारंभः पतनस्खलनादिकम् ॥ ४१ ॥
भाषणं सामिभुक्तस्य रागद्वेषभयादि च ।
कर्म प्राणातिपातादि दशधा यच्च निंदितम् ॥ ४२ ॥
मिथ्यायोगः समस्तोऽसाविह चामुत्र वा कृतम् ।

याची जितकी प्रवृत्ति असायला पाहिजे तितकी नसणें, ही कर्माची हीनप्रवृत्ति; जास्त असणें ही अतिप्रवृत्ति; आणि मलमूत्रादिवेगांचें बलात्कारानें धारण करणें किंवा सोडणें, वांकडें तिकडें

बसणें उठणें, पडणें, अडखळणें, तोंडांत घांस असतां बोलणें, राग-द्वेष-भयादि कर्में, आणि हिंसा, चौर्य वगैरे दशविध पातकें—मग तीं या जन्मीं अथवा पूर्वजन्मीं केलेलीं असोत—हीं सर्व कर्मांच्या मिथ्यायोगाचीं उदाहरणें आहेत.

**निदानमेतद्दोषाणां कुपितास्तेन नैकधा ॥ ४३ ॥**
**कुर्वंति विविधान् व्याधीन् शाखाकोष्ठास्थिसंधिषु ।**

याप्रमाणें हें दोषप्रकोपाचें कारण आहे. यामुळें कुपित झालेले दोष शाखा, कोष्ठ, अस्थि व संधि यांच्या ठिकाणीं अनेक प्रकारचे व्याधि उत्पन्न करतात.

**शाखारक्तादयस्त्वक् च बाह्यरोगायनं हि तत् ॥ ४४ ॥**
**तदाश्रया मषव्यंगगंडालज्यर्बुदादयः**
**बहिर्भागाश्च दुर्नामगुल्मशोफादयो गदाः ॥ ४५ ॥**

शाखा ( हात-पाय ), रक्तादि सप्त धातु व त्वचा यांना बाह्य रोगस्थान म्हणतात. यामध्यें मस, वांग, करट, अळजी ( प्रमेह-पिटिका ), अर्बुद व गुदद्वाराच्या बाहेरच्या बाजूस होणारी मूळ-व्याधि, रक्तगुल्मादि व सूज हे रोग होतात.

**अंतःकोष्ठो महास्रोत आमपक्काशयाश्रयः ।**
**तत्स्थानाश्छर्द्यतीसारकासश्वासोदरज्वराः ॥ ४६ ॥**
**अंतर्भागं च शोफार्शोगुल्मवीसर्पविद्रधि ।**

अभ्यंतररोगस्थानाला महास्रोत किंवा कोष्ठ ( कोठा ) असें म्हण-तात. यांत आमाशय व पक्काशय यांची गणना होते. त्यामध्यें ओकारी, अतिसार, खोकला, श्वास, उदर, ताप आणि अंतर्भागीं होणारी मूळव्याधि, सूज, गुल्म, विसर्प व विद्रधि हे रोग होतात.

**शिरोहृदयबस्त्यादिमर्माण्यस्थ्नां च संधयः ॥ ४७ ॥**
**तन्निबद्धः शिरास्नायुकंडराद्याश्च मध्यमः ।**
**रोगमार्गः स्थितास्तत्र यक्ष्मपक्षवधार्दिताः ॥ ४८ ॥**
**मूर्धादिरोगाः संध्यस्थित्रिकशूलग्रहादयः ।**

मस्तक, हृदय व बस्ति इत्यादि मर्में, अस्थींचे संधि व त्यांचा आश्रय धरून असलेल्या शिरा, स्नायु, कंडरा इत्यादिकांना मध्यम रोगमार्ग अशी संज्ञा आहे. यामध्यें क्षय, अर्धांगवायु, अर्दितवायु,

मस्तकादिकांचे रोग, सांधे, हाडें व माकडहाड (त्रिक) यांतील शूल व स्तब्धता इत्यादि रोग उत्पन्न होतात.

स्रंसव्यासव्यधस्वापसादरुक्तोदभेदनम् ॥ ४९ ॥
संगांगभंगसंकोचवर्तहर्षणतर्षणम् ।
कंपपारुष्यसौषिर्यशोषस्पंदनवेष्टनम् ॥ ५० ॥
स्तंभः कषायरसता वर्णः श्यामोऽरुणोऽपि वा ।
कर्माणि वायोः

अवयव स्थानापासून निखळणें, आचके, टोंचण्यासारखी पीडा, स्पर्श न समजणें, विकलता, पीडा (दुखणें), तोडून घेतल्यासारखी पीडा, भेद केल्यासारखी पीडा, प्रतिबंध, अंग उकललयाप्रमाणें पीडा, आकुंचन, वाटोळें फिरण्यासारखी पीडा होणें, रोमांच, तृषा, कंप, रूक्षता, पोकळ होणें, सुकणें, स्फुरण होणें, वांकणें, ताठणें किंवा क्रिया बंद होणें; आणि तुरट रस, काळसर अथवा आरक्त वर्ण हीं वायूचीं कर्में आहेत.

पित्तस्य दाहरागोष्मपाकिताः ॥ ५१ ॥
स्वेदः क्लेदः स्रुतिः कोथः सदनं मूर्च्छनं मदः ।
कटुकाम्लौ रसौ वर्णः पांडुरारुणवर्जितः ॥ ५२ ॥

दाह, लाली, उष्णता, पाक (पिकणें) स्वेद, ओलसरपणा, स्राव, कुजणें, अंग गळून जाणें, मूर्च्छा, मद, हीं आणि तिखट व आंबट रस आणि पांढरा व आरुण वर्णाशिवाय इतर कोणताही वर्ण, हीं पित्താचीं कर्में आहेत.

श्लेष्मणः स्नेहकाठिन्यकंडूशीतत्वगौरवम् ।
बंधोपलेपस्तैमित्यशोफापक्त्यतिनिद्रताः ॥ ५३ ॥
वर्णः श्वेतो रसौ स्वादुलवणौ चिरकारिता ।

स्निग्धता, काठिण्य, कंडू, शीतता, जडता, स्रोतोरोध, चिकटा, आळस, सूज, अपचन, अतिनिद्रा हीं; आणि मधुर व खारट रस, पांढरा वर्ण आणि सावकाश रोग उत्पन्न होणें, हीं कफाचीं कर्में होत.

इत्यशेषामयव्यापि यदुक्तं दोषलक्षणम् ॥ ५४ ॥
दर्शनाद्यैरवहितस्तत्सम्यगुपलक्षयेत् ।
व्याध्यवस्थाविभागज्ञः पश्यन्नार्तान् प्रतिक्षणम् ॥ ५५ ॥

याप्रमाणें सर्व रोगांमध्यें साधारणतः दिसणारीं दोषांचीं लक्षणें

सांगितलीं. रोग व त्याच्या निरनिराळ्या अवस्था यांचें ज्ञान ज्यास उत्तम आहे, अशा वैद्यानें रोग्यांना क्षणोक्षणीं पाहून दर्शनादि रोगज्ञानाच्या साधनांनीं हीं लक्षणें नीटपणें समजून घ्यावीं.

अभ्यासात्प्राप्यते दृष्टिः कर्मसिद्धिप्रकाशिनी ।
रत्नादिसदसज्ज्ञानं न शास्त्रादेव जायते ॥ ५६ ॥

वैद्याला कर्मसिद्धि-प्रकाशिनी दृष्टिही विशेष अनुभवानें प्राप्त होते. रत्नादिकांचें खऱ्याखोट्याचें ज्ञान शास्त्रानें प्राप्त होत नाहीं.

दृष्टापचारजः कश्चित्कश्चित्पूर्वापराधजः ।
तत्संकराद्भवत्यन्यो व्याधिरेवं त्रिधा स्मृतः ॥ ५७ ॥

कित्येक व्याधि ऐहिक अपराधांपासून होतात; कांहीं पूर्वजन्मींच्या पातकानें होतात, व कांहीं दोन्हींच्या मिश्रणानें होतात. याप्रमाणें व्याधींचे तीन प्रकार आहेत.

यथानिदानं दोषोत्थः कर्मजो हेतुभिर्विना ।
महारंभोऽल्पके हेतावातंको दोषकर्मजः ॥ ५८ ॥

कारणानुरूप उत्पन्न होणारा व्याधि तो दोषज, कारणावांचून होणारा तो कर्मज, आणि थोड्या कारणानें मोठा व्याधि उत्पन्न होतो तो दोषकर्मज व्याधि होय.

विपक्षशीलनात्पूर्वः कर्मजः कर्मसंक्षयात् ।
गच्छत्युभयजन्मा तु दोषकर्मक्षयात्क्षयम् ॥ ५९ ॥

दोषज व्याधि, विरुद्ध गोष्टींच्या सेवनानें नाहींसा होतो; कर्मज व्याधि, प्रायश्चित्तानें कर्माचा नाश झाला म्हणजे नाहींसा होतो; आणि उभय प्रकारचा मिश्रव्याधि, त्या त्या कारणांचा क्षय झाल्यानें नाश पावतो.

द्विधा स्वपरतंत्रत्वाद्व्याधयः

व्याधींचे आणखी स्वतंत्र व परतंत्र असे दोन प्रकार आहेत.

अंत्याः पुनर्द्विधा ।
पूर्वजा पूर्वरूपाख्या जाता पश्चादुपद्रवाः ॥ ६० ॥

त्यांत परतंत्र व्याधींचे दोन पोटभेद आहेत. मुख्य व्याधीच्या पूर्वीं जो दिसतो, त्याला त्या वेळीं पूर्वरूप असें म्हणतात. व नंतर होतो त्यास उपद्रव असें म्हणतात.

यथास्वजन्मोपशयाः स्वतंत्राः स्पष्टलक्षणाः ।

जो रोग स्वतःच्या कारणानुरूप उत्पन्न होतो व त्यावरील उपचारानें शम पावतो, व ज्याचीं लक्षणें स्पष्ट असतात, त्याला स्वतंत्र व्याधि म्हणावें.

विपरीतास्ततोऽन्ये तु

याहून विपरीत तो परतंत्र होय.

विद्यादेवं मलानपि ॥ ६१ ॥

याचप्रमाणें दोषही स्वतंत्र किंवा परतंत्र असतात.

तान् लक्षयेदवहितो विकुर्वाणान् प्रतिज्वरम् ।
तेषां प्रधानप्रशमे प्रशमोऽशाम्यतस्तथा ॥ ६२ ॥
पश्चाच्चिकित्सेत्तूर्णं वा बलवंतमुपद्रवम् ।
व्याधिक्लिष्टशरीरस्य पीडाकरतरो हि सः ॥ ६३ ॥

प्रत्येक रोगामध्यें पीडा देणाऱ्या दोषांची परीक्षा सूक्ष्म रीतीनें करावी. स्वतंत्र व्याधीचा उपशम झाला म्हणजे साहजिक परतंत्र व्याधिही बरा होतो. कदाचित् असें न झाल्यास मागाहून परतंत्र व्याधीची स्वतंत्र व्याधीप्रमाणें चिकित्सा करावी. परंतु जर परतंत्र व्याधीचा जोर जास्त असेल, तर मात्र प्रथम त्याची चिकित्सा करावी. कारण व्याधीनें त्रस्त झालेल्या शरीरास तो अधिक त्रासदायक होतो.

विकारनामाकुशलो न जिह्रीयात्कदाचन ।
न हि सर्वविकाराणां नामतोऽस्ति ध्रुवा स्थितिः ॥ ६४ ॥

रोगाचें नांव कळलें नाहीं म्हणून वैद्यानें चिकित्सेंत मागेंपुढें पाहण्याचें कारण नाहीं. कारण, सर्व प्रकारच्या रोगांना नांवें दिलेलीं आहेतच, असें नाहीं.

स एव कुपितो दोषः समुत्थानविशेषतः ।
स्थानांतराणि च प्राप्य विकारान् कुरुते बहून् ॥ ६५ ॥

कारण, एकच दोष कुपित होऊन, उत्पत्तिविशेषानें आणि अन्यान्य स्थानांत जाऊन अनेक प्रकारचे विकार उत्पन्न करूं शकतो.

तस्माद्विकारप्रकृतीरधिष्ठानांतराणि च ।
बुध्द्वा हेतुविशेषांश्च शीघ्रं कुर्यादुपक्रमम् ॥ ६६ ॥

म्हणून विकारांचीं कारणें, त्यांचीं स्थानांतरें आणि हेतुविशेष हीं ध्यानांत आणून लौकर चिकित्सेचा आरंभ करावा.

दूष्यं देशं बलं कालमनलं प्रकृतिं वयः ।
सत्त्वं सात्म्यं तथाऽऽहारमवस्थाश्च पृथग्विधाः ॥ ६७ ॥
सूक्ष्मसूक्ष्माः समीक्ष्यैषां दोषौषधनिरूपणे ।
यो वर्तते चिकित्सायां न स स्खलति जातुचित् ॥ ६८ ॥

दोष आणि औषध यांच्या योजनेच्या वेळीं जो वैद्य दूष्य (बिघडलेला), देश, बल, काल, अग्नि, प्रकृति, वय, सत्त्व, सात्म्य (संवय), आहार, तसेंच त्यांच्या निरनिराळ्या अवस्था यांचें अगदीं बारीक रीतीनें अवलोकन करून वागतो, तो चिकित्सेंत कधींही चुकत नाहीं.

गुर्वल्पव्याधिसंस्थानं सत्त्वदेहबलाबलात् ।
दृश्यतेऽप्यन्यथाकारं तस्मिन्नवहितो भवेत् ॥ ६९ ॥

रोग्याच्या मनाच्या व शरीराच्या बलाप्रमाणें गुरु किंवा लघु व्याधींचें लक्षण अन्यथाही दिसण्याचा संभव असतो; म्हणून फार दक्षतेनें खरी स्थिति जाणण्याचा प्रयत्न करावा.

गुरुं लघुमिति व्याधिं कल्पयंस्तु भिषग्ब्रुवः ।
अल्पदोषाकलनया पथ्ये विप्रतिपद्यते ॥ ७० ॥

वैद्यपणाची घमेंड मारणारा, गुरु (मोठ्या) व्याधीस लघु (हलका) समजून, दोषाचें बल थोडें आहे असें समजून थोडें औषध देतो, व फसतो.

ततोऽल्पमल्पवीर्यं वा गुरुव्याधौ प्रयोजितम् ।
उदीरयेत्तरां रोगान् संशोधनमयोगतः ॥ ७१ ॥

त्यामुळें तो गुरुव्याधीवर थोडें किंवा थोड्या शक्तीचें औषध देतो, आणि त्या रोगाला पुरती मात्रा मिळाली नसल्यामुळें, चिकित्सेचा हीनयोग होऊन रोग अधिकच वाढतो.

शोधनं त्वतियोगेन विपरीतं विपर्यये ।
क्षिणुयान्न मलानेव केवलं वपुरस्यति ॥ ७२ ॥

किंवा एखादे वेळीं वरच्या विरुद्ध समजुतीमुळें, औषधाचा अतियोग होऊन, मलाचाच नाश न होतां, रोग्याच्या शरीराचाही नाश होतो.

अतोऽभियुक्तः सततं सर्वमालोच्य सर्वथा ।
तथा युंजीत भैषज्यमारोग्याय यथा ध्रुवम् ॥ ७३ ॥

यासाठीं सर्वदा तत्पर राहून, सर्वथा सर्व बाजू नीट पाहून, अशी औषध योजना करावी कीं, तीमुळें खात्रीनें रोग बरा होईल.

**वक्ष्यंतेऽतःपरं दोषा वृद्धिक्षयविभेदतः ।**

आतां वृद्धिक्षय-भेदांनीं दोषांची संख्या सांगतों.

**पृथक् त्रीन् विद्धि संसर्गस्त्रिधा तत्र तु तान्नव ॥ ७४ ॥**
**त्रीनेव समया वृद्ध्या षडेकस्यातिशायने ।**

दोषांच्या निरनिराळ्या वृद्धि तीन ( वात, पित्त व कफ ); संसर्ग तीन प्रकारचा ( वातपित्त, कफपित्त व वातकफ ); त्यांचे पुनः ९ भेद आहेतः—समानवृद्धीनें तीन प्रकारचे व एक दोषाच्या आधिक्यानें सहा प्रकारचे संसर्ग होतातः—( वातवृद्ध, पित्त वृद्धतर; पित्त वृद्ध, वात वृद्धतर; कफ वृद्ध, पित्त वृद्धतर; पित्त वृद्ध, कफ वृद्धतर; कफ वृद्ध, वात वृद्धतर; व वात वृद्ध, कफ वृद्धतर. )

**त्रयोदश समस्तेषु षड्द्व्येकातिशयेन तु ॥ ७५ ॥**
**एकं तुल्याधिकैः षट् च तारतम्यविकल्पनात् ।**

सन्निपातांत ( तिन्ही दोषांच्या मिश्रणांत ) दोहोंच्या व एकेकाच्या आधिक्यानें सहा; तिन्ही दोषांच्या समान वृद्धीनें एक; आणि तिन्ही दोष एकाहून एक जास्त वृद्ध झाल्यानें सहा भेद, याप्रमाणें सन्निपाताचे एकंदर तेरा भेद होतात.

**पंचविंशतिमित्येवं वृद्धैः क्षीणैश्च तावतः ॥ ७६ ॥**

असे, दोषांच्या वृद्धीमुळें एकंदर पंचवीस भेद झाले. शिवाय वृद्धीप्रमाणें क्षयाचेही तितके व तसेच भेद होतात.

**एकैकवृद्धिसमताक्षयैः षट् ते**

त्याशिवाय तिन्ही दोषांच्या सन्निपातांत एका दोषाची वृद्धि, दुसऱ्याची समता व तिसऱ्याची क्षीणता या प्रकारांमुळें सहा भेद होतात.

**पुनश्च षट् ।**
**एकक्षयद्वंद्ववृद्ध्या सविपर्यययाऽपि ते ।**

नंतर एकाचा क्षय व दोघांची वृद्धि आणि दोहोंचा क्षय व एकाची वृद्धि यामुळें सहा भेद होतात.

भेदा द्विषष्टिर्निर्दिष्टाः

हे दोषांचे ६२ भेद सांगितले.

त्रिषष्टः स्वास्थ्यकारणम् ॥ ७७ ॥

त्रेसष्टावा भेद आरोग्यास कारण आहे.

संसर्गाद्रसरुधिरादिभिस्तथैषां
दोषांस्तु क्षयसमताविवृद्धिभेदैः ।
आनंत्यं तरतमयोगतश्च यातान्
जानीयादवहितमानसो यथास्वम् ॥ ७८ ॥

याशिवाय रसरक्तादिकांशीं दोषांचा संयोग झाल्यानें, क्षय-समता-विवृद्धि यांच्या तारतम्यानें (कमजास्त प्रमाणानुरूप) दोषांचे अनंत भेद होतात; ते विचार करून समजून घ्यावे.

---

## अध्याय तेरावा.

अथाऽतो दोषोपक्रमणीयमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां दोषांची चिकित्सा सांगतों.

वातस्योपक्रमः स्नेहः स्वेदः संशोधनं मृदु ।
स्वाद्वम्ललवणोष्णानि भोज्यान्यभ्यंगमर्दनम् ॥ १ ॥
वेष्टनं त्रासनं सेको मद्यं पैष्टिकगौडिकम् ।
स्निग्धोष्णा बस्तयो बस्तिनियमः सुखशीलता ॥ २ ॥
दीपनैः पाचनैः सिद्धाः स्नेहाश्चानेकयोनयः ।
विशेषान्मेद्यंपिशितरसतैलानुवासनम् ॥ ३ ॥

वातदोषावर स्नेह, स्वेद, मृदु (हलकें), रेचक, स्वादु, अम्ल, खारट व उष्ण असा आहार; अभ्यंग, मर्दन, वेष्टन (ऊबदार वस्त्रांनीं गुंडाळणें), भिवविणें; काढे वगैरे द्रव पदार्थांची धार धरणें, पिठाचें व गुळाचें मद्य, स्निग्धोष्ण बस्तिक्रिया, मात्राबस्ति, सुख लागेल अशा रीतीनें असणें व पाचन आणि दीपन औषधांनीं बनविलेलीं तेलें, घृतें, वगैरे, आणि विशेषेंकरून मेदस्वी मांसाचा सुरवा व तेल यांचा अनुवासनबस्ति यांचा उपयोग करावा.

पित्तस्य सर्पिषः पानं स्वादुशीतैर्विरेचनम् ।
स्वादुतिक्तकषायाणि भोजनान्यौषधानि च ॥ ४ ॥
सुगंधशीतहृद्यानां गंधानामुपसेवनम् ।
कंठेगुणानां हाराणां मणीनामुरसा धृतिः ॥ ५ ॥

कर्पूरचंदनोशीरैरनुलेपः क्षणे क्षणे ।
प्रदोषश्चंद्रमाः सौधं हारि गीतं हिमोऽनिलः ॥ ६ ॥
अयंत्रणसुखं मित्रं पुत्रः संदिग्धमुग्धवाक् ।
छंदानुवर्तिनो दाराः प्रियाः शीलविभूषिताः ॥ ७ ॥
शीतांबुधारागर्भाणि गृहाण्युद्यानदीर्घिकाः ।
सुतीर्थविपुलस्वच्छसलिलाशयसैकते ॥ ८ ॥
सांभोजजलतीरांते कायमाने द्रुमाकुले ।
सौम्या भावाः पयः सर्पिर्विरेकश्च विशेषतः ॥ ९ ॥

पित्तदोषावर तूप पिणें, मधुर व शीत औषधांचें रेचक, मधुर, कडू व तुरट असा आहार व तशींच औषधें; सुगंध, शीत व आल्हादकारक गंधाची उटी, गळ्यांत मोत्यांची कंठी–हार; व उरावर रत्नांचे हार, कापूर, चंदन, वाळा यांचा वारंवार लेप; प्रदोषसमयीं चांदण्यांत गच्चीवर बसणें; मनोरंजक गाणें, थंड वायु, मन मोकळें असणारे मित्र, बोबडें व मधुर बोलणारीं मुलें; आवडत्या, आपल्या इच्छेनुरूप वागणाऱ्या व सुशील बायका, ज्यांत थंड पाण्याचीं कारंजीं उडत आहेत अशीं घरें; स्वच्छ व विपुल पाणी ज्यांत आहे, अशा विस्तृत जलाशयाजवळील वाळवंटांत–कमलयुक्त जलानें वेष्टित व अनेक प्रकारच्या वृक्षांनीं युक्त अशा ठिकाणची पर्णकुटी यांचें सेवन; आणि विशेषेंकरून सौम्य पदार्थ, दूध व विरेचन यांची योजना करावी.

श्लेष्मणो विधिना युक्तं तीक्ष्णं वमनरेचनम् ।
अन्नं रूक्षाल्पतीक्ष्णोष्णं कटुतिक्तकषायकम् ॥ १० ॥
दीर्घकालस्थितं मद्यं रतिप्रीतिः प्रजागरः ।
अनेकरूपो व्यायामश्चिंता रूक्षं विमर्दनम् ॥ ११ ॥
विशेषाद्वमनं यूषः क्षौद्रं मेदोघ्नमौषधम् ।
धूमोपवासगंडूषा निःसुखत्वं सुखाय च ॥ १२ ॥

कफदोषावर विधिपूर्वक तीक्ष्ण वमन व रेचन; तिखट, कडू व तुरट रसांनीं युक्त, रूक्ष, थोडा, तीक्ष्ण व उष्ण असा आहार; फार दिवसांचें मद्य, रतिसुखाची इच्छा, जागरण, अनेक प्रकारचा व्यायाम, चिंता, रूक्ष औषधांचें मर्दन; आणि विशेषेंकरून वमन,

कढण, मध, मेदोनाशक औषध, धूमपान, उपवास, गुळण्या आणि आरोग्यासाठीं चैनीचे पदार्थ वर्ज्य करणें, यांपासून फायदा होतो.

उपक्रमः पृथग्दोषान् योऽयमुद्दिश्य कीर्तितः।
संसर्गसन्निपातेषु तं यथास्वं विकल्पयेत् ॥ १३ ॥

याप्रमाणें दोषांना जिंकण्यासाठीं निरनिराळा उपक्रम सांगितला; त्याला अनुसरून संसर्ग व सन्निपातामध्यें दोषप्रकोपाच्या मानाप्रमाणें तसतशी चिकित्सा करावी.

ग्रैष्मः प्रायो मरुत्पित्ते वासंतः कफमारुते।
मरुतो योगवाहित्वात्कफपित्ते तु शारदः ॥ १४ ॥

सामान्यतः वातपित्तात्मक संसर्गावर ग्रीष्मऋतूप्रमाणें व कफवायूवर वसंताप्रमाणें उपचार करावे. कारण, वायु हा योगवाही आहे, म्हणून त्याच्याशीं ज्याचा संसर्ग असेल, त्याला धरूनच त्याचीही चिकित्सा केली पाहिजे. कफपित्तावर शरदृतूप्रमाणें चिकित्सा करावी.

चय एव जयेद्दोषं कुपितं त्वविरोधयन्।
सर्वकोपे बलीयांसं शेषदोषाविरोधतः ॥ १५ ॥

कुपित झालेल्या दोषांना विरोध न होईल अशा रीतीनें, सांचलेल्या दोषाला प्रथम जिंकावें. सर्वांचाच कोप झाला असेल, तर त्यांत जो विशेष बलिष्ठ असेल त्याची चिकित्सा प्रथम करावी; पण इतर दोषांशीं त्या चिकित्सेचा विरोध होऊं देऊं नये.

प्रयोगः शमयेद्व्याधिं योऽन्यमन्यमुदीरयेत्।
नाऽसौ विशुद्धः शुद्धस्तु शमयेद्यो न कोपयेत् ॥ १६ ॥

ज्या योगानें एक रोग बरा होतो व दुसरा जोर करीत जातो ती कांहीं खरी चिकित्सा नव्हे. एका रोगाचें किंवा दोषाचें शमन करतांना दुसरा रोग किंवा दोष यांचा कोप होणें योग्य नाहीं.

व्यायामादूष्मणस्तैक्ष्ण्यादहिताचरणादपि।
कोष्ठाच्छाखास्थिमर्माणि द्रुतत्वान्मारुतस्य च ॥ १७ ॥
दोषा यांति

कोठ्यांतील दोष व्यायामामुळें, उष्णतेच्या तीक्ष्णतेमुळें, अहितकारक आहारविहारामुळें व वायूच्या तीव्र वेगामुळें शाखा, अस्थि व मर्म यांच्यांत प्रवेश करतात.

तथा तेभ्यः स्रोतोमुखविशोधनात् ।
वृद्ध्याभिष्यंदनात्पाकात्कोष्ठं वायोश्च निग्रहात् ॥ १८ ॥

याचप्रमाणें शाखादिकांतील दोष स्रोतसांच्या मुखांचें शोधन, दोषांची वृद्धि, पातळपणा, पाचन व वायूचा जोर यांमुळें कोठ्यांत आणतां येतात.

तत्रस्थाश्च विलंबेरन् भूयो हेतुप्रतीक्षिणः ।
ते कालादिबलं लब्ध्वा कुप्यंत्यन्याश्रयेष्वपि ॥ १९ ॥

त्या त्या स्थानीं गेल्यावर ते लागलीच विकार उत्पन्न करतात असें नाहीं; तर निमित्ताची वाट पाहून कालादिकांचें बल मिळालें म्हणजे, ते जरी स्वतःच्या जागीं नसतात तरी, तेथेंही कोप पावतात.

तत्राऽन्यस्थानसंस्थेषु तदीयामबलेषु तु ।
कुर्याच्चिकित्सां स्वामेव बलेनान्याभिभाविषु ॥ २० ॥

अशा प्रकारच्या दोषांची चिकित्सा करणें ती, ते बलवान् नसतील तर त्यांच्या मूळ स्थानास अनुसरून करावी. पण ते जर अन्यस्थानीं बलिष्ठ झाले असतील, तर मात्र त्या अन्यस्थानास अवलंबून त्यांची चिकित्सा करावी.

आगंतुं शमयेद्दोषं स्थानिनं प्रतिकृत्य वा ।

अथवा स्थानिक दोषांची अगोदर चिकित्सा करून, नंतर आगंतु दोषाचा नाश करावा.

प्रायस्तिर्यग्गता दोषाः क्लेशयंत्यातुरांश्चिरम् ॥ २१ ॥
कुर्यान्न तेषु त्वरया देहाग्निबलविक्रियाम् ।
शमयेत्तान् प्रयोगेण सुखं वा कोष्ठमानयेत् ॥ २२ ॥
ज्ञात्वा कोष्ठप्रपन्नांश्च यथासन्नं विनिर्हरेत् ।

बहुतकरून स्थानांतर करून गेलेले दोष रोग्याला फार दिवसपर्यंत त्रास देतात; म्हणून देहबल व अग्निबल ध्यानांत आणून, त्यांचा प्रतिकार घाईघाईनें न करितां सावकाशपणीं करावा. त्यांचा त्या अन्यस्थानांतच प्रशम करावा; किंवा युक्तीनें, त्रास न होतां ते कोठ्यांत आणावे. आणि ते कोठ्यांत आलेले बरोबर ताडून नंतर ज्या बाजूनें जवळ पडेल तिकडून त्या दोषांस बाहेर काढून टाकावें.

स्रोतोरोधबलभ्रंशगौरवानिलमूढताः ॥ २३ ॥
आलस्यापक्तिनिष्ठीवमलसंगारुचिक्लमाः ।
लिंगं मलानां सामानां निरामाणां विपर्ययः ॥ २४ ॥

स्रोतांचा अवरोध, बलहानि, जडता, वायूचा अव्यवस्थित संचार, आळस, अपचन, तोंडास पाणी सुटणें, मलबद्धता, अरुचि, ग्लानि हीं सामदोषांचीं चिन्हें होत. निरामदोषांचीं चिन्हें याच्या उलट असतात.

ऊष्मणोऽल्पबलत्वेन धातुमाद्यमपाचितम् ।
दुष्टमामाशयगतं रसमामं प्रचक्षते ॥ २५ ॥

अग्नीच्या मंदपणामुळें, शरीरांतील पहिला धातु जो रस, तो आमाशयांत परिपक्व न होतां तसाच राहून, वातादि दोषांच्या संयोगानें बिघडला, म्हणजे त्या रसाला आम अशी संज्ञा आहे.

अन्ये दोषेभ्य एवातिदुष्टेभ्योऽन्योन्यमूर्च्छनात् ।
कोद्रवेभ्यो विषस्येव वदंत्यामस्य संभवम् ॥ २६ ॥

कित्येक असें म्हणतात कीं, ज्याप्रमाणें दोन जातीचे हरीक एके ठिकाणीं झाल्यास विषरूप होतात, त्याचप्रमाणें दोषांच्याच परस्पर मिश्रणानें आमाची उत्पत्ति होते.

आमेन तेन संपृक्ता दोषा दूष्याश्च दूषिताः ।
सामा इत्युपदिश्यंते ये च रोगास्तदुद्भवाः ॥ २७ ॥

वातादि दोष, रसादि दूष्य व त्यांमुळें उद्भवणारे रोग या आमानें युक्त असले म्हणजे त्यांना साम असें म्हणतात.

सर्वदेहप्रविसृतान् सामान् दोषान्न निर्हरेत् ।
लीनान् धातुष्वनुत्क्लिष्टान् फलादामाद्रसानिव ॥ २८ ॥
आश्रयस्य हि नाशाय ते स्युर्दुर्निर्हरत्वतः ।

सर्व देहांत पसरलेले, धातूंत लीन झालेले व स्वस्थानापासून च्युत न झालेले जे साम दोष त्यांना एकदम बाहेर काढून टाकूं नये. ज्याप्रमाणें अपक्व आंब्यांतील रस काढूं गेलें असतां तो न निघतां, आंब्याचाही नाश होतो, त्याप्रमाणें साम दोषांना बाहेर काढण्याचा प्रयत्न करण्यानें त्यांचा नाश न होतां, शरीराचा मात्र नाश होतो.

पाचनैर्दीपनैः स्नेहैस्तान् स्वेदैश्च परिष्कृतान् ॥ २९ ॥
शोधयेच्छोधनैः काले यथासन्नं यथाबलाम् ।

यासाठीं त्यांवर पाचन, दीपन, स्नेहन व स्वेदन हे संस्कार करून, नंतर योग्य कालीं, शक्ति-मान पाहून व जवळच्या मार्गानें त्यांचें शोधन करावें.

हंत्याशु युक्तं वक्रेण द्रव्यमामाशयान्मलान् ॥ ३० ॥
घ्राणेन चोर्ध्वजत्रूत्थान् पक्काधानाद्गुदेन च ।

आमाशयांतील मलांना, तोंडावाटे दिलेलें औषध लौकर जिंकूं शकतें. ऊर्ध्वजत्रुरोगांत ( गळ्यापासून वरच्या ) दोषांना, नाकावाटे दिलेलें औषध लौकर जिंकतें. आणि आंतड्यांतील दोषांना गुदद्वारा दिलेलें ( बस्तिद्वारा ) लौकर जिंकतें.

उत्क्लिष्टानध ऊर्ध्वं वा न चामान्वहतः स्वयम् ॥ ३१ ॥
धारयेदौषधैर्दोषान् विधृतास्ते हि रोगदाः ।
प्रवृत्तान् प्रागतो दोषानुपेक्षेत हिताशिनः ॥ ३२ ॥
विबद्धान् पाचनैस्तैस्तैः पाचयेन्निर्हरेत वा ।

जर स्वस्थानापासून चलित होऊन, ऊर्ध्व किंवा अधोमार्गानें ते दोष आपोआप आमदोषास बाहेर काढूं लागले, तर त्यांना प्रतिबंध करूं नये. तसें केल्यास अनेक प्रकारचे रोग उत्पन्न होतात. म्हणून त्या वेळीं फक्त पथ्यानें वागून त्यांची उपेक्षा करावी. जर ते बद्ध होऊन राहिले असले, तर पाचन क्रियांनीं पक्क करावे किंवा बाहेर काढून टाकावे.

श्रावणे कार्तिके चैत्रे मासि साधारणे क्रमात् ॥ ३३ ॥
ग्रीष्मवर्षाहिमचितान् वाय्वादीनाशु निर्हरेत् ।

ग्रीष्म ऋतूंत सांचणाऱ्या वायूचें शोधन श्रावण महिन्यांत करावें; वर्षाऋतूंत सांचणाऱ्या पित्ताचें शोधन कार्तिक महिन्यांत करावें, आणि हेमंतशिशिरांत सांचणाऱ्या कफाचें शोधन चैत्र महिन्यांत करावें. हे सर्वसामान्य काल आहेत.

अत्युष्णवर्षशीता हि ग्रीष्मवर्षाहिमागमाः ॥ ३४ ॥
संधौ साधारणे तेषां दुष्टान दोषान् विशोधयेत् ।
स्वस्थवृत्तमभिप्रेत्य व्याधौ व्याधिवशेन तु ॥ ३५ ॥

ग्रीष्म, वर्षा व हिम यांत उष्णता, पर्जन्य व शीतता हीं अनुक्रमें जास्त असतात, म्हणून त्यांचे जे संधीचे दिवस, तेच शोधनास योग्य आहेत. तथापि हा काल, निरोगी मनुष्यांसाठीं आहे. रोगी मनुष्याला रोगानुरूप त्या त्या वेळीं शोधन द्यावें.

कृत्वा शीतोष्णवृष्टीनां प्रतीकारं यथायथम् ।
प्रयोजयेत्क्रियां प्राप्तां क्रियाकालं न हापयेत् ॥ ३६ ॥

जर शीतोष्णवर्षाऋतूंतच रोग्याला शोधन देणें असेल, तर त्या वेळीं शीतादिकांचा योग्य बंदोबस्त करूनच शोधन द्यावें; पण शोधनाची वेळ दवडूं नये.

युंज्यादनन्नमन्नादौ मध्येऽते कवलांतरे ।
ग्रासे ग्रासे मुहुः सान्नं सामुद्गं निशि चौषधम् ॥ ३७ ॥

जेवण्यापूर्वीं औषध जिरेल अशा वेळीं, जेवण्यापूर्वीं, जेवणाच्या मध्यभागीं, भोजनोत्तर, एकेक घास आड टाकून प्रत्येक घासाशीं, वारंवार, सर्व जेवणाबरोबर, सामुद्ग (भोजन) होतांच आणि रात्रीं निजते वेळीं; हे औषध देण्याचे काल आहेत.

कफोद्रेके गदेऽनन्नं बलिनो रोगरोगिणोः ।

रोग आणि रोगी बलिष्ठ असूत, कफाधिक्य असल्यास अनशेपोटीं औषध द्यावें.

अन्नादौ विगुणेऽपाने

अपानवायूचा कोप असल्यास जेवण्यापूर्वीं औषध द्यावें.

समाने मध्य इष्यते ॥ ३८ ॥

समानवायूचा कोप असल्यास भोजनाच्या मध्यभागीं औषध द्यावें.

व्यानेऽते प्रातराशस्य

व्यानवायूचा कोप असल्यास सकाळच्या भोजनानंतर औषध द्यावें.

सायमाशस्य तूत्तरे ।

उदान वायूचा कोप असल्यास रात्रीच्या जेवणानंतर औषध द्यावें.

ग्रासग्रासांतयोः प्राणे प्रदुष्टे मातरिश्वनि ॥ ३९ ॥

प्राणवायूचा कोप असल्यास औषध घासाबरोबर किंवा घासाच्या शेवटीं द्यावें.

मुहुर्मुहुर्विषच्छर्दिहिध्मातृट्श्वासकासिषु ।

विषबाधा, वांति, उचकी, तृषा, श्वास व कास ह्या विकारांमध्यें वरचेवर द्यावें.

योज्यं सभोज्यं भैषज्यं भोज्यैश्चित्रैररोचके ॥ ४० ॥

अरोचकामध्यें औषध नानाप्रकारच्या खाण्याच्या पदार्थांशीं मिश्र करून द्यावें.

कंपाक्षेपकहिध्मासु सामुद्गं लघुभोजिनाम् ।

कंप, आक्षेप ( आचके ) व उचकी या विकारांत औषध भोजनाच्या पूर्वी व मागाहून देऊन, हलका आहार करावा.

ऊर्ध्वजत्रुविकारेषु स्वप्नकाले प्रशस्यते ॥ ४१ ॥

आणि ऊर्ध्वजत्रुविकारांत ( गळ्यापासून वरच्या रोगांत ) औषध निजते वेळीं द्यावें.

---

## अध्याय चौदावा.

अथाऽतो द्विविधोपक्रमणीयमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां चिकित्सेच्या दोन पद्धति सांगतों.

उपक्रम्यस्य हि द्वित्वाद्द्विधैवोपक्रमो मतः ।
एकः संतर्पणस्तत्र द्वितीयश्चापतर्पणः ॥ १ ॥
बृंहणो लंघनश्चेति तत्पर्यायावुदाहृतौ ।

रोग दोन प्रकारचे असल्यामुळें चिकित्साही दोनच प्रकारची मानली जाते. एक संतर्पणरूप व दुसरी अपतर्पणरूप. यांस अनुक्रमें बृंहण व लंघन अशीं दुसरीं नांवें आहेत.

बृंहणं यद्बृहत्त्वाय लंघनं लाघवाय यत् ॥ २ ॥
देहस्य

जें शरीरास बृहत्व म्हणजे पुष्टि देतें, तें बृंहण; व जें शरीरास लाघव म्हणजे हलकेपणा—कृशता आणितें तें लंघन.

भवतः प्रायो भौमापमितरच्च ते ।

संतर्पण पदार्थ बहुतकरून पृथ्वीजलप्रधान असतात. आणि अपतर्पणपदार्थांत बहुधा अग्नि, वायु, आकाश, यांचें आधिक्य असतें.

स्नेहनं रूक्षणं कर्म स्वेदनं स्तंभनं च यत् ॥ ३ ॥
भूतानां तदपि द्वैध्याद्द्वितयं नाऽतिवर्तते ।

स्नेहन, रूक्षण, स्वेदन व स्तंभन या चार कर्मांचाही संतर्पण व अपतर्पण यांत समावेश होतो. कारण पंचमहाभूतांत हेच दोन मुख्य गुण आहेत, आणि स्नेहन, रूक्षण वगैरे कर्में करणारीं द्रव्यें पंचमहाभौतिकच आहेत.

शोधनं शमनं चेति द्विधा तत्राऽपि लंघनम् ॥ ४ ॥

त्यांपैकीं लंघनांत पुन्हा शोधन व शमन असे दोन प्रकार आहेत.

यदीरयेद्बहिर्दोषान्पंचधा शोधनं च तत् ।
निरूहो वमनं कायशिरोरेकोऽस्रविस्रुतिः ॥ ५ ॥

जें औषध अंतस्थ दोषांस बाहेर काढितें, तें शोधन. तें पांच प्रकारचें आहे; बस्ति, वमन, रेचन, शिरोविरेचन अथवा नस्य, आणि रक्तस्राव.

न शोधयति यद्दोषान् समान्नोदीरयत्यपि ।
समीकरोति विषमान् शमनं तच्च सप्तधा ॥ ६ ॥
पाचनं दीपनं क्षुत्तृड्व्यायामातपमारुताः ।

जें औषध दोषांस बाहेरही काढीत नाहीं व सम दोषांस वाढवीतही नाहीं, पण कमीजास्त झालेल्या दोषांस सम करितें, त्यास शमन म्हणतात. तें सात प्रकारचें आहे. पाचन, दीपन, न जेवणें, पाणी न पिणें, व्यायाम, उन्ह घेणें आणि वारा घेणें.

बृंहणं शमनं त्वेव वायोः पित्तानिलस्य च ॥ ७ ॥

वायूवर व पित्तयुक्त वायूवर बृंहण औषधेंच शमनाप्रमाणें उपयोगीं पडतात.

बृंहयेद्व्याधिभैषज्यमद्यस्त्रीशोककर्शितान् ।
भाराध्वोरःक्षतक्षीणरूक्षदुर्बलवातलान् ॥ ८ ॥
गर्भिणीसूतिकाबालवृद्धान् ग्रीष्मेऽपरानपि ।
मांसक्षीरसितासर्पिर्मधुरस्निग्धबस्तिभिः ॥ ९ ॥
स्वप्नशय्यासुखाऽभ्यंगस्नाननिर्वृतिहर्षणैः ।

रोग, औषध, मद्य, स्त्रीसंग, शोक यांनीं कृश झालेले; ओझें वाहणें, रस्ता चालणें व उरःक्षत यांनीं क्षीण झालेले; रूक्ष, अशक्त, वातप्रकृतीचे, गर्भिणी, बाळंतीण, मुलें व म्हातारे यांना बृंहण द्यावें. ग्रीष्मऋतूंत सर्वांसच बृंहण द्यावें. तें मांस, दूध, साखर, तूप, मधुर

व स्निग्ध बस्ति, झोंप, बिछान्यावर चैनीनें पडून राहणें, सुखदायक अभ्यंगस्नान, मनाची स्वस्थता, आणि हर्ष या उपायांनीं देतां येतें.

मेहामदोषाऽतिस्निग्धज्वरोरुस्तंभकुष्ठिनः ॥ १० ॥
विसर्पविद्रधिप्लीहशिरः कंठाक्षिरोगिणः ।
स्थूलांश्च लंघयेन्नित्यं शिशिरे त्वपरानपि ॥ ११ ॥

प्रमेह, आमदोष, अतिस्निग्धता, ताप, मांड्या आंखडणें, कुष्ठ, विसर्प, विद्रधि, पानथरी, डोकें, गळा व डोळे यांचे रोग असलेले, आणि स्थूल मनुष्य यांना लंघन द्यावें. हिंवाळ्यांत सर्वांनींच लंघन करावें.

तत्र संशोधनैः स्थौल्यबलपित्तकफाधिकान् ।
आमदोषज्वरच्छर्दिरतीसारहृदामयैः ॥ १२ ॥
विबंधगौरवोद्गारहृल्लासादिभिरातुरान् ।

त्यांपैकीं ज्यांच्यांत स्थूलता, बळ, पित्त व कफ हे अधिक असून ज्यांस आमदोष, ताप, उलटी, जुलाब, हृद्रोग, मलावरोध, जडत्व, ढेंकर, मळमळ वगैरे विकार असतील त्यांना विरेचन द्यावें.

मध्यस्थौल्यादिकान् प्रायः पूर्वं पाचनदीपनैः ॥ १३ ॥

ज्यांच्यांत स्थूलता वगैरे गोष्टी मध्यम प्रमाणांत असून ज्यांस आमदोष वगैरे विकार असतील, त्यांस प्रथम पाचक व दीपक औषधें देऊन लंघन द्यावें.

एभिरेवामयैरार्तान् हीनस्थौल्यबलादिकान् ।
क्षुत्तृष्णानिग्रहैर्दोषैस्त्वार्तान्मध्यबलैर्दृढान् ॥ १४ ॥
समीरणातपायासैः किमुताल्पबलैर्नरान् ।

ज्यांच्यांत स्थूलता वगैरे फारच कमी प्रमाणांत असून सदरहू विकार झाले असतील त्यांचें लंघन न जेवल्यानें व पाणी न प्याल्यानें होतें. रोगी सशक्त असून दोषांचें बळ मध्यम असल्यास त्याचें वारा, ऊन व व्यायाम या उपायांनीं लंघन करावें. आणि दोषांचें बळ अगदीं कमी असल्यासही याच उपायांनीं लंघन करावें, हें सांगावयास नकोच.

न बृंहयेल्लंघनीयान्

लंघनयोग्य मनुष्यास कोणत्याही सबबीवर बृंहण देऊं नये.

बृंह्यांस्तु मृदु लंघयेत् ॥ १५ ॥
युक्त्या वा देशकालादिबलतस्तानुपाचरेत् ।

बृंहणयोग्य मनुष्यास एखादा लंघनसाध्य रोग झाल्यास त्यास हलकेंसें लंघन द्यावें, किंवा देशकाल पाहून योग्य ती योजना करावी.

बृंहिते स्याद्बलं पुष्टिस्तत्साध्यामयसंक्षयः ॥ १६ ॥

बृंहण झालें असतां शक्ति व पुष्टि हीं प्राप्त होतात आणि बृंहणानें बरे होणारे रोग नाहींसे होतात.

विमलेंद्रियता सर्गो मलानां लाघवं रुचिः ।
क्षुत्तृट्सहोदयः शुद्धहृदयोद्गारकंठता ॥ १७ ॥
व्याधिमार्दवमुत्साहस्तंद्रानाशश्च लंघिते ।

लंघनानें इंद्रियांची निर्मलता, मलोत्सर्ग, अंग हलकें होणें, रुचि, भूक व तहान एकदम लागणें, हृदय, कंठ व ढेंकर यांची शुद्धि, लंघनसाध्य रोग हलके पडणें, अंगांत तरतरी येणें व ग्लानि नाहींशी होणें हीं लक्षणें होतात.

अनपेक्षितमात्रादिसेविते कुरुतस्तु ते ॥ १८ ।
अतिस्थौल्यातिकार्श्यादीन् वक्ष्यंते ते च सौषधाः ।

बृंहण व लंघन, उपचार, प्रमाण वगैरेंचा विचार न करतां वाटेल तसें केल्यानें अनुक्रमें अतिस्थौल्यादि व अतिकार्श्यादि विकार होतात. ते व त्यावरचीं औषधें पुढें सांगितलीं आहेत.

रूपं तैरेव च ज्ञेयमतिबृंहितलंघिते ॥ १९ ॥

याच विकारांवरून बृंहणलंघनाचा अतियोग झाला असल्यास ओळखावा.

अतिस्थौल्यापचीमेहज्वरोदरभगंदरान् ।
काससंन्यासकृच्छ्रामकुष्टादीनतिदारुणान् ॥ २० ॥

अतिबृंहणानें अतिशय स्थूलता, अपची, प्रमेह, ताप, उदर, भगंदर, खोकला, संन्यास, मूत्रकृच्छ्र, आम, कुष्ठ, वगैरे अतिशय दारुण रोग होतात.

तत्र मेदोनिलश्लेष्मनाशनं सर्वमिष्यते ।

त्यांवर मेद, वायु व कफनाशक सर्व क्रिया कराव्या.

कुलत्थजूर्णश्यामाकयवमुद्गमधूदकम् ॥ २१ ॥

मस्तुदंडाहतारिष्टचिंताशोधनजागरम्।
मधुना त्रिफलां लिह्याद्गुडूचीमभयां घनम् ॥ २२ ॥

कुळीथ, जोंधळे, सांवे, जव, मूग, मध व पाणी, दह्याची निवळ ताक, अरिष्ट, चिंता, रेच व जागरण यांचें सेवन करावें. त्रिफळाचूर्ण, गुळवेलीचें चूर्ण, हिरड्याचें चूर्ण किंवा नागरमोथ्याचें चूर्ण मधांतून चाटावें.

रसांजनस्य महतः पंचमूलस्य गुग्गुलोः
शिलाजतोः प्रयोगश्च साग्निमंथरसो हितः ॥ २३ ॥

रसांजन, मोठें पंचमूळ, गुग्गुळ किंवा शिलाजित यांचें ऐरणीच्या रसांतून सेवन करावें.

विडंगं नागरं क्षारः काललोहरजो मधु ।
यवामलकचूर्णं च योगोऽतिस्थौल्यदोषजित् ॥ २४ ॥

वावडिंग, सुंठ, जवखार, मंडूरभस्म, सातूचें पीठ व आवळकठीचें चूर्ण मधाबरोबर सेवन केलें असतां अतिस्थूलत्व नष्ट होतें.

व्योषकट्वीवराशिग्रुविडंगाऽतिविषास्थिराः।
हिंगुसौवर्चलाजाजीयवानीधान्यचित्रकाः ॥ २५ ॥
निशे बृहत्यौ हपुषा पाठा मूलं च केंबुकात् ।
एषां चूर्णं मधु घृतं तैलं च सदृशांशकम् ॥ २६ ॥
सक्तुभिः षोडशगुणैर्युक्तं पीतं निहंति तत् ।
अतिस्थौल्यादिकान् सर्वान् रोगानन्यांश्च तद्विधान्॥२७॥
हृद्रोगकामलाश्वित्रश्वासकासगलग्रहान् ।
बुद्धिमेधास्मृतिकरं सन्नस्याग्नेश्च दीपनम् ॥ २८ ॥

त्रिकटु, कुटकी, त्रिफळा, शेवग्याच्या मुळाची साल, वावडिंग, अतिविष, सालवण, हिंग, पादेलोण, जिरें, ओवा, धणे चित्रक, हळद, दारूहळद, रिंगणीमूळ, थोर शेरणी, पाहाडमूळ व केंबुकमूळ यांचें समभाग चूर्ण मध, तूप व तेल आणि सोळापट सातूचें पिठ यांबरोबर सेवन केलें असतां पूर्वोक्त अतिस्थौल्यादि सर्व रोग, हृद्रोग, कावीळ, श्वेतकुष्ठ, दमा, खोकला, गलग्रह व यांसारखे दुसरे रोगही बरे होतात. हें बुद्धि, मेधा व स्मृति यांस वाढवितें आणि मंदाग्नीस प्रदीप्त करितें.

अतिकार्श्यं भ्रमः कासस्तृष्णाधिक्यमरोचकः।
स्नेहाऽग्निनिद्राद्दक्श्रोत्रशुक्रौजःक्षुत्स्वरक्षयः ॥ २९ ॥
बस्तिहृन्मूर्धजंघोरुत्रिकपार्श्वरुजा ज्वरः।
प्रलापोऽर्ध्वानिलग्लानिच्छर्दिः पर्वास्थिभेदनम् ॥ ३० ॥
विण्मूत्रादिग्रहाद्याश्च जायंतेऽतिविलंघनात्।

अतिलंघनानें अतिशय कृशता, श्रम, खोकला, फार तहान, अरुचि, स्निग्धता, अग्नि, निद्रा, दृष्टि, श्रवणशक्ति, वीर्य, ओज, भूक व स्वर यांचा क्षय; बास्ति, हृदय, डोकें, पोटऱ्या, मांड्या, माकडहाड व बरगड्या यांत दुखणें; ताप, बडबड, अर्धांगवायु, ग्लानि, उलटी, पेरें व हाडें फुटणें, मलमूत्रादिकांचा अवरोध वगैरे विकार होतात.

कार्श्यमेव वरं स्थौल्यान्न हि स्थूलस्य भेषजम् ॥ ३१ ॥
बृंहणं लंघनं नालमतिमेदोऽग्निवातजित्।
मधुरस्निग्धसौहित्यैर्यत्सौख्येन विनश्यति ॥ ३२ ॥
क्रशिमा स्थविमाऽत्यंतविपरीतनिषेवणैः।

अतिस्थूलपणापेक्षां अतिकृशता बरी. कारण अतिस्थूलतेवर कांहीं औषधच देतां येत नाहीं. बृंहण द्यावें तर त्यानें अग्नि व वायु यांचें शमन होतें, पण मेद वाढतो; आणि लंघनानें मेद झडतो, पण अग्नि व वायु वाढतात. त्या योगानें पुन्हा मेद वाढतो. मधुर व स्निग्ध पदार्थांचें तृप्ति होईपर्यंत सेवन केल्यानें अतिकृशत्व सहज नाहींसें होतें. परंतु स्थूलत्व नाहींसें करण्यास त्याच्या अत्यंत विपरीत उपचार करावे लागतात.

योजयेद्बृंहणं तत्र सर्वं पानान्नभेषजम् ॥ ३३ ॥

अतिकृशत्वावर सर्व प्रकारचा पुष्टिकारक अन्नपान व औषध यांची योजना करावी.

अचिंतया हर्षणेन ध्रुवं संतर्पणेन च।
स्वप्नप्रसंगाच्च कृशो वराह इव पुष्यति ॥ ३४ ॥

आनंद, पौष्टीक खाणें-पिणें आणि यथेच्छ झोंप घेणें या गोष्टींनीं कृश मनुष्य डुकराप्रमाणें पुष्ट होतो.

न हि मांससमं किंचिदन्यद्देहबृहत्त्वकृत्।
मांसादमांसं मांसेन संभृतत्वाद्विशेषतः ॥ ३५ ॥

मांसासारखा शरीरास पुष्ट करणारा दुसरा पदार्थ नाहीं. त्यांतही मांसाहारी प्राण्यांचें मांस मांसाचेंच बनलें असल्यामुळें अधिकच पुष्टिदायक असतें.

गुरु चातर्पणं स्थूले विपरीतं हितं कृशे ।

थोडक्यांत सांगायाचें म्हणजे जड व कृशत्वोत्पादक असे जेवढे पदार्थ ते सर्व स्थूल मनुष्यास हितकर; आणि हलके व पौष्टिक पदार्थ कृश मनुष्यास हितकर जाणावे.

यवगोधूममुभयोस्तद्योग्याहितकल्पनम् ॥ ३६ ॥

स्थूल मनुष्यास जवांचे व कृश मनुष्यास गव्हांचे पदार्थ योग्य रीतीनें तयार करून दिले असतां हितकर आहेत.

दोषगत्याऽतिरिच्यंते ग्राहिभेद्यादिभेदतः ।
उपक्रमा न ते द्वित्वाद्भिन्ना अपि गदा इव ॥ ३७ ॥

दोषांच्या निरनिराळ्या भेदामुळें चिकित्सेचेही ग्राही, भेदी इत्यादि अनेक प्रकार आहेत. परंतु जसे दोषांचे कितीही भेद झाले तरी रोग साम व निराम या दोन भेदांस सोडून राहात नाहींत, तद्वत्च चिकित्सेचेही किती भेद असेल तरी त्या सर्वांचा लंघन व बृंहण या दोन मुख्य प्रकारांतच अंतर्भाव होतो.

---

## अध्याय पंधरावा.

अथाऽतः शोधनादिगणसंग्रहमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां शोधनादिकांच्या उपयोगी द्रव्यांचा संग्रह सांगतों.

मदनमधुकलंबानिंबबिंबीविशाला--
त्रपुसकुटजमूर्वादेवदालीकृमिघ्नम् ।
विदुलदहनचित्राः कोशवत्यौ करंजः
कणलवणवचैलासर्षपाश्छर्दनानि ॥ १ ॥

गेळफळ, ज्येष्ठमध, कडू दूधभोंपळा, कडूलिंब, कडू तोंडलें, इंद्रायण, कडू कांकडी, कुडा, मोरवेल, देवडांगरी, वावडिंग, जळवेतस, चित्रक, दांती, कडू दोडके, कडू घोसाळें, करंज, पिंपळी, सैंधव, वेखंड, वेलची व शिरसा हीं वांतिकारक औषधें आहेत.

निकुंभकुंभात्रिफलागवाक्षीस्नुक्शंखिनीनीलिनितिल्वकानि ।
शम्याककंपिल्लकहेमदुग्धा दुग्धं च मूत्रं च विरेचनानि ॥ २ ॥

दंती, निशोत्तर, त्रिफळा, घोड इंद्रावण, तिधारी निवडुंग, सांखवेल, निळी, लोध्र, बाहवा, रेवाचिनी, पिंवळा घोतरा, दूध व मूत्र हीं रेचक आहेत.

मदनकुटजकुष्ठदेवदाली-
मधुकवचादशमूलदारुरास्नाः ।
यवमिसिकृतवेधनं कुलत्थो
मधुलवणं त्रिवृता निरूहणानि ॥ ३ ॥

गेळफळ, कुड्याची साल, कोष्ठ, देवडांगरी, ज्येष्ठमध, वेखंड, दशमुळें, देवदार, रास्ना, जव, बडीशोप, कडू दोडके, कुळी, मध, सैंधव व निशोत्तर हीं औषधें निरूह बस्तीच्या उपयोगाचीं आहेत.

वेल्लापामार्गव्योषदार्वीसुराला
बीजं शैरीषं बार्हतं शैग्रवं च ।
सारो माधूकः सैंधवं तार्क्ष्यशैलं
त्रुट्यौ पृथ्वीका शोधयंत्युत्तमांगम् ॥ ४ ॥

वावडिंग, आघाड्याचें बीं, त्रिकटु, दारुहळद, राळ, शिरस-बीज, रिंगणी, डोरली, शेवग्याच्या शेंगांतील बीं, मोहाच्या झाडाचा नार, सैंधव, रसांजन, लहान व मोठी वेलची व बाफळी हीं औषधें शिरोविरेचनांत ( नाक वहावणें ) वापरलीं जातात.

भद्रदारु नतं कुष्ठं दशमूलं बलाद्वयम् ।
वायुं वीरतरादिश्च विदार्यादिश्च नाशयेत् ॥ ५ ॥

देवदार, तगर, कोष्ठ, दशमूळ, चिकणा, सहदेवी, हीं आणि पुढें सांगितलीं जाणारीं वीरतरादि व विदार्यादि गणांतील औषधें वायुनाशक आहेत.

दूर्वाऽनंता निंबवासाऽत्मगुप्ता
गुंद्राऽभीरुः शीतपाकी प्रियंगुः ।
न्यग्रोधादिः पद्मकादिः स्थिरे द्वे
पद्मं वन्यं सारिवादिश्च पित्तम् ॥ ६ ॥

दूर्वा, घमासा, कडूलिंब, अडूळसा, कुहिली, गुंद्रा, शतावरी, पांढरी गुंज, गहुला, न्यग्रोधादि गण, पद्मकादि गण, सालवण, पिठवण, कमळ, भद्रमोथा, आणि सारिवादिगण पित्तनाशक आहेत.

आरग्वधादिरर्कादिर्मुष्ककाद्योसनादिकः ।
सुरसादिः समुस्तादिर्वत्सकादिर्बलासजित् ॥ ७ ॥

आरग्वधादि, अर्कादि, मुष्ककादि, असनादि, सुरसादि, मुस्तादि व वत्सकादि गणांतील औषधें कफनाशक आहेत.

जीवंती काकोल्यौ मेदे द्वे मुद्गमाषपर्ण्यौ च ।
ऋषभकजीवकमधुकं चेति गणो जीवनीयाख्यः ॥ ८ ॥

जीवंती, काकोली, क्षीरकाकोली, मेदा, महामेदा, मुद्गपर्णी, ऋषभक, जीवक व ज्येष्ठमध हा जीवनीय गण होय.

विदारिपंचांगुलवृश्चिकालीवृश्चीवदेवाह्वयशूर्पपर्ण्यः ।
कंडूकरी जीवनह्रस्वसंज्ञे द्वे पंचके गोपसुता त्रिपादी ॥ ९ ॥
विदार्यादिरयं हृद्यो बृंहणो वातपित्तहा ।
शोषगुल्मांगमर्दोर्ध्वश्वासकासहरो गणः ॥ १० ॥

भुईकोहळा, एरंड, मेढशिंग, पुनर्नवा, देवदार[1], मुद्गपर्णी, कुहिली, जीवनपंचमूळ, लघुपंचमूळ, उपळसरी, व तांबडी लाजाळू या सर्व औषधांस विदार्यादिगण म्हणतात. हा हृद्य, पौष्टिक, वातपित्तनाशक; आणि शोष, गुल्म, अंग वळणें, ऊर्ध्वश्वास व खोकला नाहींसा करणारा आहे.

सारिवोशीरकाश्मर्यमधूकशिशिरद्वयम् ।
यष्टी परूषकं हंति दाहपित्तास्रतृड्ज्वरान् ॥ ११ ॥

उपळसरी, वाळा, शिवणमूळ, मोहाचीं फुलें, पांढरें व तांबडें चंदन, ज्येष्ठमध व फालसा हा सारिवादि गण दाह, रक्तपित्त, तृषा व ज्वर यांस नष्ट करितो.

पद्मकपुंड्रौ वृद्धितुगर्ध्द्यः शृंग्यमृता दश जीवनसंज्ञाः ।
स्तन्यकरा घ्नंतीरणपित्तं प्रीणनजीवनबृंहणवृष्याः ॥ १२ ॥

पद्मकाष्ठ, पुंडरीक, मुंडी, वंशलोचन, गोरखमुंडी, काकडशिंगी, गुळवेल, आणि जीवनीय गणांतील दहा औषधें हीं सर्व मिळून पद्मकादि गण होतो. हा स्त्रियांचें दूध वाढविणारा, वातपित्तनाशक, तुष्टिदायक, आरोग्यप्रद, पौष्टिक व वीर्यवर्धक आहे.

---

१ पाठांतराप्रमाणें सहदेवी, विश्वदेवा.

परूषकं वरा द्राक्षा कट्फलं कतकत्फलम् ।
राजाह्वं दाडिमं शाकं तृण्मूत्रामयवातजित् ॥ १३ ॥

फालसा, त्रिफळा, काळीं द्राक्षें, कायफळ, निवळीचें बीं, खिरणी, डाळिंब व सागाचें बीं हा परूषकादि गण तृषा, मूत्ररोग व वायु यांचा नाश करितो.

अंजनं फलिनी मांसी पद्मोत्पलरसांजनम् ।
सैलामधुकनागाह्वं विषांतर्दाहपित्तनुत् ॥ १४ ॥

सुर्मा, गहुला, जटामांसी, पांढरें व चंद्रविकासी कमळ, रसांजन, वेलची, ज्येष्ठमध व नागकेशर हा अंजनादि गण विषविकार, अन्तर्दाह व पित्त यांचा नाश करितो.

पटोलकटुरोहिणीचंदनं मधुस्रवगुडूचिपाठान्वितम् ।
निहंति कफपित्तकुष्ठज्वरान् विषं वमिमरोचकं कामलाम् ॥ १५ ॥

कडू पडवळ, कुटकी, चंदन, मोरवेल, गुळवेल व पहाडमूळ हा पटोलादि गण कफ, पित्त, कुष्ठ, ज्वर, विष, वांति, अरुचि व कावीळ यांचा नाश करितो.

गुडूचीपद्मकारिष्टधानका रक्तचंदनम् ।
पित्तश्लेष्मज्वरच्छर्दिदाहतृष्णाघ्नमग्निकृत् ॥ १६ ॥

गुळवेल, पद्मकाष्ठ, कडूलिंब, धणे व रक्तचंदन हा गुडूच्यादि गण पित्त, कफ, ज्वर, उलटी, दाह व तृषा यांचा नाश करून अग्नि प्रदीप्त करितो.

आरग्वधेंद्रयवपाटलिकाकातिक्ता
निंबाऽमृतामधुरसास्रुववृक्षपाठाः ।
भूनिंबसैर्यकपटोलकरंजयुग्मं
सप्तच्छदाऽग्निसुषवीफलबाणघोंटाः ॥ १७ ॥

आरग्वधादिर्जयति छर्दिकुष्ठविषज्वरान् ।
कफं कंडूं प्रमेहं च दुष्टव्रणविशोधनः ॥ १८ ॥

बाहवा, इंद्रजव, पाडळ, सागरगोटी, कडूलिंब, गुळवेल, मोरवेल, बेहकळ, पहाडमूळ, कडू किराईत, कोरांटी, कडू पडवळ, करंज, घाणेरा करंज, सातवीण, चित्रक, कारली, गेळफळ, निळा कोरांटा व घोंटीबोर हीं औषधें आरग्वधादि गणांत येतात; तीं

उलटी, कुष्ठ, विष, ताप, कफ, कंडू व प्रमेह यांचा नाश करून दुष्ट व्रणाचें शोधन करितात.

असनतिनिशभूर्जश्वेतवातप्रकीर्या
खदिरकदरभंडीशिंशपामेषशृंग्यः।
त्रिहिमतलपलाशा जोंगकः शाकशालौ
क्रमुकधवकुलिंगच्छागकर्णाश्वकर्णाः॥ १९॥
असनादिर्विजयते श्वित्रकुष्ठकफक्रिमीन्।
पांडुरोगं प्रमेहं च मेदोदोषनिबर्हणः॥ २०॥

असाणा, तिवस, भूर्जवृक्ष, अर्जुनसादडा, घाणेरा करंज, खैर, पांढरा खैर, शिरीष, शिसव, मेढशिंगी, पांढरें चंदन, दारुहळद, ताड, पळस, अगर, साग, राळवृक्ष, सुपारी, धावडा, इंद्रजव, अजकर्ण व अश्वकर्ण हा असनादि गण पांढरें कुष्ठ, कुष्ठ, कफ, कृमि, पांडु, प्रमेह, व मेदोरोग यांस नष्ट करितो.

वरणसैर्यकयुग्मशतावरीदहनमोरटाबिल्वविषाणिकाः।
द्विबृहतीद्विकरंजजयाद्वयं वहलपल्लवदर्भरुजाकराः॥२१॥
वरणादिः कफं मेदो मंदाग्नित्वं नियच्छति।
अधोवातं शिरःशूलं गुल्मं चांतःसविद्रधिम्॥ २२॥

वायवरणा, तांबडा व पिंवळा कोरांटा, शतावरी, चित्रक, मोरवेल, बेल, मेढशिंगी, रिंगणी, डोरली, करंज, घाणेरा करंज, ऐरण, हिरडा, शेवगा, दर्भमूळ व रुई, हा वरणादि गण कफ, मेद, अग्निमांद्य, अधोवात, मस्तकशूळ, गुल्म व अन्तर्विद्रधि हे विकार नाहींसे करितो.

ऊषकस्तुत्थकं हिंगु कासीसद्वयसैंधवम्।
साशिलाजतु कृच्छ्राश्मगुल्ममेदःकफापहम्॥ २३॥

खारी माती, मोरचूत, हिंग, हिराकस, पांढरा हिराकस, सैंधव व शिलाजित हा ऊषकादिगण मूत्रकृच्छ्र, मूतखडा, गुल्म, मेद व कफ यांचा नाश करितो.

वेल्लंतरारणिकबूकवृषाऽश्मभेद-
गोकंटकेत्कटसहाचरबाणकाशाः।
वृक्षादनीनलकुशद्वयगुंठगुंद्रा-
भल्लूकमोरटकुरंटकरंभपार्थाः॥ २४॥

वर्गो वीरतराद्योऽयं हंति वातकृतान् गदान् ।
अश्मरीशर्करामूत्रकृच्छ्राघातरुजाहरः ॥ २५ ॥

काळ वाळा, ऐरण, बकुळी, अडूळसा, लकडी पाषाणभेद, गोखरू, तिरकांडें, पांढरी व निळी कोरांटी, कसई, बांडगूळ, देवनळ, लहान व मोठा दर्भ, गुंठ व गुंद्रा गवत, टेंटू, मोरवेल, पिंवळा कोरांटा, उतरण व सूर्यमुखी हा वीरतरादि गण वातरोग, मूत्राश्मरी, मूत्रकृच्छ्र व मूत्राघात हे रोग नाहींसे करितो.

रोध्रशाबररोध्रपलाशा जिंगिणीसरलकट्फलयुक्ताः ।
कुत्सितांबकदलीगतशोकाः सैलवालुपरिपेलवमोचाः २६
एष रोध्रादिको नाम मेदःकफहरो गणः ।
योनिदोषहरः स्तंभी वर्ण्यो विषविनाशनः ॥ २७ ॥

लोध्र, पांढरा लोध्र, कापूरकचरी, काळी सांवरी, देवदार, कायफळ, रास्ना, कदंब, केळ, अशोक, एलवालु, जलमोथा व साळई हा रोध्रादि गण मेदकफनाशक, योनिरोगहारक, स्तंभक, वर्णकर आणि विषघ्न आहे.

अर्कालर्कौ नागदंती विशल्या
भार्गी रास्ना वृश्चिकाली प्रकीर्या ।
प्रत्यक्पुष्पीपीततैलोदकीर्या
श्वेतायुग्मं तापसानां च वृक्षः ॥ २८ ॥
अयमर्कादिको वर्गः कफमेदोविषापहः
कृमिकुष्ठप्रशमनो विशेषाद्व्रणशोधनः ॥ २९ ॥

रुई, मंदार, नागाळी, कळलावी, भारंगमूळ, रास्ना, लघु मेढशिंगी, घाणेरा करंज, आघाडा, मोठी मालकांगोणी, करंज, किन्हई पांढरी किन्हई व हिंगणबेट हा अर्कादिगण कफ, मेद, विष, कृमि व कुष्ठ यांचा नाश करणारा असून विशेषतः व्रणशोधक आहे.

सुरसयुगफणिज्जं कालमालाविडंगं
खरबुसवृषकर्णीकट्फलं कासमर्दः ।
क्षवकसरसिभार्गी कार्मुका काकमाची
कुलहलविषमुष्टी भूस्तृणो भूतकेशी ॥ ३० ॥
सुरसादिगणः श्लेष्ममेदःकृमिनिषूदनः ।
प्रतिश्यायारुचिश्वासकासघ्नो व्रणशोधनः ॥ ३१ ॥

पांढरी व काळी तुळस, पांढरा व काळा अजवला, वावाडिंग, मरवा, उंदिरकानी, कायफळ, कासविंदा, काळे शिरस, पांढरी निर्गुडी, भारंगमूळ, तांबडी कण्हेरी, कामोणी, गोरखमुंडी, बकाणनिंब, रोहिस गवत व निर्गुडी हा सुरसादि गण कफ, मेद, कृमि, पडसें, अरुचि, दमा, खोकला यांचा नाश करून व्रणशोधन करितो.

मुष्ककस्नुग्वराद्वीपिपलाशधवशिंशपाः ।
गुल्ममेहाश्मरीपांडुमेदोऽर्शःकफशुक्रजित् ॥ ३२ ॥

मोखा, तिधारी निवडुंग, त्रिफळा, चित्रक, पळस, धावडा व शिसव हा मुष्ककादिगण गुल्म, प्रमेह, मूत्राश्मरी, पांडु, मेद, मूळव्याध, कफ व वीर्य यांचा नाशक आहे.

वत्सकमूर्वाभार्गीकटुकामरिचं घुणप्रिया च गंडीरम्
एलापाठाजाजीकट्वंगफलाजमोदसिद्धार्थवचाः ॥ ३३ ॥
जीरकहिंगुविडंगं पशुगंधा पंचकोलकं हंति ।
चलकफमेदःपीनसगुल्मज्वरशूलदुर्नाम्नः ॥ ३४ ॥

कुडा, मोरवेल, भारंगमूळ, कुटकी, काळीं मिरें, अतिविष, तिधारी निवडुंग, वेलची, पहाडमूळ, जिरें, टेंटू, गेळफळ, अजमोदा, पांढरे शिरस, वेखंड, काळें जिरें, हिंग, वावडिंग, रानतुळस व पंचकोल हा वत्सकादि गण वायु, कफ, मेद, पीनस, गुल्म, ज्वर, शूळ व मूळव्याध यांचा नाश करतो.

वचाजलददेवाह्वनागरातिविषाभयाः ।
हरिद्राद्वययष्ट्याह्वकलशीकुटजोद्भवाः ॥ ३५ ॥
वचाहरिद्रादिगणावामातिसारनाशनौ ।
मेदःकफाढ्यपवनस्तन्यदोषनिबर्हणौ ॥ ३६ ॥

वेखंड, नागरमोथा, देवदार, सुंठ, अतिविष, हिरडा; हळद, दारुहळद, ज्येष्ठमध, पिठवण व कुड्याच्या बिया हे वचादि व हरिद्रादि गण आमातिसार, मेद, कफ, ऊरुस्तंभ आणि स्त्रियांच्या दुधांतील दोष यांस नाहींसे करणारे आहेत.

प्रियंगुपुष्पांजनयुग्मपद्मापद्माद्रजोयोजनवल्ल्यनंता ।
मानद्रुमो मोचरसः समंगा पुन्नागशीतं मदनीयहेतुः ॥ ३७ ॥
अंबष्ठा मधुकं नमस्करी नंदीवृक्षपलाशकच्छुराः ।

रोध्रं धातकिबिल्वपेशिके कट्वंगः कमलोद्भवं रजः ॥ ३८ ॥
गणौ प्रियंग्वंबष्ठादी पक्कातीसारनाशनौ ।
संधानीयौ हितौ पित्ते व्रणानामपि रोपणौ ॥ ३९ ॥

गहुला, जस्ताचें फूल, काळा व पांढरा सुरमा, स्थलकमलिनी, कमळकेसर, मंजिष्ठ, धमासा, सांवर, मोचरस, तांबडी लाजाळू, पुन्नाग, चंदन, धायटी; पहाडमूळ, ज्येष्ठमध, लाजाळू, मांदरुखी, पळस, तांबडा धमासा, लोध्र, धायटीचीं फुलें, कोंवळें बेलफळ, टेंटू, पद्मरेणु, हे प्रियंग्वादि व अंबष्ठादि गण पक्कातिसारनाशक, भग्नसंधान करणारे, पित्तशामक आणि जखम भरून आणणारे आहेत.

मुस्तावचाऽग्निद्विनिशाद्वितिक्ता-
भल्लातपाठात्रिफलाविषाख्याः ।
कुष्ठं त्रुटी हैमवती च योनि-
स्तन्यामयघ्ना मलपाचनाश्च ॥ ४० ॥

नागरमोथा, वेखंड, चित्रक, हळद, दारुहळद, कुटकी, सागरगोटा, बिबा, पहाडमूळ, त्रिफळा, अतिविष, कोष्ठ, वेलची व पांढरें वेखंड हा मुस्तादि गण योनिरोग व स्तन्यदोष दूर करणारा आणि मलपाचक आहे.

न्यग्रोधपिप्पलसदाफलरोध्रयुग्मं
जंबूद्वयार्जुनकपीतनसोमवल्काः ।
प्लक्षाम्रवंजुलपियालपलाशनंदी-
कोलीकदंबविरलामधुकं मधूकम् ॥ ४१ ॥
न्यग्रोधादिर्गणो व्रण्यः संग्राही भग्नसाधनः ।
मेदःपित्तास्रतृड्दाहयोनिरोगनिबर्हणः ॥ ४२ ॥

वड, पिंपळ, उंबर, दोन्ही प्रकारचे लोध्र, जांभूळ, रानजांभूळ अर्जुनसादडा, पारोसा पिंपळ, कायफळ, पिंपरी, आंबा, वेत, खिरणी, पळस, नांदरुखी, बोर, कदंब, टेंभुरणी, ज्येष्ठमध व मोहाचीं फुलें, हा न्यग्रोधादि गण व्रणावर हितकर, ग्राहक, मोडलेलें हाड वगैरे जोडणारा आणि मेद, रक्तपित्त, तृषा, दाह व योनिरोग यांचा नाश करणारा आहे.

एलायुग्मतुरुष्ककुष्ठफलिनीमांसीजलध्यामकं
स्पृक्काचोरकचोचपत्रतगरस्थौणेयजातीरसाः।
शुक्तिर्व्याघ्रनखोऽमराह्वमगुरुः श्रीवासकं कुंकुमं
चंडागुग्गुलुदेवधूपखपुराः पुन्नागनागाह्वयम् ॥ ४३ ॥
एलादिको वातकफौ विषं च विनियच्छति।
वर्णप्रसादनः कंडूपिटिकाकोठनाशनः ॥ ४४ ॥

लहान व मोठी वेलची, शिलारस, कोष्ठ, गहुला, जटामांसी, नागरमोथा, रोहिस गवत, ब्राह्मी, गठोना, दालचिनी, तमालपत्र, तगर, स्थौणेय, रक्त्याबोळ, शंखनखें, नखला, देवदार, अगर, गंधाबिरोजा, केशर, किरमाणी ओंवा, गुग्गुळ, राळ, कुरुंद, उंडणीचीं फुलें व नागकेशर हा एलादि गण वात, कफ व विष यांचा नाशक, कांति देणारा, आणि कंडू, पुटकुळ्या व गांधी नाहींशा करणारा आहे.

श्यामादंतीद्रवंतीक्रमुककुटरणीशंखिनीचर्मसाह्वाः
स्वर्णक्षीरीगवाक्षीशिखरिरजनकच्छिन्नरोहाकरंजाः।
बस्तांत्री व्याधिघातो बहलबहुरसस्तीक्ष्णवृक्षात् फलानि
श्यामाद्यो हंति गुल्मं विषमरुचिकफौ हृद्रुजं मूत्रकृच्छ्रम् ४५

काळें निशोत्तर, दंतीमूळ, द्रवंती ( थोर दंती ), लोध्र, पांढरें निशोत्तर, सांखवेल, शिकेकाई, पिंवळा धोतरा, इंद्रायणमूळ, अघाडा, कपिला, गुळवेल, करंज, बोकडी, बाहवा, ऊंस व पीलूचीं फळें हा श्यामादि गण गुल्म, विषदोष, अरुचि, कफ, हृद्रोग व मूत्रकृच्छ्र यांस नाहींसें करितो.

त्रयस्त्रिंशदिति प्रोक्ता वर्गास्तेषु त्वलाभतः।
युंज्यात्तद्विधमन्यच्च द्रव्यं जह्यादयौगिकम् ॥ ४६ ॥

याप्रमाणें हे ३३ वर्ग सांगितले. यांपैकीं जीं औषधें मिळणार नाहींत, त्यांच्या ऐवजीं त्यांच्याच सारख्या गुणांचीं दुसरीं औषधें वापरावीं. तसेंच यांतील एखादें औषध अयोग्य असेल तर तें गाळावें.

एते वर्गा दोषदूष्याद्यपेक्ष्य
कल्ककाथस्नेहलेहादियुक्ताः।

पाने नस्येऽन्वासनेऽतर्बहिर्वा
लेपाभ्यंगैर्घ्नंति रोगान् सुकृच्छ्रान् ॥ ४७ ॥

या गणांतील औषधांचा दोष, दूष्य वगैरे गोष्टींच्या अनुरोधानें कल्क, तेल, लेह, पान, नस्य, अनुवासन, लेप, अभ्यंग इत्यादि प्रकारांनीं पोटांत किंवा बाहेरून उपयोग केल्यास तीं नानाप्रकारचे कष्टसाध्य रोग बरे करितात.

---

## अध्याय सोळावा.

अथाऽतः स्नेहविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां स्नेहविधि सांगतों.

गुरुशीतसरास्निग्धमंदसूक्ष्ममृदुद्रवम् ।
औषधं स्नेहनं प्रायो विपरीतं विरूक्षणम् ॥ १ ॥

जें औषध जड, थंड, सारक, स्निग्ध, मंद, सूक्ष्म, मऊ व पातळ असतें, तें बहुतकरून स्निग्धता आणणारें असतें; आणि जें वरील गुणांच्या उलट असतें तें बहुधा रूक्षता उत्पन्न करितें.

सर्पिर्मज्जा वसा तैलं स्नेहेषु प्रवरं मतम् ।
तत्राऽपि चोत्तमं सर्पिः संस्कारस्याऽनुवर्तनात् ॥ २ ॥

सर्व स्नेहांत तूप, मज्जा, वसा व तिळांचें तेल हे श्रेष्ठ आहेत. त्यांतही तूप सर्वश्रेष्ठ आहे. कारण त्यावर औषधांचे संस्कार केले तरी स्वतःचे गुण नाहींसे न होतां त्या औषधांचेही गुण यांत येतात.

पित्तघ्नास्ते यथापूर्वमितरघ्ना यथोत्तरम् ।

ते शेवटाकडून एकापेक्षां एक अधिक पित्तशामक आहेत. आणि पहिल्यापासून शेवटाकडे एकाहून एक अधिक वातकफनाशक आहेत.

घृतात्तैलं गुरु वसा तैलान्मज्जा ततोऽपि च ॥ ३ ॥

तुपापेक्षां तेल, तेलापेक्षां वसा व वसेपेक्षां मज्जा जड असते.

द्वाभ्यां त्रिभिश्चतुर्भिस्तैर्यमकस्त्रिवृतो महान् ।

कोणत्याही दोन स्नेहांच्या मिश्रणास यमक, तिहींच्या मिश्रणास त्रिवृत्त व चोहोंच्या समुदायास महास्नेह म्हणतात.

स्वेद्यसंशोध्यमद्यस्त्रीव्यायामासक्तचिंतकाः ॥ ४ ॥
वृद्धबालाऽबलकृशा रूक्षाः क्षीणास्त्ररेतसः ।
वातार्तस्यंदतिमिरदारुणप्रतिबोधिनः ॥ ५ ॥
स्नेह्याः

ज्यांस घाम काढावयाचा आहे, ज्यांस वमन-विरेचन देणें आहे; दारूबाज, अतिमैथुनी, अति व्यायाम करणारे, वातरोगी, काळजी वाहणारे, म्हातारे, मुलें, अशक्त, कृश, रूक्ष, रक्तक्षयी, वीर्यक्षयी, अभिष्यंदी ( डोळे आलेले ), तिमिर नामक नेत्ररोगी आणि ज्यांचे डोळे झोंपेंत चिकटल्यामुळें निजून उठल्यावर लवकर उघडतां येत नाहींत, असे मनुष्य स्नेहनास योग्य जाणावे.

न त्वतिमंदाग्नितीक्ष्णाग्निस्थूलदुर्बलाः ।
ऊरुस्तंभाऽतिसाराऽमगलरोगगरोदरैः ॥ ६ ॥
मूर्च्छाच्छर्द्यरुचिश्लेष्मतृष्णामद्यैश्च पीडिताः ।
अपप्रसूता युक्ते च नस्ये बस्तौ विरेचने ॥ ७ ॥

ज्यांचा अग्नि अतिशय मंद किंवा अतिशय तीक्ष्ण आहे; जे लठ्ठ, अशक्त; ऊरुस्तम्भ, अतिसार, आमदोष, गळ्याचे रोग, विष-दोष, उदर, मूर्च्छा, उलटी, अरुचि, कफ, तहान व मद्यविकार यांनीं पीडित आहेत; ज्या स्त्रीचा गर्भस्राव झाला आहे; आणि ज्यांस नस्य, बस्ति व रेचन दिलें आहे अशा मनुष्यांस स्नेहन देऊं नये.

तत्र धीस्मृतिमेधाऽग्निकांक्षिणां शस्यते घृतम् ।

ज्यांस बुद्धि, स्मृति, धारणा व पचनशक्ति वाढविण्याची इच्छा असेल, त्यांस सर्व स्नेहांत तूप प्रशस्त आहे.

ग्रंथिनाडीकृमिश्लेष्ममेदोमारुतरोगिषु ॥ ८ ॥
तैलं लाघवदार्ढ्यार्थिक्रूरकोष्ठेषु देहिषु ।

ज्यांस करटें, नाडीव्रण, कृमि, कफ, मेदोरोग व वातविकार झाले असतील; ज्यांस शरीर हलकें व सुदृढ करण्याची इच्छा असेल; आणि ज्यांचा कोठा फार जड असेल, अशांस तेल प्रशस्त आहे.

वाताऽतपाऽध्वभारस्त्रीव्यायामक्षीणधातुषु ॥ ९ ॥

रूक्षक्लेशक्षमाऽत्यग्निवातावृतपथेषु च ।
शेषौ

वारा, ऊन, मार्गक्रमण, ओझें वाहणें, मैथुन व व्यायाम यांनीं ज्यांचे धातु क्षीण झाले आहेत; जे रूक्ष, क्लेश सहन करणारे, अति प्रदीप्त जठराग्नीचे आहेत; आणि ज्यांचीं स्रोतें वायूनें भरलेलीं आहेत, अशांस वसा व मज्जा प्रशस्त आहेत.

वसा तु संध्यस्थिमर्मकोष्ठरुजासु च ॥१०॥
तथा दग्धाऽहतभ्रष्टयोनिकर्णशिरोरुजि ।

सांधे, हाडें, मर्मस्थानें व कोठा यांचा शूळ; कान व मस्तक यांचा शूळ, आणि भाजणें, दुखापत होणें, व योनिभ्रंश यांपासून होणारी पीडा यांवरही वसा प्रशस्त आहे.

तैलं प्रावृषि वर्षांते सर्पिरन्यौ तु माधवे ॥ ११ ॥

पावसाळ्यांत तेल, शरदृतूंत तूप, आणि वसंतांत वसा व मज्जा सेवन करावीं.

ऋतौ साधारणे स्नेहः शस्तोऽह्नि विमले रवौ ।

श्रावण, कार्तिक व चैत्र या ऋतुसंधींत दिवसा, आकाश स्वच्छ असतां स्नेहपान करावें.

तैलं त्वरायां शीतेऽपि

विशेष जरूरीच्या प्रसंगीं हिंवाळ्यांतही तेलाचा उपयोग केला तरी चालेल.

घर्मेपि च घृतं निशि ॥ १२ ॥
निश्येव पित्ते पवने संसर्गे पित्तवत्यपि ।
निश्यन्यथा वातकफाद्रोगाः स्युः पित्ततो दिवा ॥ १३ ॥

तसेंच ग्रीष्म ऋतूंतही रात्रीच्या वेळीं घृतपान करण्यास हरकत नाहीं. मात्र पित्त, वात व पित्ताधिक संसर्गावर घृतपान करणें तें रात्रींच करावें. वरील विकारांशिवाय इतर वेळीं रात्रीं घृतपान केलें तर वातकफाचे विकार होतील, आणि दिवसा तेलाचा उपयोग केल्यानें पित्तविकार होतील

युक्त्याऽवचारयेत्स्नेहं भक्ष्याद्यन्नेन बस्तिभिः ।
नस्याभ्यंजनगंडूषमूर्धकर्णाऽक्षितर्पणैः ॥ १४ ॥

स्नेहाचा उपयोग करणें तो अन्नपान, बस्ति, नस्य, अभ्यंग, गुळण्या, टाळूवर जिरवणें, कानांत घालणें, डोळ्यांवर घड्या घालणें, यांच्या द्वारें यथायोग्य रीतीनें करावा.

रसभेदैककत्वाभ्यां चतुःषष्टिर्विचारणाः ।
स्नेहस्याऽन्याभिभूतत्वादल्पत्वाच्च क्रमात्स्मृताः ॥ १५ ॥

निरनिराळ्या रसभेदांनीं युक्त अन्नपानाबरोबर दिल्या जाणाऱ्या स्नेहाचे ६३ प्रकार, आणि बस्ति वगैरे उपायांनीं दिलेला केवळ स्नेह, अशा स्नेह देण्याच्या ६४ विचारणा आहेत. या रीतीनें दिलेल्या स्नेहांत स्नेहाचें प्रमाण कमी असतें, आणि त्याची शक्ति बरोबर दिलेल्या अन्नपानामुळें कमी झालेली असते.

यथोक्तहेत्वभावाच्च नाच्छपेयो विचारणा ।
स्नेहस्य कल्पः स श्रेष्ठः स्नेहकर्माशुसाधनात् ॥ १६ ॥

शुद्ध स्नेहपानांत हा प्रकार नसल्यामुळें त्यास विचारणा म्हणत नाहींत; त्यास अच्छपेय म्हणतात. शुद्ध स्नेहपानच सर्वांत श्रेष्ठ आहे. कारण त्यानें स्नेहाचें कार्य लवकर सिद्ध होतें.

द्वाभ्यां चतुर्भिरष्टाभिर्यामैर्जीर्यति याः क्रमात् ।
ह्रस्वमध्योत्तमा मात्रास्तास्ताभ्यश्च ह्रसीयसीम् ॥ १७ ॥
कल्पयेद्वीक्ष्य दोषादीन् प्रागेव तु ह्रसीयसीम् ।

दोन, चार व आठ प्रहरांत जिरेल ती स्नेहाची अनुक्रमें अल्प, मध्यम व उत्तम मात्रा जाणावी. दोष, बल वगैरे पाहून या अल्प मात्रेपेक्षांही कमी मात्रा दिली असतां चालेल. आरंभीं तर सर्वांसच अल्प मात्रा द्यावी.

ह्यस्तने जीर्ण एवान्ने स्नेहोऽच्छः शुद्धये बहुः ॥ १८ ॥

संशोधनाकरितां स्नेह देणें असल्यास तो पूर्व दिवशींचा आहार पचतांक्षणींच ( भूक लागण्यापूर्वीं ) नुस्ताच उत्तम प्रमाणानें द्यावा.

शमनः क्षुद्वतोऽनन्नो मध्यमात्रश्च शस्यते ।

रोगशमनार्थ देणें असल्यास भूक लागल्यावर मध्यम प्रमाणानें व नुस्ताच द्यावा.

बृंहणो रसमद्याद्यैः सभक्तोऽल्पो हितः स च ॥ १९ ॥
बालवृद्धपिपासार्तस्नेहद्विण्मद्यशीलिषु ।

स्त्रीस्नेहनित्यमंदाग्निसुखितक्लेशभीरुषु ॥ २० ॥
मृदुकोष्ठाल्पदोषेषु काले चोष्णे कृशेषु च ।

पुष्टीकरितां देणें असल्यास तो मांसरस, अन्न, मद्य वगैरे पदार्थां-बरोबर कमी प्रमाणानें द्यावा. मुलें, म्हातारे, तृषार्त, स्नेहाचा तिटकारा असलेले, मद्यपी, स्त्रीसंग करणारे, नेहमीं स्नेहपान करणारे, मंदाग्नि, सुखी, कष्ट सहन न होणारे, नरम कोठ्याचे, अल्पदोषी व कृश मनुष्यांस आणि उन्हाळ्यांत पुष्टीकरितां स्नेह देणें हितावह आहे.

प्राङ्मध्योत्तरभक्तोऽसावधोमध्योर्ध्वदेहजान् ॥ २१ ॥
व्याधीन् जयेद्बलं कुर्यादंगानां च यथाक्रमम् ।

जेवणापूर्वी, जेवणाच्या मध्यभागीं व जेवणानंतर सेवन केलेले स्नेह अनुक्रमें शरीराचा अधोभाग, मध्यभाग व मस्तक यांत होणारे विकार बरे करितात, आणि त्या त्या भागास बळ-कटी आणतात.

वार्युष्णमच्छेऽनु पिबेत् स्नेहे तत्सुखपक्तये ॥ २२ ॥
आस्योपलेपशुद्ध्यै च तौवरारुष्करे न तु ।

शुद्ध स्नेहपानावर स्नेहाचें पचन होण्याकारितां व तोंडाचा चिकट-पणा जाण्याकारितां ऊन पाणी प्यावें. बिब्याच्या व काजूच्या तेलावर मात्र तें पिऊं नये.

जीर्णाजीर्णविशंकायां पुनरुष्णोदकं पिबेत् ॥ २३ ॥
तेनोद्गारविशुद्धिः स्यात्ततश्च लघुता रुचिः ।

तो जिरला किंवा नाहीं याची शंका असल्यास पुन्हां ऊन पाणी प्यावें. या योगानें ढेकर शुद्ध येऊन अंग हलकें होतें व तोंडास रुचि येते.

भोज्योऽन्नं मात्रया पास्यन् श्वः पिबन् पीतवानपि ॥२४॥
द्रवोष्णमनभिष्यंदि नातिस्निग्धमसंकरम् ।

स्नेहपान करावयाच्या पूर्व दिवशीं, त्या दिवशीं व तें केल्या-नंतर पातळ, गरम, कफ न करणारा, किंचित् स्निग्ध, साधा व मित असा आहार करावा.

उष्णोदकोपचारी स्याद्ब्रह्मचारी क्षपाशयः ॥ २५ ॥
न वेगरोधी व्यायामक्रोधशोकहिमातपान् ।
प्रवातयानयानाध्वभाष्यात्यासनसंस्थितीः ॥ २६ ॥

नीचात्युच्चोपधानाहःस्वप्नधूमरजांसि च ।
यान्यहानि पिबेत्तानि तावंत्यन्यान्यपि त्यजेत् ॥ २७ ॥
सर्वकर्मस्वयं प्रायो व्याधिक्षीणेषु च क्रमः ।

स्नानास, पिण्यास वगैरे ऊन पाणी घ्यावें. स्त्रीसंग करूं नये. रात्रींच झोंप घ्यावी. वेग थांबवूं नयेत. जितके दिवस स्नेहपान केलें असेल, तितकेच दिवस पुढें व्यायाम, क्रोध, थंडी, ऊन, वारा, अश्वादि यान, मार्गक्रमण, फार बोलणें, उभें राहणें, बसणें, फार सखल किंवा फार उंच उशी ठेवून निजणें, दिवसा झोंप, धूर व धुरळा या गोष्टी वर्ज्य कराव्या. वमन-विरेचनादि सर्व कर्मांत व रोगानें अशक्त झालेल्यांसही बहुतेकच हाच विधि लागू आहे.

उपचारस्तु शमने कार्यः स्नेहे विरिक्तिवत् ॥ २८ ॥

रोगशमनार्थ स्नेहपान केलें असतां त्यावर विरेचनाप्रमाणेंच उपचार करावे.

त्र्यहमच्छं मृदौ कोष्ठे क्रूरे सप्तादिनं पिबेत् ।
सम्यक्स्निग्धोऽथवा यावदतः सात्मीभवेत्परम् ॥ २९ ॥

कोठा हलका असल्यास सतत तीन दिवस आणि जड असल्यास सात दिवस पर्यंत नुस्तें स्नेहपान करावें. किंवा कोठा चांगला स्निग्ध होईपर्यंत तें करावें. सात दिवसांनंतर तें अंगवळणीं पडून त्याचा अभीष्ट गुण येत नाहीं.

वातानुलोम्यं दीप्तोऽग्निर्वर्चः स्निग्धमसंहतम् ॥ ३० ॥
विमलेंद्रियता सम्यक् स्निग्धे रूक्षे विपर्ययः ।
अतिस्निग्धे तु पांडुत्वं घ्राणवक्त्रगुदस्रवाः ॥ ३१ ॥

वातांचें अनुलोमन, अग्नीचें दीपन, मलाची स्निग्धता व इंद्रियें निर्मळ असणें, गांठी मोडणें हीं चांगलें स्नेहन झाल्याचीं लक्षणें जाणावीं. याच्या उलट लक्षणें असलीं म्हणजे अंगांत रूक्षता आहे, असें समजावें. अति स्नेहन झालें असतां अंग फटफटीत होतें, आणि नाक, तोंड व गुद यांतून स्राव सुरू होतो.

अमात्रया हितो काले मिथ्याहारविहारतः ।
स्नेहः करोति शोफार्शस्तंद्रास्तंभविसंज्ञताः ॥ ३२ ॥
कंडूकुष्ठज्वरोत्क्लेशशूलाऽनाहभ्रमादिकान् ।

कमीजास्त प्रमाणानें, अयोग्य मनुष्यांनीं व अकाळीं स्नेहपान

केल्यानें किंवा स्नेहपान करून अपथ्य आहारविहार केल्यानें सूज, मूळव्याध, झांपड, शरीर ताठणें, मूर्च्छा, कंडू, कुष्ठ, ज्वर, मळमळ, शूळ, पोटफुगी, भोंवळ इत्यादि विकार होतात.

क्षुत्तृष्णोल्लेखनस्वेदरूक्षपानान्नभेषजम् ॥ ३३ ॥
तक्रारिष्टखलोद्दालयवश्यामाककोद्रवाः ।
पिप्पलीत्रिफलाक्षौद्रपथ्यागोमूत्रगुग्गुलु ॥ ३४ ॥
यथास्वं प्रतिरोगं च स्नेहव्यापदि साधनम् ।

स्नेह अयोग्य रीतीनें घेतल्यामुळें होणाऱ्या रोगांवर उपाशीं राहणें, पाणी न पिणें, वांति, शेकणें, रूक्ष अन्नपान व औषधें, ताक, अरिष्टें, सांबारें, उद्दाल नांवाचे शालि, जव, सांवे, हरीक, पिंपळी त्रिफळा, मध, हिरडा, गोमूत्र, गुग्गुळ, इत्यादि उपाय योजावे. शिवाय त्या त्या रोगाची चिकित्साही करावी.

विरूक्षणे लंघनवत्कृतातिकृतलक्षणम् ॥ ३५ ॥

रूक्षण बरोबर झालें किंवा जास्त झालें याचीं लक्षणें सम्यक् व अतिरिक्त लंघनाच्या लक्षणांप्रमाणें जाणावीं.

स्निग्धद्रवोष्णधन्वोत्थरसभुक् स्वेदमाचरेत् ।
स्निग्धस्त्र्यहं स्थितः कुर्याद्विरेकं वमनं पुनः ॥ ३६ ॥
एकाहं दिनमन्यच्च कफमुत्क्लेश्य तत्करैः ।

स्नेहनानंतर स्निग्ध, द्रव, उष्ण, असा जांगल मांसाचा रस भक्षण करून स्वेदन करावें, आणि तीन दिवसांनीं रेचन द्यावें. वमन देणें असल्यास तें स्वेदनानंतर दुसऱ्या दिवशीं कफोत्क्लेश करणाऱ्या पदार्थांनीं कफास चाळवून तिसऱ्या दिवशीं द्यावें.

मांसला मेदुरा भूरिश्लेष्माणो विषमाग्नयः ॥ ३७ ॥
स्नेहोचिताश्च ये स्नेह्यास्तान् पूर्वं रूक्षयेत्ततः ।
संस्नेह्य शोधयेदेवं स्नेहव्यापन्न जायते ॥ ३८ ॥

ज्यांच्या शरीरांत मांस, मेद व कफ फार आहे; ज्यांचा अग्नि विषम आहे, किंवा जे नेहमीं स्नेहपान करितात, त्यांस शोधन देण्याकरितां स्नेहन करणें असल्यास अगोदर रूक्षण करावें, आणि मग स्नेहन व शोधन करावें. या योगानें स्नेहाधिक्याचे विकार होत नाहींत.

अलं मलानीरयितुं स्नेहश्चासात्म्यतां गतः ।

जोंपर्यंत स्नेह अंगवळणीं पडला नाहीं, तोंपर्यंतच तो मलांस बाहेर काढूं शकतो.[1]

बालवृद्धादिषु स्नेहपरिहारासहिष्णुषु ॥ ३९ ॥
योगानिमाननुद्वेगान् सद्यःस्नेहान् प्रयोजयेत् ।
प्राज्यमांसरसास्तेषु पेया वा स्नेहभर्जिता ॥ ४० ॥
तिलचूर्णश्च सस्नेहफाणितः कृशरा तथा ।
क्षीरपेया घृताढ्योष्णा दध्नो वा सगुडः सरः ॥ ४१ ॥
पेया च पंचप्रसृता स्नेहैस्तंडुलपंचमैः ।
सप्तैते स्नेहनाः सद्यःस्नेहाश्च लवणोल्बणाः ॥ ४२ ॥

स्नेहन क्रियेचें पथ्य ज्यांस सहन होत नाहीं अशीं मुलें, म्हातारीं माणसें यांस पुढील सुखदायक व तात्कालिक स्नेहनप्रयोग योजावे. पुष्कळसें मांस व तूप घालून केलेले मांसरस; तुपांत किंवा तेलांत भाजून केलेली कण्हेरी; स्नेह व काकवी मिश्रित तिळकूट; खिचडी; तूप घातलेली व ऊन खीर; गूळ घातलेली दह्याची निवळ; आणि तेल, तूप, वसा, मज्जा प्रत्येकीं आठ आठ तोळे घेऊन त्यांत आठ तोळे तांदूळ घालून केलेली लापशी, हे सात तात्कालिक स्नेहनप्रयोग आहेत. लवणयुक्त स्नेहही तसेच आहेत.

तद्ध्यभिष्यंद्यरूक्षं च सूक्ष्ममुष्णं व्यवायि च ।

मीठ, सूक्ष्म दोषांना चाळविणारें, स्निग्ध, सूक्ष्म, उष्ण व शरीरभर पसरणारें असल्यामुळें तें स्नेहांत घातलें असतां स्नेहनक्रियेस साहाय्य करितें.

गुडानूपामिषक्षीरतिलमाषसुरादधि ॥ ४३ ॥
कुष्ठशोफप्रमेहेषु स्नेहार्थं न प्रकल्पयेत् ।

कुष्ठ, सूज, प्रमेह हे विकार ज्यांस असतील, त्यांस स्नेहन देणें असल्यास गूळ, आनूप मांस, दूध, तीळ, उडीद, सुरा व दहीं हे पदार्थ देऊं नयेत.

---

१ कोणताही पदार्थ रोजच्या खाण्यापिण्याप्रमाणें पचनीं पडला म्हणजे त्याचें औषधी स्वरूप नष्ट होतें. विषदेखील एकदां पचनीं पडलें म्हणजे त्याचा कांहीं परिणाम होत नाहीं.

त्रिफलापिप्पलीपथ्यागुग्गुल्वादिविपाचितान् ॥ ४४ ॥
स्नेहान्यथास्वमेतेषां योजयेदविकारिणः ।

त्यांस त्रिफळा, पिंपळी, हिरडा, गुग्गुळ वगैरे औषधें घालून तयार केलेले स्नेह द्यावे, म्हणजे विकार होणार नाहींत.

क्षीणानां त्वामयैरग्निदेहसंधुक्षणक्षमान ॥ ४५ ॥

रोगानें अशक्त झालेल्यांस स्नेह देणें ते अग्निदीपक व पौष्टिक असावे.

दीप्तांतराग्निः परिशुद्धकोष्ठः प्रत्यग्रधातुर्बलवर्णयुक्तः ।
दृढेंद्रियो मंदजरः शतायुः स्नेहोपसेवी पुरुषः प्रदिष्टः ॥ ४६ ॥

नेहमीं स्नेहाचें सेवन करणाऱ्या मनुष्याचा अग्नि प्रदीप्त होतो, कोठा साफ राहतो, नवीन धातु उत्पन्न होतात, शक्ति व कांति प्राप्त होते, इंद्रियें बळकट होतात, म्हातारपण लवकर येत नाहीं, व तो शंभर वर्षें जगतो.

---

## अध्याय सतरावा.

अथातः स्वेदविधिमध्यायं व्यास्यास्यामः ।

आतां स्वेदविधि सांगतों.

स्वेदस्तापोपनाहोष्मद्रवभेदाच्चतुर्विधः ।

स्वेद चार प्रकारचा आहे. तापस्वेद, उष्मस्वेद, उपनाहस्वेद व द्रवस्वेद.

तापोऽग्नितप्तवसनफालहस्ततलादिभिः ॥ १ ॥

तापस्वेद म्हणजे विस्तवानें तापविलेलें वस्त्र, लोखंडाची पट्टी, तळहात वगैरे उपायांनीं शेकणें.

उपनाहो वचाकिण्वशताह्वादेवदारुभिः ।
धान्यैः समस्तैर्गंधैश्च रास्नैरंडजटामिषैः ॥ २ ॥
उद्रिक्तलवणैः स्नेहचुक्रतक्रपयःप्लुतैः ।
केवले पवने श्लेष्मसंसृष्टे सुरसादिभिः ॥ ३ ॥
पित्तेन पद्मकाद्यैस्तु साल्वणाख्यैः पुनः पुनः ।

केवळ वातविकारावर वेखंड, सुराबीज, बडीशेप, देवदार, धान्यें, सुगंधी द्रव्यें, रास्ना, एरंडमूळ, जटामांसी व निरनिराळ्या प्रकारचीं मांसें यांत बरेंच मीठ, आणि स्नेह, आंबट पदार्थ

ताक व दूध हीं मिसळून पोटीस (उपनाह) तयार करून बांधावें. कफमिश्रित वात असल्यास त्यांत सुरसादि गणांतील औषधें मिळवावीं; आणि पित्तमिश्रित वात असल्यास पद्मकादि गणांतील औषधांचा उपयोग करावा. यांस साल्वण उपनाह म्हणतात.

स्निग्धोष्णवीर्यैर्मृदुभिश्चर्मपट्टैरपूतिभिः ॥ ४ ॥
अलाभे वातजित्पत्रकौशेयाऽविकशाटकैः ।
रात्रौ बद्धं दिवा मुंचेन्मुंचेद्रात्रौ दिवाकृतम् ॥ ५ ॥

स्निग्ध, उष्णवीर्य, नरम व दुर्गंधिरहित अशा चामड्याच्या पट्ट्या वरचेवर या पोटिसांवर बांधाव्या. चामड्याच्या पट्ट्या न मिळाल्यास एरंड, रुई वगैरे झाडांचीं वातनाशक पानें; किंवा रेशमी, लोंकरी अथवा सुती वस्त्राची पट्टी घ्यावी. रात्रीं बांधलेलें पोटीस सकाळीं सोडून टाकावें व सकाळीं बांधलेलें रात्रीं सोडावें.

ऊष्मा तूत्कारिकालोष्टकपालोपलपांसुभिः ।
पत्रभंगेन धान्येन करीषसिकतातुषैः ॥ ६ ॥
अनेकोपायसंतप्तैः प्रयोज्यो देशकालतः ।

मातीचें ढेंकूळ, खापर, दगड, धूळ, पानें, धान्यें, गोंवऱ्यांचा चूर, रेती व कोंडा इत्यादि पदार्थ अनेक प्रकारांनीं तापवून देशकालादिकांचा विचार करून उष्मस्वेद द्यावा.

शिग्रुवीरणकैरंडकारंजसुरसार्जकात् ॥ ७ ॥
शिरीषवासावंशार्कमालतीदीर्घवृंततः ।
पत्रभंगैर्वचाद्यैश्च मांसैश्चाऽनूपवारिजैः ॥ ८ ॥
दशमूलेन च पृथक् सहितैर्वा यथामलम् ।
स्नेहवद्भिः सुराशुक्तवारिक्षीरादिसाधितैः ॥ ९ ॥
कुंभीर्गलंतीर्नाडीर्वा पूरयित्वा रुजार्दितम् ।
वाससाऽच्छादितं गात्रं स्निग्धं सिंचेद्यथासुखम् ॥ १० ॥

शेवगा, पांगारा, एरंड, करंज, तुळसी, अजवला, शिरीष, अडूळसा, वेळू, रुई, जाई व टेंटू या वृक्षांचीं पानें, वर सांगितलेलीं वेखंड वगैरे औषधें, आनूप व जळज प्राण्यांचीं मांसें आणि दशमुळें हीं निरनिराळीं किंवा सर्व एकत्र घेऊन दोषानुसार मद्य, कांजी, पाणी, किंवा दूध यांत कढवावीं; व त्यांत थोडा स्नेह घालावा. नंतर तो काढा एका मडक्यांत, गळतींत, किंवा झारींत

अथवा वेळूच्या नळींत भरावा; आणि पीडित अंगास स्निग्ध करून व वस्त्रानें झांकून त्यावर त्याची धार धरावी.

तैरेव वा द्रवैः पूर्णं कुंडं सर्वांगगेऽनिले।
अवगाह्याऽतुरस्तिष्ठेदर्शःकृच्छ्रादिरुक्षु च ॥ ११ ॥

सर्वांगांत वात भरला असल्यास किंवा मूळव्याध, मूत्रकृच्छ्र वगैरे रोगांत, हाच काढा एखाद्या रुंद तोंडाच्या मोठ्या भांड्यांत भरून त्यांत रोग्यास बसवावें.

निवातेऽतर्बहिःस्निग्धो जीर्णान्नः स्वेदमाचरेत्।
व्याधिव्याधितदेशर्तुवशान्मध्यवरावरम् ॥ १२ ॥

स्नेहपानानें अंतःस्निग्ध व अभ्यंगानें बहिःस्निग्ध झालेल्या मनुष्यास, त्याचा आहार पचल्यावर, निवातस्थलीं स्वेद द्यावा. तो रोग रोगी, देश व काल यांच्या अनुरोधानें उत्तम, मध्यम किंवा कनिष्ठ असावा.

कफार्तो रूक्षणं रूक्षो रूक्षस्निग्धं कफानिले।

कफविकारांत स्नेहनावांचून रूक्ष स्वेद द्यावा. कफवातविकारावर थोडा रूक्ष व थोडा स्निग्ध द्यावा.

आमाशयगते वायौ कफे पक्काशयाश्रिते ॥ १३ ॥
रूक्षपूर्वं तथा स्नेहपूर्वं स्थानानुरोधतः।

स्थानानुरोधानें आमाशयांत वातविकार असल्यास व पक्काशयांत कफविकार असल्यास प्रथम स्निग्ध व नंतर रूक्ष स्वेद द्यावा.

अल्पं वंक्षणयोः स्वल्पं दृङ्मुष्कहृदये न वा ॥ १४ ॥

जांघाड्यांत थोडा स्वेद द्यावा. डोळे, अंडकोश व हृदय या ठिकाणीं फारच थोडा द्यावा; किंबहुना मुळींच देऊं नये.

शीतशूलक्षये स्विन्नो जातेऽगानां च मार्दवे।
स्याच्छनैर्मृदितः स्नातस्ततः स्नेहविधिं भजेत् ॥ १५ ॥

थंडी व वेदना नाहींशा होऊन अंग नरम झालें म्हणजे स्वेदक्रिया बरोबर झाली असें समजावें. नंतर हळू हळू अंग रगडून घेऊन ऊन पाण्यानें स्नान करून स्नेहविधींत सांगितल्याप्रमाणें उपचार करावे.

---

१ कारण आमाशय हें मूळचें कफस्थान असून वायु हा तेथें आगंतुक आहे. तसेंच पक्काशय हें मूळचें वायूचें स्थान असून कफ तेथें आगंतुक आहे. प्रथम स्थानिक दोषाचें शमन करून नंतर आगंतुक दोषाचा प्रतिकार केला पाहिजे.

पित्तास्रकोपतृण्मूर्छास्वरांगसदनभ्रमाः ।
संधिपीडाज्वरश्यावरक्तमंडलदर्शनम् ॥ १६ ॥
स्वेदातियोगाच्छर्दिश्च तत्र स्तंभनमौषधम् ।
विषक्षाराग्न्यतीसारच्छर्दिमोहातुरेषु च ॥ १७ ॥

स्वेदाचा अतियोग झाला असतां रक्तपित्त, तृषा, मूर्च्छा, स्वरभेद, हात-पाय गळणें, भ्रम, सांधे दुखणें, ताप, काळ्या व लाल रंगाच्या गांधी अंगावर उठणें, व उलटी हे विकार होतात. त्यांवर स्तंभक औषधें द्यावीं. याचप्रमाणें विषविकार, क्षारानें किंवा अग्नीनें भाजणें, अतिसार, वांति व मूर्च्छा यांवरही स्तंभक औषधच द्यावें.

स्वेदनं गुरु तीक्ष्णोष्णं प्रायः स्तंभनमन्यथा ।
द्रवस्थिरसरस्निग्धरूक्षसूक्ष्मं च भेषजम् ॥ १८ ॥
स्वेदनं स्तंभनं श्लक्ष्णं रूक्षसूक्ष्मसरद्रवम् ।
प्रायस्तिक्तं कषायं च मधुरं च समासतः ॥ १९ ॥

जड, तीक्ष्ण व उष्ण औषधें प्रायः स्वेदन करणारीं असतात. आणि यांच्या उलट गुणांचीं औषधें स्तंभक असतात. प्रवाही, स्थिर, सारक, स्निग्ध, रूक्ष व सूक्ष्म औषधें स्वेदन करितात; मृदु, रूक्ष, सूक्ष्म, सर, द्रव, कडू, तुरट व गोड द्रव्यें प्रायः स्तंभक असतात.

स्तंभितः स्याद्बले लब्धे यथोक्तामयसंक्षयात् ।

वर सांगितलेले विकार नाहींसे होऊन अंगांत शक्ति आली म्हणजे स्तंभन बरोबर झालें असें समजावें.

स्तंभत्वक्स्नायुसंकोचकंपहृद्वाग्घनुग्रहैः ॥ २० ॥
पादोष्ठत्वक्करैः श्यावैरतिस्तंभितमादिशेत् ।

स्तंभनाचा अतियोग झाला असतां अंग ताठणें, चामडी व स्नायूचें आकुंचन, कांपरें, छातींत धडा बसणें, वाचा बंद होणें, दांतखिळी बसणें आणि पाय, ओंठ, त्वचा व हात काळेनिळे होणें हे विकार उत्पन्न होतात.

न स्वेदयेदतिस्थूलरूक्षदुर्बलमूर्छितान् ॥ २१ ॥
स्तंभनीयक्षतक्षीणक्षाममद्यविकारिणः ।
तिमिरोदरवीसर्पकुष्ठशोषाढ्यरोगिणः ॥ २२ ॥
पीतदुग्धदधिस्नेहमधून्कृतविरेचनान् ।

अष्टदग्धगुदग्लानिक्रोधशोकभयान्वितान् ॥ २३ ॥
क्षुत्तृष्णाकामलापांडुमेहिनः पित्तपीडितान् ।
गर्भिणीं पुष्पितां सूतां मृदु चाऽत्ययिके गदे ॥ २४ ॥

अतिस्थूल, रूक्ष, अशक्त, मूर्च्छित, स्तंभनास योग्य, क्षतक्षीण कृश, मद्यरोगी; तिमिर, उदर, विसर्प, कुष्ठ, क्षय, वातरक्त, गुद-भ्रंश, गुदपाक, ग्लानि, क्रोध, शोक, भय, भूक, तहान, कावीळ, पांडु, प्रमेह व पित्त या विकारांनीं पीडित; दूध, दहीं, तूप, मद्य प्यालेले व जुलाब घेतलेले असे मनुष्य, गर्भिणी, ऋतुस्नात, व बाळंतीण[1] यांना स्वेदन देऊं नये. एखाद्या भयंकर रोगांत स्वेदन देणें फार जरूर असल्यास तें थोड्या प्रमाणानें द्यावें.

श्वासकासप्रतिश्यायहिध्माध्मानविबंधिषु ।
स्वरभेदाऽनिलव्याधिश्लेष्मामस्तंभगौरवे ॥ २५ ॥
अंगमर्दकटीपार्श्वपृष्ठकुक्षिहनुग्रहे ।
महत्त्वे मुष्कयोः खल्यामायामे वातकंटके ॥ २६ ॥
मूत्रकृच्छ्रार्बुदग्रंथिशुक्राघाताढ्यमारुते ।
स्वेदं यथायथं कुर्यात्तदौषधविभागतः ॥ २७ ॥

दमा, खोकला, पडसें, उचकी, पोटफुगी, मलावष्टंभ, स्वरभंग, वातव्याधि, कफविकार, आम, अंग ताठणें, जडपणा, अंग वळणें, कंबर, बरगड्या, पाठ, कूस व हनुवटी यांचें जखडणें; अंडवृद्धि, खल्लीनामक वातरोग, धनुर्वात, वातकंटक, मूत्रकृच्छ्र, अर्बुद, करटें, वीर्यविकार, ऊरुस्तंभ या विकारांवर स्वेदन देणें प्रशस्त आहे. तें वरील चार प्रकारांपैकीं जो योग्य वाटेल त्यानें व त्या त्या रोगा-वरील औषधांनीं द्यावें.

स्वेदो हितस्त्वनाग्नेयो वाते मेदःकफावृते ।
निवातं गृहमायासो गुरुप्रावरणं भयम् ॥ २८ ॥
उपनाहाहवक्रोधभूरिपानं क्षुधातपः ।

मेद व कफ यांनीं आवृत झालेल्या वायूवर अनग्निस्वेद हितावह

---

१ बाळंतीणीला स्वेद देण्याची घातुक चाल इतकी रूढ झाली आहे कीं, स्वेद देऊ नका म्हणून सांगणारा वैद्य मूर्ख आहे, असें लोक समजतात. आम्हीं केलेल्या प्रयोगांवरून स्वेद बहुतेक अनावश्यक आहे, असा आमचा अनुभव आहे. स्वेदा-तिरेकानेंही भयंकर परिणाम झालेले आमच्या पाहण्यांत आले आहेत.

आहे. निवाऱ्याच्या जागीं राहणें, मेहनत, जड वस्त्र पांघरणें, भीति, पोटीस, युद्ध, क्रोध, खूब दारू पिणें, भूक लागणें व ऊन घेणें हे अनग्निस्वेदाचे प्रकार आहेत.

स्नेहक्लिन्नाः कोष्ठगा धातुगा वा
स्रोतोलीना ये च शाखाऽस्थिसंस्थाः ।
दोषाः स्वेदैस्ते द्रवीकृत्य कोष्ठं
नीताः सम्यक् शुद्धिभिर्निर्ह्रियंते ॥ २९ ॥

कोठा, धातु, स्रोतोमार्ग, हात पाय व अस्थि यांत मुरून बसलेले दोष स्नेहनानें ओलसर होतात. त्या सर्वांस स्वेद पातळ करून कोठ्यांत आणितो आणि तेथून वमन-विरेचनाच्या द्वारें ते साफ बाहेर काढले जातात.

---

## अध्याय अठरावा.

अथाऽतो वमनविरेचनविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां वमनविरेचनविधि सांगतों.

कफे विदध्याद्वमनं संयोगे वा कफोल्बणे ।
तद्वद्विरेचनं पित्ते

कफविकारांत व कफाधिकसंयोगजन्य विकारांत वमन द्यावें. तसेंच पित्तविकारांत किंवा पित्ताधिकसंयोगजन्य विकारांत विरेचन द्यावें.

विशेषेण तु वामयेत् ॥ १ ॥
नवज्वरातिसाराधःपित्तासृग्राजयक्ष्मिणः ।
कुष्ठमेहाऽपचीग्रंथिश्लीपदोन्मादकासिनः ॥ २ ॥
श्वासहृल्लासवीसर्पस्तन्यदोषोर्ध्वरोगिणः ।

नवज्वर, अतिसार, अधोगामी रक्तपित्त, क्षय, कुष्ठ, प्रमेह, गंडमाळा, गांठी, श्लीपद, उन्माद, खोकला, दमा, मळमळ, विसर्प, स्त्रियांचे स्तन्यदोष व गळ्याच्या वरील भागांतील रोग यांवर विशेषतः वमन द्यावें.

अवम्या गर्भिणी रूक्षः क्षुधितो नित्यदुःखितः ॥ ३ ॥
बालवृद्धकृशस्थूलहृद्रोगिक्षतदुर्बलाः ।
प्रसक्तवमथुप्लीहतिमिरक्रिमिकोष्ठिनः ॥ ४ ॥

ऊर्ध्वप्रवृत्तवाय्वस्रदत्तबस्तिहतस्वराः।
मूत्राघात्युदरी गुल्मी दुर्वमोऽत्यग्निरर्शसः॥ ५॥
उदावर्तभ्रमाऽष्ठीलापार्श्वरुग्वातरोगिणः।
ऋते विषगराऽजीर्णविरुद्धाऽभ्यवहारतः॥ ६॥

गर्भिणी, रूक्ष, भुकेलेला, नेहमीं दुःखी असणारा, लहान मुलें, म्हातारे, कृश, लठ्ठ, हृद्रोगी, जखमी, अशक्त, ज्यांना फार वांति होते; ज्यांस पानथरी, तिमिर, उदरस्थ कृमि, ऊर्ध्वगामी वायु व रक्तपित्त हे विकार आहेत; ज्यांस बस्ति दिला आहे; ज्यांचा घसा बसलेला आहे; ज्यांस मूत्राघात उदर, गुल्म, मूळव्याध, उदावर्त, भ्रम, वाताष्ठीला, बरगडचा दुखणें व वातविकार हे आहेत; ज्यांस वमन लवकर लागू पडत नाहीं व ज्यांचा जठराग्नि फार तीव्र आहे, अशांस वमन देऊं नये. परंतु जर त्यांनीं विष, कृत्रिम विष, अजीर्ण किंवा विरुद्ध आहार केला असेल तर त्यांस वमन देण्यास हरकत नाहीं.

प्रसक्तवमथोः पूर्वं प्रायेणामज्वरोऽपि च।
धूमांतैः कर्मभिर्वर्ज्याः सर्वैरेव त्वजीर्णिनः॥ ७॥

गर्भिणीपासून अशक्तापर्यंत जीं अकरा माणसें वमनास अयोग्य सांगितलीं तीं व आमज्वराचे रोगी यांस, वमनच नव्हे तर स्नेह-पानापासून धूम्रपानापर्यंतचीं सर्व कर्में वर्ज्य आहेत. अजीर्णांतही सर्व कर्में वर्ज्य आहेत.

विरेकसाध्या गुल्मार्शोविस्फोटव्यंगकामलाः।
जीर्णज्वरोदरगरच्छर्दिप्लीहहलीमकाः॥ ८॥
विद्रधिस्तिमिरं काचः स्यंदः पक्वाशयव्यथा।
योनिशुक्राशया रोगाः कोष्ठगाः कृमयो व्रणाः॥ ९॥
वातास्रमूर्ध्वगं रक्तं मूत्राघातः शकृद्ग्रहः।
वम्याश्च कुष्ठमेहाद्याः

गुल्म, मूळव्याध, विस्फोट, वांग, कावीळ, जीर्णज्वर, उदर, कृत्रिमविष, वांति, पानथरी, हलीमक, विद्रधि तिमिर, काचबिन्दु, डोळे येणें, पोटशूळ, योनिरोग, वीर्यदोष, कोठ्यांतील कृमि, व्रण, वातरक्त ऊर्ध्वगामी, रक्तपित्त, मूत्राघात, मलावरोध आणि कुष्ठ व प्रमेह वगैरे वमनार्ह रोग विरेचनसाध्य आहेत.

न तु रेच्यो नवज्वरी ॥ १० ॥
अल्पाऽग्न्यधोगपित्तास्रक्षतपाय्वतिसारिणः ।
सशल्यास्थापितक्रूरकोष्ठातिस्निग्धशोषिणः ॥ ११ ॥

नवीन ज्वरांत रेचक कधींही देऊं नये. त्याचप्रमाणें अग्निमांद्य, अधोगामी रक्तपित्त, गुदपाक, अतिसार व क्षय या विकारांत, व ज्यांच्या शरीरांत शल्य शिरलें आहे, ज्यांना आस्थापन बस्ति दिला आहे, ज्यांचा कोठा जड आहे, व ज्यांस अतिस्नेहन झालें आहे, त्यांनाही विरेचन देऊं नये.

अथ साधारणे काले स्निग्धस्विन्नं यथाविधि ।
श्वोवम्यमुत्क्लिष्टकफं मत्स्यमाषतिलादिभिः ॥ १२ ॥
निशां सुप्तं सुजीर्णान्नं पूर्वाह्णे कृतमंगलम् ।
निरन्नमीषत्स्निग्धं वा पेयया पीतसर्पिषम् ॥ १३ ॥
वृद्धबालाबलक्लीबभीरून् रोगानुरोधतः ।
आकंठं पायितान्मद्यं क्षीरमिक्षुरसं रसम् ॥ १४ ॥
यथाविकारविहितां मधुसैंधवसंयुताम् ।
कोष्ठं विभज्य भैषज्यमात्रां मंत्राभिमंत्रिताम् ॥ १५ ॥
ब्रह्मदक्षाश्विरुद्रेंद्रभूचंद्रार्काऽनिलाऽनलाः ।
ऋषयः सौषधिग्रामा भूतसंघाश्च पांतु वः ॥ १६ ॥
रसायनमिवर्षीणाममराणामिवामृतम् ।
सुधेवोत्तमनागानां भैषज्यमिदमस्तु ते ॥ १७ ॥
ॐनमो भगवते भैषज्यगुरवे वैडूर्यप्रभराजाय
तथागतायाऽर्हते सम्यक्संबुद्धाय । तद्यथा ।
ॐभैषज्ये भैषज्ये महाभैषज्ये समुद्गते स्वाहा ॥
प्राङ्मुखं पाययेत्

नंतर श्रावणादि साधारण ऋतुसंधिकाळीं यथाविधि स्नेहन-स्वेदन करावें. वमन देण्याच्या पूर्व दिवशीं मासे, उडीद, तीळ वगैरे कफास चाळविणारे पदार्थ खावयास घालावे. आणि सगळी रात्र यथेच्छ झोंप घेऊन दुसरे दिवशीं सकाळीं अन्न चांगलें जिरल्यावर स्वस्तिवाचन वगैरे करून अनशेपोटीं किंवा जरूर वाटल्यास किंचित् तूप घातलेली पेज पाजून वमनौषध पाजावें. म्हातारे, लहान मुलें, अशक्त, नपुंसक व भित्रे यांस त्यांच्या रोगाच्या

अनुरोधानें दारू, दूध, उंसाचा रस किंवा मांसरस आकंठ पाजावा. वामक औषध त्या त्या विकारावर योग्य असावें. कोठ्याच्या जड किंवा हलकेपणाप्रमाणें त्याचें प्रमाण असावें. त्यांत मध व सैंधव मिळवावा; आणि तें "ब्रह्मदक्षाश्वि०" । या मंत्रांनीं अभिमंत्रित करून रोग्याला पूर्वाभिमुख बसवून पाजावें.

पीतं मुहूर्तमनुपालयेत् ।
तन्मनाः

औषध प्यालयावर दोन घटकापर्यंत रोग्यानें वमनाकडेच एकसारखें लक्ष्य लावून बसावें.

जातहृल्लासप्रसेकश्छर्दयेत्ततः ॥ १८ ॥
अंगुलिभ्यामनायस्तो नालेन मृदुनाऽथवा ।
गलतालवरुजन्वेगानप्रवृत्तान् प्रवर्तयन् ॥ १९ ॥
प्रवर्तयन् प्रवृत्तांश्च जानुतुल्यासने स्थितः ।

मळमळून तोंडास पाणी सुटूं लागलें म्हणजे गुडघ्याइतक्या उंच आसनावर बसून घशांत दोन बोटें अथवा कमळाचा कोंवळा देंठ गळा व टाळू यांस इजा न होईल अशा रीतीनें घालून वांति सुरू नसल्यास सुरू करावी; आणि सुरू झाली असल्यास तशीच होऊं द्यावी.

उभे पार्श्वे ललाटं च वमतश्चाऽस्य धारयेत् ॥ २० ॥
प्रपीडयेत्तथा नाभिं पृष्ठं च प्रतिलोमतः ।

वांति होत असतांना दुसऱ्या मनुष्यानें रोग्याचें कपाळ व दोन्ही बरगड्या हातांनीं दाबून धराव्या आणि बेंबीवर व पाठीवर खालून वर चोळावें.

कफे तीक्ष्णोष्णकटुकैः पित्ते स्वादुहिमैरिति ॥ २१ ॥
वमेत् स्निग्धाम्ललवणैः संसृष्टे मरुता कफे ।
पित्तस्य दर्शनं यावच्छेदो वा श्लेष्मणो भवेत् ॥ २२ ॥

कफविकारावर तीक्ष्ण, उष्ण व तिखट; पित्तावर गोड व थंड; आणि वातमिश्रित कफावर स्निग्ध, आंबट व तिखट अशीं वामक औषधें द्यावीं. पित्त पडेपर्यंत किंवा कफ निघून जाईपर्यंत वमन करावें.

हीनवेगः कणाधात्रीसिद्धार्थलवणोदकैः।
वमेत्पुनः पुनः

वमनाचा वेग फारच कमी असल्यास म्हणजे चांगलें वमन न झाल्यास पिंपळी, आंवळकठी, शिरस व सैंधव हीं वाटून पाण्यांत कालवून वरचेवर पिऊन उलटी करावी.

तत्र वेगानामप्रवर्तनम् ॥ २३ ॥
प्रवृत्तिः सविबंधा वा केवलस्यौषधस्य वा।
अयोगस्तेन निष्ठीवकंडूकोठज्वरादयः ॥ २४ ॥

वांति मुळींच न होणें, अडखळत होणें, किंवा नुस्तें औषधच पडणें हीं वांतीच्या अयोगाचीं लक्षणें होत. यापासून तोंडांत वरचेवर थुंकी जमणें, खाज, गांधी उठणें, ज्वर वगैरे विकार होतात.

निर्विबंधं प्रवर्तंते कफपित्ताऽनिलाः क्रमात्।
सम्यग्योगे

कफ, पित्त व वायु यांची या क्रमानें मोकळी प्रवृत्ति झाली म्हणजे वमन बरोबर लागू झालें, असें समजावें.

अतियोगे तु फेनचंद्रकरक्तवत् ॥ २५ ॥
वमितं क्षामता दाहः कंठशोषस्तमो भ्रमः।
घोरा वाय्वामया मृत्युर्जीवशोणितनिर्गमात् ॥ २६ ॥

वमनाचा अतियोग झाला असतां वांतींत फेंस, चित्रविचित्र रंगाचीं वर्तुळें व रक्त हीं पडतात, आणि कृशता, दाह, गळा सुकणें, डोळ्यापुढें अंधेरी येणें, भोंवळ, भयंकर वातरोग आणि जीवशोणित निघून गेल्यामुळें मृत्युही येतो.

सम्यग्योगेन वमितं क्षणमाश्वास्य पाययेत्।
धूमत्रयस्यान्यतमं स्नेहाचारमथाऽऽदिशेत् ॥ २७ ॥

ज्यास बरोबर वमन झालें असेल त्यास क्षणभर विसांवा देऊन हुशारी आली म्हणजे तीन प्रकारच्या धूम्रपानांपैकीं एखादें धूम्रपान व स्नेहविधीमध्यें सांगितलेले नियम पाळावयास सांगावें.

ततः सायं प्रभाते वा क्षुद्वान् स्नातः सुखांबुना।
भुंजानो रक्तशाल्यन्नं भजेत्पेयादिकं क्रमम् ॥ २८ ॥

नंतर संध्याकाळीं किंवा दुसरे दिवशीं सकाळीं सुखोष्ण पाण्यानें

स्नान करून भूक लागली असतां तांबसाळीचा भात जेवून नंतर पुढील पेयादिक क्रम करावा.

**पेयां विलेपीमकृतं कृतं च यूषं रसं त्रीनुभयं तथैकम् ।**
**क्रमेण सेवेत नरोऽन्नकालान् प्रधानमध्यावरशुद्धिशुद्धः ॥ २९ ॥**

उत्तम, मध्यम व कनिष्ठ प्रतीचें वमन झालेल्या रोग्यानें पेज, मऊ व पातळ भात, फोडणीचें व बिनफोडणीचें कढण आणि मांसरस हीं अनुक्रमें तीन, दोन व एक वेळ सेवन करावीं.

**यथाऽणुरग्निस्तृणगोमयाद्यैः संधुक्ष्यमाणो भवति क्रमेण ।**
**महान् स्थिरः सर्वपचस्तथैव शुद्धस्य पेयादिभिरंतराग्निः ॥३०॥**

ज्याप्रमाणें विस्तवाची एखादी लहानशी ठिणगी गवत, गोवऱ्या वगैरेंनीं क्रमानें पेटवीत गेलें असतां कांहीं वेळानें तिचाच मोठा स्थिर व सर्व पदार्थ जाळून टाकण्याजोगा अग्नि बनतो, त्याचप्रमाणें वमनविरेचनादिकांनीं कोठा शुद्ध झाला असतां पेयादिक्रमाचें सेवन केल्यानें जठराग्नि प्रदीप्त होऊन सर्व पदार्थांचें पचन करण्यास समर्थ होतो.

**जघन्यमध्यप्रवरे तु वेगाश्चत्वार इष्टा वमने षडष्टौ ।**
**दशैव ते द्वित्रिगुणा विरेके प्रस्थस्तथा स्याद्द्विचतुर्गुणश्च ॥ ३१॥**

फार जोरदार औषधानें झालेल्या उत्तम वांतीचे आठ, मध्यम वांतीचे सहा आणि कनिष्ठ प्रकारच्या वांतीचे चार वेग यावे. उत्तम, मध्यम व कनिष्ठ प्रतीच्या रेचनाचे अनुक्रमें तीस, वीस व दहा वेग यावे. त्यांचें उत्तम, मध्यम व कनिष्ठ प्रमाण चार, दोन व एक प्रस्थ असतें.

**पित्तावसानं वमनं विरेकादर्धं कफांतं च विरेकमाहुः ।**

---

१ उत्तम प्रतीचें वमन झालेल्या मनुष्यानें एके दिवशीं सकाळ संध्याकाळ दोन वेळ व दुसरे दिवशीं तिसऱ्यांदा पेज प्यावी. दुसरे दिवशीं संध्याकाळीं व तिसरे दिवशीं दोन वेळ विलेपी खावी. याचप्रमाणें फोडणीचें व बिनफोडणीचें कढण आणि मांसरस तीन तीन वेळ सेवन करावे. म्हणजे आठव्या दिवशीं नेहमींच्या भोजनाची पाळी येते. मध्यम वमनावर प्रत्येक अन्नप्रकार दोन दोन वेळां व कनिष्ठ वमनावर एकेक वेळां सेवन करावा. सामान्यतः दिवसांतून दोनच वेळां जेवावयाचें असतें, म्हणून अन्नकाल दररोज दोन असतात.

वांतीचें प्रमाण रेचकाच्या निम्में जाणावें. पित्त पडेपर्यंत वमन, व कफ पडेपर्यंत रेचन व्हावें.

द्वित्रान् सविट्कानपनीय वेगान् मेयं विरेके वमने तु पीतम् ३२

रेचनाचे वेग मोजतांना पहिले दोन तीन मलमिश्रित वेग वजा करून बाकीचे मोजावे. वमनांत प्यालेलें औषध वजा करून बाकीचें ओकलेलें द्रव्य मोजावें.

अथैनं वामितं भूयः स्नेहस्वेदोपपादितम् ।
श्लेष्मकाले गते ज्ञात्वा कोष्ठं सम्यग्विरेचयेत्॥ ३३॥

याप्रमाणें वमन झालेल्या मनुष्यास पुन्हा स्नेहन-स्वेदन देऊन कफाची वेळ ( सकाळ ) निघून गेल्यावर कोठ्याचा विचार करून योग्य रेचन द्यावें.

बहुपित्तो मृदुः कोष्ठः क्षीरेणाऽपि विरेच्यते ।
प्रभूतमारुतः क्रूरः कृच्छ्राच्छ्यामादिकैरपि ॥ ३४ ॥

पित्ताधिक कोठा हलका असतो; त्याला नुसत्या दुधानेंही जुलाब होतात. वाताधिक कोठा फार जड असतो. त्यास काळ्या निशोत्तरासारख्या रेचक औषधांनीं देखील जुलाब होण्याची मारामार पडते.

कषायमधुरैः पित्ते विरेकः कटुकैः कफे ।
स्निग्धोष्णलवणैर्वायौ

पित्तविकारांत तुरट व गोड, कफांत तिखट, आणि वायूवर स्निग्ध, उष्ण व खारट, अशीं रेचक औषधें द्यावीं.

अप्रवृत्तौ तु पाययेत् ॥ ३५॥
उष्णांबु स्वेदयेदस्य पाणितापेन चोदरम् ।

रेचक लागू न पडल्यास ऊन पाणी पाजावें व बिस्तवावर हात तापवून त्यांनीं पोट शेकावें.

उत्थानेऽल्पे दिने तस्मिन्भुक्त्वाऽन्येद्युः पुनः पिबेत् ३६
अदृढस्नेहकोष्ठस्तु पिबेदूर्ध्वं दशाहतः ।
भूयोऽप्युपस्कृततनुः स्वेदस्नेहैर्विरेचनम् ॥ ३७॥
यौगिकं सम्यगालोच्य स्मरन्पूर्वमनुक्रमम् ।

पहिल्या दिवशीं थोडें रेचन झाल्यास त्या दिवशीं जेवण करून दुसऱ्या दिवशीं पुन्हा रेचन द्यावें. कोठा रुक्ष झाल्यास दहा दिवसां-

नंतर पुन्हा चांगलें स्नेहन-स्वेदन करून, पूर्वीं सांगितलेला एकंदर विधि व क्रम लक्षांत आणून त्याप्रमाणें योग्य रेचन द्यावें.

हृत्कुक्ष्यशुद्धिररुचिरुत्क्लेशः श्लेष्मपित्तयोः ॥ ३८ ॥
कंडूर्विदाहः पिटिका पीनसो वातविड्ग्रहः ।
अयोगलक्षणम्

छातींत व पोटांत जडपणा असणें, अरुचि, कफपित्तांची स्वस्थानापासून च्युति, कंडू, विदाह, पुटकुळ्या, पीनस, आणि वाताचा व मलांचा अवरोध हीं रेचनाच्या अयोगाचीं लक्षणें होत.

योगो वैपरीत्ये यथोदितात् ॥ ३९ ॥

याच्या उलट लक्षणांवरून रेचक चांगलें लागू झालें आहे असें जाणावें.

विट्पित्तकफवातेषु निःसृतेषु क्रमात्स्रवेत् ।
निःश्लेष्मपित्तमुदकं श्वेतं कृष्णं सलोहितम् ॥ ४० ॥
मांसधावनतुल्यं वा मेदःखंडाभमेव वा ।
गुदनिःसरणं तृष्णा भ्रमो नेत्रप्रवेशनम् ॥ ४१ ॥
भवंत्यतिविरिक्तस्य तथाऽतिवमनामयाः ।

मल, पित्त, कफ व वात हीं क्रमानें एकामागून एक पडल्यावर कफपित्तरहित पांढरें, काळें, किंचित् तांबूस, मांसाच्या धुवणासारखें किंवा चर्बीच्या गठ्ठ्यासारखें पाणी निघूं लागतें. गुदभ्रंश, तहान, भ्रम, डोळे आंत ओढले जाणें, आणि अतिवमनापासून होणारे रोग हे रोग विरेचनाच्या अतियोगामुळें होतात.

सम्यग्विरिक्तमेनं च वमनोक्तेन योजयेत् ॥ ४२ ॥
धूमवर्ज्येन विधिना

रेचक लागू झाल्यानंतर धूम्रपानाशिवाय बाकी सर्व वमनोक्त उपचार करावे.

ततो वमितवानिव ।
क्रमेणाऽन्नानि भुंजानो भजेत्प्रकृतिभोजनम् ॥ ४३ ॥

नंतर वमन झालेल्या मनुष्याप्रमाणेंच क्रमशः पेयादिकांचें सेवन करीत करीत नेहमींच्या जेवणावर यावें.

मंदवह्निमसंशुद्धमक्षामं दोषदुर्बलम् ।
अदृष्टजीर्णलिंगं च लंघयेत्पीतभेषजम् ॥ ४४ ॥
स्नेहस्वेदौषधोत्क्लेशसंगैरिति न बाध्यते ।

ज्याचा अग्नि मंद आहे, कोठा अशुद्ध आहे, दोष दुर्बल आहेत, जो स्थूल आहे व ज्यानें रेचक घेतलें असून तें जिरल्याचीं लक्षणें दिसत नाहींत, त्यानें लंघन करावें. यापासून स्वेदन व रेचक औषधें यांच्या योगानें दोष आपापल्या स्थानापासून च्युत होऊन, त्यांचा आंतल्या आंत अवरोध झाल्यानें होणारे विकार उत्पन्न होत नाहींत.

संशोधनास्रविस्रावस्नेहयोजनलंघनैः ॥ ४५ ॥
यात्यग्निर्मंदतां तस्मात्क्रमं पेयादिमाचरेत्।

संशोधन, रक्तस्राव, स्नेहन व लंघन यांच्या योगानें अग्नि मंद होतो, म्हणून पेयादिकांचें सेवन करावें.

स्रुताल्पपित्तश्लेष्माणं मद्यपं वातपैत्तिकम् ॥ ४६ ॥
पेयां न पाययेत्तेषां तर्पणादिक्रमो हितः।

ज्यास व कफ पित्त थोडेंच पडलें आहे, जो दारू पिणारा आहे, किंवा ज्यास वातपित्तविकार आहेत, त्यांस पेया वगैरे न देतां, मंथ वगैरे तर्पणादि क्रमच चालू करावा.

अपक्कं वमनं दोषान् पच्यमानं विरेचनम् ॥ ४७ ॥
निर्हरेद्वमनस्याऽतः पाकं न प्रतिपालयेत्।

वमनौषध अपक्क अवस्थेंतच दोषांस काढून टाकितें आणि विरेचनौषध पक्क होत असतांना दोषांस काढितें. म्हणून वमनाच्या पचनाची वाट पाहूं नये.

दुर्बलो बहुदोषश्च दोषपाकेन यः स्वयम् ॥ ४८ ॥
विरिच्यते भेदनीयैर्भोज्यैस्तमुपपादयेत्।

ज्या दुर्बल मनुष्यास दोषातिरेकामुळें दोषाचें पचन होतांच औषधावांचून आपोआप रेच होतात, त्यास रेचक औषध न देतां नुस्ते सारक असे खाण्याचे पदार्थ द्यावे.

दुर्बलः शोधितः पूर्वमल्पदोषः कृशो नरः ॥ ४९ ॥
अपरिज्ञातकोष्ठश्च पिबेन्मृद्वल्पमौषधम्।

अशक्त, कृश, ज्याचा कोठा नुकताच पूर्वीं शुद्ध केला आहे, ज्याला थोडाच विकार आहे, अथवा ज्याच्या कोठ्याची बरोबर माहिती नाहीं, अशा मनुष्यानें सौम्य व थोडेंच रेचक औषध घ्यावें.

वरं तदसकृत्पीतमन्यथा संशयावहम् ॥ ५० ॥

तेंच औषध पुन्हा पुन्हा घेणें बरें; परंतु एकदम पुष्कळ व कडक औषध घेणें जोखमाचें आहे.

हरेद्बहूंश्चलान्दोषानल्पानल्पान् पुनः पुनः ।
दुर्बलस्य मृदुद्रव्यैरल्पान् संशमयेत्तु तान् ॥ ५१ ॥
क्लेशयंति चिरं ते हि हन्युर्वैनमनिर्हृताः ।

दुर्बल मनुष्याचे दोष फार असून ते प्रचलित झाले असल्यास वरचेवर सौम्य औषधांनीं थोडे करून काढून टाकावे, आणि थोडेच असल्यास त्यांचें शमन करावें. फार दोष असून जर ते काढून टाकिले नाहींत, तर ते फार दिवसपर्यंत क्लेश देतात किंवा कदाचित् प्राणही घेतात.

मंदाग्निं क्रूरकोष्ठं च सक्षारलवणैर्घृतैः ॥ ५२ ॥
संधुक्षिताग्निं विजितकफवातं च शोधयेत् ।

ज्याचा अग्नि मंद असून कोठा जड आहे, त्यास प्रथम अग्नि प्रदीप्त करण्याकरितां व कफवाताचें शमन करण्याकरितां क्षारलवणयुक्त घृतें देऊन नंतर रेचन द्यावें.

रूक्षबह्वानिलक्रूरकोष्ठव्यायामशीलिनाम् ॥ ५३ ॥
दीप्ताग्नीनां च भेषज्यमविरेच्यैव जीर्यति ।

ज्यांचें शरीर रूक्ष व वातुळ आहे; कोठा जड आहे, जे नेहमीं व्यायाम करितात व ज्यांचा अग्नि प्रदीप्त आहे, अशा मनुष्यांस रेचक औषध दिलें असतां त्यापासून जुलाब न होतां तें तसेंच जिरून जातें.

तेभ्यो बस्तिं पुरा दद्यात्ततः स्निग्धं विरेचनम् ॥ ५४ ॥
शकृन्निर्हृत्य वा किंचित्तीक्ष्णाभिः फलवर्तिभिः ।
प्रवृत्तं हि मलं स्निग्धो विरेको निर्हरेत्सुखम् ॥ ५५ ॥

अशा मनुष्यांस प्रथम रेचक औषधांची पिचकारी मारावी, किंवा तीव्र रेचक औषधांची वात गुदद्वारांत घालून किंचित् मल काढावा; आणि नंतर ( एरंडेल तेलासारखें ) स्निग्ध रेचक द्यावें. याप्रमाणें मल एकदां निघूं लागला म्हणजे स्निग्ध रेचनानें तो अनायास बाहेर येतो.

विषाभिघातपिटिकाकुष्ठशोफविसर्पिणः ।

कामलापांडुमेहार्तान्नातिस्निग्धान् विरेचयेत् ॥ ५६ ॥

ज्यांस विषविकार, अभिघात, पुळ्या, सूज, विसर्प, कावीळ, पांडु व प्रमेह हे विकार असतील त्यांस फारसें स्नेहन न देतांच रेचक द्यावें.

सर्वान् स्नेहविरेकैश्च रूक्षैस्तु स्नेहभावितान् ।

सर्व रोग्यांस स्निग्ध रेचक द्यावें; पण चांगल्या रीतीनें स्नेहन झालेल्यांस रूक्ष रेचक द्यावें.

कर्मणां वमनादीनां पुनरप्यंतरेऽतरे ॥ ५७ ॥
स्नेहस्वेदौ प्रयुंजीत स्नेहमंते बलाय च ।

वमनादि कर्में चालू असतां मध्यंतरीं म्हणजे प्रत्येक कर्माच्या आरंभीं व शेवटीं स्नेहन व स्वेदन करावें. आणि सर्व कर्में संपल्यावर शक्तीकरितां पुन्हा स्नेहन द्यावें.

मलो हि देहादुत्क्लेश्य ह्रियते वाससो यथा ॥ ५८ ॥
स्नेहस्वेदैस्तथोत्क्लेश्य ह्रियते शोधनैर्मलः ।

ज्याप्रमाणें स्नेह व स्वेद यांच्या योगानें वस्त्रांचा मळ सुटतो, त्याचप्रमाणें स्नेहन व स्वेदन यांच्या योगानें शरीरांतील मळ मोकळा होऊन वमनविरेचनादिकांच्या द्वारें तो बाहेर काढला जातो.

स्नेहस्वेदावनभ्यस्य कुर्यात्संशोधनं तु यः ॥ ५९ ॥
दारु शुष्कमिवानामे शरीरं तस्य दीर्यते ।

सुकलेलें लांकूड वांकविल्यानें जसें तात्काळ मोडतें, त्याचप्रमाणें स्नेहन व स्वेदन न करितां शोधन दिलें असतां शरीराचा नाश होतो.

बुद्धिप्रसादं बलमिंद्रियाणां धातुस्थिरत्वं ज्वलनस्य दीप्तिम् ।
चिराच्च पाकं वयसः करोति संशोधनं सम्यगुपास्यमानम् ६०

योग्य रीतीनें संशोधन केलें असतां त्यापासून निर्मळ बुद्धि, बळकट इंद्रियें, स्थिर धातु, प्रदीप्त अग्नि व दीर्घ आयुष्य हीं प्राप्त होतात.

---

## अध्याय एकोणिसावा.

अथाऽतो बस्तिविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां बस्तिविधि सांगतों.

वातोल्बणेषु दोषेषु वाते वा बस्तिरिष्यते ।
उपक्रमाणां सर्वेषां सोऽग्रणीस्त्रिविधश्च सः ॥ १ ॥
निरूहोऽन्वासनो बस्तिरुत्तरः

केवळ वातविकारांत किंवा वाताधिक दोषांत बस्ति देणें हितकर आहे. तो सर्व प्रकारच्या चिकित्सेंत श्रेष्ठ असून त्याचे निरूह, अनुवासन व उत्तर बस्ति असे तीन प्रकार आहेत.

तेन साधयेत् ।
गुल्माऽनाहखुडप्लीहशुद्धाऽतीसारशूलिनः ॥ २ ॥
जीर्णज्वरप्रतिश्यायशुक्राऽनिलमलग्रहान् ।
वर्ध्माऽश्मरीरजोनाशान् दारुणांश्चाऽनिलामयान् ॥ ३ ॥

त्यांपैकीं निरूह बस्ति गुल्म, पोटफुगी, वातरक्त, पानथरी, निराम अतिसार, शूळ, जीर्णज्वर, पडसें; वीर्य, वात व मळ यांचा अवरोध, अन्तर्गळ, मूतखडा, विटाळ बंद होणें, व दारुण वातरोग यांवर द्यावा.

अनास्थाप्यास्त्वतिस्निग्धः क्षतोरस्को भृशं कृशः ।
आमातिसारी वमिमान् संशुद्धो दत्तनावनः ॥ ४ ॥
कासश्वासप्रमेहार्शोहिध्माऽध्मानाल्पवर्चसः ।
शूनपायुः कृताहारो बद्धच्छिद्रोदकोदरी ॥ ५ ॥
कुष्ठी च मधुमेही च मासान् सप्त च गर्भिणी ।

अतिस्निग्ध, उरःक्षती, अत्यंत कृश; आमातिसार व वांति होत असलेले; वमन, विरेचन किंवा नस्य घेतलेले; खोकला, दमा, प्रमेह, मूळव्याध, उचकी, वायूनें पोट फुगणें, बद्धोदर, छिद्रोदर, उदकोदर, कुष्ठ व मधुमेह हे विकार असलेले; ज्यांच्या कोठ्यांत थोडा मळ आहे; ज्यांचें गुदद्वार सुजलें आहे, ज्यांनीं नुक्तेंच जेवण केलें आहे; असे व सात महिन्यापर्यंतची गर्भवती स्त्री, यांस निरूह बस्ति देऊं नये.

आस्थाप्या एव चान्वास्या विशेषादतिवह्नयः ॥ ६ ॥
रूक्षाः केवलवातार्ताः

ज्यांस निरूह बस्ति द्यावयाचा तेच अनुवासनासही योग्य जाणावेत. ज्यांचा अग्नि फार तीक्ष्ण आहे, रूक्ष व केवळ वातरोगी अशांस तर अनुवासन बस्ति विशेषेंकरून द्यावा.

नाऽनुवास्यास्त एव च ।
येऽनास्थाप्यास्तथा पांडुकामलामेहपीनसाः ॥ ७ ॥
निरन्नप्लीहविड्भेदिगुरुकोष्ठकफोदराः ।
अभिष्यंदिकृशस्थूलकृमिकोष्ठाढ्यमारुताः ॥ ८ ॥
पीते विषे गरेऽपच्यां श्लीपदी गलगंडवान् ।

जे निरूह बस्तीस योग्य नाहींत, ते अनुवासनासही अयोग्यच जाणावेत. त्याशिवाय पांडु, कावीळ, प्रमेह, पीनस, प्लीहा, अतिसार, जड कोठा, कफोदर, अभिष्यंद, कृशता, स्थूलता, कृमि, ऊरुस्तंभ, विष, कृत्रिमविष, गंडमाला, श्लीपद, गलगंड या विकारांत व अनशेपोटीं अनुवासन बस्ति देऊं नये.

तयोस्तु नेत्रं हेमादिधातुदार्वस्थिवेणुजम् ॥ ९ ॥
गोपुच्छाकारमच्छिद्रं श्लक्ष्णर्जु गुलिकामुखम् ।

बस्ति देण्याची नळी सोनें वगैरे धातूंची, लांकडाची, हाडाची किंवा वेळूची, गोपुच्छाकार, छिद्ररहित, गुळगुळीत व सरळ असून तिचें तोंड वाटोळें असावें व तिला धार नसावी.

ऊनेऽब्दे पंच पूर्णेऽस्मिन्ना सप्तभ्योंऽगुलानि षट् ॥ १० ॥
सप्तमे सप्त तान्यष्टौ द्वादशे षोडशे नव ।
द्वादशैव परं विंशात्

तिचें प्रमाण एक वर्षाच्या आंतील वयाच्या रोग्यास पांच अंगुळें, एक वर्षानंतर व सात वर्षांच्या आंत सहा अंगुळें, सातव्या वर्षीं सात अंगुळें, बारा वर्षांच्या वयांत आठ अंगुळें, सोळा वर्षांच्या वयांत नऊ अंगुळें, आणि वीस वर्षांनंतर बारा अंगुळें असावें.

वीक्ष्य वर्षांतरेषु च ॥ ११ ॥
वयोबलशरीराणि प्रमाणमभिवर्धयेत् ।

सदरहू वयाच्या मध्यंतरीं वय, बळ व शरीराचें मान पाहून नळीचें प्रमाण वाढवावें.

स्वांगुष्ठेन समं मूले स्थौल्येनाग्रे कनिष्ठया ॥ १२ ॥

नळीचें मूळ हाताच्या आंगठ्याएवढें जाड, आणि टोंक करंगळीइतकें जाड असावें.

पूर्णेऽब्देऽगुलमादाय तदर्धार्धप्रवर्धितम् ।
त्र्यंगुलं परमं छिद्रं मूलेऽग्रे वहते तु यत् ॥ १३ ॥

मुद्गं माषं कलायं च क्लिन्नं कर्कंधुकं क्रमात् ।

नळीच्या छिद्राचा परिघ मुळाशीं एक अंगुळ असून तो पुढें सातव्या, बाराव्या व सोळाव्या वर्षीं पाव पाव अंगुळ वाढवीत जावा; आणि सतराव्या वर्षापासून एकविसाव्या वर्षापर्यंत दर वर्षास पाव पाव अंगुळ वाढवीत जावा. म्हणजे एकविसाव्या वर्षीं त्याचें तीन अंगुळांचें पूर्ण प्रमाण होतें. अग्रभागीं छिद्राचा परिघ पहिल्या वर्षीं मूग, सातव्या वर्षीं उडीद, बाराव्या वर्षीं भिजलेला वाटाणा, आणि एकविसाव्या वर्षीं रानबोर जाईल एवढा असावा.

मूलच्छिद्रप्रमाणेन प्रांते घटितकर्णिकम् ॥ १४ ॥
वर्त्याग्रे पिहितं मूले यथास्वं ह्यंगुलांतरम् ।
कर्णिकाद्वितयं नेत्रे कुर्यात्

नळीच्या टोंकाशीं मुळाशीं असलेल्या छिद्राएवढी एक चाती करून बसवावी; तिच्या पुढच्या छिद्रांत वातीचा दट्या बसविलेला असावा. आणि नळीच्या मुळाशीं दोन आंगळांच्या अंतरानें दोन चात्या बसवाव्या.

तत्र च योजयेत् ॥ १५ ॥
अजाविमहिषादीनां बस्तिं सुमृदितं दृढम् ।
कषायरक्तं निश्छिद्रग्रंथिगंधशिरं तनुम् ॥ १६ ॥
ग्रंथितं साधु सूत्रेण सुखसंस्थाप्यभेषजम् ।

तेथें बकरा, मेंढा, रेडा वगैरेंचा मूत्राशय जोडावा. तो तेल लावून चांगला कमावलेला, बळकट, काढ्यानें रंगविलेला; छिद्र, गांठी, दुर्गंधी व शिरा नसलेला आणि पातळ असून चांगल्या पक्क्या दोऱ्यानें शिवलेला व त्यांत चांगल्या रीतीनें औषध घालतां येईल असा असावा.

बस्त्यभावेऽकपादं वा न्यसेद्वासोऽथवा घनम् ॥ १७ ॥

बस्तीच्या अभावीं सदरहू पशूंच्या मांडीचें किंवा पायाचें चामडें अथवा जाड कापड लावावें.

निरूहमात्रा प्रथमे प्रकुंचो वत्सरात्परम् ।
प्रकुंचवृद्धिः प्रत्यब्दं यावत्षट्प्रसृतास्ततः ॥ १८ ॥
प्रसृतं वर्धयेदूर्ध्वं द्वादशाष्टादशस्य च ।

आसप्ततेरिदं मानं दशैव प्रसृताः परम् ॥ १९ ॥

निरूहबस्तीचीं औषधें पहिल्या वर्षीं चार तोळे घेऊन पुढें बारा वर्षेंपर्यंत दर वर्षीं चार चार तोळेप्रमाणें आणि त्याच्यापुढें अठरा वर्षेंपर्यंत दर वर्षीं आठ तोळेप्रमाणें वाढवीत जावीं. सत्तर वर्षेंपर्यंत हेंच प्रमाण कायम ठेवून पुढें ८० तोळ्याचें प्रमाण ठेवावें.

यथायथं निरूहस्य पादो मात्राऽनुवासने ।

अनुवासनाच्या औषधाचें प्रमाण निरूहाच्या चतुर्थांश द्यावें.

आस्थाप्यं स्नेहितं स्विन्नं शुद्धं लब्धबलं पुनः ॥ २० ॥
अन्वासनार्हं विज्ञाय पूर्वमेवाऽनुवासयेत् ।
शीत वसंते च दिवा रात्रौ केचित्ततोऽन्यदा ॥ २१ ॥

ज्यांस निरूह बस्ति देणें असेल त्यांचें स्नेहन-स्वेदन करून वमनविरेचनानें कोठा शुद्ध करून पुनः अंगांत शक्ति आल्यावर रोगी अनुवासनास योग्य असल्यास प्रथम अनुवासन द्यावें. तें वसंत, हेमंत व शिशिर या ऋतूंत दिवसा आणि (कित्येकांच्या मतें) इतर ऋतूंत रात्रीं द्यावें.

अभ्यक्तस्नातमुचितात्पादहीनं हितं लघु ।
अस्निग्धरूक्षमशितं सानुपानं द्रवादि च ॥ २२ ॥
कृतचंक्रमणं मुक्तविण्मूत्रं शयने सुखे ।
नात्युच्छ्रिते न चोच्छीर्षे संविष्टं वामपार्श्वतः ॥ २३ ॥
संकोच्य दक्षिणं सक्थि प्रसार्य च ततोऽपरम् ।
अथाऽस्य नेत्रं प्रणयेत्स्निग्धे स्निग्धमुखं गुदे ॥ २४ ॥
उच्छ्वास्य बस्तेर्वदने बद्धे हस्तमकंपयन् ।
पृष्ठवंशं प्रति ततो नाऽतिद्रुतविलंबितम् ॥ २५ ॥
नाऽतिवेगं न वा मंदं सकृदेव प्रपीडयेत् ।
सावशेषं च कुर्वीत वायुः शेषे हि तिष्ठति ॥ २६ ॥

तें देण्यापूर्वीं रोग्यानें अभ्यंगस्नान करून, नेहमींपेक्षां एक चतुर्थांश कमी, हितकर, हलकें, किंचित् स्निग्ध व किंचित् रूक्ष असें अन्न पातळ पदार्थांबरोबर खाऊन, थोडें हिंडून, मलमूत्रोत्सर्ग करून, फार उंच नव्हे अशा मऊ बिछान्यावर उशी न घेतां डाव्या कुशीवर, उजवी मांडी आकुंचित करून व डावी पसरून निजावें. नंतर गुदद्वार व नळीचें तोंड यांस तेल लावून ती आंत घालावी.

नळींतील हवा काढून टाकून तिचें तोंड बंद करून हात कांपूं न देतां पाठीच्या कण्याच्या बाजूनें आंत सारून बस्ति बेतानें एकदम पिळावा. त्यांत थोडेंसें औषध शिल्लक ठेवावें. कारण त्यांत वायूचा अंश असतो.

दत्ते तूत्तानदेहस्य पाणिना ताडयेत्स्फिजौ ।
तत्पार्ष्णिभ्यां तथा शय्यां पादतश्च त्रिरुत्क्षिपेत् ॥ २७ ॥

नंतर रोग्यास उताणा निजवून बस्ति दिल्यावर त्याच्या कुल्यावर हातांनीं किंवा त्याच्या खोटांनीं ताडन करावें. आणि पायांकडून बिछाना तीन वेळां उचलून खालीं सोडावा.

ततः प्रसारितांगस्य सोपधानस्य पार्ष्णिके ।
आहन्यान्मुष्टिनांगं च स्नेहेनाभ्यज्य मर्दयेत् ॥ २८ ॥
वेदनार्तमिति स्नेहो न हि शीघ्रं निवर्तते ।
योज्यः शीघ्रं निवृत्तेऽन्यः स्नेहोऽतिष्ठन्नकार्यकृत् ॥ २९ ॥

नंतर रोग्यास पाय पसरण्यास सांगून डोक्याखालीं उशी द्यावी, आणि खोटांवर मुठींनीं ताडण करून तेल चोळून अंग रगडावें. अंगें दुखत असल्यामुळें बस्ति लवकर परत येत नाहीं. कदाचित् आलाच तर पुन्हा स्नेहबस्ति द्यावा. कारण बस्ति कांहीं वेळ आंत राहिला तरच तो आपलें स्नेहनाचें कार्य करूं शकतो.

दीप्ताग्निं त्वागतस्नेहं सायाह्ने भोजयेल्लघु ।

स्नेहबस्ति परत आल्यावर रोग्यास भूक लागली असतां संध्याकाळीं हलकें अन्न खावयास द्यावें.

निवृत्तिकालः परमस्त्रयो यामास्ततः परम् ॥ ३० ॥
अहोरात्रमुपेक्षेत परतः फलवर्तिभिः ।
तीक्ष्णैर्वा बस्तिभिः कुर्याद्यत्नं स्नेहनिवृत्तये ॥ ३१ ॥

स्नेहबस्ति परत येण्याची जास्तींत जास्ती मुदत तीन प्रहरांची आहे. इतक्यांत तो परत न आल्यास एक दिवस व रात्र वाट पाहून नंतर रेचक वाती गुदद्वारांत घालून किंवा तीक्ष्ण बस्ति देऊन स्नेह परत आणण्याचा यत्न करावा.

अतिरौक्ष्यादनागच्छन्न चेज्जाड्यादिदोषकृत् ।
उपेक्षेतैव हि ततोऽध्युषितश्च निशां पिबेत् ॥ ३२ ॥

प्रातर्नागरधान्यांभः कोष्णं केवलमेव वा।

कोठ्याच्या अतिशय रूक्षतेमुळें तो परत नच आल्यास व त्यापासून जाड्य, अग्निमांद्य वगैरे विकार न उद्भवल्यास तो तसाच राहूं द्यावा. आणि रात्रीं निजून सकाळीं उठल्यावर सुंठ व धणे यांचें पाणी किंवा नुस्तें कोमट पाणी प्यावें.

अन्वासयेत्तृतीयेऽह्नि पंचमे वा पुनश्च तम् ॥ ३३ ॥
यथा वा स्नेहपाक्तिः स्यादतोऽत्युल्बणमारुतान्।
व्यायामनित्यान् दीप्ताग्नीन् रूक्षांश्च प्रतिवासरम् ॥ ३४ ॥

नंतर तिसऱ्या किंवा पांचव्या दिवशीं अथवा स्नेहाचा पाक झाल्यावर पुनः स्नेहबस्ति द्यावा. ज्यांच्या शरीरांत वायूचा जोर अतिशय आहे, जे नेहमीं व्यायाम करतात, ज्यांचा जठराग्नि प्रदीप्त आहे, किंवा ज्यांचा कोठा रूक्ष आहे, अशा मनुष्यांस दररोज अनुवासन द्यावें.

इति स्नेहैस्त्रिचतुरैः स्निग्धे स्रोतोविशुद्धये।
निरूहं शोधनं युंज्यादस्निग्धे स्नेहनं तनोः ॥ ३५ ॥

याप्रमाणें तीन चार स्नेहबस्ति देऊन कोठा स्निग्ध झाल्यावर स्रोतें शुद्ध करण्याकरितां रेचक औषधांचा निरूह बस्ति द्यावा. कोठा स्निग्ध झाला नसल्यास प्रथम स्नेहन करावें.

पंचमेऽथ तृतीये वा दिवसे साधके शुभे।
मध्याह्ने किंचिदावृत्ते प्रयुक्ते बलिमंगले ॥ ३६ ॥
अभ्यक्तस्वेदितोत्सृष्टमलं नातिबुभुक्षितम्।
अवेक्ष्य पुरुषं दोषभेषजादीनि चादरात् ॥ ३७ ॥
बस्तिं प्रकल्पयेद्वैद्यस्तद्विद्यैर्बहुभिः सह।

नंतर सिद्धिदायक व शुभ अशा पांचव्या किंवा तिसऱ्या दिवशीं मध्याह्न उलटल्यावर बलि-मंगलादि क्रिया करून, अभ्यंग व स्वेदन करून मलोत्सर्जन करावयास सांगावें; व मग त्यास थोडी भूक लागली म्हणजे त्याची प्रकृति, दोष, औषध वगैरेंचें मान बारकाईनें पाहून बरेच वैद्य आपल्या मदतीस घेऊन बस्ति द्यावा.

क्राथयेद्विंशतिपलं द्रव्यस्याष्टौ फलानि च ॥ ३८ ॥
ततः क्राथाच्चतुर्थांशं स्नेहं वाते प्रकल्पयेत्।
पित्ते स्वस्थे च षष्ठांशमष्टमांशं कफाधिके ॥ ३९ ॥

सर्वत्र चाष्टमं भागं कल्काद्द्रवाति वा यथा ।
नात्यच्छसांद्रता बस्तेः पलमात्रं गुडस्य च ॥ ४० ॥
मधुपट्वादिशेषं च युक्त्या

कल्पस्थानांत सांगितलेलीं निरूहबस्तीचीं औषधें ऐशीं तोळे आणि आठ गेळफळें घेऊन त्यांत चौपट पाणी घालून चतुर्थांश काढा उरवावा. त्यांत रोग्यास वातविकार असल्यास त्याच्या चतुर्थांश, पित्ताचा जोर असल्यास किंवा प्रकृति निरोगी असल्यास सहावा हिस्सा, आणि कफाधिक्य असल्यास अष्टमांश स्नेह मिळवावा. सर्व दोषांत औषधांचा कल्क अष्टमांश घ्यावा, अथवा बस्ति फार दाट किंवा फार पातळ न होईल इतक्या बेतानें घ्यावा; गूळ चार तोळे आणि मध, सैंधव वगैरे बाकीचीं द्रव्यें योग्य प्रमाणानें घ्यावीं.

सर्वं तदेकतः ।
उष्णांबुकुंभीबाष्पेण तप्तं खजसमाहतम् ॥ ४१ ॥
प्रक्षिप्य बस्तौ प्रणयेत्पायौ नात्युष्णशीतलम् ।
नातिस्निग्धं न वा रूक्षं नातितीक्ष्णं न वा मृदु ॥ ४२ ॥
नात्यच्छसांद्रं नोनातिमात्रं नापटु नाति च ।
लवणं तद्वदम्लं च

हीं सर्व औषधें एकत्र करून मडक्यांत ओतलेल्या तापविलेल्या पाण्याच्या वाफेनें किंचित् ऊन करून रवीनें घुसळावीं, आणि पिचकारींत भरून ती गुदद्वारांत सोडावी. पिचकारींतील औषधांची उष्णता, स्निग्धता, रूक्षता, तीक्ष्णता, स्वच्छता, प्रमाण, खारटपणा व आंबटपणा हे गुण फार असूं नयेत, बेताचेच असावेत.

पठंत्यन्ये तु तद्विदः ॥ ४३ ॥
मात्रां त्रिपलिकां कुर्यात्स्नेहमाक्षिकयोः पृथक् ।
कर्षार्धं माणिमंथस्य स्वस्थे कल्कपलद्वयम् ॥ ४४ ॥
सर्वद्रवाणां शेषाणां पलानि दश कल्पयेत् ।

कांहीं आचार्यांच्या मतें स्नेह व मध हे प्रत्येकीं बारा तोळे, सैंधव अर्धा तोळा, औषधांचा कल्क आठ तोळे ( निरोगी मनुष्यास) व इतर सर्व द्रवद्रव्यें चाळीस तोळे घ्यावीं.

माक्षिकं लवणं स्नेहं कल्कं क्वाथमिति क्रमात् ॥ ४५ ॥
आवपेत निरूहाणामेष संयोजने विधिः।

यांच्या मिश्रणाचा क्रम असा आहे कीं, प्रथम एका भांड्यांत मध घालावा, आणि नंतर सैंधव, स्नेह, कल्क व काढा हीं अनुक्रमानें मिळवीत जावीं.

उत्तानो दत्तमात्रे तु निरूहे तन्मना भवेत् ॥ ४६ ॥
कृतोपधानः संजातवेगश्चोत्कटकः सृजेत्।

पिचकारी मारल्याबरोबर तिकडेच सगळें लक्ष्य ठेवून व उशी घेऊन उताणें निजावें. वेग आला म्हणजे उकिडवें बसून उत्सर्जन करावें.

आगतौ परमः कालो मुहूर्तो मृत्यवे परम् ॥ ४७ ॥

निरूह बस्ति परत येण्याचा परमावधि म्हटला म्हणजे दोन घटका होय. यापेक्षां विलंब लागल्यास मरणच येऊन ठेपतें.

तत्रानुलोमिकं स्नेहक्षारमूत्राम्लकल्पितम्।
त्वरितं स्निग्धतीक्ष्णोष्णं बस्तिमन्यं प्रपीडयेत् ॥ ४८
विदध्यात्फलवर्तिं वा स्वेदनोत्रासनादि च।

अशा प्रसंगीं अनुलोमन करण्याकरितां स्नेह, यवक्षार, गोमूत्र, अम्ल वगैरे औषधांनीं तयार केलेला दुसरा स्निग्ध, तीक्ष्ण व उष्ण बस्ति ताबडतोब द्यावा. किंवा रेचक औषधी वात गुदद्वारांत घालावी, शेक द्यावा, एकाएकीं भिववावें; किंवा अशाच तऱ्हेचे दुसरे उपाय करावे.

स्वयमेव निवृत्ते तु द्वितीयो बस्तिरिष्यते ॥ ४९ ॥
तृतीयोऽपि चतुर्थोऽपि यावद्वा सुनिरूढता।

बस्तीचें औषध आपोआप परत आलें म्हणजे पुनः दुसरा, तिसरा, चवथा किंवा बरोबर लागू पडण्यास जितके जरूर असतील तितके बस्ति द्यावे.

विरिक्तवच्च योगादीन्विद्यात्

निरूहबस्ति बरोबर लागू पडल्याचीं किंवा त्याचा कमीजास्त योग झाल्याचीं लक्षणें विरेचनाप्रमाणेंच जाणावीं.

योगे तु भोजयेत् ॥ ५० ॥
कोष्णेन वारिणा स्नातं तनु धन्वरसौदनम्।

बस्ति बरोबर लागू पडला असतां कोमट पाण्यानें स्नान घालून जांगल मांसाच्या पातळशा रसाबरोबर भात जेवावा.

विकारा ये निरूहस्य भवंति प्रचलैर्मलैः ॥ ५१ ॥
ते सुखोष्णांबुसिक्तस्य यांति भुक्तवतः शमम् ।

निरूह बस्तीच्या योगानें प्रचलित झालेल्या दोषांपासून होणारे विकार कोमट पाण्याच्या स्नानानें व भोजनानें शमन पावतात.

अथ वातार्दितं भूयः सद्य एवानुवासयेत् ॥ ५२ ॥

यानंतरही वातविकार शिल्लक राहिल्यास पुन्हा त्याच दिवशीं अनुवासन बस्ति द्यावा.

सम्यग्घीनातियोगाश्च तस्य स्युः स्नेहपीतवत् ।

अनुवासनाचे सम्यग्योग, हीनयोग व अतियोग यांचीं लक्षणें स्नेहपानाच्या त्या त्या योगाप्रमाणें जाणावीं.

किंचित्कालं स्थितो यश्च सपुरीषो निवर्तते ॥ ५३ ॥
साऽनुलोमानिलः स्नेहस्तत्सिद्धमनुवासनम् ।

जो अनुवासन बस्ति कांहीं थोडा वेळ कोठ्यांत राहून मल व अनुलोम वायुसहित परत येतो, तो बरोबर लागू पडला असें समजावें.

एकं त्रीन् वा बलासे तु स्नेहबस्तीन् प्रकल्पयेत् ॥ ५४ ॥
पंच वा सप्त वा पित्ते नवैकादश वाऽनिले ।
पुनस्ततोऽप्ययुग्मांस्तु पुनरास्थापनं ततः ॥ ५५ ॥

कफविकारावर एक किंवा तीन, पित्त विकारांवर पांच किंवा सात, आणि वातावर नऊ किंवा अकरा अनुवासन बस्ति द्यावे; आणि मध्यंतरीं एकदां निरूहबस्ति देऊन पुन्हा विषम संख्येनें अनुवासन बस्ति द्यावे.

कफपित्तानिलेष्वन्नं यूषक्षीररसैः क्रमात् ।

निरूहबस्तीनंतर कफ, पित्त व वात या दोषांवर अनुक्रमें कढण, दूध व मांसरस यांच्याबरोबर भात जेवावा.

वातघ्नौषधनिःक्वाथत्रिवृतासैंधवैर्युतः ॥ ५६ ॥
बस्तिरेकोऽनिले स्निग्धः स्वाद्वम्लोष्णरसान्वितः ।

वातविकारावर बस्ति देणें तो वातनाशक औषधांचा ऊन काढा,

निशोत्तर, सैंधव, स्नेह, मधुर, अम्ल व मांसरस यांनीं युक्त करून एकच द्यावा.

न्यग्रोदिगणकाथपद्मकादिसितायुतौ ॥ ५७ ॥
पित्ते स्वादुहिमौ साज्यक्षीरेक्षुरसमाक्षिकौ ।

पित्तविकारावर न्यग्रोधादि गणांतील औषधांच्या काढ्यांत पद्मकादि गणांतील औषधांचा कल्क, खडीसाखर, तूप, दूध, उंसाचा रस व मध मिळवून त्याचे मधुर व थंड असे दोन बस्ति द्यावे.

आरग्वधादिनिःक्वाथवत्सकादियुतास्त्रयः ॥ ५८ ॥
रूक्षाः सक्षौद्रगोमूत्रास्तीक्ष्णोष्णकटुकाः कफे ।

कफविकारावर आरग्वधादि व वत्सकादि गणांतील औषधांच्या काढ्यांत मध व गोमूत्र मिळवून त्याचे तीक्ष्ण, उष्ण, तिखट, व रूक्ष असे तीन बस्ति द्यावे.

त्रयश्च संनिपातेऽपि दोषान्घ्नंति यतः क्रमात् ॥ ५९ ॥

सन्निपातावर वरील तीनही बस्ति द्यावे. कारण ते तीनही दोषांचा क्रमशः नाश करितात.

त्रिभ्यः परं बस्तिमतो नेच्छंत्यन्ये चिकित्सकाः ।
न हि दोषश्चतुर्थोऽस्ति पुनर्दीयेत यं प्रति ॥ ६० ॥

म्हणूनच कित्येक वैद्य लोक या तीन बस्तींशिवाय चवथ्या बस्तीची जरूर नाहीं, असें मानतात. कारण जर चवथा दोषच नाहीं, तर चवथा बस्ति देणार तरी कशावर?

उत्क्लेशनं शुद्धिकरं दोषाणां शमनं क्रमात् ।
त्रिधैवं कल्पयेद्बस्तिमित्यन्येऽपि प्रचक्षते ॥ ६१ ॥

कित्येकांचें असें मत आहे कीं, दोषांस आपल्या स्थानापासून सोडविणें, त्यांस बाहेर काढून टाकणें व त्यांचें शमन करणें या तीन क्रिया करणारे तीन बस्ति द्यावे.

दोषौषधादिबलतः सर्वमेतत्प्रमाणयेत् ।
सम्यङ्निरूढलिंगं तु नासंभाव्य निवर्तयेत् ॥ ६२ ॥

तात्पर्य, दोष व औषध यांच्या शक्तीचें मान बरोबर लक्ष्यांत आणून जें योग्य दिसेल तें करावें; आणि जोंपर्यंत बस्ति बरोबर लागू पडल्याचीं चिन्हें दिसत नाहींत, तोंपर्यंत वरचेवर बस्ति देत असावें.

प्राक्स्नेह एकः पंचांते द्वादशास्थापनानि च ।
सान्वासनानि कर्मैवं बस्तयस्त्रिंशदीरिताः ॥ ६३ ॥

प्रथम एक अनुवासन बस्ति, मध्यें आळीपाळीनें बारा बारा आस्थापन व अनुवासन बस्ति आणि शेवटीं पांच अनुवासन बस्ति मिळून एकंदर तीस बस्ति, यांस कर्मबस्ति असें नांव आहे.

कालः पंचदशैकोऽत्र प्राक् स्नेहोंते त्रयस्तथा ।
षट् पंचबस्त्यंतरिताः

पहिल्यानें एक अनुवासन बस्ति, मध्यंतरीं आळीपाळीनें निरूह व अनुवासन बस्ति मिळून अकरा बस्ति आणि शेवटीं तीन अनुवासन बस्ति; अशा या एकंदर पंधरा बस्तींस कालबस्ति म्हणतात.

योगोऽष्टौ बस्तयोऽत्र तु ॥ ६४ ॥
त्रयो निरूहाः स्नेहाश्च स्नेहावाद्यंतयोरुभौ ।

आरंभीं व शेवटीं एकेक स्नेहबस्ति, आणि मध्यें पाळीपाळीनें तीन अनुवासन व तीन निरूह बस्ति, मिळून एकंदर आठ बस्तींस योगबस्ति असें म्हणतात.

स्नेहबस्तिं निरूहं वा नैकमेवातिशीलयेत् ॥ ६५ ॥
उत्क्लेशाग्निवधौ स्नेहान्निरूहान्मरुतो भयम् ।

स्नेहबस्ति किंवा निरूहबस्ति यांपैकीं कोणत्याही एकाचाच अतिशय उपयोग कधींही करूं नये. कारण स्नेहबस्तीच्या फाजील उपयोगानें दोष आपल्या स्थानापासून च्युत होऊन अग्नीला मंद करितात, आणि निरूहाच्या अतिसेवनानें वातविकाराची भीति असते.

तस्मान्निरूढः स्नेह्यः स्यान्निरूह्यश्चानुवासितः ॥ ६६ ॥
स्नेहशोधनयुक्त्यैवं बस्तिकर्म त्रिदोषजित् ।

म्हणून निरूहण दिल्यानंतर स्नेहबस्ति, आणि स्नेहबस्ति दिल्यावर निरूहण द्यावें. याप्रमाणें स्नेहन व शोधन यांची योजना केल्यानें बस्तिकर्म त्रिदोषनाशक होतें.

ह्रस्वया स्नेहपानस्य मात्रया योजितः समः ॥ ६७ ॥
मात्राबस्तिः स्मृतः स्नेहः

स्नेहपानाच्या कनिष्ठ प्रमाणानें जो स्नेहबस्ति दिला जातो त्यास मात्राबस्ति म्हणतात.

शीलनीयः सदा च सः ।
बालवृद्धाध्वभारस्त्रीव्यायामासक्तचिंतकैः ॥ ६८ ॥
वातभग्नबलाल्पाग्निनृपेश्वरसुखात्मभिः ।
दोषघ्नो निष्परीहारो बल्यः सृष्टमलः सुखः ॥ ६९ ॥

हा दोषनाशक, विनपथ्याचा, शक्ति देणारा, मलसारक व घेण्यास सुखकर असल्यामुळें मुलें, म्हातारे, प्रवासी, ओझें वाहणारे; मैथुन, व्यायाम व काळजी करणारे; वातरोग व अस्थिभंग यांनीं अशक्त झालेले; मंदाग्नि, राजे, श्रीमान् व सुखवस्तु लोक यांनीं सेवन करण्यास योग्य आहे.

बस्तौ रोगेषु नारीणां योनिगर्भाशयेषु च ।
द्वित्रास्थापनशुद्धेभ्यो विदध्याद्बस्तिमुत्तरम् ॥ ७० ॥

पुरुषांच्या मूत्राशयासंबंधीं आणि स्त्रियांची योनि व गर्भाशय यासंबंधीं रोगांत प्रथम दोन तीन आस्थापन बस्ति देऊन कोठा शुद्ध करून नंतर उत्तरबस्ति द्यावा.

आतुरांगुलमानेन तन्नेत्रं द्वादशांगुलम् ।
वृत्तं गोपुच्छवन्मूलमध्ययोः कृतकर्णिकम् ॥ ७१ ॥
सिद्धार्थकप्रवेशाग्रं श्लक्ष्णं हेमादिसंभवम् ।
कुंदाश्वमारसुमनापुष्पवृंतोपमं दृढम् ॥ ७२ ॥

पुरुषांच्या उत्तरबस्तीची नळी त्याच्या बोटांच्या मानानें बारा बोटें लांब, वाटोळी, गोपुच्छाकार आणि मुळांत व मध्यभागीं एकेक चकती बसविलेली असावी. तिचें अग्र गुळगुळीत, सुवर्णादि धातूंचें केलेलें; कुंद, कण्हेर किंवा जाई यांच्या फुलांप्रमाणें व दृढ असून तिचें तोंड शिरसाचा आंत दाणा जाऊं शकण्याजोगें असावें.

तस्य बस्तिर्मृदुलघुर्मात्रा शुक्तिर्विकल्प्य वा ।

या नळीस जोडावयाचा बस्ति मऊ व लहानसा असून औषधाचें प्रमाण दोन तोळे किंवा शक्ति, वय यांच्या मानानें कमी जास्त करून द्यावें.

अथ स्नाताशितस्यास्य स्नेहबस्तिविधानतः ॥ ७३ ॥
ऋजोः सुखोपविष्टस्य पीठे जानुसमे मृदौ ।
हृष्टे मेढ्रे स्थिते चर्जौ शनैः स्रोतोविशुद्धये ॥ ७४ ॥

सूक्ष्मां शलाकां प्रणयेत्तया शुद्धेऽनुसेवनीम्।
आमेहनांतं नेत्रं च निष्कंपं गुदवत्ततः॥ ७५॥
पीडितेंऽतर्गते स्नेहे स्नेहबस्तिक्रमो हितः।

रोग्यास स्नेहबस्तिविधींत सांगितल्याप्रमाणें स्नान व भोजन घालून गुडघ्याइतक्या उंच व मऊ आसनावर सरळ व सुखानें बसवून, शिश्न ताठून उठलें म्हणजे तें सरळ धरून मार्ग साफ करण्याकरितां प्रथम एक बारीकशी सळई हळू हळू आंत सारावी. मार्ग मोकळा झाल्यावर शिवणीस अनुलक्षून शिश्नाच्या मुळापर्यंत गुदबस्तीप्रमाणें हात न कांपवितां हळूच नळीचें तोंड आंत सारावें. तें शेवटापर्यंत पोंचलें म्हणजे पिचकारी दाबून आंतील स्नेह पिळावा. नंतर स्नेहबस्तींत सांगितल्याप्रमाणें उपचार करावे.

बस्तीननेन विधिना दद्यात्रींश्चतुरोऽपि वा॥ ७६॥
अनुवासनवच्छेषं सर्वमेवाऽस्य चिंतयेत्।

याप्रमाणें तीन चार बस्ति देऊन बाकी सर्व व्यवस्था अनुवासनबस्तीप्रमाणें समजावी.

स्त्रीणामार्तवकाले तु योनिर्गृह्णात्यपावृतेः॥ ७७॥
विदधीत तदा तस्मादनृतावपि चात्यये।
योनिविभ्रंशशूलेषु योनिव्यापदसृग्दरे॥ ७८॥

स्त्रियांचें योनिद्वार (गर्भाशयाचें द्वार) ऋतुकाळींच—विटाळाच्या ४ थ्या दिवसापासून १६ व्या दिवसापर्यंत—उघडें असतें; म्हणून स्त्रियांस उत्तरबस्ति देणें तो याच वेळीं द्यावा. इतर वेळीं यांच्यांत स्नेह ग्रहण करण्याचा मार्ग मोकळा नसतो. परंतु योनिभ्रंश, योनिशूल, रक्तप्रदर व इतर योनिरोग यांसारख्या अगत्याच्या प्रसंगीं उत्तरबस्ति देण्याची जरूर असल्यास तो ऋतुकाळाशिवाय इतर वेळीं देण्यासही हरकत नाहीं.

नेत्रं दशांगुलं मुद्गप्रवेशं चतुरंगुलम्।
अपत्यमार्गे योज्यं स्याद् द्व्यंगुलं मूत्रवर्त्मनि॥ ७९॥
मूत्रकृच्छ्रविकारेषु बालानां त्वेकमंगुलम्।

स्त्रियांच्या उत्तरबस्तीची नळी दहा आंगळें लांब असून तिचें तोंड मुगाचा दाणा जाण्याजोगें असावें. ती प्रौढ स्त्रीच्या योनि-

द्वारांत चार बोटें, आणि मूत्रकृच्छ्रादि विकारांत मूत्रद्वारांत घालणें झाल्यास दोन बोटें घालावी. लहान मुलींच्या मूत्रद्वारांत एकच बोट घालावी.

**प्रकुंचो मध्यमा मात्रा बालानां शुक्तिरेव तु ॥ ८० ॥**

प्रौढ स्त्रियांना उत्तर बस्ति देण्याचें औषधाचें मध्यम प्रमाण चार तोळे आहे. मुलींना तर दोनच तोळे द्यावें.

**उत्तानायाः शयानायाः सम्यक् संकोच्य सक्थिनी ।**
**ऊर्ध्वजान्वास्त्रिचतुरानहोरात्रेण योजयेत् ॥ ८१ ॥**
**बस्तींस्त्रिरात्रमेवं च स्नेहमात्रां विवर्धयेत् ।**
**त्र्यहमेव च विश्रम्य प्रणिदध्यात् पुनस्त्र्यहम् ॥ ८२ ॥**

जीस बस्ति देणें असेल तीस उताणी निजवून गुडघे वर करून मांड्या आखडून धरून तीन चार पिचकाऱ्या माराव्या. याप्रमाणें तीन दिवस करावें. मध्यें तीन दिवस बंद ठेवून पुन्हां तीन दिवस वरील विधीनें पिचकाऱ्या माराव्या. व प्रत्येक वेळीं स्नेहाचें प्रमाण थोडें वाढवीत जावें.

**पक्षाद्विरेको वमिते ततः पक्षान्निरूहणम् ।**
**सद्यो निरूढश्चाऽन्वास्यः सप्तरात्राद्विरेचितः ॥ ८३ ॥**

वमन घेतल्यानंतर पंधरा दिवसांनीं विरेचन द्यावें; विरेचनापासून पंधरा दिवसांनीं निरूह बस्ति द्यावा. निरूहावर लागलेंच अनुवासन द्यावें. आणि विरेचनानंतर अनुवासन सात दिवसांनीं द्यावें.

**यथा कुसुंभादियुतात्तोयाद्रागं हरेत्पटः ।**
**तथा द्रवीकृताद्देहाद्बस्तिर्निर्हरते मलान् ॥ ८४ ॥**

कुसुंबा वगैरे रंगाच्या पाण्यांत वस्त्र भिजविलें असतां तें जसें त्यांतून रंग मात्र आकर्षण करून घेतें, तद्वतच स्नेहस्वेदादि पंचकर्मांनीं द्रवीभूत झालेल्या देहांतील दोषधातूंच्या मिश्रणांतून बस्ति फक्त दोष तेवढे काढून घेतो; धातूंस धक्का लावीत नाहीं.

**शाखागताः कोष्ठगताश्च रोगा**
**मर्मोर्ध्वसर्वावयवांगजाश्च ।**
**ये संति तेषां नतु कश्चिदन्यो**
**वायोः परं जन्मनि हेतुरस्ति ॥ ८५ ॥**

शाखांतील, कोठ्यांतील, मर्मस्थानांतील, गळयाच्या वरच्या भागांतील व सर्वांगांतील जितके म्हणून रोग आहेत त्या सर्वांच्या उत्पत्तीचें मुख्य कारण वायूशिवाय दुसरें कोणतेंही नाहीं.

विट्श्लेष्मपित्तादिमलाचयानां
विक्षेपसंहारकरः स यस्मात्।
तस्याऽतिवृद्धस्य शमाय नान्य-
द्बस्तेर्विना भेषजमस्ति किंचित्॥ ८६॥

कारण मल, कफ, पित्त, वगैरे मलाचे जे संचय त्यांस दूर फेंकणें किंवा ते जागच्या जागीं राहणें हें सर्व वायूवरच अवलंबून असतें. तो अतिशय वाढला असतां त्याचें शमन करण्यास बस्तीवांचून दुसरें औषधच नाहीं.

तस्माच्चिकित्सार्ध इति प्रदिष्टः
कृत्स्ना चिकित्साऽपि च बस्तिरेकैः।
तथा निजागंतुविकारकारि-
रक्तौषधत्वेन शिराव्यधोऽपि॥ ८७॥

म्हणूनच बस्तीस कोणी कोणी अर्धी चिकित्सा मानतात. कांहीं तर सगळी वैद्यक्रिया एका बस्तींत येते असें मानतात. हेंच मत अनेक प्रकारचे निज व आगंतु रोग उत्पन्न करणाऱ्या व रक्तदोषांस दूर करणाऱ्या शिराव्यधविधीविषयींही सार्थ आहे.

---

## अध्याय विसावा.

अथाऽतो नस्यविधिमध्यायं व्याख्यास्यामः।

आतां नस्यविधि सांगतों.

ऊर्ध्वजत्रुविकारेषु विशेषान्नस्यमिष्यते।
नासा हि शिरसो द्वारं तेन तद्व्याप्य हंति तान्॥ १॥

ऊर्ध्वजत्रु विकारांत, म्हणजे शिरोरोगांत विशेषेंकरून नस्याचा उपयोग इष्ट आहे. कारण नाक हें मस्तकाचें द्वार आहे. आणि म्हणून त्या द्वारें दिलेलें औषध सर्व मस्तकांत पसरून त्यांतील रोगांचा नाश करितें.

विरेचनं बृंहणं च शमनं च त्रिधाऽपि तत्।

विरेचन, बृंहण व शमन असें तीन प्रकारचें नस्य आहे.

विरेचनं शिरःशूलजाड्यस्यंदगलामये ॥ २ ॥
शोफगंडक्रिमिग्रंथिकुष्ठाऽपस्मारपीनसे ।

विरेचन नस्य, डोकें दुखणें, जड होणें, अभिष्यंद, गळ्याचे रोग, सूज, गलगंड, मस्तकांतील कृमि, ग्रंथि, कुष्ठ, अपस्मार व पीनस या रोगांवर उपयोगी आहे.

बृंहणं वातजे शूले सूर्यावर्ते स्वरक्षये ॥ ३ ॥
नासास्यशोषे वाक्संगे कृच्छ्रबोधेऽवबाहुके ।

बृंहण नस्य वातजन्य शूल, सूर्यावर्त, आवाज बसणें, नाक व तोंड यांची कोरड, वाचा बसणें, कृच्छ्रोन्मीलन, (झोंपेंतून उठल्यावर डोळे चिकटल्यामुळें लवकर न उघडणें ) व अवबाहुक या रोगांवर उपयोगीं पडतें.

शमनं नीलिकाव्यंगकेशदोषाक्षिराजिषु ॥ ४ ॥

शमन नस्य तीळ, वांग, केंस गळणें व डोळ्याच्या शिरा फुगणें या विकारांवर द्यावें.

यथास्वं यौगिकैः स्नेहैर्यथास्वं च प्रसाधितैः ।
कल्कक्काथादिभिश्चाद्यं मधुपद्वासवैरपि ॥ ५ ॥

त्या त्या दोषांच्या अनुसार यथायोग्य औषधांनीं सिद्ध केलेले स्नेह, अनेक प्रकारचे कल्क, काढे, मध, सैंधव व आसवें यांनीं विरेचन नस्यें दिलीं जातात.

बृंहणं धन्वमांसोत्थरसासृक्खपुरैरपि ।

जांगल जनावरांच्या मांसाचा रस, त्यांचें रक्त व साळईचा डीक यांनीं बृंहण नस्य दिलें जातें.

शमनं योजयेत्पूर्वैः क्षीरेण च जलेन च ॥ ६ ॥

शमन नस्य पूर्वोक्त पदार्थ, दूध व जल यांच्या योगानें दिलें जातें.

**मर्शश्च प्रतिमर्शश्च द्विधा स्नेहोऽत्र मात्रया ।**

स्नेहन नस्यांत मात्रेच्या कमीजास्त प्रमाणावरून मर्श व प्रतिमर्श असे दोन भेद आहेत.

**कल्काद्यैरवपीडस्तु तीक्ष्णैर्मूर्धविरेचनः ॥ ७ ॥**

सुंठ वगैरे तीक्ष्ण औषधांचा कल्क, काढा वगैरे करून जें नस्य दिलें जातें, त्यास अवपीड किंवा मूर्धविरेचन म्हणतात.

ध्मानं विरेचनश्चूर्णो

विरेचन नस्याचें चूर्ण असल्यास त्यास ध्मान म्हणतात.

युंज्यात्तं मुखवायुना ।
षडंगुलद्विमुखया नाड्या भेषजगर्भया ॥ ८ ॥
स हि भूरितरं दोषं चूर्णत्वादपकर्षति ।

तें देणें असल्यास सहा बोटें लांबीची आरपार नळी घेऊन तींत चूर्ण भरून तें नाकांत फुंकावें. हें चूर्ण असल्यामुळें वाढलेल्या दोषांस बाहेर काढितें.

प्रदेशिन्यंगुलीपर्वद्वयान्मग्नसमुद्धृतात् ॥ ९ ॥
यावत्पतत्यसौ बिंदुर्दशाष्टौ षट् क्रमेण ते ।
मर्शस्योत्कृष्टमध्योना मात्रास्ता एव च क्रमात् ॥ १० ॥
बिंदुद्वयोनाः कल्कादेः

हाताच्या आंगठ्या शेजारच्या बोटाचीं दोन पेरें स्नेहांत बुचकळून वर काढिलीं असतां जें प्रमाण खालीं पडतें त्यास बिंदु असें म्हणतात. अशा प्रकारचे दहा, आठ, सहा बिंदु मर्श नस्याचें अनुक्रमें उत्तम, मध्यम व कनिष्ठ प्रमाण होय. सदरहु प्रमाणांतून दोन दोन बिंदु कमी केले असतां कल्कादिकांचें प्रमाण होतें.

योजयेन्न तु नावनम् ।
तोयमद्यगरस्नेहपीतानां पातुमिच्छताम् ॥ ११ ॥
भुक्तभक्तशिरःस्नातस्नातुकामस्रुतासृजाम् ।
नवपीनसवेगार्तसूतिकाश्वासकासिनाम् ॥ १२ ॥
शुद्धानां दत्तबस्तीनां तथानार्तवदुर्दिने ।
अन्यत्रात्यायिकाद्व्याधेः

पाणी, मद्य, कृत्रिम विष किंवा स्नेह प्यालेले, अथवा कांहीं वेळानें पिण्याची तयारी केलेले; जेवलेले; डोक्यावरून स्नान केलेले किंवा लगेच करूं इच्छिणारे, रक्त काढलेले; नवीन पडसें, मल मूत्रादिकांचे वेग, दमा व खोकला हे विकार झालेले; वमन-विरेचन घेतलेले, बस्ति दिलेले, असे मनुष्य व बाळंतीण स्त्रिया यांस नस्य

देऊं नये. भलत्याच ऋतूंत आकाश अभ्राच्छादित असतांही नस्य देऊं नये. भयंकर रोगप्रसंगीं मात्र केंव्हांही दिल्यास हरकत नाहीं.

अथ नस्यं प्रयोजयेत् ॥ १३ ॥
प्रातः श्लेष्मणि मध्याह्ने पित्ते सायंनिशोश्चले।

कफविकारावर सकाळीं, पित्तावर मध्यान्हीं, आणि वातावर, संध्याकाळीं व रात्रीं नस्य द्यावें.

स्वस्थवृत्ते तु पूर्वाह्णे शरत्कालवसंतयोः ॥ १४ ॥
शीते मध्यंदिने ग्रीष्मे सायं वर्षासु सातपे।

निरोगी मनुष्यास देणें असल्यास शरदतूंत व वसंतांत सकाळीं; हेमंत व शिशिर ऋतूंत दुपारीं; ग्रीष्मऋतूंत संध्याकाळीं, आणि पावसाळ्यांत ऊन पडेल त्या दिवशीं द्यावें.

वाताभिभूते शिरसि हिध्मायामपतानके ॥ १५ ॥
मन्यास्तंभे स्वरभ्रंशे सायंप्रातर्दिने दिने।

वातज शिरोरोग, उचकी, अपतानक, मान जखडणें व स्वरभ्रंश या विकारांवर दररोज सकाळीं व संध्याकाळीं नस्य द्यावें.

एकाहांतरमन्यत्र सप्ताहं च तदाचरेत् ॥ १६ ॥

इतर विकारांवर एक दिवसाआड नस्य द्यावें. नस्य सात दिवसांपेक्षां ज्यास्त दिवस देऊं नये.

स्निग्धस्विन्नोत्तमांगस्य प्राकृतावश्यकस्य च।
निवातशयनस्थस्य जत्रूर्ध्वं स्वेदयेत् पुनः ॥ १७ ॥
अथोत्तानर्जुदेहस्य पाणिपादे प्रसारिते।
किंचिदुन्नतपादस्य किंचिन्मूर्धनि नामिते ॥ १८ ॥
नासापुटं पिधायैकं पर्यायेण निषेचयेत्।
उष्णांबुतप्तं भैषज्यं प्रनाड्या पिचुनाथवा ॥ १९ ॥

ज्यास नस्य देणें असेल त्याच्या मस्तकास प्रथम स्नेहन-स्वेदन करून, शौच-मुखमार्जनादि विधि उरकून घ्यावयास सांगावें. नंतर निवाऱ्याच्या जागीं बिछान्यावर निजवून पुनः गळ्यावरील भागास स्वेदन करावें. नंतर रोग्यास उताणा व सरळ निजवून हातपाय पसरण्यास सांगून पायांचा कल किंचित् वर व डोक्याचा झोंक किंचित खालीं अशा तऱ्हेनें शरीर ठेवून आळीपाळीनें एक नाक-

पुडी बंद करून दुसरींत पाण्याच्या वाफेवर तापाविलेलें औषध नळींतून किंवा कापसाच्या बोळयानें घालावें.

दत्ते पादतलस्कंधहस्तकर्णादि मर्दयेत् ।
शनैरुच्छिद्य निष्ठीवेत्पार्श्वयोरुभयोस्ततः ॥ २० ॥
आभेषजक्षयादेवं द्विस्त्रिर्वा नस्यमाचरेत् ।

नस्य दिल्यावर पायांचे तळवे, खांदे, हात, कान वगैरे चोळावे. आणि हळूहळू दोन्ही नाकपुडयांनीं श्वास वर ओढून घशांत येणारा रस, कफ वगैरे थुंकून टाकावा. याप्रमाणें सगळें औषध संपेपर्यंत दोन तीन वेळां नस्य द्यावें.

मूर्च्छायां शीततोयेन सिंचेत्परिहरन् शिरः ॥ २१ ॥

मूर्च्छा आल्यास डोक्याशिवाय इतर अंगावर पाणी शिंपडावें.

स्नेहं विरेचनस्यांते दद्याद्दोषाद्यपेक्षया ।

नाक वाहून गेल्यावर त्या त्या दोषादिकांस अनुसरून स्नेहनस्य द्यावें.

नस्यांते वाक्शतं तिष्ठेदुत्तानः

नस्य दिल्यानंतर शंभर अंक मोजीपर्यंत उताणें पडून रहावें.

धारयेत्ततः ॥ २२ ॥
धूमं पीत्वा कवोष्णांबुकवलान् कंठशुद्धये ।

नंतर धूम्रपान करून गळा साफ होण्याकरितां कोमट पाण्याच्या गुळण्या कराव्या.

सम्यक्स्निग्धे सुखोच्छ्वासस्वप्नबोधाक्षपाटवम् ॥ २३॥

मस्तक चांगलें स्निग्ध झालें म्हणजे श्वासोच्छ्वास साफ चालतो, निद्रा व जागृति हीं सुखानें होतात आणि इंद्रियांचें सामर्थ्य वाढतें.

रूक्षेऽक्षिस्तब्धता शोषो नासास्ये मूर्धशून्यता ।

रूक्षता राहिल्यास डोळे ताठतात, तोंड व नाक कोरडीं पडतात आणि डोकें हलकें होतें.

स्निग्धेऽतिकंडूर्गुरुताप्रसेकारुचिपीनसाः ॥ २४ ॥

अधिक स्नेहन झाल्यास शिरोभागीं कंडू, जडपणा, लाळ गळणें, अरुचि व पीनस हे विकार होतात.

सुविरिक्तेऽक्षिलघुतास्वरवक्त्रविशुद्धयः ।

दुर्विरिक्ते गदोद्रेकः क्षामतातिविरेचिते ॥ २५ ॥

बरोबर शिरोविरेचन झाल्यास डोळे हलके होतात, आणि स्वर व तोंड हीं शुद्ध होतात. अर्धवट झाल्यास रोग आणखी वाढतो आणि वाजवीपेक्षां जास्त झाल्यास कृशत्व येतें.

प्रतिमर्शः क्षतक्षामबालवृद्धसुखात्मसु ।
प्रयोज्योऽकालवर्षेऽपि

क्षत झालेले, कृश, मुलें, म्हातारे व सुकुमार प्रकृतीचे मनुष्य यांस प्रतिमर्श नस्य अकालवृष्टीच्या दिवशीं देण्यासही हरकत नाहीं.

न त्विष्टो दुष्टपीनसे ॥ २६ ॥
मद्यपीतेऽबलश्रोत्रे कृमिदूषितमूर्धनि ।
उत्कृष्टोत्क्लिष्टदोषे च हीनमात्रतया हि सः ॥ २७ ॥

परंतु दुष्ट पीनस, कमी ऐकूं येणें व कृमिजन्य शिरोरोग या विकारांवर, तसेंच मद्य प्यालेला किंवा ज्याचे दोष फार वाढले आहेत अथवा चाळवले आहेत, अशा मनुष्यास मात्र हें प्रतिमर्श नस्य देऊं नये. कारण याचें प्रमाण फार कमी म्हणजे अवघें दोन बिंदु असल्यामुळें यापासून दोषांचें शमन न होतां ते उलट प्रकुपित होण्याची भीति असते.

निशाहर्भुक्तवांताहःस्वप्नाध्वश्रमरेतसाम् ।
शिरोभ्यंजनगंडूषप्रस्रवांजनवर्चसाम् ॥ २८ ॥
दंतकाष्ठस्य हासस्य योज्योंऽतेऽसौ द्विबिंदुकः ।

हें दोन बिंदूंचें नस्य सकाळीं, संध्याकाळीं, जेवणानंतर, वांति झाल्यावर, दिवसा निजून उठल्यावर, आणि मार्गक्रमण, परिश्रम, मैथुन, शिरोभ्यंग, गुळण्या, मूत्रोत्सर्ग, अंजन, मलोत्सर्ग, दंतधावन व हंसणें या पंधरा क्रियांच्या अंतीं द्यावें.

पंचसु स्रोतसां शुद्धिः क्लमनाशस्त्रिषु क्रमात् ॥ २९ ॥
दृग्बलं पंचसु ततो दंतदार्ढ्यं मरुच्छमः ।

यांपैकीं पहिल्या पांच वेळीं प्रतिमर्श दिल्यानें त्याच्या योगानें स्रोतें शुद्ध होतात; पुढील तीन वेळीं श्रमपरिहार होतो; पुढच्या पांच प्रसंगीं दृष्टि सतेज होते; दंतधावनानंतर दांत बळकट होतात आणि हंसण्यानंतर वाताचें शमन होतें.

न नस्यमूनसप्ताब्दे नातीताशीतिवत्सरे ॥ ३० ॥
न चोनाष्टादशे धूमः कवलो नोनपंचमे ।
न शुद्धिरूनदशमे न चातिक्रांतसप्ततौ ॥ ३१ ॥

सात वर्षांपेक्षां कमी व ऐंशी वर्षांपेक्षां जास्त वयाच्या मनुष्यास नस्य देऊं नये. वयाच्या अठराव्या वर्षापूर्वीं धूमपान करूं नये. वयाच्या पांचव्या वर्षापूर्वीं गुळण्या करूं नयेत. दहा वर्षांपूर्वी आणि सत्तर वर्षांनंतर वमन-विरेचन देऊं नये.

आजन्ममरणं शस्तः प्रतिमर्शस्तु बस्तिवत् ।
मर्शवच्च गुणान् कुर्यात्स हि नित्योपसेवनात् ॥ ३२ ॥
न चात्र यंत्रणा नापि व्यापद्भ्यो मर्शवद्भयम् ।

प्रतिमर्श नस्य मात्र बस्तीप्रमाणें जन्मापासून मरेपर्यंत हितकर आहे. हें नित्य देत गेल्यानें मर्शनस्याप्रमाणें गुण करितें. यास कांहीं पथ्य नाहीं, किंवा मर्शनस्याप्रमाणें यापासून कांहीं अपाय होण्याची भीति नाहीं.

तैलमेव च नस्यार्थे नित्याभ्यासेन शस्यते ॥३३ ॥
शिरसः श्लेष्मधामत्वात्स्नेहाः स्वस्थस्य नेतरे ।

निरोगी मनुष्यानें नस्यांत तेलाचाच उपयोग करावा. कारण, त्याची आपणांस संवय असते. मस्तक हें कफस्थान असल्यामुळें इतर स्नेह वापरल्यास कफ वाढण्याचा संभव असतो.

आशुकृच्चिरकारित्वं गुणोत्कर्षापकृष्टता ॥ ३४ ॥
मर्शे च प्रतिमर्शे च विशेषो न भवेद्यदि ।
को मर्शं सपरीहारं सापदं च भजेत्ततः ॥ ३५ ॥

मर्श व प्रतिमर्शनस्य यांत भेद असा आहे कीं, मर्शाचा तत्काल व उत्कृष्ट गुण येतो आणि प्रतिमर्शाचा उशिरां व थोडा गुण येतो. हा भेद नसता तर प्रतिमर्श नस्य सोडून, पथ्य संभाळून व अपायाची धास्ती बाळगून प्रतिमर्शाचें सेवन कोण करता?

अच्छपानविचाराख्यौ कुटीवातातपस्थिती ।
अन्वासमात्राबस्ती च तद्वदेव च निर्दिशेत् ॥ ३६ ॥

शुद्ध-स्नेहपान व विचारणा-स्नेहपान, कुटीप्रावेशिक व वातातपरसायन, अनुवासन व मात्राबस्ति यांच्यामध्येंही अशाच प्रकारचा भेद आहे.

जीवंतीजलदेवदारुजलदत्वक्सेव्यगोपीहिमं
दार्वीत्वङ्मधुकप्लवागुरुवरापुंड्राह्वबिल्वोत्पलम् ।
धावन्यौ सुरभिः स्थिरे कृमिहरं पत्रं त्रुटिं रेणुकं
किंजल्कं कमलाह्वयं शतगुणे दिव्येऽभसि क्वाथयेत् ३७
तैलाद्रसं दशगुणं परिशेष्य तेन
तैलं पचेच्च सलिलेन दशैव वारान् ।
पाके क्षिपेच्च दशमे सममाजदुग्धं
नस्यं महागुणमुशंत्यणुतैलमेतत् ॥ ३८ ॥

जीवंती, वाळा, देवदार, नागरमोथा, दालचिनी, काळा वाळा, उपळसरी, चंदन, दारुहळद, तालीसपत्र, ज्येष्ठमध, भद्रमोथा, अगर, त्रिफळा, पुंडरीक कमळ, बाळबेल, निळें कमळ, रिंगणी, डोरली, साळई, सालवण, पिठवण, वावडिंग, तमालपत्र, वेलची, रेणुकबीज, कमळकेशर व चिकणमूळ, हीं औषधें समभाग घेऊन त्यांचा सर्वांच्या शंभरपट गांग उदकांत काढा करावा. तो गाळून घेऊन त्यांत त्याच्या दशांश तिळांचें तेल पाणी आटेपर्यंत कढवावें. याप्रमाणें दहा निरनिराळ्या काढ्यांत दहा वेळ तें तेल कढवावें. दहाव्या वेळीं त्यांत बरोबरीनें बकरीचें दूध मिळवून तें सिद्ध करावें. यास अणुतैल म्हणतात. हें नस्याच्या कामीं फारच गुणदायक आहे.

घनोन्नतप्रसन्नत्वक्स्कंधग्रीवास्यवक्षसः ।
दृढेंद्रियास्त्वपलिता भवेयुर्नस्यशीलिनः ॥ ३९ ॥

नेहमीं नस्याचें सेवन करणारांची त्वचा, खांदे, मान, तोंड व छाती जाड, उन्नत व रमणीय होतात. त्यांचीं इंद्रियें बळकट होतात व केंस पिकत नाहींत.

---

## अध्याय एकविसावा.

अथाऽतो धूमपानविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां धूमपानविधि सांगतों.

जत्रूर्ध्वं कफवातोत्थविकाराणामजन्मने ।
उच्छेदाय च जातानां पिबेद्धूमं सदात्मवान् ॥ १ ॥

विचारी मनुष्यानें शिरोभागांत कफवातविकार न होऊं देण्याकरितां व झालेल्या रोगांच्या नाशाकरितां नेहमीं धूमपान करावें.

स्निग्धो मध्यः स तीक्ष्णश्च वाते वातकफे कफे ।
योज्यः

धूम्रपानाचे स्निग्ध, मध्य व तीक्ष्ण असे तीन प्रकार असून ते अनुक्रमें वातजन्य, वातकफजन्य व कफजन्य विकारांवर योजावे.

न रक्तपित्तार्तिविरिक्तोदरमेहिषु ॥ २ ॥
तिमिरोर्ध्वाऽनिलाऽध्मानरोहिणीदत्तबास्तिषु ।
मत्स्यमद्यदधिक्षीरक्षौद्रस्नेहविषाशिषु ॥ ३ ॥
शिरस्यभिहते पांडुरोगे जागरिते निशि ।

ज्यांस रक्तदोष, पित्तविकार, उदर, प्रमेह, तिमिर, ऊर्ध्ववात, पोटफुगी, रोहिणी नांवाचा कण्ठरोग, मस्तकाभिघात व पांडु हे रोग झाले आहेत, ज्यांना विरेचन किंवा बस्ति दिला आहे, ज्यांनीं मासे, दारू, दहीं, दूध, मध, तूप किंवा विषारी पदार्थांचें सेवन केलें आहे, अथवा ज्यांनीं रात्रीं जागरण केलें आहे, त्यांनीं धूमपान करूं नये.

रक्तपित्तांध्यबाधिर्यतृण्मूर्छामदमोहकृत् ॥ ४ ॥
धूमोऽकालेऽतिपीतो वा तत्र शीतो विधिर्हितः ।

अवेळीं किंवा अतिशय धूमपान केल्यानें रक्तपित्त, आंधळेपणा, बहिरेपणा, तहान, मूर्च्छा, मद व मोह हे विकार होतात. त्यांवर शीत उपचार करावे.

क्षुतजृंभितविण्मूत्रस्त्रीसेवाशस्त्रकर्मणाम् ॥ ५ ॥
हासस्य दंतकाष्ठस्य धूममंते पिबेन्मृदुम् ।

शिंक, जांभई, मल-मूत्रोत्सर्ग, मैथुन, शस्त्रक्रिया, हास्य, दंतधावन या कर्मांच्या नंतर मृदु ( स्निग्ध ) धूमपान करावें.

कालेष्वेषु निशाऽहारनावनांते च मध्यमम् ॥ ६ ॥

सदरहू प्रसंगीं व सकाळीं, जेवणानंतर व नस्य घेतल्यावर मध्यम धूम्रपान करावें.

निद्रानस्यांजनस्नानच्छर्दितांते विरेचनम् ।

निद्रा, नस्य, अंजन, स्नान व वमन या क्रियांच्या नंतर विरेचन धूम्रपान करावें.

बस्तिनेत्रसमद्रव्यं त्रिकोशं कारयेदृजु ॥ ७ ॥
मूलाग्रेऽगुष्ठकोलास्थिप्रवेशं धूमनेत्रकम् ।

तीक्ष्णस्नेहनमध्येषु त्रीणि चत्वारि पंच च ॥ ८ ॥
अंगुलानां क्रमात्पातुः प्रमाणेनाऽष्टकानि तत् ।

धूम्रपानाची नळी बस्तीच्या नळीप्रमाणेंच धातु वगैरेची केलेली, तीन पडद्यांची, व सरळ असून तिचें मुळाकडचें छिद्र आंगठा आंत जाईल इतकें व अग्र बोराची बी जाईल एवढें मोठें असावें. तिची लांबी तीक्ष्ण धूम्रपानास, धूम्रपान करणाराच्या बोटांनीं चोवीस अंगळें, स्निग्ध धूम्रपानास बत्तीस अंगळें आणि मध्यमास चाळीस अंगळें असावी.

ऋजूपविष्टस्तच्चेता विवृतास्यास्त्रिपर्ययम् ॥ ९ ॥
पिधाय च्छिद्रमेकैकं धूमं नासिकया पिबेत् ।

सरळ बसून, सगळें लक्ष्य धूम्रपानाकडे ठेवून, तोंड उघडें ठेवून आळीपाळीनें एक नाकपुडी बंद करून दुसरीनें धूर ओढावा. याप्रमाणें प्रत्येक नाकपुडीनें तीन तीन वेळ ओढावा.

प्राक् पिबेन्नासयोत्क्लिष्टे दोषे घ्राणशिरोगते ॥ १० ॥
उत्क्लेशनार्थं वक्त्रेण विपरीतं तु कंठगे ।

नाकांतील व डोक्यांतील दोष स्थानांतून बाहेर पडले असल्यास प्रथम नाकानें धूर ओढावा. तसें नसल्यास त्यांना चाळवण्याकरितां प्रथम तोंडानें धूर ओढून मग नाकानें ओढावा. गळ्यांतील दोष चाळवणें असल्यास प्रथम नाकानें ओढून मग तोंडानें ओढावा.

मुखेनैव वमेद्धूमं नासया दृग्विघातकृत् ॥ ११ ॥

धूर सोडतांना नेहमीं तोंडानेंच सोडावा. नाकानें सोडल्यास डोळ्यांस इजा होते.

आक्षेपमोक्षैः पातव्यो धूमस्तु त्रिस्त्रिभिस्त्रिभिः ।

तीनदां धूर घेऊन तीनदां सोडणें यास एक धूमपान म्हणतात. अशीं तीन धूम्रपानें दरवेळीं करावीं.

अह्नः पिबेत्सकृत् स्निग्धं द्विर्मध्यं शोधनं परम् ।
त्रिश्चतुर्वा

स्निग्ध धूम्रपान दिवसांतून एकदांच करावें. मध्यम पान दोनदां आणि तीक्ष्ण तीन किंवा चार वेळ करावें.

मृदौ तत्र द्रव्याण्यगुरुगुग्गुलुः ।
मुस्तस्थौणेयशैलेयनलदोशीरवालकम् ॥ १२ ॥

वरांगकौंतीमधुकाबिल्वमज्जैलवालुकम् ।
श्रीवेष्टकं सर्जरसो ध्यामकं मदनं प्लवम् ॥ १४ ॥
शल्लकी कुंकुमं माषा यवाः कुंदुरकं तिलाः ।
स्नेहः फलानां साराणां मेदोमज्जावसाघृतम् ॥ १५ ॥

स्निग्ध धूम्रपानांत पुढील औषधें वापरावीं:—अगर, गुग्गुळ, नागरमोथा, थुणेर, दगडफूल, जटामांसी, काळा वाळा, सुगंधी वाळा, दालचिनी, रेणुकबीज, ज्येष्ठमध, बेलफळाचा गर, एलवालुक, गंधाबिरोजा, राळ, रोहिस गवत, गेळफळ, क्षुद्र मोथा, साळईचा डीक, केशर, उडीद, जव, कवडचा ऊद, तीळ, नारळ, बदाम वगैरे फळांचीं व देवदार, खैर वगैरे झाडांच्या सारांचीं तेलें, चर्बी, मज्जा, वसा व तूप.

शमने शल्लकी लाक्षा पृथ्वीका कमलोत्पलम् ।
न्यग्रोधोदुंबराश्वत्थप्लक्षरोध्रत्वचः सिता ॥ १६ ॥
यष्टी मधु सुवर्णत्वक् पद्मकं रक्तयष्टिका ।
गंधाश्चाकुष्ठतगराः

शमन ( मध्यम ) धूम्रपानांत पुढील औषधें वापरावीं:—साळईचा डीक, लाख, बारीक वेलची, कमळ, निळें कमळ, वड, उंबर, पिंपळ, पिंपरी व लोध्र यांच्या साली, खडीसाखर, ज्येष्ठमध, मध, बाहवा, पद्मकाष्ठ, मंजिष्ठ; आणि कोष्ठ व तगर खेरीज करून बाकी सर्व सुगंधि द्रव्यें.

तीक्ष्णे ज्योतिष्मती निशा ॥ १७ ॥
दशमूलमनोह्वालं लाक्षाश्वेताफलत्रयम् ।
गंधद्रव्याणि तीक्ष्णानि गणो मूर्धविरेचनः ॥ १८ ॥

तीक्ष्ण धूमपानांत पुढील द्रव्यें वापरावीं:—मालकांगोणी, हळद, दशमुळें, मनशीळ, हरताळ, लाख, किन्हीचें मूळ, त्रिफळा, तीक्ष्ण गंधद्रव्यें आणि शिरोविरेचनगणांतील द्रव्यें.

जले स्थितामहोरात्रमिषीकां द्वादशांगुलाम् ।
पिष्टैर्धूमौषधैरेवं पंचकृत्वः प्रलेपयेत् ॥ १९ ॥
वर्तिरंगुष्ठवत्स्थूला यवमध्या यथा भवेत् ।
छायाशुष्कां विगर्भां तां स्नेहाभ्यक्तां यथायथम् ॥ २० ॥
धूमनेत्रार्पितां पातुमग्निप्लुष्टां प्रयोजयेत् ।

एक बारा बोटें लांबीची दर्भमुळाची काडी अहोरात्र पाण्यांत भिजत घालून वर सांगितलेली धूम्रपानाचीं औषधें वाटून त्यांचा तिच्यावर पांच वेळ लेप करावा. हा लेप असा दिला पाहिजे कीं, ती आंगठ्याइतकी जाड व यवाच्या आकाराची ( मध्यें जाड व टोकांस बारीक ) होईल. नंतर ती वात सावलींत सुकवून आंतली काडी काढून टाकावी. उपयोग करतांना वात तूप वगैरे स्नेहांत बुडवून धूमयंत्रांत ठेवून पेटवून ओढावी.

शरावसंपुटच्छिद्रे नाडीं न्यस्य दशांगुलाम् ॥ २१ ॥
अष्टांगुलां वा वक्त्रेण कासवान् धूममापिबेत् ।

खोकल्यावर धूमपान करणें असल्यास, दोन परळ एकत्र सांधून वरच्यास भोंक पाडावें. आणि त्या भोंकावर आठ किंवा दहा बोटें लांबीची नळी ठेवून तोंडानें धूर ओढावा.

कासः श्वासः पीनसो विस्वरत्वं पूतिर्गंधः पांडुता केशदोषः ।
कर्णाऽस्याक्षिस्रावकंड्वर्तिजाड्यं तंद्रा हिध्मा धूमपं न स्पृशंति २२

धूम्रपान करणाऱ्या मनुष्यास खोकला, दमा, पीनस, स्वरभेद, तोंड व नाक यांची दुर्गंधि, चेहऱ्याचा फिकटपणा, केसांचे विकार, कान, तोंड, डोळे यांचा स्राव, कंडू, ठणका, जाड्य, तंद्रा व उचकी हे विकार होत नाहींत.

---

## अध्याय बाविसावा.

अथाऽतो गंडूषादिविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां गंडूष वगैरेंचा विधि सांगतों.

चतुष्प्रकारो गंडूषः स्निग्धः शमनशोधनौ ।
रोपणश्च

गंडूष चार प्रकारचे आहेत. स्निग्ध, शमन, शोधन व रोपण.

त्रयस्तत्र त्रिषु योज्याश्चलादिषु ॥ १ ॥
अंत्यो व्रणघ्नः

त्यांपैकीं पहिल्या तीन प्रकारच्या गंडूषांचा अनुक्रमें वातादि दोषांवर उपयोग करावा. चवथा प्रकार व्रणघ्न आहे.

स्निग्धोऽत्र स्वाद्वम्लपटुसाधितैः ।
स्नेहैः

स्निग्ध गंडूष मधुर, आंबट व खारट औषधांनीं सिद्ध केलेल्या स्नेहांनीं करावे.

संशमनस्तिक्तकषायमधुरौषधैः ॥ २ ॥

शमन गंडूष कडू, तुरट व मधुर औषधांनीं करावे.

शोधनस्तिक्तकट्वम्लपटूष्णैः

शोधन गंडूष कडू, तिखट, आंबट, खारट व उष्ण औषधांनीं करावे.

रोपणः पुनः

कषायतिक्तकैः

रोपण (जखम भरून आणणारे) गंडूष तुरट व कडू औषधांनीं करावे.

तत्र स्नेहः क्षीरं मधूदकम् ॥ ३ ॥

शुक्तं मद्यं रसो मूत्रं धान्याम्लं च यथायथम् ।

कल्कैर्युक्तं विपक्वं वा यथास्पर्शं प्रयोजयेत् ॥ ४ ॥

गंडूष करणें ते तूप, तेल वगैरे स्नेह, दूध, मध, पाणी, शुक्त, मद्य, मांसरस, गोमूत्र, व अम्लकांजी यांपैकीं दोषानुरोधानें जें योग्य असेल तें ऊन किंवा थंड घेऊन त्यांत औषधांचा कल्क मिळवून त्यानें करावे.

दंतहर्षे दंतचाले मुखरोगे च वातिके ।

सुखोष्णमथवा शीतं तिलकल्कोदकं हितम् ॥ ५ ॥

दांत शिवशिवणें, हालणें व वातजन्य मुखरोग यांवर तिळ-कल्काच्या कोमट अथवा थंड पाण्याचे गंडूष करावे.

गंडूषधारणे नित्यं तैलं मांसरसोऽथवा ।

निरोगी मनुष्यास गंडूष नेहमीं करणें असल्यास त्यानें तिळाच्या तेलानें अथवा मांसरसानें करावे.

ऊषादाहान्विते पाके क्षते वागंतुसंभवे ॥ ६ ॥

विषक्षाराग्निदग्धे च सर्पिर्धार्यं पयोऽथवा ।

तोंड येऊन जळजळ किंवा दाह होत असल्यास, तोंडांत आगंतु जखम झाली असल्यास, किंवा विष, क्षार अथवा अग्नीनें तोंड भाजलें असल्यास तुपाचे किंवा दुधाचे गंडूष करावे.

वैशद्यं जनयत्यास्ये संदधाति मुखव्रणान् ॥ ७ ॥

दाहतृष्णाप्रशमनं मधुगंडूषधारणम् ।

मधाच्या गंडूषांनीं तोंड स्वच्छ होतें; चिकटा जातो; तोंडांतील व्रण भरून येतात; आणि दाह व तहान शमन पावतात.

धान्याम्लमास्यवैरस्यमलदौर्गंध्यनाशनम् ॥ ८ ॥
तदेवालवणं शीतं मुखशोषहरं परम् ।

कांजीच्या गंडूषांनीं तोंडाचा बेचवपणा, मळ व दुर्गंधि हीं नाहींशीं होतात. थंड कांजींत मीठ न घालतां गंडूष केल्यास तोंडाची कोरड तावडतोब नाहींशी होते.

आशु क्षारांबुगंडूषो भिनत्ति श्लेष्मणश्चयम् ॥ ९ ॥

क्षारमिश्रित पाण्याच्या गंडूषांनीं कफाचा संचय तावडतोब नाहींसा होतो.

सुखोष्णोदकगंडूषैर्जायते वक्त्रलाघवम् ।

कोमट पाण्याच्या गंडूषांनीं तोंडाचें जडत्व नाहींसें होतें.

निवाते सातपे स्विन्नमृदितस्कंधकंधरः ॥ १० ॥
गंडूषमपिबन् किंचिदुन्नतास्यो विधारयेत् ।
कफपूर्णास्यता यावत्स्रवद्घ्राणाक्षताथवा ।

खांदे व मान यांस शेकून व रगडवून ऊन पडलेल्या निवाऱ्याच्या जागीं बसून गंडूषाचें पाणी तोंडांत ओतून तोंड किंचित् वर करून कांहीं वेळ तसेंच ठेवावें, गिळूं नये. तोंड कफानें भरून जाईपर्यंत किंवा नाकाडोळ्यांना धार लागेपर्यंत गंडूष तोंडांत धरावा.

असंचार्यो मुखे पूर्णे गंडूषः कवलोऽन्यथा ॥ ११ ॥

तोंड गच्च भरून जाऊन पाणी खुळखुळवितां येत नाहीं, त्यास गण्डूष म्हणतात; आणि पाणी खुळखुळवतां येण्याजोगा गंडूष असला म्हणजे त्यास कवल म्हणतात.

मन्याशिरःकर्णमुखाक्षिरोगाः प्रसेककंठामयवक्त्रशोषाः ।
हृल्लासतंद्रारुचिपीनसाश्च साध्या विशेषात्कवलग्रहेण १२

मान, डोकें, तोंड व डोळे यांचे रोग, लाळ गळणें, गळ्याचे रोग, तोंड कोरडें पडणें, मळमळ, झांपड, अरुचि व पीनस हे रोग विशेषेंकरून कवलधारणानें बरे होतात.

कल्को रसक्रिया चूर्णस्त्रिविधं प्रतिसारणम् ।
युंज्यात्तत् कफरोगेषु गंडूषविहितौषधैः ॥ १३ ॥

प्रतिसारण म्हणजे चोळण्याचें औषध तीन प्रकारचें आहे. कल्क, रसक्रिया ( अवलेह ) व चूर्ण. तें कफरोगांत गंडूषाकरितां सांगितलेल्या औषधांनींच करावें.

मुखालेपस्त्रिधा दोषविषहा वर्णकृच्च सः ।
उष्णो वातकफे शस्तः शेषेष्वत्यर्थशीतलः ॥ १४ ॥

मुखलेप तीन प्रकारचा आहे. दोषघ्न, विषघ्न व कांतिदायक. वातकफविकारांवर उष्ण आणि इतर दोषांवर अत्यंत थंड लेप करावा.

त्रिप्रमाणश्चतुर्भागत्रिभागार्धांगुलोन्नतिः ।

त्याच्या जाडीचें प्रमाणही तीन प्रकारचें आहे. एक चतुर्थांश, एक तृतीयांश व अर्धे अंगुळ.

अशुष्कस्य स्थितिस्तस्य शुष्को दूषयति च्छविम् १५
तमार्द्रयित्वापनयेत्तदंतेऽभ्यंगमाचरेत् ।

मुखलेप ओला असेपर्यंतच राहूं द्यावा. सुकल्यावर ठेवल्यास तो त्वचा बिघडवितो. (तो सुकावयाच्या बेतांत आला म्हणजे) ओला करून काढावा आणि नंतर अभ्यंग करावा.

विवर्जयेद्दिवास्वप्नभाष्याग्न्यातपशुक्क्रुधः ॥ १६ ॥

मुखलेप करणारांनीं दिवसा निजणें, फार बोलणें, अग्नि, ऊन, शोक व क्रोध या गोष्टी वर्ज्य कराव्या.

न योज्यः पीनसेऽजीर्णे दत्तनस्ये हनुग्रहे ।
अरोचके जागरिते

पीनस, अजीर्ण, दांतखिळी बसणें व अरुचि हे विकार झाले असतां, आणि नस्य दिलेल्या व रात्रीं जागलेल्या मनुष्यास मुखलेप लावूं नये.

स च हंति सुयोजितः ॥ १७ ॥
अकालपलितव्यंगवलीतिमिरनीलिकाः ।

मुखलेपाचा यथाविधि उपयोग केला असतां अकाळीं केंस पिकणें, वांग, अंगावर सुरकुत्या पडणें, तिमिर व तीळ हे विकार नाहींसे होतात.

कोलमज्जा वृषान्मूलं शाबरं गौरसर्षपाः ॥ १८ ॥
सिंहीमूलं तिलाः कृष्णा दार्वी त्वङ्ग निस्तुषा यवाः ।
दर्भमूलहिमोशीरशिरीषमिशितंडुलाः ॥ १९ ॥
कुमुदोत्पलकह्लारदूर्वामधुकचंदनम् ।
कालीयकतिलोशीरमांसीतगरपद्मकम् ॥ २० ॥
तालीसगुंद्रापुंड्राह्वयष्टीकाशनतागुरुः ।
इत्यर्धार्धोदिता लेपा हेमंतादिषु षट् स्मृताः ॥ २१ ॥

१ बोराच्या बीचा मगज, अडुळशाच्या मुळया, लोध्र, पांढरें शिरस; २ डोरलीमूळ, काळे तीळ, दारुहळद, दालचिनी, सालपटें काढलेले जव; ३ दर्भमूळ, कापूर, वाळा, शिरसाची साल, बडीशेप व तांदूळ; ४ तांबडें, निळें व शतपत्र कमळ, दूर्वा, ज्येष्ठमध, चंदन; ५ पिवळा चंदन, तीळ, वाळा, जटामांसी, तगर, पद्मकाष्ठ; ६ तालीसपत्र, गव्हला, कमळ, ज्येष्ठमध, कसई गवत, तगर, व अगुरु हे अर्ध्या अर्ध्या श्लोकांत सांगितलेले सहा लेप अनुक्रमें हेमंत, शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा व शरत् या सहा ऋतूंत लावावे.

मुखालेपनशीलानां दृढं भवति दर्शनम् ।
वदनं चाऽपरिम्लानं श्लक्ष्णं तामरसोपमम् ॥ २२ ॥

नेहमीं मुखलेप लावणारांची दृष्टि सुदृढ आणि तोंड प्रफुल्लित, गुळगुळीत व कमलाप्रमाणें सुंदर होतें.

अभ्यंगसेकपिचवो बस्तिश्चेति चतुर्विधम् ।
मूर्धतैलं बहुगुणं तद्विद्यादुत्तरोत्तरम् ॥ २३ ॥

डोक्यावर तेल घालण्याचे चार प्रकार आहेत. अभ्यंग, परिषेक, बोळा किंवा घडी व शिरोबस्ति. हे उत्तरोत्तर एकाहून एक जास्त गुणकारी आहेत.

तत्राऽभ्यंगः प्रयोक्तव्यो रौक्ष्यकंडूमलादिषु ।

त्यांपैकीं अभ्यंग रूक्षता, कंडू व मळ वगैरे घालविण्याकरितां उपयोगांत आणावा.

अरूंषिकाशिरस्तोददाहपाकव्रणेषु तु ॥ २४ ॥
परिषेकः

खवडे, डोक्याचा ठणका, दाह, पाक व व्रण या विकारांवर तेलाची धार धरावी.

पिचुः केशशातस्फुटनधूपने ।
नेत्रस्तंभे च

केंस गळणें, त्यांतून ठणका व वाफा निघणें आणि डोळे ताठणें यांवर डोक्यावर तेलाची घडी ठेवावी.

बस्तिस्तु प्रसुप्त्यर्दितजागरे ॥ २५ ॥
नासाऽस्यशोषे तिमिरे शिरोरोगे च दारुणे ।

डोक्याच्या त्वचेची स्पर्शाज्ञता, वायूनें तोंड वांकडें होणें, झोंप न येणें, नाक व तोंड यांस कोरड पडणें, तिमिर व भयंकर डोक्याचे रोग, यांवर शिरोबस्ति द्यावा.

विधिस्तस्य निषण्णस्य पीठे जानुसमे मृदौ ॥ २६ ॥
शुद्धाक्तस्विन्नदेहस्य दिनांते गव्यमाहिषम् ।
द्वादशांगुलविस्तीर्णं चर्मपट्टं शिरःसमम् ॥ २७ ॥
आकर्णबंधनस्थानं ललाटे वस्त्रवेष्टिते ।
चैलवेणिकया बध्द्वा माषकल्केन लेपयेत् ॥ २८ ॥
ततो यथाव्याधि शृतं स्नेहं कोष्णं निषेचयेत् ।
ऊर्ध्वं केशभुवो यावद् द्व्यंगुलम्

वमनादिकांनीं शुद्ध झालेल्या रोग्यास अभ्यंग व स्वेदन करून संध्याकाळच्या वेळीं गुडघ्याइतका उंच मऊ आसनावर बसवून कपाळास एक वस्त्र गुंडाळून त्यावर डोक्याच्या घेराचें व बारा बोटें रुंदीचें बैलाचें किंवा रेड्याचें चामडें कानाच्या बरोबर कपड्याच्या नाडीनें बांधून सांध्यावर उडदाच्या पिठाचा लेप द्यावा. नंतर या शिरोबस्तींत रोगानुसार औषधें घालून कढविलेलें कोमट तेल केंसांच्या सपाटीवर दोन बोटें उंच येईपावेतों भरावें.

धारयेच्च तम् ॥ २९ ॥
आवक्त्रनासिकोत्क्लेदात्

आणि तें तोंड व नाक वाहूं लागेपावेतों धारण करावें.

दशाष्टौ षट् चलादिषु ।
मात्रासहस्राण्यरुजे त्वेकम्

तें वातविकारावर एक हजार अंक, पित्तावर आठ हजार अंक, आणि कफावर सहा हजार अंक मोजीपर्यंत धारण करावें. निरोगी मनुष्यानें फक्त एक हजार अंक मोजीपर्यंत ठेवावें.

स्कंधादि मर्दयेत् ॥ ३० ॥
मुक्तस्नेहस्य

हा बस्ति काढून टाकल्यावर खांदे, डोकें, मान वगैरे अंगांचें मर्दन करावें.

परमं सप्ताहं तस्य सेवनम् ।

शिरोबस्तीचा परमावधि म्हणजे सात दिवस होय.

धारयेत्पूरणं कर्णे कर्णमूलं विमर्दयन् ॥ ३१ ॥
रुजः स्यान्मार्दवं यावन्मात्राशतमवेदने ।

कानांत तेल वगैरे औषध घातलें असतां तें दुखणें कमी होई-पावेतों ठेवावें आणि तोंपर्यंत कानाच्या मुळाचा भाग चोळीत असावें. निरोगी मनुष्यानें तेल घातलें असतां शंभर अंक मोजीपावेतों ठेवावें.

यावत्पर्येति हस्ताग्रं दक्षिणं जानुमंडलम् ॥ ३२ ॥
निमेषोन्मेषकालेन समं मात्रा तु सा स्मृता ।

उजव्या हातानें उजव्या गुडध्यासभोंवतीं मंडल करण्यास किंवा डोळ्यांची उघडझांप करण्यास जितका वेळ लागतो त्यास मात्रा असें म्हणतात.

कचसदनसितत्वपिंजरत्वं परिफुटनं शिरसः समीररोगान् ।
जयति जनयतींद्रियप्रसादं स्वरहनुमूर्धबलं च मूर्धतैलम् ३३

टाळूवर तेल घातल्यानें केंस गळणें, भुरकट होणें, पिकणें, ठणकणें हे विकार व वातजन्य शिरोरोग नाहींसे होऊन इंद्रियें प्रसन्न होतात; आणि स्वर, हनवटी व टाळू यांस बळ येतें.

---

## अध्याय तेविसावा.

अथात आश्चोतनांजनविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां आश्चोतन व अंजन यांचे विधि सांगतों.

सर्वेषामक्षिरोगाणामादावाश्चोतनं हितम् ।
रुक्तोदकंडूघर्षाश्रुदाहरागनिबर्हणम् ॥ १ ॥

सर्व नेत्ररोगांत प्रथम पातळ औषधांचे थेंब टाकणें हितकर आहे. त्यायोगानें ठणका, टोंचण, खाज, खुपणें, पाणी गळणें, आग व लाली हे विकार बरे होतात.

उष्णं वाते कफे कोष्णं तच्छीतं रक्तपित्तयोः ।

वातावर ऊन, कफावर कोमट आणि रक्तपित्तावर थंड असे थेंब सोडावे.

निवातस्थस्य वामेन पाणिनोन्मील्य लोचनम् ॥ २ ॥
शुक्त्या प्रलंबयान्येन पिचुवर्त्या कनीनिके ।
दश द्वादश वा बिन्दून् द्व्यंगुलादवसेचयेत् ॥ ३ ॥

रोग्यास निर्वातस्थानीं निजवून डाव्या हातानें त्याचा डोळा उघडून उजव्या हातानें डोळ्याच्या बाहेरच्या बाजूस शिंपी धरून त्यांत ठेवलेल्या कापसाच्या वातीच्या द्वारें डोळ्याच्या नाकाजवळील कोंपऱ्यांत दोन बोटें अंतरावरून औषधाचे दहा बारा थेंब सोडावे.

ततः प्रमृज्य मृदुना चैलेन कफवातयोः ।
अन्येन कोष्णपानीयप्लुतेन स्वेदयेन्मृदु ॥ ४ ॥

नंतर मऊ फडक्यानें डोळा पुसून वातकफविकार असल्यास दुसऱ्या एका कोमट पाण्यांत भिजवलेल्या कपड्यानें तो किंचित् शेकावा.

अत्युष्णतीक्ष्णं रुग्रागदृङ्नाशायाक्षिसेचनम् ।
अतिशीतं तु कुरुते निस्तोदस्तंभवेदनाः ॥ ५ ॥
कषायवर्त्मतां घर्षं कृच्छ्रादुन्मेषणं बहु ।
विकारवृद्धिमत्यल्पं संरंभमपरिस्रुतम् ॥ ६ ॥

सदरहू औषधाचे थेंब फार उष्ण किंवा तीक्ष्ण असल्यास ठणका, लाली व दृष्टिनाश हे विकार होतात. ते फार थंड असल्यास डोळा स्तब्ध होतो आणि टोंचण व ओढ लागते. औषध फार पडल्यास पापण्या रूक्ष होऊन खुपतात आणि उघडझांक करतांना त्रास होतो; आणि औषध फारच थोडें पडल्यास रोग वाढतो. औषध गळून गेलें नसल्यास डोळ्यांचा क्षोभ होतो.

गत्वा संधिशिरोघ्राणमुखस्रोतांसि भेषजम् ।
ऊर्ध्वगान्नयने न्यस्तमपवर्तयते मलान् ॥ ७ ॥

डोळ्यांत घातलेलें औषध डोळ्यांचे संधि, मस्तक, नाक व तोंड यांतील सूक्ष्मवाहिन्यांतून जाऊन वर जाणाऱ्या दोषांस परत आणितें.

अथांऽजनं शुद्धतनोर्नेत्रमात्राश्रये मले ।
पक्वलिंगेऽल्पशोफार्तिकंडूपैच्छिल्यलक्षिते ॥ ८ ॥
मंदघर्षाश्रुरागेऽक्षिण प्रयोज्यं घनदूषिके ।
आर्ते पित्तकफासृग्भिर्मारुतेन विशेषतः ॥ ९ ॥

आतां अंजन घालावयाचें तें शोधनानंतर फक्त नेत्रगत दोष पक्व झाल्यावर घालावें. दोष पक्व झाला म्हणजे सूज कमी होणें, खाज व चिकटा हीं वाढणें, खुपणें व पाणी वाहणें, हे विकार

कमी होणें आणि पू दाटणें हीं लक्षणें होतात. पित्त, कफ, रक्त व वात या दोषांपासून होणाऱ्या रोगांवर अंजन घालावें. वातज रोगांवर त्याचा विशेष उपयोग करावा.

लेखनं रोपणं दृष्टिप्रसादनमिति त्रिधा ।
अंजनम्

लेखन (दोषच्छेद करणारें), रोपण (व्रणादि भरून आणणारें) आणि दृष्टिप्रसादन ( दृष्टि स्वच्छ करणारें ) असें तीन प्रकारचें अंजन आहे.

लेखनं तत्र कषायाम्लपटूषणैः ॥ १० ॥
रोपणं तिक्तकैर्द्रव्यैः स्वादुशीतैः प्रसादनम् ।

त्यांपैकीं लेखन अंजन तुरट, आंबट, खारट व तिखट औषधांनीं तयार करावें. रोपण अंजन कडू औषधांनीं करावें. आणि प्रसादन मधुर व थंड औषधांनीं तयार करावें.

दशांगुला तनुर्मध्ये शलाका मुकुलानना ॥ ११ ॥
प्रशस्ता लेखने ताम्री रोपणे काललोहजा ।
अंगुली च सुवर्णोत्था रूप्यजा च प्रसादने ॥ १२ ॥

अंजन डोळ्यांत घालण्याची सळई दहा अंगुळें लांब व मध्यभागीं बारीक असून तिचीं दोन्ही टोंकें फुलाच्या कळीसारखीं असावींत. लेखन अंजन घालण्यास तांब्याची सळई घ्यावी. रोपण अंजन पोलादाच्या सळईनें किंवा बोटानें घालावें आणि प्रसादन अंजन सोन्याच्या किंवा रुप्याच्या सळईनें घालावें.

पिंडो रसक्रिया चूर्णस्त्रिधैवांजनकल्पना ।
गुरौ मध्ये लघौ दोषे ताः क्रमेण प्रयोजयेत् ॥ १३ ॥

अंजनाचे तीन प्रकार आहेत. एक पिंड, म्हणजे मलमासारखें; दुसरें रसक्रिया म्हणजे लेहासारखें आणि तिसरें चूर्ण. पुष्कळ दोषांवर पिंड, मध्यमांवर रसक्रिया आणि लघुदोषांवर चूर्ण अशी योजना करावी.

हरेणुमात्रं पिंडस्य वेल्लमात्रा रसक्रिया ।
तीक्ष्णस्य द्विगुणं तस्य मृदुनः

पिंड व रसक्रिया यांचें औषध तीक्ष्ण असल्यास अनुक्रमें रेणुक-

बीजाएवढें व वावडिंगाएवढें दर वेळीं घालावें, आणि सौम्य असल्यास त्याच्या दुप्पट घालावें.

चूर्णितस्य च ॥ १४ ॥
द्वे शलाके तु तीक्ष्णस्य तिस्रः स्युरितरस्य च ।

चूर्णांजन तीव्र असल्यास दोन सळया आणि सौम्य असल्यास तीन सळया डोळ्यांत फिरवाव्या.

निशि स्वप्ने न मध्याह्ने म्लाने नोष्णगभस्तिभिः ॥ १५ ॥
अक्षिरोगाय दोषाः स्युर्वर्धितोत्पीडितद्रुताः ।
प्रातःसायं च तच्छांत्यै व्यभ्रेऽर्केऽतोऽञ्जयेत्सदा ॥ १६ ॥

रात्रीं, निजावयाच्या वेळीं, माध्यान्हीं व उन्हानें डोळे म्लान झाले असतां अंजन घालूं नये. घातल्यास त्यायोगानें दोषांची वृद्धि, संक्षोभ व द्रावण होऊन ते नेत्ररोग उत्पन्न करितात. म्हणून नेहमीं सकाळीं व संध्याकाळीं आकाश निरभ्र असतां अंजन घालावें.

वदंत्यन्ये तु न दिवा प्रयोज्यं तीक्ष्णमंजनम् ।
विरेकदुर्बलं चक्षुरादित्यं प्राप्य सीदति ॥ १७ ॥

कित्येकांचें असें ह्मणणें आहे कीं, दिवसा तीक्ष्ण अंजन घालूं नये. कारण, त्यानें पाणी निघून जाऊन अशक्त झालेल्या डोळ्यास सूर्यप्रकाश सहन होणार नाहीं.

स्वप्नेन रात्रौ कालस्य सौम्यत्वेन च तर्पिता ।
शीतसात्म्या दृगाग्नेयी स्थिरतां लभते पुनः ॥ १८ ॥

दृष्टि अग्नितत्त्वप्रधान व शीतसात्म्य असल्यामुळें ती रात्रीच्या झोंपेनें व सौम्यपणानें पुष्ट होऊन आणखी बळकट होते ( म्हणून रात्रीं तीक्ष्ण अंजन द्यावें. )

अत्युद्रिक्ते बलासे तु लेखनीयेऽथवा गदे ।
काममह्न्यपि नात्युष्णे तीक्ष्णमक्ष्णि प्रयोजयेत् ॥ १९ ॥

कफ अतिशय प्रबल असल्यास किंवा एखादा लेखनानें बरा होणारा नेत्ररोग झाला असल्यास दिवसा देखील, फारसा उष्मा नसल्यास तीक्ष्ण अंजनाचा उपयोग करण्यास हरकत नाहीं.

अश्मनो जन्म लोहस्य तत एव च तीक्ष्णता ।
उपघातोऽपि तेनैव तथा नेत्रस्य तेजसः ॥ २० ॥

( ज्या लोखंडापासून शस्त्र बनतें तें ) शस्त्र ( पर्यायानें ) दगडापासूनच बनतें. दगडावर घांसूनच त्याला तीक्ष्णता येते. आणि तीक्ष्णता जाऊन तें बोथट होण्यासही दगडच कारण होतो. त्याच प्रमाणें डोळ्याची उत्पत्ति, तीक्ष्णता व नाश या तिन्हींस एक तेजच कारण आहे.

न रात्रावपि शीतेऽति नेत्रे तीक्ष्णांजनं हितम् ।
दोषमस्रावयत्स्तंभकंडूजाड्यादिकारि तत् ॥ २१ ॥

कफाधिक्यामुळें जर डोळ्यांस अतिशय शैत्य झालें असेल तर रात्रीं देखील तीक्ष्ण अंजन घालूं नये. कारण रात्रीची वेळ थंड असल्यामुळें त्यापासून दोषांचा स्राव न होतां उलट ओढ, खाज व जडपणा हे विकार वाढतात.

नांजयेद्भीतवमितविरिक्ताशितवेगिते ।
क्रुद्धज्वरिततांताक्षिशिरोरुक्शोकजागरे ॥ २२ ॥
अदृष्टेऽर्के शिरःस्नाते पीतयोर्धूममद्ययोः ।
अजीर्णेऽग्न्यर्कसंतप्ते दिवा सुप्ते पिपासिते ॥ २३ ॥

भ्यालेले, वमनविरेचन घेतलेले, नुक्तेच जेवलेले, मलमूत्रादिकांचे वेग असलेले, रागावलेले, ज्वर आलेले, ज्यांच्या डोळ्यांस ग्लानि आली आहे असे; डोकें दुखणें, शोक, जागरण या विकारांनीं पीडित; डोक्यावरून स्नान केलेले, धूम्रपान व मद्यपान केलेले, अजीर्ण झालेले, विस्तवानें किंवा उन्हानें तापलेले, दिवसा निजलेले आणि तहान लागलेले, अशा मनुष्यांस, व आकाश अभ्राच्छादित असतां कोणासही अंजन करूं नये.

अतितीक्ष्णमृदुस्तोकबहुच्छघनकर्कशम् ।
अत्यर्थशीतलं तप्तमंजनं नावचारयेत् ॥ २४ ॥

अति तीक्ष्ण, अति सौम्य, अति थोडें, पुष्कळ, अति पातळ, अति दाट, अति थंड किंवा अति उष्ण असें अंजन कधींही वापरूं नये.

अथाऽनुन्मीलयन् दृष्टिमंतः संचारयेच्छनैः ।
अंजिते वर्त्मनी किंचिच्चालयेच्चैवमंजनम् ॥ २५ ॥

तीक्ष्णं व्याप्नोति सहसा न चोन्मेषनिमेषणम् ।
निष्पीडनं च वर्त्मभ्यां क्षालनं वा समाचरेत् ॥ २६ ॥

डोळ्यांत अंजन घातल्यावर डोळे झांकून आंतल्या आंत हळू हळू हालवावे, आणि पापण्यांची मधून मधून थोडी थोडी उघडझांक करीत असावें. असें केल्यानें तीक्ष्ण अंजन सर्व भागांत पसरतें. एकदम पापण्यांची उघडझांक करूं नये, त्या चोळूं नयेत; किंवा लगेच डोळे धुवून टाकूं नयेत.

अपेतौषधसंरंभं निर्वृतं नयनं यदा ।
व्याधिदोषर्तुयोग्याभिरद्भिः प्रक्षालयेत्तदा ॥ २७ ॥

औषध झोंबावयाचें बंद होऊन डोळ्यांस स्वस्थता आली म्हणजे रोग, दोष व ऋतु यांच्या अनुरोधानें योग्य पाण्यानें ते धुवावे.

दक्षिणांगुष्ठकेनाऽक्षि ततो वामं सवाससा ।
ऊर्ध्ववर्त्मनि संगृह्य शोध्यं वामेन चेतरत् ॥ २८ ॥

एक फडकें घेऊन तें उजव्या आंगठ्यावर घालून, तो आंगठा डाव्या डोळ्याच्या वरच्या पापणीवर धरून डोळा पुसावा. याचप्रमाणें डाव्या आंगठ्यानें उजवा डोळा साफ करावा.

वर्त्मप्राप्तांजनाद्दोषो रोगान्कुर्यादतोऽन्यथा ।

असें न केल्यास पापणीस लागून राहिलेल्या अंजनानें दोष कुपित होऊन तो रोग उत्पन्न करील.

कंडूजाड्येऽजनं तीक्ष्णं धूमं वा योजयेत् पुनः ।

कंडू सुटल्यास किंवा डोळे जड झाल्यास पुनः तीक्ष्ण अंजन किंवा धूम्रपान करावें.

तीक्ष्णांजनाभितप्ते तु चूर्णं प्रत्यंजनं हितम् ॥ २९ ॥

तीक्ष्ण अंजनानें डोळ्यांस त्रास झाल्यास त्यावर उतार्‍यादाखल चूर्णांजनाचा उपयोग करावा.

---

# अध्याय चोविसावा.

अथाऽतस्तर्पणपुटपाकविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां तर्पण व पुटपाक यांचा विधि सांगतों.

नयने ताम्यति स्तब्धे शुष्के रूक्षेऽभिघातिते ।
वातपित्तातुरे जिह्मे शीर्णपक्ष्माविलेक्षणे ॥ १ ॥
कृच्छ्रोन्मीलशिराहर्षशिरोत्पाततमोऽर्जुनैः ।
स्यंदमंथान्यतोवातवातपर्यायशुक्रकैः ॥ २ ॥
आतुरे शांतरागाश्रुशूलसंरंभदूषिके ।
निवाते तर्पणं योज्यं शुद्धयोर्मूर्धकाययोः ॥ ३ ॥
काले साधारणे प्रातः सायं चोत्तानशायिनः ।

डोळ्यांची ग्लानि, ओढ, शुष्कता, रूक्षता, अभिघात, वातपित्तविकार, केंस गळणें, भुरकट दिसणें, डोळे उघडतांना कष्ट होणें, शिरा फुरफुरणें, शिरोत्पात, तिमिर, अहिरा, पाणी गळणें, मंथ, अन्यतोवात, वातपर्याय व फूल हे विकार झाले असतां; आणि डोळ्यांची लाली, पाणी गळणें, शूळ, चुग्चुर व पू हे विकार शांत झाले असतां तर्पण द्यावें. प्रथम रोग्याच्या कोठ्याची व मस्तकाची शुद्धि करून वसंतादि साधारण ऋतुकाळीं, सकाळीं व संध्याकाळीं निवाऱ्याच्या जागीं, रोग्यास उताणें निजवून तर्पण द्यावें.

यवमाषमयीं पालीं नेत्रकोशाद्बहिः समाम् ॥ ४ ॥
द्व्यंगुलोच्चां दृढां कृत्वा यथास्वं सिद्धमावपेत् ।
सर्पिर्निमीलिते नेत्रे तप्तांबुप्रविलापितम् ॥ ५ ॥

डोळ्यांच्या बाहेर सातू व उडदाच्या पिठाची दोन बोटें उंचीची घट्ट व सारखी पाळ करून तींत दोषानुरोधानें तयार केलेलें औषधी घृत पाण्याच्या वाफेनें पातळ करून रोग्यास डोळे झांकावयास सांगून ओतावें.

नक्तांध्यवाततिमिरकृच्छ्रबोधादिके वसाम् ।
आ पक्ष्माग्रात्

रातांधळें, वातज नेत्ररोग, तिमिर, डोळे उघडतांना प्रयास पडणें इत्यादि विकारांवर चरबीचा उपयोग करावा. तूप किंवा वसा हीं दोन्हीं पापण्याचीं टोकें बुडेपर्यंत घालावीं.

अथोन्मेषं शनकैस्तस्य कुर्वतः ॥ ६ ॥
मात्रा विगणयेत्तत्र वर्त्मसंधिसितासिते ।
द्वौ च क्रमशो व्याधौ शतं त्रीणि च पंच च ॥ ७ ॥

शतानि सप्त चाष्टौ च दश मंथे दशानिले ।
पित्ते षट् स्वस्थवृत्ते च बलासे पंच धारयेत् ॥ ८ ॥

नंतर हळुहळू डोळे उघडीत राहून तो स्नेह पापण्या, नेत्रसंधि, पांढरें बुब्बुळ, काळें बुब्बुळ व दृष्टि यांच्या विकारांवर अनुक्रमें शंभर, तीनशें, पांचशें, सातशें व आठशें मात्रापर्यंत राहूं द्यावा. अधिमंथ रोगावर व वातज नेत्ररोगांवर एक हजार मात्रापावेतों ठेवावा. पित्तविकारांवर व निरोगी मनुष्यानें सहाशें मात्रापर्यंत आणि कफविकारांवर पांचशें मात्रापर्यंत ठेवावा.

कृत्वाऽपांगे ततो द्वारं स्नेहं पात्रे तु गालयेत् ।
पिबेच्च धूमं नेक्षेत व्योम रूपं च भास्वरम् ॥ ९ ॥

नंतर डोळ्याच्या बाहेरच्या कोपऱ्याजवळ पाळीला एक भोंक पाडून त्यांतून आंतील स्नेह एका भांड्यांत गळूं द्यावा. नंतर धूम्रपान करावें आणि आकाशाकडे किंवा चकचकीत पदार्थांकडे पाहूं नये.

इत्थं प्रतिदिनं वायौ पित्ते त्वेकांतरं कफे ।
स्वस्थे च द्व्यंतरं दद्यादातृप्तेरिति योजयेत् ॥ १० ॥

याप्रमाणें वातविकारावर दररोज, पित्तावर एक दिवसा आड, आणि कफावर व निरोगी अवस्थेंत दोन दिवसांआड तर्पण द्यावें. आणि अशा रीतीनें लागू पडेपावेतों चालू ठेवावें.

प्रकाशक्षमता स्वास्थ्यं विशदं लघु लोचनम् ।
तृप्ते विपर्ययोऽतृप्तेऽतितृप्ते श्लेष्मजा रुजः ॥ ११ ॥

डोळ्यांस प्रकाश सहन होणें, डोळयांची स्वस्थता, स्वच्छता, व हलकेपणा हीं तर्पण बरोबर झाल्याचीं लक्षणें होत. याच्या उलट लक्षणें असतां तर्पण बरोबर झालें नाहीं असें समजावें. तर्पण जास्त झालें असतां कफजन्य विकार होतात.

स्नेहपीता तनुरिव क्लांता दृष्टिर्हि सीदति ।
तर्पणानंतरं तस्माद्दृग्बलाधानकारिणम् ॥ १२ ॥
पुटपाकं प्रयुंजीत पूर्वोक्तेष्वेव यक्ष्मसु ।

स्नेहपानानंतर ज्याप्रमाणें शरीरास ग्लानि येते, त्याचप्रमाणें

तर्पणानंतर दृष्टीसही थकवा येतो; तो दूर करून शक्ति आणण्या-करितां वरील रोगांतच पुटपाकाचा उपयोग करावा.

स वाते स्नेहनः श्लेष्मसहिते लेखनो हितः ॥ १६ ॥
दृग्दौर्बल्येऽनिले पित्ते रक्ते स्वस्थे प्रसादनः ।

वायूवर स्नेहन पुटपाक, कफवातावर लेखन, आणि दृष्टिदौर्बल्यावर, वात, पित्त, रक्त यांपासून होणाऱ्या नेत्ररोगांवर व निरोगी स्थितींत प्रसादन पुटपाक हितकर जाणावा.

भूशयप्रसहानूपमेदोमज्जावसामिषैः ॥ १४ ॥
स्नेहनं पयसा पिष्टैर्जीवनीयैश्च कल्पयेत् ।

बिलेशय, प्रसह व अनूप प्राण्यांचा मेद, मज्जा, वसा व मांस आणि दुधांत वाटलेलीं जीवनीय गणांतील औषधें यांचा स्नेहन पुटपाक करावा.

मृगपक्षियकृन्मांसमुक्तायस्ताम्रसैंधवैः ॥ १५ ॥
स्रोतोजशंखफेनालैर्लेखनं मस्तुकल्पितैः ।

जांगल पशुपक्ष्यांचें यकृत् व मांस आणि मोतीं, लोह, ताम्र, सैंधव, सुरमा, शंख, समुद्रफेस व हरताळ हीं द्रव्यें दह्याच्या निवळीबरोबर वाटून त्यांचा लेखन पुटपाक करावा.

मृगपक्षियकृन्मज्जावसांऽत्रहृदयामिषैः ॥ १६ ॥
मधुरैः सघृतैः स्तन्यक्षीरपिष्टैः प्रसादनम् ।

पशुपक्ष्यांचें यकृत्, मज्जा, वसा, आंतडीं, हृदय व मांस, आणि मधुर गणांतील औषधें, थोडें तूप घालून, स्त्रियांच्या अंगावरच्या दुधांत वाटून त्यांचा प्रसादन पुटपाक करावा.

बिल्वमात्रं पृथक्पिंडं मांसभेषजकल्कयोः ॥ १७ ॥
उरुबूकवटांऽभोजपत्रैः स्नेहादिषु क्रमात् ।
वेष्टयित्वा मृदा लिप्तं धवधन्वनगोमयैः ॥ १८ ॥
पचेत्प्रदीप्तैरग्न्याभं पक्वं निष्पीड्य तद्रसम् ।
नेत्रे तर्पणवद्युंज्यात्

मांस व औषधांचा कल्क यांचे चार चार तोळ्यांचे वेगवेगळे गोळे घेऊन ते स्नेहन, लेखन व प्रसादन पुटपाकांत अनुक्रमें एरंड, वड व कमळिणी यांच्या पानांत गुंडाळून दोन बोटें जाडीचा काळ्या मातीचा लेप करून धावडा, व धामण यांचीं लांकडें किंवा गोवऱ्या

यांच्या अग्नींत लाल होईपावेतों भाजून काढावा, आणि वरची माती वगैरे काढून टाकून आंतील औषधांचा रस काढून त्या रसाचा डोळ्यावर तर्पणाप्रमाणें उपयोग करावा.

शतं द्वे त्रीणि धारयेत् ॥ १९ ॥
लेखनस्नेहनांत्येषु

लेखन, स्नेहन व प्रसादन पुटपाक अनुक्रमानें शंभर, दोनशें व तीनशें मात्रापर्यंत धारण करावे.

पूर्वौ कोष्णौ हिमोऽपरः ।
धूमपोऽते तयोरेव

पहिले दोन ( लेखन व स्नेहन ) पुटपाक कोमट असावे; आणि तिसरा प्रसादन पुटपाक थंड करून घालावा. लेखन व स्नेहन पुटपाकानंतर धूमपान करावें.

योगास्तत्र च तृप्तिवत् ॥ २० ॥

पुटपाकाचे हीनयोग, अतियोग व सम्यग्योग तर्पणाप्रमाणेंच जाणावे.

तर्पणं पुटपाकं च नस्यानर्हे न योजयेत् ।

ज्यांस नस्य वर्ज्य सांगितलें आहे, त्यांस तर्पण व पुटपाक देऊं नये.

यावंत्यहानि युंजीत द्विस्ततो हितभाग्भवेत् ।

जितके दिवस तर्पण व पुटपाक यांचें सेवन केलें असेल, त्याच्या दुप्पट दिवस पथ्यानें वागावें.

मालतीमाल्लिकापुष्पैर्बद्धाक्षो निवसेन्निशि ॥ २१ ॥

रात्रीं निजतांना मालतीचीं किंवा मोगरीचीं फुलें डोळ्यांवर बांधावीं.

सर्वात्मना नेत्रबलाय यत्नं कुर्वीत नस्यांजनतर्पणाद्यैः ।
दृष्टिश्च नष्टा विविधं जगच्च तमोमयं जायत एकरूपम् ॥२२॥

डोळ्यांचें सामर्थ्य राखण्याकरितां नस्य, अंजन, तर्पण वगैरे उपायांनीं सर्व प्रकारें यत्न करावा. कारण एक दृष्टि नाहींशी झाली म्हणजे हें जग विविध असूनही एकरूप—अंधकारमय होऊन जातें.

# अध्याय पंचविसावा.

अथाऽतो यंत्रविधिमध्यायं व्याख्यास्यामः।

आतां यंत्रविधि सांगतों.

नानाविधानां शल्यानां नानादेशप्रबाधिनाम्।
आहर्तुमभ्युपायो यस्तद्यंत्रं यच्च दर्शने ॥ १ ॥
अर्शोभगंदरादीनां शस्त्रक्षाराऽग्नियोजने।
शेषांगपरिरक्षायां तथा बस्त्यादिकर्मणि ॥ २ ॥
घटिकालाबुशृंगं च जांबवोष्ठादिकानि च।

शरीराच्या निरनिराळ्या अंगांस बाधा करणारीं निरनिराळ्या प्रकारचीं शल्यें काढून टाकणें; मूळव्याध, भगंदर वगैरे रोग पाहणें; शस्त्रकर्म, क्षारकर्म व अग्निकर्म हीं करतांना इतर अंगाचें रक्षण करणें; आणि बस्ति, नस्य वगैरे कर्में करणें; या कामीं साधनभूत जे जे पदार्थ ते; व वाटी, तुंबडी, शिंग व जांबवोष्ठादिक पदार्थ या सर्वांस यंत्र असें म्हणतात.

अनेकरूपकार्याणि यंत्राणि विविधान्यतः ॥ ३ ॥
विकल्प्य कल्पयेद् बुद्ध्या यथास्थूलं तु वक्ष्यते।

निरनिराळे आकार व उपयोग यांवरून यंत्रें अनेक प्रकारचीं आहेत. तीं अभीष्ट कार्याच्या अनुरोधानें तयार करावीं. या ठिकाणीं फक्त त्यांचें स्थूल मानानें वर्णन केलें आहे.

तुल्यानि कंकसिंहर्क्षकाकादिमृगपक्षिणाम् ॥ ४ ॥
मुखैर्मुखानि यंत्राणां कुर्यात्तत्संज्ञकानि च।

कंक ( पक्षी ), सिंह, आस्वल, कावळा वगैरे पशुपक्ष्यांच्या तोंडासारख्या तोंडाचीं यंत्रें तयार करून त्यांस त्या त्या पशुपक्ष्यावरून कंकमुख, सिंहमुख इत्यादि नांवें द्यावीं.

अष्टादशांगुलायामान्यायसानि च भूरिशः ॥ ५ ॥
मसूराकारपर्यंतैः कंठे बद्धानि कीलकैः।
विद्यात्स्वस्तिकयंत्राणि मूलेऽकुशनतानि च ॥ ६ ॥
तैर्दृढैरास्थिसंलग्नशल्याहरणमिष्यते।

स्वस्तिक यंत्रें बहुधा लोहाचीं असून त्यांची लांबी अठरा बोटें असते. त्याचे सांधे मसुरेच्या डाळीएवढ्या घेराच्या खिळ्यांनीं जोडलेले असून त्यांचा मूळभाग ( हातांत धरावयाची जागा )

अंकुशाप्रमाणें वांकलेला असतो. या मजबूत यंत्रांनीं हाडांतील शल्य काढून टाकावें.

कीलबद्धाविमुक्ताग्रौ संदंशौ षोडशांगुलौ ॥ ७ ॥
त्वक्‌शिरास्नायुपिशितलग्नशल्यापकर्षणौ ।

सांडस खिळ्यांनीं जोडलेले व खुले असे दोन प्रकारचे असतात. ते सोळा बोटें लांब असून चामडी, शिरा, स्नायु व मांस यांतील शल्य काढण्याच्या उपयोगीं पडतात.

षडंगुलोऽन्यो हरणे सूक्ष्मशल्योपपक्ष्मणाम् ॥ ८ ॥

दुसरा एक सहा बोटें लांबीचा सांडस असतो तो ( नाकांतील केंसासारखीं ) सूक्ष्मशल्यें व पडकेंस काढण्याच्या उपयोगी आहे.

मुचुंडी सूक्ष्मदंतर्जुर्मूले रुचकभूषणा ।
गंभीरव्रणमांसानाममर्मणः शेषितस्य च ॥ ९ ॥

मुचुंडी नांवाचें एक यंत्र आहे. तें सरळ असून त्यास बारीक दांते असतात आणि त्यांच्या मुळांत एक वळें बसविलेलें असतें. यानें खोल जखमेंतील व बुबुळावर वाढलेलें मांस कापून टाक-ल्यानंतर शिल्लक राहिलेलें मांस काढतां येतें.

द्वे द्वादशांगुले मत्स्यतालवद् ध्येकतालके ।
तालयंत्रे स्मृते कर्णनाडीशल्यापहारिणी ॥ १० ॥

एकतालक व द्वितालक अशीं दोन तालयंत्रें आहेत. तीं बारा बोटें लांब असून आकारानें—एक तालक एका बाजूनें व द्विता-लक दोन्ही बाजूंनीं—माशाच्या खवल्याप्रमाणें असतें. हीं यंत्रें कानांतील शल्य काढण्याच्या उपयोगाचीं आहेत.

नाडीयंत्राणि शुषिराण्येकानेकमुखानि च ।
स्रोतोगतानां शल्यानामामयानां च दर्शने ॥ ११ ॥
क्रियाणां सुकरत्वाय कुर्यादाचूषणाय च ।
तद्विस्तारपरीणाहदैर्घ्यं स्रोतोनुरोधतः ॥ १२ ॥

नाडीयंत्रें पोकळ, आणि एक किंवा अनेक मुखांचीं असून तीं स्रोतांतील शल्यें किंवा रोग पाहण्याकरितां, शस्त्रक्षारादि कर्मांच्या सोईकारितां, किंवा विषदग्ध अंगांतील विष चोखून काढण्याकरितां तयार करतात. त्यांची लांबी, रुंदी व परिघ, हीं त्या त्या स्रोतांच्या मानानें असावीं.

दशांगुलार्धनाहांतः कंठशल्यावलोकने ।
नाडी

गळ्यांतील शल्य पाहण्याकरितां दहा बोटें लांबीचें व पांच बोटें घेराचें नाडीयंत्र करावें.

पंचमुखच्छिद्रा चतुष्कर्णस्य संग्रहे ॥ १३ ॥
वारंगस्य द्विकर्णस्य त्रिच्छिद्रा तत्प्रमाणतः ।

चतुष्कर्ण वारंग धरण्याकरितां पांच तोंडाचें आणि द्विकर्ण वारंग धरण्याकरितां तीन तोंडाचें नाडीयंत्र करावें. त्याचें प्रमाण वारंगाच्या प्रमाणाइतकें असावें.

वारंगकर्णसंस्थानानाहदैर्घ्यानुरोधतः ॥ १४ ॥
नाडीरेवंविधाश्चान्या द्रष्टुं शल्यानि कारयेत् ।

शल्यें पाहण्याकरितां अशाच प्रकारच्या ज्या इतर नाड्या करणें त्यांचा आकार, परिघ व लांबी हीं वारंगाच्या टोंकांस अनुलक्षून केलेलीं असावीं.

पद्मकर्णिकया मूर्ध्नि सदृशी द्वादशांगुला ॥ १५ ॥
चतुर्थसुषिरा नाडी शल्यनिर्घातिनी मता ।

शल्यनिर्घातिनी नांवाची नाडी बारा बोटें लांब असून तिच्या एक चतुर्थांश भागांत छिद्रें असतात आणि तिचें वरचें टोंक कमळांतील गर्भकोशाप्रमाणें असतें.

अर्शसां गोस्तनाकारं यंत्रकं चतुरंगुलम् ॥ १६ ॥
नाहे पंचांगुलं पुंसां प्रमदानां षडंगुलम् ।
द्विच्छिद्रं दर्शने व्याधेरेकच्छिद्रं तु कर्मणि ॥ १७ ॥
मध्येऽस्य त्र्यंगुलं छिद्रमंगुष्ठोदरविस्तृतम् ।
अर्धांगुलोच्छ्रितोवृत्तकर्णिकं तु तदूर्ध्वतः ॥ १८ ॥

अर्शोयंत्र गाईच्या स्तनासारखें व चार बोटें लांबीचें असतें. तें पुरुषांकरितां असल्यास त्याचा परिघ पांच बोटें व बायकांकरितां असल्यास सहा बोटें असतो. मूळव्याध पाहण्याकरितां जें यंत्र असतें, त्याच्या दोहों बाजूस आरपार भोंक असतें; आणि शस्त्र, क्षारादि क्रिया करतांना ज्याचा उपयोग करावयाचा असतो, त्याच्या एका

१ बाण वगैरे शल्याचा दांडा, कोयता, चाकू, यांचें मुठींत अडकविण्याकरितां जें निमुळतें टोंक असतें व ज्यास चार फांटे असतात, त्यास चतुष्कर्ण म्हणतात.

बाजूसच छिद्र असतें. या यंत्राच्या मधोमध एक तीन बोटें लांबीचें व आंगठ्याच्या रुंदीचें छिद्र असतें, आणि वरच्या टोंकास एक अर्ध अंगुळ रुंद व तितकाच उंच कांठ असतो.

शम्याख्यं तादृगाच्छिद्रं यंत्रमर्शःप्रपीडनम् ।

शमीयंत्र नांवाचें मूळव्याधीचे मोड दाबण्याचें जें यंत्र असतें, तें वरीलप्रमाणेंच असून त्यास छिद्र मात्र नसतें.

सर्वथापनयेदोष्ठं छिद्रादूर्ध्वं भगंदरे ॥ १९ ॥

अर्शोयंत्रांत छिद्राच्या वरची कड कमी केली म्हणजे भगंदर यंत्र होतें.

घ्राणार्बुदार्शसामेकच्छिद्रा नाड्यंगुलद्वया ।
प्रदेशिनीपरीणाहा स्याद्भगंदरयंत्रवत् ॥ २० ॥

नांकांतील अर्बुद व मोड यांकरितां जी नाडी करितात, ती दोन बोटें लांब असून तीस एका बाजूनेंच भोंक असतें. हें यंत्र भगंदरयंत्राप्रमाणेंच असून याची जाडी आंगठ्याशेजारच्या बोटाएवढी असते.

अंगुलित्राणकं दांतं वार्क्षं वा चतुरंगुलम् ।
द्विच्छिद्रं गोस्तनाकारं तद्वक्त्रविवृतौ सुखम् ॥ २१ ॥

अंगुलित्राणक यंत्र हस्तिदंताचें किंवा लांकडाचें, चार बोटें लांबीचें, दोन छिद्रांचें व गोस्तनासारखें असतें. याच्या योगानें दांतखिळी बसली असतां तोंड सहजीं उघडतां येतें.

योनिव्रणेक्षणं मध्ये सुषिरं षोडशांगुलम् ।
मुद्राबद्धं चतुर्भित्तमंभोजमुकुलाननम् ॥ २२ ॥
चतुःशलाकमाक्रांतं मूले तद्विकसेन्मुखे ।

योनिव्रणेक्षण ( योनींतील व्रण पाहण्याचें ) यंत्र सोळा बोटें लांब मध्यें पोकळ, चार पाकळ्यांचें, कमळाच्या कळीसारख्या तोंडाचें व चार शलाकायुक्त असून त्यास खालींवर होणारी एक कडी बसविलेली असते. ती मुळांत दाबली असतां यंत्राचें तोंड उघडतें.

यंत्रे नाडीव्रणाभ्यंगक्षालनाय षडंगुले ॥ २३ ॥
बस्तियंत्राकृती मूले मुखेऽगुष्ठकलायखे ।
अग्रतोऽकर्णिके मूले निबद्धमृदुचर्मणी ॥ २४ ॥

नाडीव्रणांत तेल घालण्याकरितां व तो धुण्याकरितां सहा बोटें लांबीचीं, बस्तियंत्राच्या आकाराचीं, मुळांत आंगठा जाण्याजोगें व तोंडाशीं वाटाण्याएवढें छिद्र असलेलीं, टोंकाकडे कर्णिकारहित आणि मुळांत मऊ चामड्याचे फुगे जोडलेलीं, अशीं यंत्रें करावीं.

**द्विद्वारा नलिका पिच्छनलिका चोदकोदरे ।**

जलोदरांत पाणी काढण्याकरितां दोन तोंडांची नळी असावी. मोराच्या पिसाची नळी असली तरी चालेल.

**धूमबस्त्यादियंत्राणि निर्दिष्टानि यथायथम् ॥ २५ ॥**

धूमयंत्र, बस्तियंत्र वगैरे यंत्रांचें वर्णन त्या त्या अध्यायांत केलें आहे.

**त्र्यंगुलास्यं भवेच्छृंगं चूषणेऽष्टादशांगुलम् ।**
**अग्रे सिद्धार्थकच्छिद्रं सुनद्धं चूचुकाकृति ॥ २६ ॥**

( दूषित रक्त, विष वगैरे ) ओढून घेण्याकरितां जें शिंग करावयाचें, त्याची लांबी अठरा बोटें असून तोंडाचा घेर तीन बोटें असावा. त्याच्या अग्रभागीं शिरसाचा दाणा जाण्याजोगें एक छिद्र असून त्यावर स्त्रियांच्या स्तनाच्या अग्राप्रमाणें चांगलें गुळगुळीत टोपण बसवावें.

**स्याद्द्वादशांगुलोऽलाबुर्नाहे त्वष्टादशांगुलः ।**
**चतुस्त्र्यंगुलवृत्तास्यो दीप्तोंऽतः श्लेष्मरक्तहृत् ॥ २७ ॥**

तुंबडीची लांबी बारा बोटें, घेर अठरा बोटें, तोंड वाटोळें व तीन चार बोटें घेराचें असावें. तींत कापूस वगैरे पदार्थ भरून पेटविले असतां ती कफदूषित रक्त ओढून घेते.

**तद्वद् घटी हिता गुल्मविलयोन्नमने च सा ।**

घटीयंत्राची आकृति, क्रिया वगैरे सर्व तुंबडीसारखींच असून शिवाय तें गुल्म वितळविण्याच्या व वर उचलण्याच्या कामीं येतें.

**शलाकाख्यानि यंत्राणि नानाकर्माकृतीनि च ॥ २८ ॥**
**यथायोगप्रमाणानि**

शलाकायंत्रांचीं कर्में व आकार बहुविध असून त्यांचें प्रमाण त्या त्या कर्मानुरूप असतें.

तेषामेषणकर्मणी ।

उभे गंडूपदमुखे

त्यांपैकीं दोहोंचीं तोंडें गांडुळाप्रमाणें असून नाडीव्रणाची गति शोधण्याच्या कामीं त्यांचा उपयोग होतो.

स्रोतोभ्यः शल्यहारिणी ॥ २९ ॥

मसूरदलवक्त्रे द्वे स्यातामष्टनवांगुले ।

स्रोतांतील शल्य काढणाऱ्या ज्या दोन सळया आहेत, त्यांची लांबी आठ किंवा नऊ बोटें असून त्यांचीं तोंडें मसुराच्या डाळीप्रमाणें असतात.

शंकवः षट्

शंकु सहा आहेत.

उभौ तेषां षोडशद्वादशांगुलौ ॥ ३० ॥

व्यूहनेऽहिफणावक्त्रौ

त्यांपैकीं दोन शंकु सोळा व बारा बोटें लांब असून त्यांचीं तोंडें सर्पाच्या फणेसारखीं असतात. ते शल्यादिक इष्ट दिशेकडे वळविण्यास उपयोगीं पडतात.

द्वौ दशद्वादशांगुलौ ।

चालने शरपुंखास्यौ

दोन शंकु दहा व बारा बोटें लांबीचे असून त्यांचीं तोंडें बाणाच्या पिसाऱ्याप्रमाणें असतात. ते शल्यादिक चाळविण्यास उपयोगीं पडतात.

आहार्ये बडिशाकृती ॥ ३१ ॥

दोन शंकु गळाच्या आकाराचे असतात. त्यांच्या योगानें शल्यादिक ओढून काढतां येतें.

नतोऽग्रे शंकुना तुल्यो गर्भशंकुरिति स्मृतः ।
अष्टांगुलायतस्तेन मूढगर्भं हरेत् स्त्रियः ॥ ३२ ॥

अग्रभागीं वांकलेलें व आठ बोटें लांबीचें शंकूच्या आकाराचें एक यंत्र असतें त्यास गर्भशंकु म्हणतात. याच्या योगानें स्त्रियांचा मूढगर्भ काढावा.

अश्मर्याहरणे सर्पफणावद्वक्रमग्रतः ।

मूतखडा काढण्याचें, अग्रभागीं सापाच्या फणेसारखें वांकडें एक यंत्र आहे, त्यास सर्पफणायंत्र म्हणतात.

शरपुंखमुखं दंतपातनं चतुरंगुलम् ॥ ३३ ॥

शरपुंखमुख नांवाचें एक चार बोटें लांबीचें यंत्र असतें. त्यानें दांत उपटून काढले जातात. याचें तोंड बाणाच्या पिसारा लावलेल्या भागासारखें असतें.

कार्पासविहितोष्णीषाः शलाकाः षट् प्रमार्जने।
पायावासन्नदूरार्थे द्वे दशद्वादशांगुले ॥ ३४ ॥
द्वे षट्सप्तांगुले घ्राणे द्वे कर्णेऽष्टनवांगुले।

क्षारक्लेदादिक पुसून काढण्याकरितां सहा सळया असतात. त्यांच्या टोंकास कापूस गुंडाळलेला असतो. गुदसंबंधीं जवळची किंवा लांबीची क्रिया करण्याकरितां अनुक्रमें दहा व बारा बोटें लांबीच्या दोन सळया असतात. नाकासंबंधीं जवळची किंवा दूरची क्रिया करण्याकरितां सहा किंवा सात बोटें लांबीच्या दोन सळया असतात. कानासंबंधीं जवळच्या व दूरच्या क्रियेंत उपयोगीं पडणाऱ्या आठ व नऊ बोटें लांबीच्या दोन सळया असतात.

कर्णशोधनमश्वत्थपत्रप्रांतं स्रुवाननम् ॥ ३५ ॥

कर्णशोधन यंत्राच्या कडा पिंपळाच्या पानासारख्या असून तोंड होमाच्या चमच्यासारखें असतें.

शलाकाजांबवोष्ठानां क्षारेऽग्नौ च पृथक् त्रयम्।
युंज्यात् स्थूलाणुदीर्घाणाम्

क्षार लावण्यासाठीं जाड, बारीक व लांब अशा तीन सळया व डाग देण्यासाठीं तशाच प्रकारचे तीन जांबवोष्ठ म्हणजे जांभळाच्या आकाराचे खिळे असतात; त्यांचा यथायोग्य उपयोग करावा.

शलाकामंत्रवर्ध्मनि ॥ ३५ ॥
मध्योर्ध्ववृत्तदंडां च मूले चार्धेंदुसंनिभाम्।

अंतर्गळांत ज्या सळईचा उपयोग करितात, ती मुळांत अर्धचन्द्राकार असून तिचा दांडा मध्यभागाच्या वर वाटोळा असतो.

कोलास्थिदलतुल्यास्या नासार्शोऽर्बुददाहकृत् ॥ ३७ ॥

नाकांतील मोड व अर्बुद भाजण्याकरितां बोराच्या बीच्या डाळिंबीसारख्या तोंडाच्या सळईचा उपयोग करतात.

अष्टांगुला निम्नमुखास्तिस्रः क्षारौषधक्रमे ।
कनीनिमध्यमानामिनखमानसमैर्मुखैः ॥ ३८ ॥

क्षार वगैरे लावण्याकरितां आठ बोटें लांबीच्या, खोलगट तोंडाच्या तीन सळया असतात. त्यांचीं तोंडें करांगळी, तिच्या शेजारचें बोट व मधलें बोट यांच्या नखांएवढीं असावीं.

स्वंस्वमुक्तानि यंत्राणि मेढ्रशुद्ध्यंजनादिषु ।

उत्तरबस्ति, अंजन वगैरे कर्मांच्या उपयोगीं पडणारीं यंत्रें त्या त्या प्रकरणांत वर्णिलीं आहेत.

अनुयंत्राण्ययस्कांतरज्जुवस्त्राश्ममुद्गराः ।
वध्रांत्रजिह्वाबालाश्च शाखानखमुखद्विजाः ॥ ३९ ॥
कालः पाकः करः पादौ भयं हर्षश्च तत्क्रियाः ।
उपायवित्प्रविभजेदालोच्य निपुणं धिया ॥ ४० ॥

लोहचुंबक, दोरी, वस्त्र, दगड, मुद्गर, चामड्याची वादी, आंतडीं, जीभ, केंस, शाखा, नखें, तोंड, दांत, काळ, पचन किंवा पिकणें, हात, पाय, भय व हर्ष हीं १९ अनुयंत्रें आहेत. यांचीं निरनिराळीं कर्में विचारपूर्वक पाहून तदनुसार शहाणपणानें त्यांची यथायोग्य योजना करावी.

निर्घातनोन्मथनपूरणमार्गशुद्धिसंव्यूहनाहरणबंधनपीडनानि ।
आचूषणोन्नमननामनचालभंगव्यावर्तनर्जुकरणानि च यंत्रकर्म ४१

ताडन करणें, घुसळणें, भरणें, मार्गशुद्धि करणें, इष्ट जागीं नेणें, काढून टाकणें, बांधणें, दाबणें, चोखणें किंवा ओढून घेणें, वर उचलणें, खालीं बसविणें, चाळवणें, मोडणें, बदल करणें व सरळ करणें हीं यंत्रांचीं कामें आहेत.

निवर्तते साध्ववगाहते च ग्राह्यं गृहीत्वोद्धरते च यस्मात् ।
यंत्रेष्वतः कंकमुखं प्रधानं स्थानेषु सर्वेष्वधिकारि यच्च ॥ ४२ ॥

कंकमुख यंत्र सुखानें आंत जातें व बाहेर येतें, ज्या शल्यादिकांस धरावयाचें असेल त्यांस धरून बाहेर काढितें, आणि सर्वत्र त्याचा उपयोग करितां येतो. म्हणून सर्व यंत्रांत कंकमुख यंत्र श्रेष्ठ आहे.

# अध्याय सव्विसावा.

अथातः शस्त्रविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां शस्त्रविधि सांगतों.

षड्विंशतिः सुकर्मारैर्घटितानि यथाविधि ।
शस्त्राणि रोमवाहीनि बाहुल्येनांगुलानि षट् ॥ १ ॥
सुरूपाणि सुधाराणि सुग्रहाणि च कारयेत् ।
अकरालानि सुध्मातसुतीक्ष्णावर्तितेऽयसि ॥ २ ॥
समाहितमुखाग्राणि नीलांभोजच्छवीनि च ।
नामानुगतरूपाणि सदा सन्निहितानि च ॥ ३ ॥
स्वोन्मानार्धचतुर्थांशफलान्येकैकशोऽपि च ।
प्रायो द्वित्राणि युंजीत तानि स्थानविशेषतः ॥ ४ ॥

चांगल्या कुशल लोहाराकडून शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें, केंस काढण्याजोगीं, सुंदर, तीक्ष्ण धारेचीं, धरण्यास सोईस्कर, बहुधा सहा बोटें लांबीचीं व उत्तम पोलादाचीं २६ शस्त्रें तयार करवावीं. तीं दिसण्यांत सौम्य असून त्यांचीं पानें मुठींत घट्ट बसविलेलीं असावीं. पानांस निळ्या कमळाच्या झांकीप्रमाणें धार दिलेली असून त्यांचा आकार नांवाप्रमाणें असावा. पानांचें प्रमाण सबंध शस्त्राच्या लांबीच्या निम्मे किंवा चतुर्थांश असावें. हीं शस्त्रें वैद्यानें सदोदित आपल्या जवळ बाळगून स्थानभेदानुसार प्रायः एक, दोन किंवा तीन वापरावीं.

मंडलाग्रं फले तेषां तर्जन्यंतर्नखाकृति ।
लेखने छेदने योज्यं पोथकीशुंडिकादिषु ॥ ५ ॥

त्यांत मंडलाग्र नांवाचें एक शस्त्र असतें. त्याचें पान आकारानें आंगठ्याशेजारच्या बोटाच्या अन्तर्नखासारखें असतें. याचा खुपऱ्या, पडजीभ वगैरे रोगांत लेखन व छेदन करण्याच्या कामीं उपयोग करावा.

वृद्धिपत्रं क्षुराकारं छेदभेदनपाटने ।
ऋज्वग्रमुन्नते शोफे गंभीरे च तदन्यथा ॥ ६ ॥
नताग्रं पृष्ठतः

वृद्धिपत्र नांवाचें वस्तऱ्याच्या आकाराचें एक शस्त्र आहे. तें जखम कापणें, फोडणें व फाडणें या कामीं येतें. तें चामडीवरील

सुजेवर चालविणें असेल तर त्याचें अग्र सरळ असावें आणि मांसांतलि खोल जखमेकरितां त्याचें अग्र पाठीकडून वांकलेलें असावें.

दीर्घह्रस्ववक्त्रं यथाक्रमम् ।

उत्पलाध्यर्धधाराख्ये छेदने भेदने

कापण्याच्या व फोडण्याच्या उपयोगीं पडणारीं उत्पलपत्र व अध्यर्धधारा अशीं दोन शस्त्रें आहेत. त्यांचीं तोंडें अनुक्रमें लांब व आंखूड असतात.

तथा ॥ ७ ॥

सर्पास्यं घ्राणकर्णार्शश्छेदनेऽर्धांगुलं फले ।

सर्पमुख नांवाचें ( नांवाप्रमाणें आकाराचें ) एक शस्त्र आहे. त्याचें पान अर्ध बोट लांबीचें असतें. त्यानें नाकांतील व कानांतील मोड कापून काढतात.

गतेरन्वेषणे श्लक्ष्णा गंडूपदमुखैषिणी ॥ ८ ॥

व्रणाची गति तपासण्याकरितां गुळगुळीत व गांडुळाच्या तोंडासारख्या तोंडाची एक एषणी–सळई असते.

भेदनार्थेऽपरा सूचीमुखा मूलनिविष्टखा ।

दुसरी एक सळई फोडण्याकरितां असते. तिचें अग्र सुईसारखें असून मुळांत एक भोंक असतें.

वेतसं व्यधने

वेताच्या पानासारखें वेतस नांवाचें एक शस्त्र आहे. त्यानें वेधन करितां येतें.

स्राव्ये शरार्यास्यत्रिकूर्चके ॥ ९ ॥

शरारी-( एक पक्षी ) मुख व त्रिकूर्चक नांवाचीं दोन शस्त्रें आहेत. तीं रक्तस्राव करण्याच्या कामीं उपयोगीं पडतात.

कुशाटीवदने स्राव्ये द्व्यंगुलं स्यात्तयोः फलम् ।

तशींच कुशमुख व आटीमुख हींही रक्तस्रावाच्या उपयोगीं आहेत. यांचीं पातीं दोन बोटें लांबीचीं असतात.

तद्वदंतर्मुखं तस्य फलमध्यर्धमंगुलम् ॥ १० ॥

अर्धचंद्राननं चैतत्तथा

अन्तर्मुख नांवाचें अर्धचंद्राकार मुखाचें एक शस्त्र आहे. त्याचें पातें दीड बोट लांबीचें असतें. हेंही रक्तस्रावाच्याच उपयोगीं पडतें.

अध्यर्धांगुलं फले ।
व्रीहिवक्त्रं प्रयोज्यं च तच्छिरोदरयोर्व्यधे ॥ ११ ॥

व्रीहिमुख नांवाचें एक शस्त्र आहे. त्याचें पान भाताच्या आकाराचें असून तें दीड बोट लांब असतें. हें शिरावेध व उदरवेध यांच्या उपयोगीं आहे.

पृथुः कुठारी गोदंतसदृशार्धांगुलानना ।
तयोर्ध्वदंडया विध्येदुपर्यस्थ्नां स्थितां शिराम् ॥ १२ ॥

कुठारी नांवाचें जें शस्त्र आहे, तें जाड असून त्याचें पान गाईच्या दांतासारखें व अर्ध बोट रुंदीचें असतें. यास दांडा असतो, तो वर उचलून हाडावरील शिरेचा वेध करावा.

ताम्री शलाका द्विमुखी मुखे कुरुवकाकृतिः ।
लिंगनाशं तया विध्येत्

एक दुतोंडी तांब्याची सळई असते. तिचीं दोन्ही तोंडें तांबड्या कोरांटीच्या कळीसारखीं असतात. या शस्त्रानें मोतीबिंदूचें वेधन करावें.

कुर्यादंगुलिशस्त्रकम् ॥ १३ ॥
मुद्रिकानिर्गतमुखं फले त्वर्धांगुलायतम् ।
योगतो वृद्धिपत्रेण मंडलाग्रेण वा समम् ॥ १४ ॥
तत्प्रदेशिन्यग्रपर्वप्रमाणार्पणमुद्रिकम् ।
सूत्रबद्धं गलस्रोतोरोगच्छेदनभेदने ॥ १५ ॥

घशांतील रोग कापण्याकरितां व फोडण्याकरितां अंगुलिशस्त्र असतें. त्याचें पान अर्ध बोट लांब असून, रोग व स्थान याप्रमाणें त्याचा आकार पूर्वोक्त वृद्धिपत्र किंवा मंडलाग्र यांसारखा असावा. तर्जनीच्या पुढल्या पेरांत बसेल एवढें एक वळें बसवून त्यांत तें शस्त्र बसवावें. तें वैद्यानें शस्त्रक्रिया करतांना आपल्या तर्जनींत घालून सुतानें बांधून टाकावें.

ग्रहणे शुंडिकामांदेर्बडिशं सुनताननम् ।

पडजीभ व बुबुळ यांवर वाढलेलें मांस पकडण्याकरितां एक बडिश म्हणजे गळ असतो. त्याचें टोंक अंकुशाप्रमाणें वांकलेलें असतें.

छेदेऽस्थ्नां करपत्रं तु खरधारं दशांगुलम् ॥ १६ ॥
विस्तारे द्व्यंगुलं सूक्ष्मदंतं सुत्सरुबंधनम् ।

हाडें कापण्याकरितां तीक्ष्ण धारेची दहा बोटें लांब व दोन बोटें रुंदीची, बारीक दांतांची व चांगल्या भक्कम मुठीची करवत करावी.

स्नायुसूत्रकचच्छेदे कर्तरी कर्तरीनिभा ॥ १७ ॥

स्नायु, सुतें व केंस कापण्यासाठीं सामान्य कातरीसारखी कातर करावी.

वक्रर्जुधारं द्विमुखं नखशस्त्रं नवांगुलम् ।
सूक्ष्मशल्योद्धृतिच्छेदभेदप्रच्छानलेखने ॥ १८ ॥

नखशस्त्र नांवाचें नऊ बोटें लांबीचें एक दुतोंडी शस्त्र असतें. त्याच्या एका टोंकास वांकडी व दुसऱ्या टोंकास सरळ धार असते. हें शस्त्र सूक्ष्म शल्यें काढणें, फोडणें, रक्त काढणें व खरवडणें या कामीं उपयोगीं पडतें.

एकधारं चतुष्कोणं प्रबद्धाकृति चैकतः ।
दंतलेखनकं तेन शोधयेद्दंतशर्कराम् ॥ १९ ॥

दंतलेखनक नांवाचें एक चौकोनी शस्त्र असतें. त्याच्या एका बाजूस धार असते व एक बाजू बोंथट असते. यानें दांतांवर जमणाऱ्या मळाच्या खपल्या खरवडून काढाव्या.

वृत्ता गूढदृढाः पाशे तिस्रः सूच्योऽत्र सीवने ।
मांसलानां प्रदेशानां त्र्यस्रा त्र्यंगुलमायता ॥ २० ॥
अल्पमांसाऽस्थिसंधिस्थव्रणानां द्व्यंगुलायता ।
व्रीहिवक्त्रा धनुर्वक्रा पक्वामाशयमर्मसु ॥ २१ ॥
सा सार्धद्व्यंगुला

जखमा शिवण्याकरितां वाटोळ्या, मजबूत आणि लांब नेढ्याच्या तीन सुया असाव्या. मांसल भागावरील जखमा शिवण्याकरितां तीन धारेची व तीन बोटें लांबीची सुई घ्यावी. थोडें मांस असलेल्या जागेवरील, हाडांवरील व सांध्यांवरील जखमा शिवण्याकरितां दोन बोटें लांबीची सुई घ्यावी. पक्वाशय, आमाशय व मर्मस्थानें यांतील जखमा शिवण्याकरितां अडीच बोटें लांबीची भातासारख्या टोंकाची व धनुष्याप्रमाणें वांकलेली सुई असावी

सर्ववृत्तास्ताश्चतुरंगुलाः ।
कूर्चौ वृत्तैकपीठस्थाः सप्ताऽष्टौ वा सुबंधनाः ॥ २२ ॥
संयोज्यो नीलिकाव्यंगकेशशातनकुट्टने ।

चार बोटें लांबीच्या व वाटोळ्या अशा सात किंवा आठ सुया घेऊन त्या सर्व एका वाटोळ्या बुडाच्या मुठींत गच्च बसवाव्या. यास कूर्च म्हणतात. याचा नीलिका, वांग व चाई यांवर गोंदण्या-कडे उपयोग करितात.

अर्धांगुलैर्मुखैर्वृत्तैरष्टाभिः कंटकैः खजः ॥ २३ ॥
पाणिभ्यां मथ्यमानेन घ्राणात्तेन हरेदसृक् ।

एक रवी असते. तिला अर्ध अर्ध बोट लांबीचे वाटोळे कांटे असतात. ही रवी नाकांत घालून हातानें घुसळून रक्त काढावें.

व्यधने कर्णपालीनां यूथिका मुकुलानना ॥ २४ ॥

कानाच्या पाळी टोंचण्याकरितां एक यूथिका नामक शस्त्र असतें. त्याचें तोंड जुईच्या कळीसारखें असतें.

आराऽर्धांगुलवृत्तास्या तत्प्रवेशा तथोर्ध्वतः ।
चतुरस्रा तया विध्येच्छोफं पक्कामसंशये ॥ २५ ॥
कर्णपालीं च बहुलाम्

आरा नांवाच्या शस्त्राचा टोंकाकडचा अर्ध बोट भाग वाटोळा असून बाकीचा चौकोनी असावा. सूज पिकली आहे कीं अपक्क आहे, हें पहाण्यासाठीं या शस्त्रानें टोंचावें. या यंत्रानें जाड कर्णपाळीचेंही वेधन करावें.

बहुलायाश्च शस्यते ।
सूची त्रिभागसुषिरा त्र्यंगुला कर्णवेधनी ॥ २६ ॥

जाड कर्णपाळीचा वेध करण्याकरितां एक तीन बोटें लांबीची कर्णवेधनी नामक सुई करावी. तिचा पुढील तीन चतुर्थांश भाग पोकळ असावा.

जलौकःक्षारदहनकाचोपलनखादयः ।
अलौहान्यनुशस्त्राणि तान्येवं च विकल्पयेत् ॥ २७ ॥
अपराण्यपि यंत्रादीन्युपयोगं च यौगिकम् ।

जळवा, क्षार, अग्नि, कांच, दगड, नखें वगैरे लोखंडाशिवाय होणारीं अनुशस्त्रें व इतर यंत्रें वगैरे अभीष्ट कार्याच्या अनुरोधानें करून त्यांचा यथायोग्य उपयोग करावा.

उत्पाट्यपाट्यसीव्यैषलेख्यप्रच्छन्नकुट्टनम् ॥ २८ ॥
छेद्यं भेद्यं व्यधो मंथो ग्रहो दाहश्च तत्क्रियाः ।

उपटणें, फाडणें, शिवणें, गति तपासणें, खरवडणें, रक्तस्राव करणें, गोंदणें, कापणें, फोडणें, टोंचणें, घुसळणें, धरणें व जाळणें हीं शस्त्रांचीं कार्यें होत.

कुंठखंडतनुस्थूलह्रस्वदीर्घत्ववक्रताः ॥ २९ ॥
शस्त्राणां खरधारत्वमष्टौ दोषाः प्रकीर्तिताः ।

बोंथटपणा, खांड, पातळपणा, जाडपणा, आंखूडपणा, लांबटपणा, वांकडेपणा व फार तीक्ष्ण धार हे शस्त्रांचे आठ दोष आहेत.

छेदभेदनलेख्यार्थं शस्त्रं वृंतफलांतरे ॥ ३० ॥
तर्जनीमध्यमांगुष्ठैर्गृह्णीयात्सुसमाहितः ।

कापणें, फोडणें व खरवडणें या क्रिया करतांना वैद्यानें एकाग्र चित्तानें तर्जनी, मधलें बोट व आंगठा या तीन बोटांनीं मूठ व पान यांच्या मधोमध शस्त्र धरावें.

विस्रावणानि वृंताग्रे तर्जन्यंगुष्ठकेन च ॥ ३१ ॥

रक्ताचा स्राव करणारीं शस्त्रें तर्जनी व आंगठा या दोन बोटांनीं मुठीच्या टोंकाजवळ धरावीं.

तलप्रच्छन्नवृन्ताग्रं ग्राह्यं व्रीहिमुखं मुखे ।

व्रीहिमुख शस्त्राची मूठ तळहातांत झांकली जाईल अशा रीतीनें तें तोंडाजवळ धरावें.

मूलेऽप्याहरणार्थं तु क्रियासौकर्यतोऽपरम् ॥ ३२ ॥

शल्य वगैरे काढतांना मुळाजवळ शस्त्र धरावें. इतर क्रियांत जसें सोयीचें पडेल तसें तें धरावें.

स्यान्नवांगुलविस्तारः सुघनो द्वादशांगुलः ।
क्षौमपत्रोर्णकौशेयदुकूलमृदुचर्मजः ॥ ३३ ॥
विन्यस्तपाशः सुस्यूतः सांतरोर्णास्थशस्त्रकः ।
शलाकापिहितास्यश्च शस्त्रकोशः सुसंचयः ॥ ३४ ॥

शस्त्रें ठेवण्याची पिशवी ( शस्त्रकोश ) जाड, नऊ बोटें रुंद, बारा बोटे लांब; ताग, धुतलेलें रेशमी कापड, किंवा इतर रेशमी वस्त्र अथवा मऊ चामडें यांची केलेली व उत्तम प्रकारें शिवलेली असावी. ती टांगण्यासाठीं तोंडापाशीं एक दोरी लावून आंत लोंकर घालून प्रत्येक शस्त्राकरितां निरनिराळा खण केलेला असावा. आणि सर्व

शस्त्रें व्यवस्थित राहतील अशी सोय असावी. या पिशवीचें तोंड बंद करण्याकारितां वर एक कडी लावलेली असावी.

जलौकसस्तु सुखिनां रक्तस्रावाय योजयेत् ॥ ३५ ॥

ज्यांस दुःख सहन होत नसेल त्यांचें रक्त जळवा लावून काढवावें.

दुष्टांबुमत्स्यभेकाहिशवकोथमलोद्भवाः ।
रक्ताः श्वेता भृशं कृष्णाश्चपलाः स्थूलपिच्छिलाः ॥ ३६ ॥
इंद्रायुधविचित्रोर्ध्वराजयो रोमशाश्च ताः ।
सविषा वर्जयेत्

नासलेल्या पाण्यांत झालेल्या; मासे, बेडूक व सर्प यांचीं प्रेतें व मल कुसून नासलेल्या पाण्यांत झालेल्या, तांबड्या, पांढऱ्या, अत्यंत काळ्या, चपल, लठ्ठ, बुळबुळीत, अंगावर केंस व इंद्रधनुष्याप्रमाणें चित्रविचित्र रंगाच्या रेघा असलेल्या जळवा विषारी समजून घेऊं नयेत.

ताभिः कंडूपाकज्वरभ्रमाः ॥ ३७ ॥
विषपित्तास्रनुत्कार्यं तत्र

विषारी जळवा लावल्यानें कंड सुटतो, जखम पिकते आणि ज्वर व भोंवळ येते. या विकारांवर विषहारक व रक्तपित्तनाशक चिकित्सा करावी.

शुद्धांबुजाः पुनः ।
निर्विषाः शैवलश्यावा वृत्ता नीलोर्ध्वराजयः ॥ ३८ ॥
कषायपृष्ठास्तन्वंग्यः किंचित्पीतोदराश्च याः ।

ज्या जळवा शुद्ध पाण्यांत झालेल्या, शेवाळीप्रमाणें हिरवट व सांवळ्या रंगाच्या, वाटोळ्या असून ज्यांच्या अंगावर निळ्या रंगाच्या व उभ्या रेघा असतात, ज्यांची पाठ भुरकट रंगाची असते, आणि पोट किंचित् पिवळें असतें व ज्या बारीक असतात त्या निर्विष समजाव्या.

ता अप्यसम्यग्वमनात्प्रततं च निपातनात् ॥ ३९ ॥
सीदंतीः सलिलं प्राप्य रक्तमत्ता इति त्यजेत् ।

निर्विष जळवा देखील चांगल्या रीतीनें न पिळल्यामुळें व वरचे-

वर फार वेळ लावल्यामुळें रक्तमत्त होतात. अशा जळवा लावूं नयेत. या पाण्यांत टाकल्या असतां मूर्छित होतात.

अथेतरा निशाकल्कयुक्तेऽम्भसि परिप्लुताः ॥ ४० ॥
अवंतिसोमे तक्रे वा पुनश्चाऽश्वासिता जले ।
लागयेद्घृतमृत्सांगशस्त्ररक्तनिपातनैः ॥ ४१ ॥
पिबंतीरुन्नतस्कंधाश्छादयेन्मृदुवाससा ।

या प्रमाणें निर्विष जळवा घेऊन त्या हळद वाटून कालविलेल्या पाण्यांत, कांजीत किंवा ताकांत घालाव्या. नंतर त्यांतून काढून पुन्हा पाण्यांत घालाव्या. त्यांत त्या चांगल्या हुशार झाल्या म्हणजे लावावयाच्या ठिकाणीं तूप, किंवा माती लावून शस्त्रानें किंचित् रक्त काढून त्यावर त्या डसवाव्या. त्या रक्त पिऊं लागल्या म्हणजे त्यांचा पुढचा भाग वर उचललेला दिसूं लागतो. त्यावेळीं त्यांवर बारीकसें फडकें घालावें.

संपृक्ताद्दुष्टशुद्धास्राज्जलौका दुष्टशोणितम् ॥ ४२ ॥
आदत्ते प्रथमं हंसः क्षीरं क्षीरोदकादिव ।

दुग्धमिश्रित पाण्यांतून हंस जसें अगोदर दूध पिऊन घेतो, तसेंच जळू शुद्ध व दूषित रक्ताच्या मिश्रणांतून प्रथम दूषित रक्तच पिऊन घेते.

दंशस्य तोदे कंड्वां वा मोक्षयेद्वामयेच्च ताम् ॥ ४३ ॥
पटुतैलाक्तवदनां श्लक्ष्णकंडनरूक्षिताम् ।

जळू लावलेल्या ठिकाणीं टोंचण अथवा खाज उत्पन्न झाल्यास एकेक जळू सोडवावी, आणि तोंडास मीठ व तेल लावून आणि अंगास तांदळाचा बारीक कोंडा फांसून रूक्ष करून पिळावी.

रक्षन् रक्तमदाद्भूयः सप्ताहं ता न पातयेत् ॥ ४४ ॥

जळवा रक्तानें मत्त होऊं नयेत म्हणून त्या एक आठवडापर्यंत पुन्हा लावूं नयेत.

पूर्ववत् पटुता दार्ढ्यं सम्यग्वांते जलौकसाम् ।

जळवा पिळून काढल्या म्हणजे पुन्हा पहिल्याप्रमाणें हुशार व बळकट होतात.

क्लमोऽतियोगान्मृत्युर्वा

त्या अतिशय पिळल्या असतां गळल्यासारख्या होतात किंवा मरतात.

दुर्वांते स्तब्धता मदः ॥ ४९ ॥

नीट रीतीनें न पिळल्यास ताठून उन्मत्त होतात.

अन्यत्राऽन्यत्र ताः स्थाप्या घटे मृत्स्नांबुगर्भिणि ।
लालादिकोथनाशार्थं सविषाः स्युस्तदन्वयात् ॥ ४५ ॥

त्यांस निरनिराळ्या मडक्यांत माती व पाणी घालून ठेवावें. एके ठिकाणीं पुष्कळशा ठेवल्यास त्यांची लाळ, मळमूत्रादिक कुजून त्यायोगानें त्या विषारी होतात.

अशुद्धौ स्रावयेद्दंशान् हरिद्रागुडमाक्षिकैः ।

अशुद्ध रक्ताचा यथायोग्य स्राव न झाल्यास व्रणावर हळद, गूळ व मध हीं एकत्र करून लावावीं. म्हणजे राहिलेलें नासकें रक्त वाहून जातें.

शतधौताज्यपिचवस्ततो लेपाश्च शीतलाः ॥ ४७ ॥

मग शतधौत तुपांत कापसाचा बोळा भिजवून तो दंशावर ठेवावा. तसेच शीतळ लेप लावावे.

दुष्टरक्तापगमनात्सद्यो रोगरुजां शमः ।

नासकें रक्त वाहून गेलें म्हणजे रोग व ठणका तावडतोब बंद होतो.

अशुद्धं चालितं स्थानात्स्थितं रक्तं व्रणाशये ॥ ४८ ॥
अम्लीभवेत्पर्युषितं तस्मात्तत्स्रावयेत्पुनः ।

स्वस्थानापासून निघालेलें अशुद्ध रक्त व्रणस्थानांत राहून दुसऱ्या दिवशीं शिळें होऊन पिकूं लागतें. म्हणून तें रक्त दुसऱ्या दिवशीं पुनः काढवावें.

युंज्यान्नालाबुघटिका रक्ते पित्तेन दूषिते ॥ ४९ ॥
तासामनलसंयोगात् युंज्याच्च कफवायुना ।

पित्तानें दूषित झालेलें रक्त अलाबूनें किंवा घटीयंत्रानें काढूं नये. कारण त्यांत अग्नीचा संयोग असतो. कफवायूच्या योगानें दूषित झालेलें रक्त अलाबु व घटिका यांनीं काढावें.

कफेन दुष्टं रुधिरं न शृंगेण विनिर्हरेत् ॥ ५० ॥
स्कन्नत्वाद्वातपित्ताभ्यां दुष्टं शृंगेण निर्हरेत् ।

कफानें दूषित झालेलें रक्त दाट असल्यामुळें तुंबडीनें काढूं नये. वायु व पित्त यांनीं दूषित झालेलें रक्त तुंबडी लावून काढावें.

गात्रं बद्ध्वोपरि दृढं रज्ज्वा पट्टेन वा समम् ॥ ५१ ॥
स्नायुसंध्यस्थिमर्माणि त्यजन् प्रच्छानमाचरन् ।
अधोदेशप्रविसृतैः पदैरुपरिगामिभिः ॥ ५२ ॥
न गाढघनतिर्यग्भिर्न पदे पदमाचरेत् ।

ज्या भागाचें रक्त काढावयाचें त्याच्या वरील भाग दोरीनें अथवा पट्टीनें सारखा बांधून, स्नायु, सांधे, हाडें व मर्मस्थानें यांस सोडून खालून वर क्रमाक्रमानें करीत फांसण्या मारीत जावें. फांसण्या फार खोल, जवळजवळ, वांकड्या व एकावर एक अशा असूं नयेत.

प्रच्छानेनैकदेशस्थं ग्रथितं जलजन्मभिः ॥ ५३ ॥
हरेच्छृंगादिभिः सुप्तमसृग्व्यापि शिराव्यधैः ।

एका जागीं जमलेलें रक्त फांसण्यांनीं काढावें; गोठलेलें जळवांनीं काढावें; अभिसरण न पावणारें रक्त शृंगादिकांनीं काढावें, आणि सर्व शरीरांतील रक्त नासलें असल्यास तें शीर तोडून काढावें.

प्रच्छानं पिंडिते वा स्यादवगाढे जलौकसः ॥ ५४ ॥
त्वक्स्थेऽलाबुघटीशृंगं शिरैव व्यापकेऽसृजि ।

किंवा गोठलेलें रक्त फांसण्यांनीं, खोल सांचलेलें जळवांनीं आणि त्वचेंतील रक्त अलाबु, घटी व शिंग यांच्या योगानें काढावें. सर्व शरीरांतील नासकें रक्त काढण्यास सर्वसंमत उपाय शिरावेधच होय.

वातादिधाम वा शृंगजलौकोलाबुभिः क्रमात् ॥ ५५ ॥

किंवा वात, पित्त व कफ यांच्या स्थानांतील रक्त अनुक्रमें शिंग, जळवा व अलाबु यांनीं काढावें.

स्रुतास्रजः प्रदेहाद्यैः शीतैः स्याद्वायुकोपतः ।
सतोदकंडूशोफस्तं सर्पिषोष्णेन सेचयेत् ॥ ५६ ॥

रक्त काढल्यानंतर थंड लेप वगैरे केल्यानें वायूचा प्रकोप होऊन टोंचण, कंड, सूज हे विकार झाल्यास त्या जागीं ऊन तुपाची धार धरावी.

# अध्याय सत्ताविसावा.

अथातः सिराव्यधविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां शिरावेधविधि सांगतों.

मधुरं लवणं किंचिदशीतोष्णमसंहतम् ।
पद्मेंद्रगोपहेमाविशशलोहितलोहितम् ॥ १ ॥
लोहितं प्रवदेच्छुद्धं तनोस्तनेवै च स्थितिः ।

मधुर, किंचित् खारट, फार ऊन किंवा थंड नसलेलें, घट्ट नसलेलें; आणि तांबडें कमळ, वनगाय (एक किडा), सोनें किंवा मेंढा व ससा यांचे रक्ताप्रमाणें लाल रंगाचें जें रक्त तें शुद्ध जाणावें. याच्या योगानेंच शरीराची स्थिति असते.

तत्पित्तश्लेष्मलैः प्रायो दूष्यते

हें रक्त बहुधा पित्तकर व कफकारक पदार्थांनीं दूषित होतें.

कुरुते ततः ॥ २ ॥

विसर्पविद्रधिप्लीहगुल्माग्निसदनज्वरान् ।
मुखनेत्रशिरोरोगमदतृड्लवणास्यताः ॥ ३ ॥
कुष्ठवातास्रपित्तास्रकट्वम्लोद्गीरणभ्रमान् ।

आणि दूषित झालें म्हणजे विसर्प, विद्रधि, पानथरी, गुल्म, अग्निमान्द्य, ताप, तोंड, डोळे व मस्तक यांचे रोग, मद, तहान, तोंड खारट होणें, कुष्ठ, वातरक्त, रक्तपित्त, तिखट किंवा आंबट ढेकर आणि श्रम हे विकार उत्पन्न करितें.

शीतोष्णस्निग्धरूक्षाद्यैरुपक्रांताश्च ये गदाः ॥ ४ ॥
सम्यक् साध्या न सिध्यंति ते च रक्तप्रकोपजाः ।

जे रोग सुखसाध्य असूनही शीत-उष्ण, स्निग्ध-रूक्ष इत्यादि अनेक प्रकारची चिकित्सा करून देखील बरे होत नाहींत, त्यांच्या मुळाशीं रक्तदोष आहे असें समजावें.

तेषु स्रावयितुं रक्तमुद्रिक्तं व्यधयेत्सिराम् ॥ ५ ॥

त्या रोगांवर, प्रकुपित रक्त काढून टाकण्याकरितां शीर तोडावी.

न तूनषोडशातीतसप्तत्यब्दस्रुतास्रजाम् ।
अस्निग्धास्वेदितात्यर्थस्वेदितानिलरोगिणाम् ॥ ६ ॥
गर्भिणीसूतिकाजीर्णपित्तास्रश्वासकासिनाम् ।
अतीसारोदरच्छर्दिपांडुसर्वांगशोफिनाम् ॥ ७ ॥

स्नेहपीते प्रयुक्तेषु तथा पंचसु कर्मसु ।
नायंत्रितां सिरां विध्येन्न तिर्यङ्नाप्यनुत्थिताम् ॥ ८ ॥
नातिशीतोष्णवाताभ्रेष्वन्यत्रात्ययिकाद्गदात् ।

सोळा वर्षांपेक्षां कमी आणि सत्तर वर्षांपेक्षां जास्त वयाचे, ज्यांचें पूर्वी रक्त काढलें आहे, ज्यांचें स्नेहन-स्वेदन झालें आहे, वातरोगी, गर्भिणी, बाळंतीण, ज्यांस अजीर्ण, रक्तपित्त, दमा, खोकला, अतिसार, उदर, उलटी, पांडु रोग व सर्वांगसूज हे विकार आहेत, आणि ज्यांनीं स्नेहपान व वमनादि पंचकर्में केलीं आहेत, अशा मनुष्यांची शीर तोडूं नये. बांधल्यावांचून व आडवी किंवा न फुगलेली शीर तोडूं नये. तसेंच एखाद्या दारुण रोगाशिवाय इतर प्रसंगीं फार थंडी, फार उष्मा, सोसाट्याचा वारा किंवा अभ्र आलें असतां शीर तोडूं नये.

शिरोनेत्रविकारेषु ललाट्यां मोक्षयेत्सिराम् ॥ ९ ॥
अपांग्यामुपनास्यां वा

मस्तक व डोळे याच्या रोगांत कपाळाची, डोळ्यांच्या बाहेरच्या कोंपऱ्याजवळची अथवा नाकाजवळची शीर तोडावी.

कर्णरोगेषु कर्णजाम् ।

कानाच्या रोगांत कानाजवळची शीर तोडावी.

नासारोगेषु नासाग्रे स्थिताम्

नाकाच्या रोगांत नाकाच्या अग्रभागाची तोडावी.

नासाललाटयोः ॥१०॥
पीनसे

पीनसांत नाकाची किंवा कपाळाची शीर तोडावी.

मुखरोगेषु जिह्वौष्ठहनुतालुगाः ।

मुखरोगांत जीभ, ओंठ, हनवटी व टाळू यांची शीर तोडावी.

जत्रूर्ध्वं ग्रंथिषु ग्रीवाकर्णशंखशिरःश्रिताः ॥ ११ ॥

गळ्याच्या वरील भागांत गांठी झाल्या असतां त्यांच्या स्थान-परत्वें मान, कान, कानपटी व डोकें यांच्या शिरा तोडाव्या.

उरोऽपांगललाटस्था उन्मादे

उन्मादांत छाती, डोळ्याच्या बाहेरचा कोंपरा किंवा कपाळ यांच्या शिरा तोडाव्या.

अपस्मृतौ पुनः ।
हनुसंधौ समस्ते वा सिरां भ्रूमध्यगामिनीम् ॥ १२ ॥

अपस्मारांत हनुवटीची, हनुवटीच्या सांध्यावरची किंवा दोन्ही भिवयांच्या मधून जाणारी शीर तोडावी.

विद्रधौ पार्श्वशूले च पार्श्वकक्षास्तनांतरे ।

विद्रधि व कुशींतील शूळ यांवर कुशींतील आणि कांख व स्तन यांच्या मधील शीर तोडावी.

तृतीयकेऽसयोर्मध्ये स्कंधस्याधश्चतुर्थके ॥ १३ ॥

तृतीयक तापांत खांद्याजवळची शीर तोडावी. चातुर्थिक ज्वरांत खांद्याच्या खालची तोडावी.

प्रवाहिकायां शूलिन्यां श्रोणितो द्व्यंगुले स्थिताम् ।

शूळसहित अतिसारांत कंबरेच्यावर दोन बोटांवरची शीर तोडावी.

शुक्रमेढ्रामये मेढ्रे

वीर्यरोगांत व शिस्नरोगांत शिस्नाची शीर तोडावी.

ऊरुगां गलगंडयोः ॥ १४ ॥

गलगंडांत व गंडमाळांत दोन्ही मांड्यांवरच्या शिरा तोडाव्या.

गृध्रस्यां जानुनोधस्तादूर्ध्वं वा चतुरंगुले ।

गृध्रसींत गुडघ्याच्या खालीं किंवा वर चार बोटावरची शीर तोडावी.

इंद्रबस्तेरधोऽपच्यां द्व्यंगुले

अपची रोगांत पोटरीच्या गोळ्याच्या खालीं दोन बोटांवरची शीर तोडावी.

चतुरंगुले ॥ १५ ॥
ऊर्ध्वं गुल्फस्य सक्थ्यर्तौ तथा क्रोष्टुकशीर्षके ।

मांडींत शूळ असल्यास पायाच्या घोट्याच्या वर चार बोटांवरची शीर तोडावी, गुडघींतही याचप्रमाणें करावें.

पाददाहे खुडे हर्षे विपाद्यां वातकंटके ॥ १६ ॥
चिप्पे च द्व्यंगुले विध्येदुपरि क्षिप्रमर्मणः ।

पाददाह, वातरक्त, पादहर्ष, विपादिका, वातकंटक आणि

नखुरडें या रोगांत पायांच्या आंगठ्यांच्या गेळापासून दोन बोटां-वरची शीर तोडावी.

गृध्रस्यामिव विश्वाच्याम्

विश्वाची नामक वातरोगांत गृध्रसीप्रमाणेंच करावें.

यथोक्तानामदर्शने ॥ १७ ॥

मर्महीने यथासन्ने देशेऽन्यां व्यधयेत् सिराम् ।

वर सांगितलेल्या शिरा न दिसल्यास मर्में सोडून त्या त्या स्थाना-जवळची दुसरी शीर तोडावी.

अथ स्निग्धतनुः सज्जसर्वोपकरणो बली ॥ १८ ॥
कृतस्वस्त्ययनः स्निग्धरसान्नप्रतिभोजितः ।
अग्नितापाऽतपस्विन्नो जानूच्चासनसंस्थितः ॥ १९ ॥
मृदुपट्टात्तकेशांतो जानुस्थापितकूर्परः ।
मुष्टिभ्यां वस्त्रगर्भाभ्यां मन्ये गाढं निपीडयेत् ॥ २० ॥
दंतप्रपीडनोत्कासगंडाऽध्मानानि चाऽचरेत् ।
पृष्ठतो यंत्रयेच्चैनं वस्त्रमावेष्टयन्नरः ॥ २१ ॥
कंधरायां परिक्षिप्य न्यस्यांतर्वामतर्जनीम् ।
एषोऽतर्मुखवर्जानां सिराणां यंत्रणे विधिः ॥ २२ ॥

ज्याची शीर तोडावयाची तो मनुष्य सशक्त असावा. त्यानें स्नेहपानानें शरीर स्निग्ध करून, स्निग्ध मांसरसासह भोजन करून, स्वस्तिवाचन करवून, अग्नीनें व उन्हानें घाम काढून, सर्व जरूरीचें साहित्य जमवून गुडघ्याइतक्या उंच आसनावर बसावें. डोक्या-सभोंवतीं केसांखालीं एक बारीक कपडा गुंडाळून गुडघ्यावर कोंपरें टेंकून दोन्ही मुठींत फडक्याच्या घड्या घेऊन मानेच्या दोन्ही बाजू जोरानें दाबाव्या. आणि दांत चावावे, मुद्दाम खोंकावें व गाल फुग-वावे. मग दुसऱ्या मनुष्यानें त्याच्यामागें उभें राहून मानेसभों-वतीं वस्त्र गुंडाळून त्यास बांधावें. बांधतांना डाव्या हाताची तर्जनी आंत घालून त्यांत शेवट खोंचावें. तोंडांत जाणाऱ्या शिरा सोडून बाकी सर्व शिरा तोडावयाच्या असल्यास याचप्रमाणें बांधावें.

ततो मध्यमयांऽगुल्या वैद्योऽगुष्ठविमुक्तया ।
ताडयेत्

नंतर ज्या जागीं शीर तोडणें असेल त्या जागीं वैद्यानें आपल्या मधल्या बोटानें कांहीं वेळ टिचक्या माराव्या.

उत्थितां ज्ञात्वा स्पर्शांगुष्ठप्रपीडनैः ॥ २३ ॥
कुठार्या लक्षयेन्मध्ये वामहस्तगृहीतया ।
फलोद्देशे सुनिष्कंपं सिरां तद्वच्च मोक्षयेत् ॥ २४ ॥
ताडयन् पीडयेच्चैनम्

नंतर ती शीर स्पर्शानें किंवा आंगठा दाबून फुगली असें पाहून डाव्या हातांत कुठारी शस्त्र घेऊन तें शिरेच्या बरोबर मधोमध धरून त्यावर हात न कापवितां मधल्या बोटाची टिचकी मारून शीर दाबून पिळावी.

विध्येद्व्रीहिमुखेन तु ।
अंगुष्ठेनोन्नमय्याग्रे नासिकामुपनासिकाम् ॥ २५ ॥

नाकाजवळची शीर तोडणें असल्यास नाकाचें अग्र आंगठ्यानें वर करून व्रीहिमुखानें तोडावी.

अभ्युन्नतविदष्टाग्रजिह्वस्याधस्तदाश्रयाम् ।

जिभेच्या खालची शीर तोडणें ती जीभ उलटी वर दुणून तिचें टोंक वरच्या दातांनीं दाबून धरून तोडावी.

यंत्रयेत्स्तनयोरूर्ध्वं ग्रीवाश्रितसिराव्यधे ॥ २६ ॥

मानेची शीर तोडणें असल्यास स्तनांच्या वर बांधावें.

पाषाणगर्भहस्तस्य जानुस्थे प्रसृते भुजे ।
कुक्षेरारभ्य मृदिते विध्येद् बद्धोर्ध्वपट्टके ॥२७॥

दंडाच्या शिरा तोडणें असल्यास रोग्याच्या दोन्ही हातांत दोन दगड देऊन ते गुडघ्यावर टेंकून लांब करून बसण्यास सांगावें. नंतर कुशीपासून मानेपर्यंत मर्दन करून वेध करण्याच्या जागेच्या वरच्या भागीं पट्टा बांधून शीर तोडावी.

विध्येद्धस्तसिरां बाहावनाकुंचितकूर्परे ।
बध्द्वा सुखोपविष्टस्य मुष्टिमंगुष्ठगर्भिणीम् ॥ २८ ॥
ऊर्ध्वं वेध्यप्रदेशाच्च पट्टिकां चतुरंगुले ।

हाताच्या शिरा तोडणें असल्यास रोग्यास सुखासनावर बसवून त्यास हात लांब व ताठ करून, मुठींत आंगठा घालून ती गच्च आंवळून धरण्यास सांगावें. नंतर ज्या जागची शीर तोडणें असेल त्याच्यावर चार बोटें पट्टा बांधून शीर तोडावी.

विध्येदालंबमानस्य बाहुभ्यां पार्श्वयोः सिराम् ॥ २९ ॥

कुशींतील शीर तोडणें असल्यास रोग्यास दोन्ही हात वर करावयास सांगून तोडावी.

प्रहृष्टे मेहने

शिस्नाची शीर तें ताठ उभें राहिलें म्हणजे तोडावी.

जंघासिरां जानुन्यकुंचिते ।

गुडघा ताठ करून पाय लांब केला असतां पोटरीची शीर तोडावी.

पादे तु सुस्थितेऽधस्ताज्जानुसंधेर्निपीडिते ॥ ३० ॥
गाढं कराभ्यामागुल्फं चरणे तस्य चोपरि ।
द्वितीये कुंचिते किंचिदारूढे हस्तवत्ततः ॥ ३१ ॥
बद्ध्वा विध्येत्सिराम्

पायाची शीर तोडणें असल्यास जमिनीवर पाय सारखा ठेवून गुडघ्यापासून घोट्यापर्यंत दोन्ही हातांनीं जोरानें दाबून त्यावर दुसरा पाय किंचित् आखडून धरून ठेवावा. नंतर हाताप्रमाणें शीर तोडण्याच्या जागेपासून चार बोटें वर पट्टी बांधून शीर तोडावी.

इत्थमनुक्तेष्वपि कल्पयेत् ।
तेषु तेषु प्रदेशेषु तत्तद्यंत्रमुपायवित ॥ ३२ ॥

येथें न सांगितलेल्या भागांविषयींही उपायकुशल वैद्यानें याच पद्धतीस अनुसरून पट्टे बांधावे.

मांसले निक्षिपेद्देशे व्रीह्यास्यं व्रीहिमात्रकम् ।
यवार्धमस्थ्नामुपरि सिरां विध्यन् कुठारिकाम् ॥ ३३ ॥

मांसलभागावरील शीर तोडण्यास व्रीहिमुख शस्त्राचें टोंक भाताच्या दाण्याइतकें आंत सारावें. हाडावरील शीर तोडतांना कुठारिका शस्त्र अर्धा जव आंत भोंसकावें.

सम्यग्विद्धे स्रवेद्धारां यंत्रे मुक्ते तु न स्रवेत् ।

शीर बरोबर तुटली असतां रक्ताची धारा निघते. परंतु पट्टा सोडला असतां धार निघत नाहीं.

अल्पकालं वहत्यल्पं दुर्विद्धा तैलचूर्णनैः ॥ ३४ ॥

अल्पवेध झाल्यास तेल व चूर्ण यांचा लेप केला तरी थोडा वेळ-पर्यंतच रक्त वाहतें.

सशब्दमतिविद्धा तु स्रवेद्दुःखेन धार्यते ।

जास्त वेध झाल्यास धार वाहतांना शब्द होतो व स्राव बंद करण्यास फार प्रयास पडतात.

भीमूर्च्छायंत्रशैथिल्यकुंठशस्त्रातितृप्तयः ॥ ३५ ॥
क्षामत्ववेगितास्वेदा रक्तस्याऽस्रुतिहेतवः ।

भय, मूर्च्छा, पट्टा ढिला असणें, शस्त्र बोंथट असणें, अतिशय खाणें, अशक्तपणा, मलमूत्रादिकांचे वेग येणें व वेधनापूर्वीं स्वेदन न करणें, या कारणांनीं रक्तस्राव बरोबर होत नाहीं.

असम्यगस्रे स्रवति वेल्लव्योषनिशानतैः ॥ ३६ ॥
सागारधूमलवणतैलैर्दिह्याच्छिरामुखम् ।
सम्यक्प्रवृत्ते कोष्णेन तैलेन लवणेन च ॥ ३७ ॥

रक्तस्राव बरोबर न झाल्यास वावडिंग, त्रिकटु, हळद, तगर, घेरोसा, सैंधव व तेल हीं एकत्र खलून यांचा शिरेच्या तोंडावर लेप करावा. तोच बरोबर झाल्यास शिरेच्या तोंडावर तेल व सैंधव कोमट करून लावावें.

अग्रे स्रवति दुष्टास्रं कुसुंभादिव पीतिका ।
सम्यक्प्रस्रुत्य यत्तिष्ठेच्छुद्धं तदिति नाहरेत् ॥ ३८ ॥

कुसुंब्यांतून जसा पिवळा रंग पहिल्यानें बाहेर येतो, त्याचप्रमाणें शीर तोडली असतां शुद्ध व दूषित रक्ताच्या मिश्रणांतून प्रथम दूषित रक्तच बाहेर येतें. योग्य स्राव होऊन आपोआप तो बंद झाला म्हणजे शिल्लक राहिलें तें शुद्ध रक्त समजून पुन्हां काढूं नये.

यंत्रं विमुच्य मूर्च्छायां वीजिते व्यजनैः पुनः ।
स्रावयेन्मूर्छति पुनस्त्वपरेद्युस्त्र्यहेऽपि वा ॥ ३९ ॥

रक्तस्राव होत असतां रोग्यास मूर्छा आल्यास पट्टे सोडून पंख्यानें वारा घालून सावध करावें आणि पुन्हां पट्टे बांधून रक्तस्राव करावा. पुन्हां मूर्च्छा आल्यास त्या दिवशीं बंद करून दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं पुन्हां रक्त काढावें.

वाताच्छ्यावारुणं रूक्षं वेगस्त्राव्यच्छफेनिलम् ।
पित्तात्पीतासितं विस्त्रमस्कंद्यौष्ण्यात्सचंद्रकम् ॥ ४० ॥
कफात् स्निग्धमसृक्पांडु तंतुमत्पिच्छिलं घनम् ।
संसृष्टलिंगं संसर्गात् त्रिदोषं मलिनाविलम् ॥ ४१ ॥

वायूनें दूषित झालेलें रक्त काळसर, तांबूस, रूक्ष, पातळ व फेंसाळ असून वेगानें स्रवतें. पित्तानें दूषित रक्त पिवळट, काळसर दुर्गंधी आणि पित्ताच्या उष्णतेमुळें पातळ असून त्यावर चित्र-विचित्र रंगाची झांक मारते. कफानें दूषित रक्त स्निग्ध, भुरकट, बुळबुळीत व दाट असून त्यास तार येते. दोन दोषांनीं दूषित रक्तांत त्या दोन दोन दोषांचीं लक्षणें असतात. त्रिदोषदूषित रक्तांत तिहींचीं लक्षणें असून तें मळकट व गढूळ असतें.

अशुद्धं बलिनोऽप्यस्त्रं न प्रस्थात्स्रावयेत्परम् ।

बळकट मनुष्याचेंही अशुद्ध रक्त चौसष्ट तोळयांपेक्षां जास्त काढूं नये.

अतिस्त्रुतौ हि मृत्युः स्याद्दारुणा वा चलामयाः ॥ ४२ ॥
तत्राऽभ्यंगरसक्षीररक्तपानानि भेषजम् ।

अतिशय रक्तस्राव झाल्यास मृत्यु अथवा दारुण वातरोग होतात. अतिस्रावावर अभ्यंग करणें आणि मांसरस, दूध व रक्त पिणें हे उपाय करावे.

स्त्रुते रक्ते शनैर्यंत्रमपनीय हिमांबुना ॥ ४३ ॥
प्रक्षाल्य तैलप्लोताक्तं बंधनीयं सिरामुखम् ।

योग्य रक्तस्राव झाल्यानंतर हळू हळू पट्टा सोडून टाकून थंड पाण्यानें तोडलेल्या शिरेचें तोंड धुवून तेलाची घडी ठेवून वर पट्टी बांधावी.

अशुद्धं स्रावयेद्भूयः सायमह्न्यपरेऽपि वा ॥ ४४ ॥
स्नेहोपस्कृतदेहस्य पक्षाद्वा भृशदूषितम् ।

दूषित रक्त शिल्लक राहिल्यास तें पुन्हां संध्याकाळीं किंवा दुसऱ्या दिवशीं काढावें. ज्याचें रक्त अतिशय दूषित झालें असेल त्यास चांगला स्निग्ध करून पंधरा दिवसांनीं पुन्हां रक्त काढावें.

किंचिद्धि शेषे दुष्टास्रे नैव रोगोऽतिवर्तते ॥ ४५ ॥
सशेषमप्यतो धार्यं न चातिस्त्रुतिमाचरेत् ।

अशुद्ध रक्त जरी थोडेंसें शिल्लक राहिलें, तरी त्यापासून रोग कमी होत नाहीं. तरी सुद्धां तें थोडेंसें राखून ठेवावें, परंतु दुष्ट रक्त म्हणून तें अतिशय मात्र काढूं नये.

हरेच्छृंगादिभिः शेषं प्रसादमथवा नयेत् ॥ ४६ ॥
शीतोपचारपित्तास्रक्रियाशुद्धिविशोषणैः ।

शिल्लक राहिलेलें दूषित रक्त शिंग, तुंबडी वगैरे लावून काढावें, अथवा शीत उपचार, रक्तपित्तावरील चिकित्सा, वमन-विरेचनादि कर्मे आणि लंघन वगैरे उपायांनीं तें शुद्ध करावें.

दुष्टं रक्तमनुद्रिक्तमेवमेव प्रसादयेत् ॥ ४७ ॥

दुष्ट रक्त फार बळावलेलें नसल्यास त्याची शुद्धि याच उपायांनीं करावी.

रक्ते त्वतिष्ठति क्षिप्रं स्तंभनीमाचरेत्क्रियाम् ।

रक्त थांबत नसल्यास ताबडतोब पुढील स्तंभक चिकित्सा करावी.

रोध्रप्रियंगुपत्तंगमाषयष्ट्याह्वगैरिकैः ॥ ४८ ॥
मृत्कपालांजनक्षौममषीक्षीरीत्वगंकुरैः ।
विचूर्णयेद्व्रणमुखं पद्मकादिहिमं पिबेत् ॥ ४९ ॥

लोध्र, गहुला, पतंगाचें लांकूड, उडीद, ज्येष्ठमध, गेरू, माती, खापर, सुरमा, तागाची राख, क्षीरिवृक्षांच्या साली व कोंवळे डेख यांचें चूर्ण करून तें व्रणाच्या तोंडावर बसवावें. आणि पोटांत पद्मकादि गणांतील औषधांचें हिम द्यावें.

तामेव वा सिरां विध्येद्व्यधात्तस्मादनंतरम् ।
सिरामुखं च त्वरितं दहेत्तप्तशलाकया ॥ ५० ॥

किंवा तीच शीर पूर्वी तोडलेल्या जागेच्या खालच्या अंगास पुन्हां तोडावी, किंवा शिरेचें तोंड तापलेल्या सळईनें डागावें.

उन्मार्गगा यंत्रनिपीडनेन स्वस्थानमायांति पुनर्न यावत् ।
दोषाः प्रदुष्टा रुधिरं प्रपन्नास्तावद्धिताहारविहारभाक्स्यात् ५१

रक्तांत येऊन मिळालेले दुष्ट वातादि दोष पट्ट्याच्या दाबानें सैरावैरा धांवत असतात, ते आपापल्या स्थानावर परत आले नाहींत तोंपर्यंत हितकर आहारविहार करीत असावें.

नात्युष्णशीतं लघु दीपनीयं रक्तेऽपनीते हितमन्नपानम् ।
तदा शरीरं ह्यनवस्थितासृमग्निर्विशेषादिति रक्षणीयः ॥५२॥

रक्तस्रावानें शरीरांतील सर्व रक्त अनवस्थित झालेलें असतें. अशा वेळीं अग्नीचें रक्षण करणें फार जरूर असतें. करितां रक्तस्रावानंतर समशीतोष्ण, हलकें व अग्निदीपक असें अन्नपान सेवन करावें.

प्रसन्नवर्णेंद्रियमिंद्रियार्थानिच्छंतमव्याहतपक्तृवेगम् ।
सुखान्वितं पुष्टिबलोपपन्नं विशुद्धरक्तं पुरुषं वदंति ॥ ५३ ॥

ज्या मनुष्याचें रक्त शुद्ध आहे, त्याचें शरीर तेजस्वी व इंद्रियें प्रफुल्लित असतात; सर्व इंद्रियांच्या विषयांचें सेवन करण्याची त्यास इच्छा होते; भूक चांगली लागते; आणि तो निरोगी, पुष्ट व बळकट असतो.

---

## अध्याय अठ्ठाविसावा.

अथाऽतः शल्याहरणविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां शल्यें काढण्याचा विधि सांगतों.

वक्रर्ज्वतिर्यगूर्ध्वाधः शल्यानां पंचधा गतिः ।

वांकडी, सरळ, आडवी, वर व खालीं अशी पांच प्रकारची शल्यांची गति असते.

ध्यामं शोफं रुजावंतं स्रवंतं शोणितं मुहुः ॥ १ ॥
अभ्युद्गतं बुद्बुदवत्पिटिकोपचितं व्रणम् ।
मृदुमांसं विजानीयादंतःशल्यं समासतः ॥ २ ॥

ज्या व्रणांत शल्य असतें, तो काळसर व सुजलेला असून ठणकत असतो. त्यांतून वरचेवर रक्त निघत असतें. तो वर उचललेला असतो. त्यावर बुडबुड्याप्रमाणें पुरळ असतो आणि त्याचें मांस नरम असतें. हीं सशल्य व्रणाचीं सामान्य लक्षणें सांगितलीं.

विशेषात्त्वग्गते शल्ये विवर्णः कठिनायतः ।
शोफो भवति

विशेषतः, त्वचेंत शल्य असल्यास त्वचेहून निराळ्या रंगाची, कठिण व पसरलेली अशी सूज येते.

मांसस्थे चोषः शोफो विवर्धते ॥ ३ ॥
पीडनाक्षमता पाकः शल्यमार्गो न रोहति ।

मांसांत शल्य असल्यास तीव्र दाह व सूज हीं वाढतात. दाबलें असतां सहन होत नाहीं, व जखम आणि शल्याचा मार्ग भरून येत नाहीं.

पेश्यंतरगते मांसप्राप्तवच्छ्वयथुं विना ॥ ४ ॥

मांसाच्या पेशींत शल्य असल्यास सुजेशिवाय इतर सर्व लक्षणें मांसशल्याप्रमाणेंच असतात.

आक्षेपः स्नायुजालस्य संरंभस्तंभवेदनाः ।
स्नायुगे दुर्हरं चैतत्

स्नायूंत शल्य असल्यास स्नायुजालास ओढ लागते, त्याचा क्षोभ होतो, तें ताठतें व त्यांत वेदना होतात. हें शल्य काढणें फार कठीण आहे.

सिराध्मानं सिराश्रिते ॥ ५ ॥

शिरेंत शल्य असल्यास ती फुगते.

स्वकर्मगुणहानिः स्यात्स्रोतसां स्रोतसि स्थिते ।

स्रोतांत शल्य असतां त्या त्या स्रोतांचीं कर्मे व त्यांचे गुण यांची हानि होते.

धमनिस्थेऽनिलो रक्तं फेनयुक्तमुदीरयेत् ॥ ६ ॥
निर्याति शब्दवान् स्याच्च हृल्लासः सांगवेदनः ।

धमनींत शल्य असल्यास वायु फेंसाळ रक्त बाहेर काढतो. तो स्वतः शब्द करीत बाहेर येतो. मळमळतें व अंग दुखतें.

संघर्षो बलवानस्थिसंधिप्राप्तेऽस्थिपूर्णता ॥ ७ ॥

हाडांच्या संधींत शल्य असल्यास तें फार सलतें, व संधींतील रिकामी जागा सुजेमुळें भरून जाते.

नैकरूपा रुजोऽस्थिस्थे शोफः

हाडांत शल्य असतां नानाप्रकारच्या वेदना होतात व सूज असते.

तद्वच्च संधिगे ।

चेष्टानिवृत्तिश्च भवेत् ।

ढोंपर, कोंपर, वगैरे शरीरसंधींत शल्य असल्यास सदरहूप्रमाणेंच लक्षणें होऊन त्या त्या अवयवाचें चलनवलन बंद होतें.

आटोपः कोष्ठसंश्रिते ॥ ८॥
आनाहोऽन्नशकृन्मूत्रदर्शनं च व्रणानने।

कोठ्यांत शल्य असल्यास पोटांत गुडगुड शब्द होतो, पोट फुगतें आणि व्रणाच्या तोंडाशीं अन्न, मळ व मूत्र हीं दिसतात.

विद्यान्मर्मगतं शल्यं मर्मविद्धोपलक्षणैः ॥ ९ ॥

मर्मांत शल्य असतां मर्मवेधाप्रमाणेंच लक्षणें होतात.

यथास्वं च परिस्रावैस्त्वगादिषु विभावयेत्।

त्वचा, मांस इत्यादिकांतील शल्यें त्यांच्या स्रावावरून ओळखावीं.[१]

रुह्यते शुद्धदेहानामनुलोमास्थितं तु तत्।
दोषकोपाऽभिघातादिक्षोभाद्भूयोऽपि बाधते ॥ १० ।

वमनविरेचनांनीं शुद्ध झालेल्या मनुष्याचें शल्य अनुकूल स्थितींत असतां व्रण आपोआप भरून येतो. परंतु दोषांच्या प्रकोपानें किंवा आघात वगैरे कारणांनीं त्या जागीं क्षोभ झाला असतां तें शल्य पुन्हा सलूं लागतें.

त्वङ्नष्टे यत्र तत्र स्युरभ्यंगस्वेदमर्दनैः।
रागरुग्दाहसंरंभा यत्र चाज्यं विलीयते ॥ ११ ॥
आशु शुष्यति लेपो वा तत्स्थानं शल्यवद्वदेत्।

अभ्यंग, स्वेदन व मर्दन केलें असतां ज्या जागीं लाली, वेदना व सलणें हीं उत्पन्न होतात, ज्या ठिकाणीं दाट तूप ठेविलें असतां तें वितळतें, व ज्या भागावर लावलेला लेप लवकर सुकतो, त्या ठिकाणीं त्वचेंत शल्य आहे असें जाणावें.

मांसप्रनष्टं संशुद्ध्या कर्शनाच्छ्लथतां गतम् ॥ १२ ॥
क्षोभाद्रागादिभिः शल्यं लक्षयेत्

मांसांतील शल्यस्थळ शोधून काढण्याकरितां वमनविरेचनांनीं रोग्यास कृश करावें. म्हणजे त्याचें मांस शिथिल होऊन शल्य

१ हाडांत मज्जा असते; तर मज्जास्राव झाल्यास हाडांत शल्य आहे असें समजावें.

अनेक प्रकारच्या वेदना, लाली, दाह वगैरे उत्पन्न करितें. त्यावरून ती जागा ओळखावी.

तद्वदेव च ।

पेश्यस्थिसंधिकोष्ठेषु नष्टम् ।

मांसपेशी, हाडांचे सांधे व कोठा यांतील शल्य देखील याच रीतीनें पहावें.

अस्थिषु लक्षयेत् ॥ १३॥

अस्थ्नामभ्यंजनस्वेदबंधपीडनमर्दनैः ।

हाडांतील नष्ट शल्य अभ्यंग, स्वेदन, बंधन, दाबणें, रगडणें हे उपाय करून ज्या ठिकाणीं सलणें, लाली वगैरे विकार होतील त्या ठिकाणीं आहे असें जाणावें.

प्रसारणाकुंचनतः संधिनष्टं तथाऽस्थिवत् ॥ १४ ॥

शरीरसंधींतील नष्टशल्य कोठें आहे, हें त्या त्या अवयवाच्या आकुंचन-प्रसारणावरून व अस्थिगत शल्य जाणण्याच्या उपायांनीं जाणावें.

नष्टे स्नायुशिरास्रोतोधमनिष्वसमे पथि ।
अश्वयुक्तं रथं खंडचक्रमारोप्य रोगिणम् ॥ १५ ॥
शीघ्रं नयेत्ततस्तस्य संरंभाच्छल्यमादिशेत् ।

स्नायु, शिरा, स्रोतें व धमन्या यांत नष्ट झालेलें शल्य समजण्याकरितां रोग्यास एका मोडक्या चाकाच्या गाडींत बसवून ती उंच सखल मार्गानें वेगानें चालवावी. त्या योगानें त्याचें सर्व अंग खिळखिळें होऊन शल्य सलूं लागतें. त्यावरून त्याची जागा ओळखावी.

मर्मनष्टं पृथङ्नोक्तं तेषां मांसादिसंश्रयात् ॥ १६ ॥

मर्में हीं मांसादिकांच्या आश्रयानें असल्यामुळें त्यांतील नष्ट शल्यें जाणण्याचे उपाय निराळे सांगितले नाहींत.

सामान्येन सशल्यं तु क्षोभिण्या क्रियया सरुक् ।

सामान्यतः, क्षोभ उत्पन्न करणारी क्रिया करून ज्या ज्या जागीं वेदना उत्पन्न होतील त्या जागीं शल्य आहे असें जाणावें.

वृत्तं पृथु चतुष्कोणं त्रिपुटं च समासतः ॥ १७ ॥
अदृश्यशल्यसंस्थानं व्रणाकृत्या विभावयेत् ।

दिसत नसलेल्या शल्याचा आकार वाटोळा, पसरट, चौकोनी किंवा तिकोनी आहे हें व्रणाच्या आकृतीवरून जाणावें.

तेषामाहरणोपायौ प्रतिलोमानुलोमकौ ॥ १८ ॥
अर्वाचीनपराचीने निर्हरेत्तद्विपर्ययात् ।
सुखाहार्यं यतश्छित्वा ततस्तिर्यग्गतं हरेत् ॥ १९ ॥

शल्यें बाहेर काढण्याचे प्रतिलोम व अनुलोम असे दोन उपाय आहेत. खालीं गेलेलें शल्य वर व वर असलेलें शल्य खालीं ओढून काढावें. तें आडवें असल्यास जेथून काढण्यास सोयीचें पडेल तेथें छेद करून काढावें.

शल्यं न निर्घात्यमुरःकक्षावंक्षणपार्श्वगम् ।
प्रतिलोममनुत्तुंडं छेद्यं पृथुमुखं च यत् ॥ २० ॥
नैवाहरेद्विशल्यघ्नं नष्टं वा निरुपद्रवम् ।

छाती, खांक, जांघाडे, व बरगड्या यांत गेलेलें, प्रतिलोम, वर न उठलेलें, चिरण्यासारखें व पसरट तोंडाचें शल्य उपटून काढूं नये. शल्य काढल्यानें रोगी मरेल अशी भीति असल्यास, तसेंच नष्ट शल्यापासून कांहीं अपाय होत नसल्यास तें मुळींच काढूं नये.

अथाहरेत्करप्राप्यं करेणैव

हातांत येण्याजोगें शल्य हातानेंच काढावें.

इतरत्पुनः ॥ २१ ॥
दृश्यं सिंहाहिमकरवार्मिकर्कटकाननैः ।

इतर दिसणारीं शल्यें सिंहमुख, सर्पमुख, मकरमुख, वर्मिमुख, कर्कटमुख, या शस्त्रांनीं काढावीं.

अदृश्यं व्रणसंस्थानाद्ग्रहीतुं शक्यते यतः ॥ २२ ॥
कंकभृंगाह्वकुररशरारीवायसाननैः ।

अदृश्य शल्य व्रणाच्या आंत शस्त्र घालून धरतां येतें. करितां तें कंकमुक, भृंगमुख, कुररमुख, शरारीमुख व काकमुख, या यंत्रांनीं काढावें.

संदंशाभ्यां त्वगादिस्थम् ।

त्वचा व मांस यांतील शल्य सांडसांनीं काढावें.

तालाभ्यां शुषिरं हरेत् ॥ २३ ॥

पोकळ शल्य दोन तालयंत्रांनीं काढावें.

शुषिरस्थं तु नलकैः

पोकळ जागेंतील शल्य नाडीयंत्रांनीं काढावें.

शेषं शेषैर्यथायथम् ।

बाकीचीं शल्यें बाकीच्या यंत्रांनीं यथायोग्य योजनेनें काढावीं.

शस्त्रेण वा विशस्याऽदौ ततो निर्लोहितं व्रणम् ॥ २४ ॥
कृत्वा घृतेन संस्वेद्य बद्ध्वाऽचारिकमादिशेत् ।

अगोदर शस्त्रानें मांसादिक कापून नंतर शल्य काढून टाकून, व्रणांतील रक्त वाहणें बंद झालें म्हणजे तो ऊन तुपानें शेकून बांधून टाकावा. आणि मग रोग्यानें स्नेहविधींत सांगितल्याप्रमाणें आहार-विहार करावे.

शिरास्नायुविलग्नं तु चालयित्वा शलाकया ॥ २५ ॥

शिरा व स्नायु यांस अडकून बसलेलें शल्य प्रथम सळईनें हाल-वून नंतर ओढून काढावें.

हृदये संस्थितं शल्यं त्रासितस्य हिमांबुना ।
ततः स्थानांतरं प्राप्तमाहरेत्तद्यथायथम् ॥ २६ ॥

हृदयांत शल्य असल्यास रोग्यास थंड पाण्यानें त्रस्त करावें. त्या योगानें तें शल्य हृदयांतून सरकून दुसरीकडे गेलें म्हणजे मग त्या स्थानानुसार यथायोग्य उपायांनीं तें काढावे.

यथामार्गं दुराकर्षमन्यतोऽप्येवमाहरेत् ।

गेलेल्या मार्गानें शल्य काढण्यास प्रयास पडत असतील तर तें याचप्रमाणें दुसऱ्या स्थानांतून काढावें.

अस्थिदष्टे नरं पद्भ्यां पीडयित्वा विनिर्हरेत् ॥ २७ ॥
इत्यशक्ये सुबलिभिः सुगृहीतस्य किंकरैः ।
तथाप्यशक्ये वारंगं वक्रीकृत्य धनुर्ज्यया ॥ २८ ॥
सुबद्धं वक्त्रकटके बध्नीयात्सुसमाहितः ।
सुसंयतस्य पंचांग्या वाजिनः कशयाथ तम् ॥ २९ ॥
ताडयेदिति मूर्धानं वेगेनोन्नमयन् यथा ।
उद्धरेच्छल्यमेवं वा शाखायां कल्पयेत्तरोः ॥ ३० ॥

हाडांतील शल्य स्पष्ट दिसत असल्यास त्यास पायांनीं दाबून धरून शल्य काढावें. या उपायांनीं तें न निघाल्यास रोग्यास बलिष्ठ नोकरांकडून घट्ट पकडवून ठेवून तें उपटून काढावें. हेंही न साधल्यास

शल्याचा दांडा वांकवून त्यास धनुष्याची दोरी घट्ट बांधून ती दोरी चार पाय व मान जखडून बांधलेल्या घोड्याच्या ओठाळीस व्यवस्थित रीतीनें बांधून घोड्यास असा कसून चाबकाचा फटका मारावा, कीं त्यासरसा तो डोक्यास झटका देऊन तें वर उचलील व त्या जोरानें शल्य उपटलें जाईल. किंवा त्याचप्रमाणें झाडाची खांदी खालीं वांकवून तीस दांड्यास बांधलेली दोरी बांधावी. आणि मग ती खांदी सोडून द्यावी. म्हणजे ती जोरानें वर जातांना हिसक्या-सरशी शल्य उपटून काढील.

बद्ध्वा दुर्बलवारंगं कुशाभिः शल्यमाहरेत् ।
श्वयथुग्रस्तवारंगं शोफमुत्पीड्य युक्तितः ॥ ३१ ॥

शल्याचा दांडा दुर्बल असल्यास तो वेळूच्या पट्ट्या बांधून उपटावा. तो सुजेखालीं दबला गेला असल्यास सूज दोहींकडून वर दाबून युक्तीनें शल्य उपटून काढावें.

मुद्गराहतया नाड्या निर्घात्योत्तुंडितं हरेत् ।
तैरेव चानयेन्मार्गममार्गोत्तुंडितं तु यत् ॥ ३२ ॥

वर उचलून आलेल्या शल्यावर नाडीयंत्र ठेवून तें मोगऱ्यानें ठोकून हालवावें आणि नंतर उपटून काढावें. जें मार्ग सोडून भलतीकडेच वर उचललें असेल तें मुद्गर वगैरेंनीं ठोकून योग्य मार्गा-वर आणून नंतर उपटून काढावें.

मृदित्वा कर्णिनां कर्णं नाड्यास्येन निगृह्य वा ।

शल्यास (भाल्याप्रमाणें) फांटे असल्यास ते मोडून किंवा नाडीमुख यंत्रानें धरून उपटून काढावें.

अयस्कांतेन निष्कर्णं विवृतास्यमृजुस्थितम् ॥ ३३ ॥

शल्यास फांटे नसून त्याचें तोंड उघडें असल्यास व तें सरळ राहिलें असल्यास लोहचुंबकानें काढावें.

पक्वाशयगतं शल्यं विरेकेण विनिर्हरेत् ।

पक्वाशयांतील शल्य जुलाबाच्या मार्गानें काढून टाकावें.

दुष्टवातविषस्तन्यरक्ततोयादि चूषणैः ॥ ३४ ॥

दुष्ट वायु, विष, स्त्रियांचें दूध, रक्त, पाणी वगैरे तोंडानें किंवा तुंबडी, शिंग वगैरे यंत्रांनीं चोखून काढावीं.

**कंठस्रोतोगते शल्ये सूत्रं कंठे प्रवेशयेत् ।**
**बिसेनात्ते ततः शल्ये बिसं सूत्रं समं हरेत् ॥ ३५ ॥**

घशांत शल्य अडकलें असतां कमळाच्या देंठास दोरा बांधून ती घशांत घालावी, आणि शल्य देंठास अडकलें म्हणजे देंठ व दोरा दोन्ही बरोबर ओढून घ्यावीं.

**नाड्याऽग्नितापितां क्षिप्त्वा शलाकामप्स्थिरीकृताम् ।**
**आनयेज्जातुषं कंठात्**

लाख घशांत अडकली असल्यास एका पोकळ नळीच्या मधून तापलेली सळई घशांत घालावी. यायोगानें लाख वितळून जाऊन सळईस चिकटली म्हणजे पाणी घालून सळई निववावी. यानें लाख पुन्हां घट्ट होऊन सळईबरोबर बाहेर येते.

**जतुदिग्धामजातुषम् ॥ ३६ ॥**

घशांत लाखेशिवाय दुसरें कसलें शल्य अडकलें असल्यास त्या सळईस लाख लावून तिनें काढावें. लाखेस चिकटून तें बाहेर येतें.

**केशोंडुकेन पीतेन द्रवैः कंटकमाक्षिपेत् ।**
**सहसा सूत्रबद्धेन वमतस्तेन चेतरत् ॥ ३७ ॥**

कांटा घशांत अडकून राहिल्यास केंसाचा झुबका दोऱ्यानें बांधून वमनद्रव्यांबरोबर प्यावा, म्हणजे एकदम उलटी होऊन कांटा केंसांत गुंतून बाहेर पडतो. केंस अडकले असल्यास कांट्यास दोरा बांधून तो प्यावा म्हणजे ते उलटी होऊन पडतील.

**अशक्यं मुखनासाभ्यामाहर्तुं परतो नुदेत् ।**

तोंडांतून व नाकांतून निघण्यासारखें नसेल तें शल्य कोठ्यांत नेऊन तेथून काढावें.

**अप्पानस्कंधघाताभ्यां ग्रासशल्यं प्रवेशयेत् ॥ ३८ ॥**

अन्नाचा घांस घशांत अडकल्यास पाणी प्यावें किंवा खांद्यावर बुक्क्या माराव्या म्हणजे तो खालीं उतरतो.

**सूक्ष्माक्षिव्रणशल्यानि क्षौमवालजलैर्हरेत् ।**

डोळ्यांतील किंवा व्रणांतील बारीक शल्यें ताग, रेशीम, केंस व पाणी यांपैकीं जें योग्य असेल त्यानें काढावीं.

**अपां पूर्णं विधुनुयादवाक्शिरसमायतम् ॥ ३९ ॥**

वामयेद्वामुखं भस्मराशौ वा निखनेन्नरम् ।

पाण्यांत बुडून ज्याच्या पोटांत पाणी भरलें आहे, त्यास उलटा टांगून झोंके द्यावे किंवा उलटी करवावी. अथवा गळ्यापर्यंत राखेच्या राशींत पुरून ठेवावें.

कर्णेऽबुपूर्णे हस्तेन मथित्वा तैलवारिणी ॥ ४० ॥
क्षिपेदधोमुखं कर्णं हन्याद्वा चूषयेत वा ।

कानांत पाणी भरलें असल्यास तेल पाणी एकत्र करून हातानें ढवळून तें कानांत घालावें. अथवा कान उपडा करून वर मारावें किंवा कशानें तरी तें पाणी ओढून घ्यावें.

कीटे स्रोतोगते कर्णं पूरयेल्लवणांबुना ॥ ४१ ॥
शुक्तेन वा सुखोष्णेन मृते क्लेदहरो विधिः ।

कानांत किडा गेला असल्यास मिठाचें पाणी किंवा कोमट सूक्त कानांत घालावें. यानें किडा मेला म्हणजे क्लेदनाशक क्रिया करावी.

जातुषं हेमरूप्यादिधातुजं च चिरस्थितम् ॥ ४२ ॥
ऊष्मणा प्रायशः शल्यं देहजेन विलीयते ।

लाख, व सोनें, रुपें वगैरे धातु यांचें शल्य फार दिवस शरीरांत राहिल्यास तें बहुतकरून शरीरांतील उष्णतेनें वितळून जातें.

मृद्वेणुदारुशृंगास्थिदंतबालोपलानि च ॥ ४३ ॥
शल्यानि न विशीर्यंते शरीरे मृन्मयानि वा ।
विषाणवेण्वयस्तालदारुशल्यं चिरादपि ॥ ४४ ॥
प्रायो निर्भुज्यते तद्धि पचत्याशु पलासृजी ।

माती, वेळू, लांकूड, शिंग, हाड, दांत, केंस व दगड हीं शल्यें वितळत नाहींत. शिंग, वेळू, लोखंड, नारळाची नरोटी व लांकूड यांचें शल्य पुष्कळ दिवस राहिलें तरी वितळत नाहीं. तें बहुतकरून वांकडें होतें, आणि मांस व रक्त यांचा लवकर पाक करितें.

शल्ये मांसावगाढे च स देशो न विदह्यते ॥ ४५ ॥
ततस्तं मर्दनस्वेदशुद्धिकर्षणबृंहणैः ।
तीक्ष्णोपनाहपानान्नघनशस्त्रपदांकनैः ॥ ४६ ॥
पाचयित्वा हरेच्छल्यं पाटनैषणभेदनैः ।

शल्य मांसांत खोल असल्यास त्या ठिकाणीं पाक होत नाहीं. करितां मर्दन, स्वेदन, वमन, विरेचन, लंघन, बृंहण, तीक्ष्ण पोटीस,

तीक्ष्ण अन्नपान, जवळ जवळ फांसण्या मारणें इत्यादि उपायांनीं ती जागा पिकवून, फाडून, सळई घालून व फोडून शल्य काढून टाकावें.

शल्यप्रदेशयंत्राणामवेक्ष्य बहुरूपताम् ।
तैस्तैरुपायैर्मतिमान् शल्यं विद्यात्तथा हरेत् ॥ ४७ ॥

शल्यें, शरीराचे भाग व यंत्रें यांचे अनेक प्रकार लक्ष्यांत आणून, त्या त्या उपायांनीं बुद्धिमान् वैद्यानें शल्याची परीक्षा करून तें योग्य उपायानें काढावें.

---

## अध्याय २९ वा.

अथाऽतः शस्त्रकर्मविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां शस्त्रकर्मविधि सांगतों.

व्रणः संजायते प्रायः पाकाच्छ्वयथुपूर्वकात् ।
तमेवोपचरेत्तस्माद्रक्षन्पाकं प्रयत्नतः ॥ १ ॥
सुशीतलेपसेकास्रमोक्षसंशोधनादिभिः ।

बहुतकरून पहिल्यानें सूज येऊन ती पिकून त्याचा व्रण होतो. म्हणून थंड लेप, परिषेक, रक्तस्राव व विरेचन वगैरे उपायांनीं सूज न पिकूं देतां बरी करण्याविषयीं प्रयत्न करावा.

शोफोऽल्पोऽल्पोष्णरुक्सामः सवर्णः कठिनः स्थिरः ॥२॥

जी सूज थोडी असून जींत उष्णता व दुखणें हीं कमी असतात, जिचा रंग इतर भागांवरील त्वचेसारखाच असतो, आणि जी कठिण व स्थिर ( न हालणारी ) असते, ती सूज कच्ची आहे असें समजावें.

पच्यमानो विवर्णस्तु रागी बस्तिरिवाततः ।
स्फुटतीव सनिस्तोदः सांगमर्दविजृंभिकः ॥ ३ ॥
संरंभारुचिदाहोषातृड्ज्वरानिद्रतान्वितः ।
स्त्यानं विष्यंदयत्याज्यं व्रणवत्स्पर्शनासहः ॥ ४ ॥

सूज पिकत असतां पुढील लक्षणें होतात. सुजलेल्या जागच्या त्वचेचा रंग बदलतो, ती जागा आरक्त होते, स्पर्शास पाण्यानें भरलेल्या पखालीप्रमाणें फुगलेली लागते, फूट व टोंचण होते, अंग

मोडतें, जांभया येतात, अनेक प्रकारच्या वेदनांनीं तळमळ होते, अरुचि, दाह, जळजळ, तहान, ताप व निद्रानाश हे विकार होतात, घट्ट तूप त्या जागीं ठेविलें असतां तें वितळतें, व व्रणाप्रमाणेंच सुजलेल्या जागीं हात लावला असतां तो सहन होत नाहीं.

पक्केऽल्पवेगता म्लानिः पांडुता वलिसंभवः ।
नामोऽतेषून्नतिर्मध्ये कंडूशोफादिमार्दवम् ॥ ५ ॥
स्पृष्टे पूयस्य संचारो भवेद्बस्ताविवांभसः ।

सूज पिकली म्हणजे वेदना कमी होतात, सुजलेली जागा म्लान व फटफटीत होऊन तिच्यावर सुरकुत्या पडतात. सुजेच्या कडा खालीं बसून मध्यभाग बराच उठलेला असतो. खाज, सूज वगैरे कमी होतात आणि पाण्यानें भरलेली पखाल हातानें दाबली असतां ज्याप्रमाणें तिच्यांतील पाणी हालूं लागतें, त्याचप्रमाणें सुजलेली जागा दाबली असतां आंतील पू इकडे तिकडे फिरूं लागतो.

शूलं नर्तेऽनिलाद्दाहः पित्ताच्छोफः कफोदयात् ॥ ६ ॥
रागो रक्ताच्च पाकः स्यादतो दोषैः सशोणितैः ।

वायूवांचून शूल नाहीं, पित्तावांचून दाह नाहीं, कफावांचून सूज नाहीं आणि रक्तावांचून लाली नाहीं. (सारांश, सूज पिकण्यांत रक्तयुक्त त्रिदोष असतात.)

पाकेऽतिवृत्ते सुषिरस्तनुत्वग्दोषभक्षितः ॥ ७ ॥
वलीभिराचितः श्यावः शीर्यमाणतनूरुहः ।

सूज जास्त पिकली म्हणजे आंतील भाग पोकळ होतो, वरची त्वचा पातळ व काळसर होते, सुरकुत्या पडतात, आणि केंस गळतात.

कफजेषु तु शोफेषु गंभीरं पाकमेत्यसृक् ॥ ८ ॥
पक्वलिंगं ततोऽस्पष्टं यत्र स्याच्छीतशोफता ।
त्वक्सावर्ण्यं रुजोऽल्पत्वं घनस्पर्शत्वमश्मवत् ॥ ९ ॥
रक्तपाकमिति ब्रूयात्तं प्राज्ञो मुक्तसंशयः ।

कफजन्य सुजेंत फार खोल जागीं रक्ताचा पाक होतो. म्हणून त्यांत पिकल्याचीं लक्षणें स्पष्ट दिसत नाहींत. ज्या सुजेंत शीतता,

त्वचेचा समानवर्ण, कमी ठणका व दगडासारखा काठिण स्पर्श, हीं लक्षणें आढळतील, तीं निःसंशय रक्तपाक आहे असें वैद्यानें समजावें.

अल्पसत्वेऽबले बाले पाके चाऽत्यर्थमुद्धते ॥ १० ॥
दारणं मर्मसंध्यादिस्थिते चाऽन्यत्र पाटनम् ।

भित्रीं व अशक्त माणसें व मुलें यांची सूज व अतिशय पिकलेली सूज, त्याचप्रमाणें मर्मे, सांधे वगैरे ठिकाणची सूज ( पोटीस, क्षार वगैरे औषधांनीं ) फोडून टाकावी. याखेरीज इतर प्रकारची सूज शस्त्रानें फाडावी.

आमच्छेदे सिरास्नायुव्यापदोसृगतिस्रुतिः ॥ ११ ॥
रुजोऽतिवृद्धिर्दरणं विसर्पो वा क्षतोद्भवः ।

कच्ची सूज शस्त्रानें चिरली तर शिरा व स्नायु यांस विकृति होते, अतिशय रक्त जातें, वेदना अतिशय वाढतात, व्रण पसरतो, किंवा त्या क्षतापासून विसर्प होतो.

तिष्ठन्नंतः पुनः पूयः सिरास्नाय्वसृगामिषम् ॥ १२ ॥
विवृद्धो दहति क्षिप्रं तृणोलपमिवानलः ।

पू आंत तसाच राहूं दिल्यास तो फार वाढून जसा अग्नि गवताची रास जाळतो, तसा शिरा, स्नायु, रक्त व मांस यांस जाळतो.

यश्छिनत्त्याममज्ञानाद्यश्च पक्कमुपेक्षते ॥ १३ ॥
श्वपचाविव विज्ञेयौ तावनिश्चितकारिणौ ।

जो वैद्य अज्ञानानें कच्ची सूज कापतो व जो पक्क सुजेची उपेक्षा करतो, ते दोघेही अविचारानें काम करणारे चांडालच समजावेत.

प्राक् शस्त्रकर्मणश्चेष्टं भोजयेदन्नमातुरम् ॥ १४ ॥
पानपं पाययेन्मद्यं तीक्ष्णं यो वेदनाक्षमः ।
न मूर्छत्यन्नसंयोगान्मत्तः शस्त्रं न बुध्यते ॥ १५ ॥
अन्यत्र मूढगर्भाश्ममुखरोगोदरातुरात् ।

शस्त्रक्रिया करण्यापूर्वी रोग्यास आवडतें अन्न खाऊं घालावें. आणि जो शस्त्रक्रियेच्या वेदना सहन करण्याजोगा नसेल त्यास दारू पिण्याची संवय असल्यास तीव्र मद्य पाजावें. अन्न खाल्या-

मुळें त्यास मूर्च्छा येत नाहीं व दारूच्या अमलांत शस्त्राच्या वेदना कळत नाहींत. मूढगर्भ, मूतखडा, मुखरोग व उदर हे रोग असलेल्यास मात्र इष्टभोजन व मद्यपान देऊं नये.

अथाहृतोपकरणं वैद्यः प्राङ्मुखमातुरम् ॥ १६ ॥
संमुखो यंत्रयित्वाऽशु न्यस्येन्मर्मादि वर्जयन् ।
अनुलोमं सुनिशितं शस्त्रमापूयदर्शनात् ॥ १७ ॥
सकृदेवाऽहरेत्तच्च

वैद्यानें शस्त्रक्रियेस लागणारी सर्व सामुग्री जमा करून हातपाय बांधलेल्या रोग्यास आपल्यासमोर पूर्वाभिमुख ठेवून, मर्मस्थानें राखून, तीक्ष्णधारेचें शस्त्र, तत्काल, पू येईपर्यंत, एकदम भोंसकावें व तसेंच एकदम बाहेर काढावें.

पाके तु सुमहत्यपि ।
पाटयेद् द्व्यंगुलं सम्यग्द्व्यंगुलत्र्यंगुलांतरम् ॥ १८ ॥
एषित्वा सम्यगेषिण्या परितः सुनिरूपितम् ।
अंगुलीनालवालैर्वा यथादेशं यथाशयम् ॥ १९ ॥

अतिशय मोठा पाक असला तरी दोन बोटेंच चिरावें. नंतर त्या व्रणापासून दोन किंवा तीन बोटांच्या अंतरावर, सळईनें किंवा बोट, कमळाचा देंठ, अथवा केंस यांपैकीं कशानें तरी व्रणाची जागा व पू वगैरे गोष्टींचा सर्व प्रकारें पुरता तपास करून, सूज व पुवाची जागा यांच्या बेतानें दुसरा व्रण करावा.

यतो गतां गतिं विद्यादुत्संगो यत्र यत्र च ।
तत्र तत्र व्रणं कुर्यात्सुविभक्तं निराशयम् ॥ २० ॥
आयतं च विशालं च यथा दोषो न तिष्ठति ।

पुवाची गति आंतून जिकडे जिकडे गेली असेल व ज्या ज्या ठिकाणीं उंचवटा दिसेल त्या त्या जागीं व्रण करावा. त्याच्या कडा साफ निराळ्या केलेल्या असाव्या. आंत पू राहण्यास जागा ठेवूं नये. त्याचें तोंड लांब व रुंद असावें. सारांश त्यांत पू राहणार नाहीं असा व्रण करावा.

शौर्यमाशुक्रिया तीक्ष्णं शस्त्रमस्वेदवेपथुः ॥ २१ ॥
असंमोहश्च वैद्यस्य शस्त्रकर्मणि शस्यते ।

शस्त्रक्रिया करतांना धैर्य, हातचलाखी, तीक्ष्ण शस्त्र, घाम न

येणें, न कांपणें, व प्रसंगावधान हे गुण वैद्याच्या अंगीं असले पाहिजेत.

तिर्यक् छिंद्याल्ललाटभ्रूदंतवेष्टकजत्रुणि ॥ २२ ॥
कुक्षिकक्षाक्षिकूटौष्ठकपोलगलवंक्षणे ।
अन्यत्र छेदनात्तिर्यक् सिरास्नायुविपाटनम् ॥ २३ ॥

कपाळ, भिंवया, दांतांच्या हिरड्या, सरी ( बाहु व गळा यांचा संधि ), कूस, खांक, डोळ्याच्या खांचेच्या कडा, ओंठ, गाल, गळा व जांघाड या ठिकाणीं आडवा छेद करावा. याशिवाय इतर ठिकाणीं आडवें कापल्यास शिरा व स्नायु तुटतील.

शस्त्रेऽवचारिते वाग्भिः शीतांभोभिश्च रोगिणम् ।
आश्वास्य परितोऽगुल्या परिपीड्य व्रणं ततः ॥ २४ ॥
क्षालयित्वा कषायेण प्लोतेनांभोऽपनीय च ।
गुग्गुल्वगुरुसिद्धार्थहिंगुसर्जरसान्वितैः ॥ २५ ॥
धूपयेत्पटुषड्ग्रंथानिंबपत्रैर्घृतप्लुतैः ।

शस्त्रक्रिया झाल्यावर गोष्टी बोलून व त्याच्या अंगावर पाणी शिंपून रोगी हुशार झाला म्हणजे व्रणासभोंवतीं बोटानें दाबून आंतील पू वगैरे सर्व दोष काढून टाकावे. नंतर स्तंभक औषधांच्या काढ्यानें व्रण धुऊन फडक्याच्या बोळ्यानें पुसून काढावा, आणि मग गुग्गुळ, अगर, शिरस, हिंग, राळ, सैंधव, वेखंड व कडूलिंबाचीं पानें या द्रव्यांस तूप लावून त्यांची धुरी जखमेस द्यावी.

तिलकल्काज्यमधुभिर्यथास्वं भेषजेन च ॥ २६ ॥
दिग्धां वर्तिं ततो दद्यात्तैरेवाऽच्छादयेच्च तम् ।
घृताक्तैः सक्तुभिश्चोर्ध्वम्

नंतर त्या त्या व्रणावर सांगितलेलीं औषधें, तिळांचा करक, तूप व मध यांचा वातीस लेप करून ती वात व्रणांत घालावी आणि वरील औषधांनींच व्रणाचें तोंड झांकावें. त्यावर सातूचें पीठ व तूप मिळवून त्याची गोळी बसवावी.

घनां कवलिकां ततः ॥ २७ ॥
निधाय युक्त्या बध्नीयात्पट्टेन सुसमाहितम् ।
पार्श्वे सव्येऽपसव्ये वा नाऽधस्तान्नैव चोपरि ॥ २८ ॥

त्यावर पुन्हा फडक्याची जाड घडी ठेवून युक्तिपूर्वक जाड कपड्याचा पट्टा बांधावा. त्याची गांठ व्रणाच्या उजव्या किंवा डाव्या बाजूस द्यावी; खालीं किंवा वर देऊं नये.

शुचिसूक्ष्मदृढाः पट्टाः कवल्यः सविकेशिकाः।
धूपिता मृदवः श्लक्ष्णा निर्वलीका व्रणे हिताः॥ २९॥

व्रणांत वापरण्याचीं फडकीं स्वच्छ, बारीक व मजबूत असावीं. आणि घड्या व वाती मऊ व गुळगुळीत असून त्यांस धुरी दिलेली असावी; व सुरकुत्या पडलेल्या नसाव्या.

कुर्वीताऽनंतरं तस्य रक्षां रक्षोनिषिद्धये।
बलिं चोपहरेत्तेभ्यः।

नंतर रोग्यास पिशाचादिकांनीं बाधा करूं नये, म्हणून त्यांस अन्नाचा बळी देऊन रोग्याची रक्षा करावी.

सदा मूर्ध्नाऽवधारयेत्॥ ३०॥
लक्ष्मीं गुहामतिगुहां जटिलां ब्रह्मचारिणीम्।
वचां छत्रामतिच्छत्रां दूर्वां सिद्धार्थकानपि॥ ३१॥

पांढरी तुळस, सालवण, पिठवण, जटामांसी, ब्राह्मी, वेखंड, बाळंतशेप, बडीशेप, दूर्वा व शिरस या औषधी रोग्यानें नेहमीं डोक्यावर ठेवाव्या.

ततः स्नेहदिनेहोक्तं तस्याऽचारं समादिशेत्।

नंतर त्यास स्नेहविधींत सांगितलेले पथ्याचे आहारविहार करावयास सांगावें.

दिवास्वप्नो व्रणे कंडूरागरुक्शोफपूयकृत्॥ ३२॥

दिवसा निजल्यानें व्रणांत खाज, लाली, ठुसठूस, सूज व पू हीं उत्पन्न होतात.

स्त्रीणां तु स्मृतिसंस्पर्शदर्शनैश्चलितस्त्रुते।
शुक्रे व्यवायजान् दोषानसंसर्गेऽप्यवाप्नुयात्॥ ३३॥

स्त्रियांच्या स्मरणानें, स्पर्शानें किंवा त्यांस पाहिल्यानें वीर्य स्वस्थानापासून च्युत होऊन त्याचा स्राव झाला असतां प्रत्यक्ष संसर्गाशिवायही संभोगापासून होणारे विकार उद्भवतात.

भोजनं तु यथासात्म्यं यवगोधूमषाष्टिकाः।

मसूरमुद्गतुवरीजीवंतीसुनिषण्णकाः ॥ ३४ ॥
बालमूलकवार्ताकतंडुलीयकवास्तुकम् ।
कारवेल्लककर्कोटपटोलकटुकाफलम् ॥ ३५ ॥
सैंधवं दाडिमं धात्री घृतं तप्तहिमं जलम् ।
जीर्णशाल्योदनं स्निग्धमल्पमुष्णं द्रवोत्तरम् ॥ ३६ ॥
भुंजानो जांगलैर्मांसैः शीघ्रं व्रणमपोहति ।

जव, गहूं, साठेसाळी, मसुरा, मूग, तुरीची डाळ, हरणदोडी, कुरडूची भाजी, कोंवळे मुळे, वांगें, तांदुळजा, चुका, कारलीं, करटोलीं, कडू एडवळ, कुटकीचें फळ, सैंधव, डाळिंब, आंवळे, तूप, तापवून थंड केलेलें पाणी आणि जुन्या साळीचा भात यांपैकीं ज्यास जे पदार्थ खाण्याची नेहमीं संवय असेल, ते पदार्थ त्यानें खावे; किंवा जुन्या साळीच्या तांदळांचा स्निग्ध असा भात जांगलमांसाच्या रसाशीं बेतानेंच खाऊन वर ऊन पाणी प्यावें. यायोगानें जखम लवकर बरी होते.

अशितं मात्रया काले पथ्यं याति जरां सुखम् ॥ ३७ ॥
अजीर्णे त्वनिलादीनां विभ्रमो बलवान् भवेत् ।
ततः शोफरुजापाकदाहानाहानवाप्नुयात् ॥ ३८ ॥

हितकर अन्न बेतानें व योग्य वेळीं खाल्लें म्हणजे तें सुखानें पचतें. अजीर्ण झाल्यास वातादि दोष अतिशय कुपित होऊन व्रणांत सूज, ठणका, पाक, दाह व पोट फुगणें हे विकार उत्पन्न करितात.

नवधान्यं तिलान् माषान् मद्यं मांसं त्वजांगलम् ।
क्षीरेक्षुविकृतीरम्लं लवणं कटुकं त्यजेत् ॥ ३९ ॥
यच्चाऽन्यदपि विष्टंभि विदाहि गुरु शीतलम् ।
वर्गोऽयं नवधान्यादिर्व्रणिनः सर्वदोषकृत् ॥ ४० ॥

नवें धान्य, तीळ, उडीद, मद्य, जांगल खेरीज करून इतर मांस, दूध व उंसाच्या रसाचे पदार्थ, आंबट, खारट व तिखट पदार्थ, आणि इतर जे जे म्हणून अवष्टंभ करणारे, विदाही, जड व थंड पदार्थ असतील ते सर्व वर्ज्य करावे. वरील पदार्थ व्रणी रोग्याचे तिन्ही दोष कुपित करितात.

मद्यं तीक्ष्णोष्णरूक्षाम्लमाशु व्यापादयेद्व्रणम्।

दारू तीक्ष्ण, उष्ण, रूक्ष व आंबट असल्यामुळें तावडतोब व्रणास बिघडविते.

वालोशीरैश्च वीज्येत न चैनं परिघट्टयेत् ॥ ४१ ॥
न तुदन्न च कंडूयेच्चेष्टमानश्च पालयेत्।
स्निग्धवृद्धद्विजातीनां कथाः शृण्वन्मनःप्रियाः ॥ ४२ ॥
आशावान् व्याधिमोक्षाय क्षिप्रं व्रणमपोहति।

व्रणांत दाह झाल्यास चवरीनें किंवा वाळयाच्या पंख्यानें वारा घालावा. परंतु व्रण घसूं नये, टोंचूं नये किंवा खाजवूं नये. कोणतेंही काम करतांना व्रणास धक्का न लागूं देण्याविषयीं खबरदारी घ्यावी. स्नेही, वृद्ध व ब्राह्मण यांजकडून मनास आवडत्या गोष्टी ऐकाव्या, आणि रोग बरा होण्याविषयीं आशा धरून असावें. म्हणजे व्रण लवकर बरा होतो.

तृतीयेऽह्नि पुनः कुर्याद्व्रणकर्म च पूर्ववत् ॥ ४३ ॥

तिसऱ्या दिवशीं पुन्हा पहिल्या दिवसासारखें प्रक्षाळनादिक कर्म करावें.

प्रक्षालनादि दिवसे द्वितीये नाचरेत्तथा।
तीव्रव्यथो विग्रथितश्चिरात्संरोहति व्रणः ॥ ४४ ॥

दुसऱ्या दिवशीं तें करूं नये. केल्यास व्रणांत तीव्र वेदना होतात, गांठी उत्पन्न होतात, व जखम भरून येण्यास उशीर लागतो.

स्निग्धां रूक्षां श्लथां गाढां दुर्न्यस्तां च विकोशिकाम्।
व्रणे न दद्यात्कल्कं च

व्रणांत वात घालावयाची ती फार स्निग्ध, रूक्ष, ढिली, वांकडी किंवा घट्ट नसावी. कल्कही असा नसावा.

स्नेहात्क्लेदो विवर्धते ॥ ४५ ॥
मांसच्छेदोऽतिरुग्रौक्ष्याद्दरणं शोणितागमः।
श्लथातिगाढदुर्न्यासैर्व्रणवर्त्मावघर्षणम् ॥ ४६ ॥

फार स्निग्धतेनें क्लेद वाढतो. अतिरूक्षतेनें मांस तुटतें, व्रण फाटतो व रक्त येतें. फार सैल किंवा घट्ट अथवा वांकडी तिकडी वात घातल्यानें व्रणांच्या कडा घांसतात.

सपूतिमांसं सोत्संगं सगतिं पूयगर्भिणम् ।
व्रणं विशोधयेच्छीघ्रं स्थिता ह्यंतर्विकेशिका ॥ ४७ ॥

ज्या व्रणांतील मांस दुर्गंधी आहे, ज्यांत उंचवटे आहेत आणि आंत नाडीव्रण (पोकळी,) व पू आहे अशा व्रणांत वात घालून ठेविली असतां ती त्याचें लवकर शोधन करिते.

व्यम्लं तु पाटितं शोफं पाचनैः समुपाचरेत् ।
भोजनैरुपनाहैश्च नातिव्रणाविरोधिभिः ॥ ४८ ॥

अपक्क सूज चुकीनें पक्क समजून चिरल्यास त्यावर सुजेस पिकवणारीं, परंतु व्रणास फारशीं विरुद्ध नसलेलीं अशीं पोटिसें बांधून व अशाच प्रकारचें अन्न खाऊन ती पिकवावी.

सद्यः सद्यो व्रणान् सीव्येद्विवृतानभिघातजान् ।
मेदोजान् लिखितान् ग्रंथीन् हस्वाः पालीश्च कर्णयोः ४९
शिरोक्षिकूटनासौष्ठगंडकर्णोरुबाहुषु ।
ग्रीवाललाटमुष्कस्फिङ्मेढ्पाय्वुदरादिषु ॥ ५० ॥
गंभीरेषु प्रदेशेषु मांसलेष्वचलेषु च ।
न तु वंक्षणकक्षाद्यावल्पमांसचले व्रणान् ॥ ५१ ॥
वायुनिर्वाहिणः शल्यगर्भान्क्षाराविषाग्निजान् ।

आघातापासून झालेल्या ताज्या जखमा त्यांचीं तोंडें पसरट असतां ताबडतोब शिवाव्या. मेदोजन्य गाठी व लहान असल्या तरी कानाच्या पाळी यांचें लेखन करून त्या शिवाव्या; डोकें, डोळ्यांच्या खळग्याच्या कडा, नाक, ओठ, गळा, कान, मांड्या, दंड, मान, कपाळ, अंडकोष, मांड्यावरचा भाग, शिस्न, गुद, पोट इत्यादि अंगावरचे, खोल जागचे, आणि मांसल व स्थिर भागावरचे ताजे व्रण तत्काल शिवावे. जांवाड, बगला, वगैरे ज्या ठिकाणीं थोडें मांस आहे व ज्या जागा नेहमीं हालणाऱ्या आहेत त्या ठिकाणचे व्रण, तसेंच ज्यांतून वायु वाहतो, ज्यांत शल्य आहे, किंवा जे क्षार, विष अथवा अग्नि यांपासून झालेले आहेत असे व्रण शिवूं नयेत.

सीव्येच्चलास्थिशुष्कास्रतृणरोमापनीय तु ॥ ५२ ॥
प्रलंबि मांसं विच्छिन्नं निवेश्य स्वनिवेशने ।
संध्यस्थ्यवस्थिते रक्ते स्नाय्वा सूत्रेण वल्कलैः ॥ ५३ ॥

व्रण शिवण्यापूर्वी त्यांतील हालणारें हाड, सुकलेलें रक्त, गवताच्या काड्या, केंस वगैरे काढून टाकून, तुटून लोंबणारें मांस, सांधे व हाडें जागच्या जागीं बसवून, रक्त वाहणें थांबलें म्हणजे स्नायूनें, सुतानें किंवा झाडाच्या सालीच्या दोरानें शिवावें.

सीव्येन्न दूरे नाऽसन्ने गृह्णन्नाल्पं न वा बहु ।

टांके फार जवळ जवळ किंवा फार दूर दूर देऊं नयेत. तसेंच शिवण्याच्या वेळीं व्रणाच्या कडा फार कमी किंवा फार जास्तीही घेऊं नयेत.

सांत्वयित्वा ततश्चार्तं व्रणे मधुघृतद्रुतैः ॥ ५४ ॥
अंजनक्षौमजमषीफलिनीशल्लकीफलैः
सरोध्रमधुकैर्दिग्धे युंज्याद्बंधादि पूर्ववत् ॥ ५५ ॥

जखम शिवल्यानंतर रोग्यास थंड पाणी शिंपडणें, वारा घालणें वगैरे उपचारांनीं हुशार करून, सुरमा, तागाची राख, गहुला आणि साळईचें फळ, लोध्र व ज्येष्ठमध यांचें चूर्ण मधांत व तुपांत कालवून जखमेवर लावावें, आणि वरून पूर्वीप्रमाणें पट्टया वगैरे बांधाव्या.

व्रणो निःशोणितौष्ठो यः किंचिदेवावलिख्य तम् ।
संजातरुधिरं सीव्येत्संधानं ह्यस्य शोणितम् ॥ ५६ ॥

ज्या जखमेच्या कडा त्यांत रक्ताचा अंश नसल्यामुळें कोरड्या पडल्या असतील त्या शस्त्रानें किंचित् खरवडून रक्तानें भरल्या म्हणजे मग शिवाव्या. कारण रक्त हेंच जखम सांधणारें आहे.

बंधनानि तु देशादीन् वीक्ष्य युंजीत तेषु च ।

पट्ट वगैरे बांधावयाचे ते देशकाल वगैरे पाहून बांधावे.

आविकाजिनकौशेयमुष्णं क्षौमं तु शीतलम् ॥ ५७ ॥
शीतोष्णं तूलसंतानकार्पासस्नायुवल्कजम् ।

लोंकरीचें कापड, हरणाचें कातडें व रेशमी वस्त्र हीं उष्ण आहेत. तागाचें वस्त्र थंड, आणि कापसाचें, स्नायूचें व झाडांच्या सालीचें वस्त्र समशीतोष्ण असतें.

ताम्रायस्त्रपुसीसानि व्रणे मेदःकफाधिके ॥ ५८ ॥
भंगे च युंज्यात्फलकं चर्मवल्ककुशादि च ।

मेदःकफाधिक व्रणांत तांबें, लोखंड, कथील व शिसें यांच्या पत्र्याच्या पट्ट्या बांधाव्या. आणि अस्थिभंगांत लांकडाची फळी, चामडें, झाडाची साल किंवा बांबूची कांब यांची योजना करावी.

स्वनामानुगताकारा बंधास्तु दश पंच च ॥ ५९ ॥
कोशस्वस्तिकमुत्तोलीचीनदामानुवेल्लितम् ।
खट्वाविबंधस्थगिकावितानोत्संगगोफणाः ॥ ६० ॥
यमकं मंडलाख्यं च पंचांगी चेति योजयेत् ।
यो यत्र सुनिविष्टः स्यात्तं तेषां तत्र बुद्धिमान् ॥ ६१ ॥

आपापल्या नांवाप्रमाणें आकाराचे एकंदर १५ व्रणबंध आहेत. ते येणेंप्रमाणें— १ कोशबन्ध, २ स्वस्तिकबन्ध, ३ मुत्तोलीबन्ध, ४ चीनबन्ध, ५ दामबन्ध, ६ अनुवेल्लितबन्ध, ७ खट्वाबन्ध, ८ विबन्धबन्ध, ९ स्थगिकाबन्ध, १० वितानबन्ध, ११ उत्सङ्गबन्ध, १२ गोफणबन्ध, १३ यमकबन्ध, १४ मण्डलबन्ध, व १५ पंचांगीबन्ध.

बध्नीयाद्गाढमूरुस्फिक्कक्षावंक्षणमूर्धसु ।

मांड्या, कुले, कांख, जांघाडे व मस्तक या ठिकाणीं पट्टा घट्ट बांधावा.

शाखावदनकर्णोरःपृष्ठपार्श्वगलोदरे ॥ ६२ ॥
समं मेहनमुष्के च

हात, पाय, तोंड, कान, छाती, पाठ, कुशी, गळा, पोट, शिस्न व अंडकोष या ठिकाणीं पट्टा अंगाबरोबर बांधावा.

नेत्रे संधिषु च श्लथम् ।

डोळे व सांधे यांवर सैल बांधावा.

---

१ या बंधांचा उपयोग खालीं दिलेल्या जागीं करावाः— १ बोटाच्या पेरांत; २ सांधे, भिवयांचा मध्यभाग, भिवया, स्तनांचा मध्यभाग, कांख, डोळे, गाल व कान या ठिकाणीं; ३ मान व शिस्न यांवर; ४ डोळ्यांच्या बाहेरच्या कोंपऱ्यावर, ५ सांधे, जांघाडे वगैरे जागीं; ६ हातापायांत; ७ हनवटी, सांधे व गाल या ठिकाणीं; ८ पोट, मांड्या व पाठ यांवर; ९ आंगठा, बोटें, शिस्न, अंत्रवृद्धि व मूत्रवृद्धि यांवर; १० डोक्यासारख्या स्थूल जागीं; ११ दंड वगैरे लांब जागीं; १२ नाक, ओंठ, हनुवटी व मांड्या यांवर; १३ जवळच्या दोन व्रणांवर; १४ वाटोळ्या जागीं व १५ मानेच्या वरच्या भागावर.

बध्नीयाच्छिथिलस्थाने वातश्लेष्मोद्भवे समम् ॥ ६३ ॥
गाढमेव समस्थाने भृशं गाढं तदाश्रये ।
शीते वसंते च तथा मोक्षणीयौ त्र्यहात्र्यहात् ॥ ६४ ॥

ज्या जागीं सैल पट्टा बांधावयास सांगितला आहे, त्या जागीं जर वातकफजन्य व्रण असतील तर पट्टा मध्यम जोरानें बांधावा. मध्यम जोरानें बांधावयास सांगितला असल्यास आवळून बांधावा. आणि गच्च बांधावयास सांगितला असल्यास खूपच घट्ट बांधावा. वातकफजन्य व्रण हेमंत, शिशिर व वसंत ऋतूंत तीन तीन दिवसांनीं सोडावे.

पित्तरक्तोत्थयोर्बंधो गाढस्थाने समो मतः ।
समस्थाने श्लथो नैव शिथिलस्याशये तथा ॥ ६५ ॥
सायंप्रातस्तयोर्मोक्षो ग्रीष्मे शरदि चेष्यते ।

पित्तरक्तजन्य व्रण असल्यास ज्या जागीं घट्ट पट्टा बांधावयास सांगितलें असेल त्या जागीं मध्यम व मध्यमाच्या ऐवजीं सैल बांधावा. आणि सैल बांधण्याच्या ठिकाणीं मुळींच बांधूं नये. पित्तजन्य व रक्तजन्य व्रणांचे पट्टे ग्रीष्म व शरदृतूंत सकाळ-संध्याकाळीं सोडावे.

अबद्धो दंशमशकशीतवातादिपीडितः ॥ ६६ ॥
दुष्टीभवेच्चिरं चाऽत्र न तिष्ठेत्स्नेहभेषजम् ।
कृच्छ्रेण शुद्धिं रूढिं वा याति रूढो विवर्णताम् ॥ ६७ ॥

व्रणावर पट्टा न बांधतां तो मोकळा ठेविल्यास डांस, माशा किंवा थंड वारा यांच्या योगानें दूषित होतो, लावलेलें मलम किंवा दुसरें औषध फार वेळ आंत टिकत नाहीं, जखम वाहून भरून येण्यास उशीर लागतो आणि भरल्यावरही त्या जागेवरच्या चामडीचा रंग बदलतो.

बद्धस्तु चूर्णितो भग्नो विश्लिष्टः पाटितोऽपि वा ।
छिन्नस्नायुसिरोऽप्याशु सुखं संरोहति व्रणः ॥ ६८ ॥
उत्थानशयनाद्यासु सर्वेहासु न पीडयेत् ।

पट्टा बांधल्यानें, ज्या व्रणांत हाडें चुरलीं आहेत, मोडलीं आहेत, सांधा सुटला आहे, जो फाडलेला आहे, आणि ज्यांत स्नायु

व शिरा तुटल्या आहेत, असे सर्व प्रकारचे व्रण लवकर व अनायासें भरून येतात; आणि उठणें निजणें वगैरे सर्व क्रिया करतांना दुखत नाहींत.

उद्वृत्तौष्ठः समुत्सन्नो विषमः कठिनोऽतिरुक् ॥ ६९ ॥
समो मृदुररुक् शीघ्रं व्रणः शुध्यति रोहति ।

ज्या व्रणाच्या कडा वर वळल्या आहेत, जो वर उचललेला, वांकडा तिकडा व कठिण असून ज्यांत अतिशय वेदना होतात, असा व्रण बांधल्यानें सारखा, मऊ होतो आणि दुखावयाचें बंद होऊन त्याचें शोधन व रोपण लवकर होतें.

स्थिराणामल्पमांसानां रौक्ष्यादनुपरोहताम् ॥ ७० ॥
प्रच्छाद्यमौषधं पत्रैर्यथादोषं यथर्तु च ।
अजीर्णतरुणाऽच्छिद्रैः समंतात्सुनिवेशितैः ॥ ७१ ॥
धौतैरकर्कशैः क्षीरिभूर्जार्जुनकदंबजैः ।

व्रण फार दिवसांचे असून त्यांत मांसल भाग कमी असल्यास, रूक्षतेमुळें ते भरून येत नाहींत. करितां त्यांवर औषध लावून त्यावर दोष व ऋतु यांचा विचार करून वड, पिंपळ वगैरे क्षीरीवृक्ष, भोजवृक्ष, अर्जुनसादडा किंवा कळंब यांचीं घड, कोंवळीं, छिद्ररहित, मऊ व धुतलेलीं अशीं पानें सभोंवतीं बसवावीं.

कुष्ठिनामग्निदग्धानां पिटिका मधुमेहिनाम् ॥ ७२ ॥
कर्णिकाश्चोंदुरुविषे क्षारदग्धा विषान्विताः ।
न मांसपाके च बध्नीयाद्गुदपाके च दारुणे ॥ ७३ ॥
शीर्यमाणाः सरुग्दाहाः शोफावस्थाविसर्पिणः ।

कुष्ठाचे, विस्तवानें भाजल्याचे, व मधुमेहाच्या पुळ्यांचे व्रण, तसेंच उंदराच्या विषाचे, क्षारानें भाजून झालेले किंवा इतर विषानें युक्त व्रण यांवर पट्टा बांधूं नये. ज्या व्रणांत मांस पिकलें असेल तो व्रण व दारुण गुदपाक हे बांधूं नयेत. तसेंच ज्यांतील मांस कुजून गळूं लागलें असेल, ज्यांत वेदना व आग होत असेल आणि जे सुजलेले व पसरणारे असतील असे व्रण बांधूं नयेत.

अरक्षया व्रणे यस्मिन् मक्षिका निक्षिपेत्कृमीन् ॥ ७४ ॥
ते भक्षयंतः कुर्वंति रुजाशोफास्रसंस्रवान् ।

सुरसादि प्रयुंजीत तत्र धावनपूरणे ॥ ७५ ॥
सप्तपर्णकरंजार्कनिंबराजादनत्वचः ।
गोमूत्रकल्किता लेपः सेकः क्षारांबुना हितः ॥ ७६ ॥
प्रच्छाद्य मांसपेश्या वा व्रणं तानाशु निर्हरेत् ।

व्रणाचें रक्षण न केल्यानें त्यावर माशा बसून आंत जे कृमि टाकतात, ते व्रणाचें मांस खाऊन वेदना, सूज व रक्तस्राव उत्पन्न करितात. यावर सुरसादि गणांतील औषधांच्या काढ्यानें व्रण धुवावे व त्यांचेंच चूर्ण किंवा कल्क करून तें व्रण भरून आणण्याकरितां घालावें. सातवीण, करंज, रुई, कडू लिंब व चारोळीचें झाड यांच्या साली गोमूत्रांत वाटून त्यांचा लेप करावा. क्षाराच्या पाण्याची धार धरावी, किंवा एक मांसाचा तुकडा व्रणावर ठेवून त्यास कृमि चिकटले म्हणजे तो बाहेर काढून टाकावा.

न चैनं त्वरमाणोऽतःसदोषमुपरोहयेत् ॥ ७७ ॥
सोऽल्पेनाप्यपचारेण भूयो विकुरुते यतः ।

व्रणांत पू वगैरे दोष शिल्लक असतां वैद्यानें घाई करून तो तसाच भरून आणूं नये. कारण तसें केल्यास रुजलेला व्रणही थोड्याशा अपथ्यानें पुन्हा विकृत होतो.

रूढेऽप्यजीर्णव्यायामव्यवायादीन् विवर्जयेत् ॥ ७८ ॥
हर्षं क्रोधं भयं वापि यावदास्थैर्यसंभवात् ।
आदरेणानुवर्त्योऽयं मासान्षट् सप्त वा विधिः ॥ ७९ ॥

व्रण भरून आल्यानंतरही त्यास चांगली स्थिरता प्राप्त होईपर्यंत अजीर्ण, व्यायाम, मैथुन, हर्ष, क्रोध, भीति वगैरे गोष्टी वर्ज्य कराव्या. निदान सहा सात महिनेपर्यंत हें पथ्य काळजीनें पाळावें.

उत्पद्यमानासु च तासु तासु वार्तासु दोषादिबलानुसारी ।
तैस्तैरुपायैः प्रयतश्चिकित्सेदालोचयन् विस्तरमुत्तरोक्तम् ॥८०॥

व्रणांची चिकित्सा करतांना जे जे विकार उत्पन्न होतील त्यांवर दोषादिकांचें बल व पुढें उत्तरस्थानांत सांगितलेली सविस्तर चिकित्सा यांचा विचार करून तदनुसार योग्य ते उपाय योजून यत्नपूर्वक व्रण बरे करावे.

---

# अध्याय तिसावा.

अथाऽतः क्षाराग्निकर्मविधिमध्यायं व्याख्यास्यामः ।

आतां क्षारक्रिया व अग्निक्रिया यांविषयीं माहिती सांगतों.

सर्वशस्त्रानुशस्त्राणां क्षारः श्रेष्ठो बहूनि यत् ।
छेद्यभेद्यादिकर्माणि कुरुते विषमेष्वपि ॥ १ ॥
दुःखावचार्यशस्त्रेषु तेन सिद्धिमयात्सु च
अतिकृच्छ्रेषु रोगेषु यच्च पानेऽपि युज्यते ॥ २ ॥

एकंदर शस्त्रें व अनुशस्त्रें यांत क्षार श्रेष्ठ आहे. कारण, ज्या ठिकाणीं शस्त्राचा उपयोग करतां येत नाहीं, अशा अवघड जागीं कापणें वगैरे अनेक प्रकारचीं कामें तो कारितो. ज्या ठिकाणीं शस्त्र चालविण्यांत फार कष्ट पडतात त्याठिकाणीं, जे रोग शस्त्रानें बरे होत नाहींत अशा रोगांवर, व अतिशय कष्टसाध्य रोगांवर त्याच प्रमाणें पोटांत घेण्यासही तो उपयोगीं पडतो.

स पेयोऽर्शोऽग्निसादाश्मगुल्मोदरगरादिषु ।

मूळव्याध, अग्निमान्द्य, मूतखडा, गुल्म, उदर, विष इत्यादि विकारांवर क्षार पोटांत द्यावा.

योज्यः साक्षान्मषश्वित्रबाह्यार्शःकुष्ठसुप्तिषु ॥ ३ ॥
भगंदरार्बुदग्रंथिदुष्टनाडीव्रणादिषु ।

मस, पांढरें कोड, मूळव्याधीचे बाहेरचे मोड, कुष्ठ, सुनबहिरी, भगंदर, अर्बुद, ग्रंथी, दुष्ट नाडीव्रण, इत्यादि रोगांत क्षाराचा वर लेप करावा.

न तूभयोऽपि योक्तव्यः पित्ते रक्ते चलेऽबले ॥ ४ ॥
ज्वरेऽतिसारे हृन्मूर्धरोगे पांड्वामयेऽरुचौ ।
तिमिरे कृतसंशुद्धौ श्वयथौ सर्वगात्रगे ॥ ५ ॥
भीरुगर्भिण्यृतुमतीप्रोद्वृत्तफलयोनिषु ।
अजीर्णेऽन्ने शिशौ वृद्धे धमनीसंधिमर्मसु ॥ ६ ॥
तरुणास्थिसिरास्नायुसेवनीगलनाभिषु ।
देशेऽल्पमांसे वृषणमेढ्रस्रोतोनखांतरे ॥ ७ ॥
वर्त्मरोगादृतेऽक्ष्णोश्च शीतवर्षोष्णदुर्दिने ।

पित्तविकार, रक्तविकार, वातविकार, ताप, अतिसार, हृद्रोग, मस्तकरोग, पांडुरोग, अरुचि, तिमिर, सर्वांगसूज, प्रोद्वृत्तफल-

योनि ( शूळ होऊन फेंसाळ विटाळ होणें ) या रोगांवर; अशक्त, वमनविरेचन घेतलेला, भित्रा, गर्भिणी, विटाळशी, म्हातारा व मुलें यांस; अजीर्णावर; धमनी, सांधे, मर्मस्थानें, कोमल हाडें, शिरा, स्नायु, वृषणापासून गुदद्वारापर्यंतची शिवण, गळा, बेंबी, थोड्या मांसाचे अवयव, वृषण, शिस्न व स्रोतें यांवर नखांच्या आंतल्या भागीं, पापण्याचे रोगखेरीज करून डोळ्यांत; आणि हेमंत, शिशिर, वर्षा व ग्रीष्म या ऋतूंत व ढग आले असतील त्या दिवशीं दोन्हीं प्रकारच्या क्षारांचा उपयोग करूं नये.

> कालमुष्ककशम्याककदलीपारिभद्रकान् ॥ ८ ॥
> अश्वकर्णमहावृक्षपलाशास्फोतवृक्षकान् ।
> इंद्रवृक्षार्कपूतीकनक्तमालाश्वमारकान् ॥ ९ ॥
> काकजंघामपामार्गमग्निमंथाग्नितिल्वकान् ।
> सार्द्रान् समूलशाखादीन् खंडशः परिकल्पितान् ॥ १० ॥
> कोशातकीश्चतस्रश्च शूकनालं यवस्य च ।
> निवाते निचयीकृत्य पृथक्तानि शिलातले ॥ ११ ॥
> प्रक्षिप्य मुष्ककचये सुधाश्मानि च दीपयेत् ।
> ततस्तिलानां कुंतालैर्दग्ध्वाऽग्नौ विगते पृथक् ॥ १२ ॥
> कृत्वा सुधाश्मनां भस्म द्रोणं त्वितरभस्मनः ।
> मुष्ककोत्तरमादाय प्रत्येकं जलमूत्रयोः ॥ १३ ॥
> गालयेदर्धभारेण महता वाससा च तत् ।
> यावत्पिच्छिलरक्ताच्छस्तीक्ष्णो जातस्तदा च तम् ॥ १४ ॥
> गृहीत्वा क्षारनिस्यंदं पचेल्लौह्यां विघट्टयन् ।

काळा मोखा, बाहवा, केळ, देवदार, राळेचा वृक्ष, तिधारी निवडुंग, पळस, मांदार, नांदरुखी, कुडा, रुई, घाणेरा करंज, करंज, कण्हेर, काकजंघा, अघाडा, ऐरण, चित्रक व लोध्र हीं झाडें ओलीं असतांना मुळें शाखा, पानें इत्यादिकांसहित सबंध उपटून आणून त्यांचे बारीक बारीक तुकडे करून ठेवावे. त्याचप्रमाणें दुसरीकडे कडू दोडकी, कडू घोसाळी, कडू तुंबी व देवडंगरी, आणि जवाचा कडबा व तूस यांच्या वारा नसेल अशा जागीं दगडावर निर-निराळ्या राशी करून ठेवाव्या. नंतर चुन्याचे खडे मोखाच्या राशींत टाकून तिळांच्या दांड्यांनीं त्या राशी पेटवाव्या. सर्व जळून जाऊन

विस्तव विझला म्हणजे चुन्याची राख निराळी काढावी आणि इतर सर्व झाडांची राख दहाशें चोवीस तोळे घेऊन व मोख्याची राख झाली असेल तेवढी घेऊन पाणी चार हजार तोळे व गोमूत्र चार हजार तोळे एकत्र मिळवून त्यांत एका मोठ्या वस्त्रांतून ती राख बुळबुळीत, लाल, पातळ व तीक्ष्ण होईपर्यंत गाळीत असावें. नंतर तें क्षारोदक एका लोखंडी कढईत घालून विस्तवावर ठेवून पळीनें घोटावें.

पच्यमाने ततस्तस्मिंस्ताः सुधाभस्मशर्कराः ॥ १५ ॥
शुक्तिक्षारपंकशंखनाभीश्चायसभाजने ।
कृत्वाग्निवर्णान् बहुशः क्षारोत्थे कुडवोन्मिते ॥ १६ ॥
निर्वाप्य पिष्ट्वा तेनैव प्रतीवापं विनिक्षिपेत् ।
श्लक्ष्णं शकृद्दक्षशिखिगृध्रकंककपोतजम् ॥ १७ ॥
चतुष्पात्पक्षिपित्तालमनोह्वालवणानि च ।
परितः सुतरां चातो दर्व्या तमवघट्टयेत् ॥ १८ ॥

तें आटूं लागल्यावर त्यांतूनच बत्तीस तोळे पाणी दुसऱ्या एका लोखंडाच्या भांड्यांत निराळें काढून घेऊन त्यांत मोख्याच्या राशींत काढून ठेवलेले चुन्याचे खडे, शिंप, खडू, व शंखाच्या आंतील भाग हे वरचेवर लाल होईपर्यंत तापवून बुडवावे. त्याच पाण्यांत वाटून नंतर ते मोठ्या कढईतील पाण्यांत टाकावे. याशिवाय त्यांत कोंबडा, मोर, गिधाड, कंक व पारवा यांची विष्ठा बारीक वाटून घालावी. तसेंच पशु-पक्ष्यांचें पित्त, हरताळ, मनशीळ, व सैंधव हीं बारीक करून त्यांत घालावीं. आणि मग पळीनें चांगलें चोहोंकडून ढवळावें.

सबाष्पैश्च यदोत्तिष्ठेद्बुद्बुदैर्लेहवद्घनः ।
अवतार्य ततः शीतो यवराशावयोमये ॥ १९ ॥
स्थाप्योऽयं मध्यमः क्षारो

त्यांतून वाफेबरोबर वर बुडबुडे येऊं लागले आणि तो लेहासारखा दाट झाला म्हणजे खालीं उतरावा, आणि थंड झाल्यावर लोखंडाच्या भांड्यांत ठेवून जवांच्या राशींत पुरून ठेवावा. हा मध्यम क्षार झाला.

न तु पिष्ट्वा क्षिपेन्मृदौ ।

निर्वाप्यापनयेत्

तोच सौम्य करावयाचा असल्यास चुना वगैरे पदार्थ वरचेवर तापवून फक्त त्या पाण्यांत विझवावे. वाटून घालूं नयेत.

तीक्ष्णे पूर्ववत् प्रतिवापनम् ॥ २० ॥
तथा लांगलिकादंतीचित्रकातिविषावचाः ।
स्वर्जिकाकनकक्षीरीहिंगुपूतीकपल्लवाः ॥ २१ ॥
तालपत्री बिडं चेति

तीक्ष्ण करावयाचा असल्यास सर्व कृति मध्यम क्षाराप्रमाणेंच करून शिवाय त्यांत कळलावी, दंती, चित्रक, अतिविष, वेखंड, सज्जीखार, पिंसोळा, हिंग, घाणेऱ्या करंजाचीं पानें, काळी मुसळी व बिडलोण हीं औषधें वाटून घालावीं.

सप्तरात्रात्परं तु सः ।

योज्यः

सात दिवसपर्यंत जवांच्या राशींत पुरून ठेवून नंतर कोणताही क्षार वापरावा.

तीक्ष्णोऽनिलश्लेष्ममेदोजेष्वर्बुदादिषु ॥ २२ ॥

तीक्ष्ण क्षार वात, कफ व मेद यांपासून झालेल्या जोरदार अर्बुदादिकांवर वापरावा.

मध्येष्वेषु च मध्यः

सदरहू विकार मध्यम जोराचे असल्यास मध्यम क्षाराचा उपयोग करावा.

अन्यः पित्तास्रगुदजन्मसु ।

सौम्य क्षार पित्तापासून व रक्तदोषापासून होणाऱ्या मूळव्याधींत वापरावा.

बलार्थं क्षीणपानीये क्षारांबु पुनरावपेत् ॥ २३ ॥

क्षारांतील पाणी सुकून तो दाट झाला असतां त्यास जोरदार करण्याकरितां पुन्हा क्षाराचें पाणी घालावें.

नातितीक्ष्णमृदुः श्लक्ष्णः पिच्छिलः शीघ्रगः सितः ।
शिखरी सुखनिर्वाप्यो न विष्यंदी न चातिरुक् ॥ २४ ॥
क्षारो दशगुणः शस्त्रतेजसोरपि कर्मकृत् ।

क्षार फार तीक्ष्ण नव्हे व फार मृदु नव्हे असा, गुळगुळीत, बुळबुळीत, शरीरांत लवकर पसरणारा, पांढरा, कांहीं दिवस ठेविल्यानें ज्यांत शिखरासारखा साका जमतो, थोडक्यांत शमन पावणारा, स्राव न करणारा व फार दुःख न देणारा असा दशगुणी आहे. हा शस्त्र व अग्नि या दोहोंचेंही काम करतो.

आचूषन्निव संरंभाद्गात्रमापीडयन्निव ॥ २५ ॥
सर्वतोऽनुसरन् दोषानुन्मूलयति मूलतः ।
कर्म कृत्वा गतरुजः स्वयमेवोपशाम्यति ॥ २६ ॥

क्षार अंगास लाविला असतां त्या भागास जोरानें ओढून घेतल्यासारखी पीडा उत्पन्न करून आणि चोहोंकडे पसरून दोषांस समूळ उपटून टाकितो. त्याचें स्वतःचें दाह वगैरे जें काम असतें तें झालें म्हणजे दुखणें बंद होऊन तो आपोआप शांत होतो.

क्षारसाध्ये गदे छिन्ने लिखिते स्रावितेऽथवा ।
क्षारं शलाकया दत्वा प्लोतप्रावृतदेहया ॥ २७ ॥
मात्राशतमुपेक्षेत

क्षारसाध्य रोगास क्षार लावण्याच्या अगोदर तो कापावा, खरवडावा किंवा त्यांतून रक्त काढावें. नंतर एका सळईच्या शेवटास कापूस गुंडाळून तिनें रोगावर क्षार लावावा आणि शंभर मात्रापर्यंत तसाच राहूं द्यावा.

तत्रार्शःस्वावृताननम्
हस्तेन यंत्रं कुर्वीत

मूळव्याधीस क्षार लावल्यानंतर यंत्रावर हात ठेवून त्याचें तोंड झांकावें.

वर्त्मरोगेषु वर्त्मनी ॥ २८ ॥
निर्भुज्य पिचुनाच्छाद्य कृष्णभागं विनिक्षिपेत् ।
पद्मपत्रतनुः क्षारलेपः

पापण्याच्या रोगावर क्षार लावणें असल्यास पापण्या वांकड्या करून डोळ्यांतील काळें बुबुळ कापसाच्या बोळ्यानें झांकून, कमळाच्या पानासारखा पातळ क्षार लावावा.

घ्राणार्बुदेषु च ।
प्रत्यादित्यं निषण्णस्य समुन्नम्याग्रनासिकाम् ॥ २९ ॥

**मात्रा विधार्यः पंचाशत्**

नाकांतील अर्बुदावरही कमळपत्राप्रमाणेंच पातळ लेप करावा, व तो करतांना सूर्याच्या सन्मुख तोंड करून रोग्यास बसवावें. आणि नाकाची बोंडी वर दाबावी. या ठिकाणीं क्षारलेप पन्नास मात्रापर्यंत तसाच राहूं द्यावा.

**तद्वदर्शसि कणजे ॥ ३० ॥**

कानांतील मोडास याच रीतीनें क्षार लावावा.

**क्षारं प्रमार्जनेनानु परिमृज्याऽवगम्य च ।**
**सुदग्धं घृतमध्वक्तं तत्पयोमस्तुकांजिकैः ॥ ३१ ॥**
**निर्वापयेत्ततः साज्यैः स्वादुशीतैः प्रदेहयेत् ।**
**अभिष्यंदीनि भोज्यानि भोज्यानि क्लेदनाय च ॥ ३२ ॥**

नंतर बोळ्यानें क्षार पुसून काढावा, आणि तो लावलेली जागा चांगली दग्ध झाली असें पाहून त्या जागीं तूप व मध लावून, दूध-दह्यावरची निवळ किंवा कांजी यांनीं धुऊन त्यांच्यांतच तूप घालून तें मधुर व थंड करून करून त्याचा लेप लावावा. नंतर स्राव चालू राहण्याकरितां अभिष्यंदी पदार्थ खावे.

**यदि च स्थिरमूलत्वात्क्षारदग्धं न शीर्यते ।**
**धान्याम्लबीजयष्ट्याह्वतिलैरालेपयेत्ततः ॥ ३३ ॥**

रोगाचें मूळ दृढ असल्यानें जर क्षारानें जाळलें असूनही स्राव होत नसेल, तर त्यावर कांजीचा गाळ, ज्येष्ठमध व तीळ यांचा लेप लावावा.

**तिलकल्कः समधुको घृताक्तो व्रणरोपणः ।**

तिळांचा कल्क, ज्येष्ठमध व तूप यांच्या लेपानें जखम भरून येते.

**पक्वजंब्वसितं सन्नं सम्यग्दग्धम्**

बरोबर दाह झाला असतां पिकलेल्या जांभळासारखा काळा रंग येतो व त्या जागीं खळगी पडते.

**विपर्यये ॥ ३४ ॥**

**ताम्रतातोदकंड्वाद्यैर्दुर्दग्धं तं पुनर्दहेत् ।**

याच्या उलट तांबडा रंग, टोंचण, खाज वगैरे लक्षणें झालीं म्हणजे बरोबर दाह झाला नाहीं असें समजून पुन्हा त्या जागीं क्षार लावावा.

अतिदग्धे स्रवेद्रक्तं मूर्छादाहज्वरादयः ॥ ३५ ॥

जास्त जळल्यास रक्तस्राव होऊन मूर्च्छा, दाह, ज्वर वगैरे विकार होतात.

गुदे विशेषाद्विण्मूत्रसंरोधोऽतिप्रवर्तनम् ।
पुंस्त्वोपघातो मृत्युर्वा गुदस्य शातनाद्ध्रुवम् ॥ ३६ ॥

गुदांत जास्त दाह झाल्यास मल-मूत्राचा अवरोध, किंवा रेचन आणि नपुंसकत्व हे विकार उद्भवतात. किंवा कदाचित् गुद गळून पडल्यामुळें मृत्युही येतो.

नासायां नासिकावंशदरणाकुंचनोद्भवः ।
भवेच्च विषयाज्ञानम्

नाकांत जास्त जळलें असल्यास नाकाचा पडदा फाटून किंवा आकुंचित होऊन वास येईनासा होतो.

तद्वच्छ्रोत्रादिकेष्वपि ॥ ३७ ॥

कान इत्यादिकांचीही अतिशय दाह झाल्यास अशी दशा होते.

विशेषादत्र सेकोऽम्लैर्लेपो मधुघृतं तिलाः ।
वातपित्तहरा चेष्टा सर्वैव शिशिरा क्रिया ॥ ३८ ॥

अशा जागीं कांजी वगैरे आंबट पदार्थांच्या घड्या ठेवाव्या, आणि मध, तूप व तीळ यांचा लेप करावा. तसेंच वातपित्तनाशक व थंड असे सर्व उपचारही हितकर आहेत.

अम्लो हि शीतः स्पर्शेन क्षारस्तेनोपसंहितः ।
यात्याशु स्वादुतां तस्मादम्लैर्निर्वापयेत्तराम् ॥ ३९ ॥

आंबट पदार्थ स्पर्शानें थंड लागतो व क्षाराचा त्याच्याशीं योग झाला कीं क्षार तत्काल गोड होतो. करितां दाहाची शांति विशेषतः आंबट पदार्थांनींच करावी.

अग्निः क्षारादपि श्रेष्ठस्तद्दग्धानामसंभवात् ।
भेषजक्षारशस्त्रैश्च न सिद्धानां प्रसाधनात् ॥ ४० ॥
त्वचि मांसे सिरास्नायुसंध्यस्थिषु स युज्यते ।

अग्निकर्म तर क्षारापेक्षांही श्रेष्ठ आहे. कारण एक तर डागानें बरे झालेले रोग पुन्हा उलटत नाहींत, आणि दुसरें औषध, क्षार व शस्त्र यांनीं न बरे झालेले रोग डागानें बरे होतात. त्वचा, मांस शिरा, स्नायु, सांधे व हाडें यांवर डाग देतात.

मषांगग्लानिमूर्धार्तिमंथकीलतिलादिषु ॥ ४१ ॥
त्वग्दाहो वर्तिगोदंतसूर्यकांतशरादिभिः ।

मस, अंगाची ग्लानि, मस्तकशूळ, अधिमंथ, चामखीळ, तीळ, वगैरे रोगांवर वात, गाईचा दांत, सूर्यकांतमणि किंवा बाण इत्यादिकांनीं त्वचेवर डाग द्यावा.

अर्शोभगंदरग्रंथिनाडीदुष्टव्रणादिषु ॥ ४२ ॥
मांसदाहो मधुस्नेहजांबवोष्ठगुडादिभिः ।

मूळव्याध, भगंदर, ग्रंथि, नाडीव्रण, दुष्टव्रण वगैरे रोगांवर मध, तेल इत्यादिकांनीं मांसावर डाग द्यावा.

श्लिष्टवर्त्मन्यसृक्स्रावनील्यसम्यग्व्यधादिषु ॥ ४३ ॥
सिरादिदाहस्तैरेव

डोळ्याच्या पापण्या आकुंचित झाल्या असल्यास, तसेंच रक्तस्राव, मोतीबिंदु व अव्यवस्थित शिरावेध या रोगांवर वर सांगितलेल्या पदार्थांनींच शिरादिकांवर डाग द्यावा.

न दहेत्क्षारवारितान् ।
अंतःशल्यासृजो भिन्नकोष्ठान् भूरिव्रणातुरान् ॥ ४४ ॥

ज्यांस क्षार वर्ज्य सांगितला आहे, ज्यांच्या शरीरांत शल्य आहे किंवा रक्त सांकळलेलें आहे, ज्यांचा कोठा फुटला आहे व जे व्रणांनीं फार गांजले आहेत अशांस डाग देऊं नये.

सुदग्धं घृतमध्वक्तं स्निग्धशीतैः प्रदेहयेत् ।

चांगला दाह झाला म्हणजे तूप व मध लावून वर स्निग्ध व थंड लेप करावा.

तस्य लिंगं स्थिते रक्ते शब्दवल्लसिकान्वितम् ॥ ४५ ॥
पक्वतालकपोताभं सुरोहं नातिवेदनम् ।

बरोबर दाह झाला असतां रक्त बंद होऊन बुडबुडयाप्रमाणें शब्द करून लस येते, आणि ती जागा पिकलेल्या ताडफळासारखी किंवा पारव्यासारखी अस्मानी रंगाची होते. व्रण लवकर रुजूं लागतो आणि त्यांत ठणका वगैरे फारसा होत नाहीं.

प्रमाददग्धवत्सर्वं दुर्दग्धात्यर्थदग्धयोः ॥ ४६ ॥

कमी किंवा जास्त दाहाचीं सर्व लक्षणें चुकून भाजल्याच्या लक्षणांप्रमाणेंच असतात.

चतुर्धा तत्तु तुच्छेन सह

तुच्छदग्धासह त्याचे एकंदर चार प्रकार होतात.

तुच्छस्य लक्षणम् ।

त्वग्विवर्णोष्यतेऽत्यर्थं न च स्फोटसमुद्भवः ॥ ४७ ॥

किंचित् पोळल्यास चामडीचा रंग पालटून तेथें अतिशय जळजळ होते व फोड येत नाहीं.

सस्फोटदाहतीव्रोषं दुर्दग्धम्

अव्यवस्थित दाहांत फोड येतात, आग होते व जळजळ असते.

अतिदाहतः ।

मांसलंबनसंकोचदाहधूपनवेदनाः ॥ ४८ ॥
सिरादिनाशस्तृण्मूर्छाव्रणगांभीर्यमृत्यवः ।

अतिदाहानें मांस लोंबूं लागतें, शिरा वगैरे ताठतात, आग होते, वाफा निघाल्यासारखें वाटतें, अतिशय वेदना होतात, शिरा वगैरे नाश पावतात, तहान लागते, मूर्च्छा येते, जखम खोल जाते आणि मृत्युही येतो.

तुच्छस्याग्निप्रतपनं कार्यमुष्णं च भेषजम् ॥ ४९ ॥
स्त्यानेऽस्रे वेदनात्यर्थं विलीने मंदता रुजः ।

किंचित् उष्णतेनें पोळलेल्या जागीं विस्तवानें शेकावें, आणि उष्ण औषधें लावावीं. थंड उपचार केल्यास त्यानें रक्त दाट होऊन फार वेदना होतात आणि उष्ण उपचारांनीं तें पातळ झालें म्हणजे वेदना कमी होतात.

दुर्दग्धे शीतमुष्णं च युंज्यादादौ ततो हिमम् ॥ ५० ॥

अव्यवस्थित दाहांत प्रथम थंड, नंतर उष्ण आणि पुन्हा थंड उपचार करावे.

सम्यग्दग्धे तुगाक्षीरिप्लक्षचंदनगैरिकैः ।
लिंपेत्साज्यामृतैरूर्ध्वं पित्तविद्रधिवत्क्रिया ॥ ५१ ॥

बरोबर दाह झाला असल्यास वंशलोचन, पायरीची साल, चंदन, गेरू, गुळवेल व तूप यांचा लेप करून नंतर पित्तविद्रधीवरील चिकित्सा करावी.

अतिदग्धे द्रुतं कुर्यात्सर्वं पित्तविसर्पवत् ।

अतिदाहावर पित्तविसर्पावरील एकंदर चिकित्सा लवकर करावी.

स्नेहदग्धे भृशतरं रूक्षं तत्र तु योजयेत् ॥ ५२ ॥

स्नेहदग्ध जागीं अत्यंत रूक्ष लेप वगैरे करावे.

समाप्यते स्थानमिदं हृदयस्य रहस्यवत् ।
अत्रार्थाः सूत्रिताः सूक्ष्माः प्रतन्यंते हि सर्वत ॥ ५३

अष्टांगहृदयाचा गूढ आशय सांगणारें सूत्रस्थान येथें संपलें. यांत सर्व गोष्टी सूत्ररूपानें सांगितल्या आहेत, आणि त्याच पुढें विस्तारानें आह्मी सांगणार आहों.

इति वैद्यपतिसिंहगुप्तसूनुवाग्भटविरचितायामष्टांग-
हृदयसंहितायां प्रथमं सूत्रस्थानं संपूर्णम् ।

याप्रमाणें वैद्यपति सिंहगुप्ताचा पुत्र वाग्भट यानें रचिलेल्या अष्टांगहृदय संहितेंतील पहिलें सूत्रस्थान संपलें.

---

सूत्रस्थान समाप्त.



# शारीरस्थान.

## अध्याय १ ला.

अथाऽतो गर्भावक्रांतिशारीरं व्याख्यास्यामः ।
इति ह स्माहुरात्रेयादयो महर्षयः ।

प्रथमतः आतां गर्भाच्या संक्रमणाविषयीं शारीर सांगतों. आत्रेयादि महर्षि असेंच सांगते झाले.

शुद्धे शुक्रार्तवे सत्वः स्वकर्मक्लेशचोदितः ।
गर्भः संपद्यते युक्तिवशादग्निरिवारणौ ॥ १ ॥

जसा अग्नि अरणींत ( अग्निहोत्रांत अग्नि उत्पन्न करण्याची लांकडाची उखळी ) उत्पन्न होतो, त्याप्रमाणें जीव स्वतःच्या ( पूर्वजन्मार्जित ) कर्मांनीं व अविद्यादि दोषांनीं प्रेरित होऊन, शुद्ध अशा वीर्य व रज यांच्या संयोगशक्तीनें गर्भस्वरूप पावतो.

बीजात्मकैर्महाभूतैः सूक्ष्मैः सत्वानुगैश्च सः ।
मातुश्चाहाररसजैः क्रमात्कुक्षौ विवर्धते ॥ २ ॥

( शुक्रार्तवासंबंधीं ) बीजात्मक महाभूतें, स्वतः जीवात्म्याबरोबर येणारीं सूक्ष्म महाभूतें व आईच्या आहारापासून उत्पन्न होणारीं महाभूतें यांनीं हळुहळु गर्भ वाढत असतो.

तेजो यथार्करश्मीनां स्फटिकेन तिरस्कृतम् ।
नेंधनं दृश्यते गच्छत्सत्त्वो गर्भाशयं तथा ॥ ३ ॥

स्फटिक मण्यांतून गोवरीवर पाडलेलें सूर्यकिरणाचें तेज जसें सामान्य दृष्टीला दिसत नाहीं, तसा जीवात्मा गर्भाशयांत जात असतां दिसत नाहीं.

कारणानुविधायित्वात्कार्याणां तत्स्वभावता ।
नानायोन्याकृतीः सत्त्वो धत्तेऽतो द्रुतलोहवत् ॥ ४ ॥

---

१ तदन्तरप्रतिपत्तौ रंहति संपरिष्वक्तः प्रश्ननिरूपणाभ्याम् ( ब्रम्हसूत्र ३-१ ) या सूत्रावरील व्याख्यानांत श्रीशंकराचार्यांनींही जीवसंक्रमणाचे वेळीं सूक्ष्म भूतें जात असतात, असें सांगितलें आहे.

कारणांच्या अनुरोधानें कार्याचें वर्तन असल्यामुळें, कार्य कारणाशीं सदृश असतें; म्हणूनच तापवून पातळ केलेलें लोखंड निरनिराळ्या साच्यांत ओतलें म्हणजे तसतशी आकृति धारण करतें. त्याप्रमाणें ( कर्माच्या योगानें तद्रूप बनलेला ) जीवात्मा, नानाप्रकारच्या योनींत जाऊन ती ती आकृति धारण करतो.

अत एव च शुक्रस्य बाहुल्याज्जायते पुमान्।
रक्तस्य स्त्री तयोः साम्ये क्लीबः

आणि म्हणूनच आर्तवापेक्षां वीर्य जास्त असल्यास पुरुष, आर्तव जास्त असल्यास स्त्री, आणि दोन्ही समान असतां षंढ असा गर्भ बनतो.

शुक्रार्तवे पुनः ॥ ५ ॥
वायुना बहुशो भिन्ने यथास्वं बह्वपत्यता ।

तसेंच आर्तव व वीर्य, वायूमुळें विभागलें गेलें म्हणजे ज्या मानानें तें विभागलें असेल त्याप्रमाणें ( वीर्याधिक्य विभागलें असल्यास पुरुष, आर्तवाधिक्य विभागलें असल्यास स्त्री, व एका भागांत वीर्याधिक्य व दुसऱ्यांत आर्तवाधिक्य असल्यास स्त्री व पुरुष, किंवा ज्या विभागांत समानत्व असेल त्यामुळें षंढ) असे दोन अथवा जास्त गर्भ उत्पन्न होतात.

वियोनिविकृताकारा जायंते विकृतैर्मलैः ॥ ६ ॥

वातादि दोष विकृत झाले असल्यास त्या विकारानुरूप विजातीय जाति ( मनुष्यास पशु, सर्प इत्यादि ) व आकार ( कमीजास्त किंवा वांकडे तिकडे अवयव वगैरे ) उत्पन्न होतात.

मासि मासि रजः स्त्रीणां रसजं स्रवति त्र्यहम्।
वत्सराद्द्वादशादूर्ध्वं याति पंचाशतः क्षयम् ॥ ७ ॥

स्त्रियांच्या शरीरांत आहाररसापासून उत्पन्न झालेलें रज ( आर्तव ), सुमारें बारा वर्षांच्या वयापासून पन्नास वर्षें वयापर्यंत प्रत्येक महिन्यांत तीन दिवसपर्यंत स्रवत असतें.

---

१ कारणाचे गुण नेहमीं कार्यांत असतात, असा सामान्य नियम आहे. मृत्तिकेपासून केलेल्या घटांत मृत्तिकेचें अस्तित्व हें याचें प्रसिद्ध उदाहरण आहे. यास अपवाद आहेत, पण त्यांची आपणांस जरूर नाहीं.

पूर्णषोडशवर्षा स्त्री पूर्णविंशेन संगता ।
शुद्धे गर्भाशये मार्गे रक्ते शुक्रेऽनिले हृदि ॥ ८ ॥
वीर्यवंतं सुतं सूते

सोळा वर्षें पूर्ण झालेली (वाढ पूर्ण झालेली) स्त्री, वीस वर्षें पूर्ण झालेल्या पुरुषाशीं रममाण झाली असतां—गर्भाशय, गुह्यस्थान, आर्तव, वीर्य, वायु आणि अंतःकरण शुद्ध असेल तर तिला पराक्रमी मुलगा होतो.

ततो न्यूनाब्दयोः पुनः ।
रोग्यल्पायुरधन्यो वा गर्भो भवति नैव वा ॥ ९ ॥

तीच जर न्यून वयाची (अपक्व वाढीची) असली, तर संतति रोगी, अल्पायुषी व नेभळी होते, किंवा मुळींच होत नाहीं.

वातादिकुणपग्रंथिपूयक्षीणमलाह्वयम् ।
बीजासमर्थं रेतोऽस्रम्

वातादि दोषांनीं बिघडलेलीं, प्रेताप्रमाणें दुर्गंधि झालेलीं, गाठाळलेलीं, पुवानें युक्त, क्षीण, मूत्रयुक्त, मलयुक्त अशा प्रत्येकीं नऊ नऊ दोषांनीं आर्तव किंवा वीर्य हीं गर्भोत्पत्तीस असमर्थ आहेत.

स्वलिंगैर्दोषजं वदेत् ॥ १० ॥
रक्तेन कुणपं श्लेष्मवाताभ्यां ग्रंथिसन्निभम् ।
पूयाभं रक्तपित्ताभ्यां क्षीणं मारुतपित्ततः ॥ ११ ॥
कृच्छ्राण्येतान्यसाध्यं तु त्रिदोषं मूत्रविट्प्रभम् ।

वातादि दोष बिघडल्याचीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्याप्रमाणें त्या त्या लक्षणांवरून तो तो दोष समजावा. रक्त दूषित झाल्यानें आर्तव किंवा वीर्य यांस प्रेताप्रमाणें दुर्गंध येतो. कफ व वात यांनीं दूषित झाल्यास गांठी बनतात. रक्त व पित्त यांनीं पुवासारखीं होतात. आणि वात व पित्त यांनीं बिघडल्यास क्षीण होतात. हीं कष्टसाध्य आहेत; परंतु मूत्र व मल यांनीं युक्त आर्तव किंवा वीर्य हीं सर्वथा असाध्य आहेत.

कुर्याद्वातादिभिर्दुष्टे स्वौषधं कुणपे पुनः ॥ १२ ॥
धातकीपुष्पखदिरदाडिमार्जुनसाधितम् ।
पाययेत्सर्पिरथवा विपक्वमसनादिभिः ॥ १३ ॥
पलाशभस्माश्मभिदा ग्रंथ्याभे पूयरेतसि ।

परूषकवटादिभ्यां क्षीणे शुक्रकरी क्रिया ॥ १४ ॥

वात, पित्त व कफ यांनीं बिघडल्यास, रीतीप्रमाणें ते दोष शुद्ध होण्याचें औषध द्यावें. कुणपगंधी (प्रेतवत् दुर्गंधी) वीर्य-दोषावर धायटीचीं फुलें, खैराची साल (किंवा नार), डाळिंबाची साल यांत घृत तयार करून तें किंवा असनादिगणांतील (सूत्रस्थान अ० १५ पहा.) औषधांनीं सिद्ध केलेलें घृत (तूप) पाजावें. ग्रंथिशुक्र दोषावर (गांठाळलेल्या वीर्यावर) पळसाची राख व लकडीपाषाणभेद यांनीं तयार केलेलें तूप पाजावें. पूयवीर्यावर फालसा व न्यग्रोधादिगणांतील औषधांनीं तयार केलेलें तूप पाजावें. क्षीण वीर्यावर वीर्यवर्धक (वृष्य) चिकित्सा करावी.

स्निग्धं वांतं विरिक्तं च निरूढमनुवासितम्।
योजयेच्छुक्रदोषार्तं सम्यगुत्तरबस्तिभिः ॥ १५ ॥

वीर्यदोषांनीं पीडिलेल्या रोग्यास स्नेहपान, वमन, विरेचन, निरूहण (निरूह बस्ति देऊन) व अनुवासन देऊन नंतर योग्य रीतीनें उत्तरबस्ति द्यावें.

संशुद्धो विट्प्रभे सर्पिर्हिंगुसेव्यादिसाधितम्।
पिबेत्

मलदोषी वीर्यावर वमन व विरेचनानें शुद्ध करून हिंग, वाळा व चित्रक यांनीं तयार केलेलें तूप द्यावें.

ग्रंथ्यार्तवे पाठाव्योषवृक्षकजं जलम् ॥ १६ ॥

गांठाळलेल्या आर्तवावर पहाडमूळ, सुंठ, मिरें, पिंपळी व कुडा यांचा कषाय द्यावा.

पेयं कुणपपूयास्रे चंदनं वक्ष्यते तु यत्।
गुह्यरोगे च तत्सर्वं कार्यं सोत्तरबस्तिकम् ॥ १७ ॥

कुणपार्तव व पूयार्तव यांवर चंदनाचा हिम, फांट किंवा कषाय वगैरे औषध द्यावें, आणि पुढें गुह्य रोगांवर दिलेले उपचार उत्तर-बस्तीसह (उत्तरस्थान, अध्याय ३४) करावे.

शुक्रं शुक्लं गुरु स्निग्धं मधुरं बहलं बहु।
घृतमाक्षिकतैलाभं सद्गर्भाय

पांढरें, जड, चिकट, गोड, घट्ट, पुष्कळ; आणि तूप, मध व

तेल यांसारखें वीर्य चांगला गर्भ उत्पन्न करण्यास समर्थ आहे.

आर्तवं पुनः ॥ १८ ॥
लाक्षारसशशास्राभं धौतं यच्च विरज्यते।

तसेंच आर्तव अळित्यासारखें किंवा सशाच्या रक्तसारखें असून ज्याचा वस्त्रास पडलेला डाग धुतल्यानें जातो तें शुद्ध होय.

शुद्धशुक्रार्तवं स्वस्थं संरक्तं मिथुनं मिथः ॥ १९ ॥
स्नेहैः पुंसवनैः स्निग्धं शुद्धं शीलितबास्तिकम्।
नरं विशेषात्क्षीराज्यैर्मधुरौषधसंस्कृतैः ॥ २० ॥
नारीं तैलेन माषैश्च पित्तलैः समुपाचरेत्।

एकमेकांवर प्रीति करणारे, निरोगी आणि ज्यांचें वीर्य व आर्तव शुद्ध आहे, अशा स्त्रीपुरुषांस स्नेहपान, वमन, विरेचन, निरूह व अनुवासनबस्ति देऊन नंतर (पुत्रोत्पत्ति होण्यासाठीं) पुंसवनस्नेह द्यावा. पुरुषांस विशेषेंकरून मधुर औषधांनीं तयार केलेलें दूध व तूप पिण्यास द्यावें. स्त्रीस तेल, उडीद व पित्तल पदार्थांनीं उपचार करावा.

क्षामप्रसन्नवदनां स्फुरच्छ्रोणिपयोधराम् ॥ २१ ॥
स्रस्ताक्षिकुक्षिं पुंस्कामां विद्यादृतुमतीं स्त्रियम्।

मुख उतरल्याप्रमाणें पण सतेज असणें, कंबर व स्तन फुरफुरणें, डोळे व दोन्ही कुशी गळल्यासारखें होणें व संभोगाची इच्छा होणें हीं स्त्री ऋतुमती झाल्याचीं लक्षणें[1] होत.

पद्मं संकोचमायाति दिनेऽतीते यथा तथा ॥ २२ ॥
ऋतावतीते योनिः सा शुक्रं नातः प्रतीच्छति।

सूर्यविकासी कमळें जशीं सूर्यास्त झाला असतां संकुचित होतात, तशी स्त्रियांचा ऋतुकाळ संपला म्हणजे योनि संकुचित होते व त्यामुळें बीजकोशांत वीर्य जाऊं शकत नाहीं.

मासेनोपचितं रक्तं धमनीभ्यामृतौ पुनः ॥ २३ ॥
ईषत्कृष्णं विगंधं च वायुर्योनिमुखान्नुदेत्।

महिनाभर सांचलेलें, किंचित् काळें व दुर्गंधरहित असें आर्तव

१ कांहीं स्त्रियांस आर्तवदर्शन न होतांच मुलें झाल्याचीं उदाहरणें आहेत, अशा अवस्थांतही ऋतुप्राप्ति ओळखतां यावी यासाठीं हें लक्षण दिलें आहे.

दोन धमन्यांमधून वायु योनिमुखांतून बहुशः दर माहिन्यास बाहेर टाकतो.

ततः पुष्पेक्षणादेव कल्याणध्यायिनी त्र्यहम् ॥ २४ ॥
मृजालंकाररहिता दर्भसंस्तरशायिनी ।
क्षैरेयं यावकं स्तोकं कोष्ठशोधनकर्षणम् ॥ २५ ॥
पर्णे शरावे हस्ते वा भुंजीत ब्रह्मचारिणी ।

याचा प्रारंभ झाल्यावर स्त्रीनें तीन दिवस ब्रह्मचारी आचारानें राहून चांगल्या गोष्टींचें चिंतन करावें. स्नान करूं नये. दागिने घालूं नयेत. दर्भाच्या शय्येवर निजावें. कोठ्याचें शोधन करणारे व शरीराला कृश करणारे दुधाचे व सातूचे पदार्थ थोडेच भक्षण करावे. ते पानावर, मातीच्या परळांत किंवा हातावरच खावे.

चतुर्थेऽह्नि ततः स्नात्वा शुक्लमाल्यांबरा शुचिः ॥ २६ ॥
इच्छंती भर्तृसदृशं पुत्रं पश्येत्पुरः पतिम् ।

चवथ्या दिवशीं स्नान करून, ( बाहेरून स्नानानें व पोटांत पंचगव्य घेऊन ) पवित्र झाल्यावर पांढरें वस्त्र व पांढरीं फुलें धारण करून, पतीप्रमाणें पुत्र होण्यासाठीं, पहिल्यानें पतीस अवलोकन करावें.

ऋतुस्तु द्वादश निशाः पूर्वास्तिस्रश्च निंदिताः ॥ २७ ॥
एकादशी च

ऋतुकालाची मर्यादा बारा रात्री आहे. त्यांतून पहिल्या तीन व अकरावी या रात्री संभोगास वर्ज्य आहेत.

युग्मासु स्यात्पुत्रोऽन्यासु कन्यका ।

सम रात्रींस संभोग केला असतां पुत्र होतो, व विषम रात्रींस कन्या होते.

उपाध्यायोऽथ पुत्रीयं कुर्वीत विधिवद्विधिम् ॥ २८ ॥
नमस्कारपरायास्तु शूद्राया मंत्रवर्जितम् ।

नंतर उपाध्यायाकडून यथाशास्त्र पुत्रीय विधि करावा. शूद्रांच्या स्त्रियांसाठीं वेदमंत्रावांचून फक्त नमस्कारपूर्वक विधि करावा.

अवंध्य एवं संयोगः स्यादपत्यं च कामतः ॥ २९ ॥

या विधीनें स्त्री-पुरुषांचा संयोग व्यर्थ जाणार नाहीं; इतकेंच नव्हे, तर यापासून पाहिजे त्या प्रकारचें अपत्यही होईल.

संतोऽप्याहुरपत्यार्थं दंपत्योः संगतं रहः।
दुरपत्यं कुलांगारो गोत्रे जातं महत्यपि ॥ ३० ॥

कारण, दंपतीचा एकांत म्हणजे केवळ संततीकरितां आहे, असें सज्जनही म्हणतात; आणि तेंच अपत्य जर वाईट निपजलें, तर तें कुल मोठें असलें, तरी त्यापासून कुलाचा नाशच होतो.

इच्छेतां यादृशं पुत्रं तद्रूपचरितांश्च तौ।
चिंतयेतां जनपदांस्तदाचारपरिच्छदौ ॥ ३१ ॥

जशा प्रकारच्या मुलाची इच्छा असेल, तशा रूपाच्या व तशा चरित्राच्या लोकांविषयीं नेहमीं चिंतन करावें. आणि आपलें आचरण व इतर परिस्थितिही तशाच प्रकारची राखण्याविषयीं प्रयत्न करीत असावें.

कर्मांते च पुमान्सर्पिःक्षीरशाल्योदनाशितः।
प्राग्दक्षिणेन पादेन शय्यां मौहूर्तिकाज्ञया ॥ ३२ ॥
आरोहेत् स्त्री तु वामेन तस्य दक्षिणपार्श्वतः।
तैलमाषोत्तराहारा

पुत्रीय विधि झाल्यावर दूधभात व तूपभात खाऊन, योग्य मुहूर्तावर, प्रथमतः पुरुषानें शय्येवर चढावें. त्याचप्रमाणें स्त्रीनेंही तेल व उडीद यांचे पदार्थ विशेषतः भक्षण करून, पतीच्या उजव्या बाजूनें जाऊन, प्रथम डावा पाय ठेवून शय्येवर चढावें.

तत्र मंत्रं प्रयोजयेत् ॥ ३३ ॥

“ अहिरसि आयुरसि सर्वतः प्रतिष्ठासि धाता त्वां
दधातु विधाता त्वां दधातु ब्रह्मवर्चसा भवेति।
ब्रह्मा बृहस्पतिर्विष्णुः सोमः सूर्यस्तथाश्विनौ
भगोऽथ मित्रावरुणौ वीरं ददतु मे सुतम् ॥ १ ॥ ”

या वेळेस पुढील मंत्र म्हणावा:—“ अहिरसि आयुरसि सर्वतः प्रतिष्ठासि धाता त्वां दधातु विधाता त्वां दधातु ब्रह्मवर्चसा भवेति ॥ ब्रह्मा बृहस्पतिर्विष्णुः सोमः सूर्यस्तथाश्विनौ ॥ भगोऽथ मित्रावरुणौ वीरं ददतु मे सुतम् ॥ ”

सांत्वयित्वा ततोऽन्योन्यं संविशेतां मुदान्वितौ।
उत्ताना तन्मना योषित्तिष्ठेदंगैः सुसंस्थितैः ॥ ३४ ॥
तथा हि बीजं गृह्णाति दोषैः स्वस्थानमास्थितैः।

नंतर परस्परांनीं आनंदयुक्त होऊन परस्परांस संतोषित करून संभोग करावा. स्त्रीनें पतीचे ठायीं एकाग्र अंतःकरण करून हात, पाय, डोकें वगैरे अवयव व्यवस्थेशीर ठेवून उताणें निजावें. असें केल्यानें स्वस्थानीं असलेल्या वातादि दोषांनीं ती स्त्री बीजग्रहण करते.

लिंगं तु सद्योगर्भाया योन्या बीजस्य संग्रहः ॥ ३५ ॥
तृप्तिर्गुरुत्वं स्फुरणं शुक्रास्रानुबंधनम् ।
हृदयस्पंदनं तंद्रा तृड् ग्लानिर्लोमहर्षणम् ॥ ३६ ॥

गर्भधारणा झाली असतां बीजकोशांत बीजाचें ग्रहण झाल्याचा स्त्रीला अनुभव येतो. मैथुनानें तिची तृप्ति होते. ओटीपोटांत जडत्व वाटून तेथें स्फुरण होतें; वीर्य व आर्तव बाहेर न येतां आंतच रहातें, तिची छाती धडधडते. झांपड, तृषा व ग्लानि येऊन तिच्या अंगावर रोमांच उभे राहतात.

अव्यक्तः प्रथमे मासि सप्ताहात्कललीभवेत् ।
गर्भः पुंसवनान्यत्र पूर्वं व्यक्तेः प्रयोजयेत् ॥ ३७ ॥

वीर्य व आर्तव यांचा सात दिवसांनीं गोळा बनतो, आणि महिना होईपर्यंत त्याला स्त्री किंवा पुरुष यांचें स्वरूप न येतां तो तशाच स्वरूपांत असतो; म्हणून महिन्याच्या आंत स्त्रीला पुंसवन ( पुत्रोत्पत्ति होण्याचीं ) औषधें द्यावीं.

बली पुरुषकारो हि दैवमप्यतिवर्तते ।

बलिष्ठ प्रयत्नानें दैवास देखील मागें हटवितां येतें.

पुष्ये पुरुषकं हैमं राजतं वाथ वायसम् ॥ ३८ ॥
कृत्वाऽग्निवर्णं निर्वाप्य क्षीरे तस्यांजलिं पिबेत् ।

पुष्य नक्षत्रावर सोन्याचा, रुप्याचा अथवा लोखंडाचा पुरुषाकृति पुतळा करून, तो तापवून लाल करून, ३२ तोळे दुधांत विझवून, स्त्रीनें तें दूध प्राशन करावें.

गौरदंडमपामार्गं जीवकर्षभसैर्यकान् ॥ ३९ ॥
पिबेत्पुष्ये जले पिष्टानेकद्वित्रिसमस्तशः ।

पांढरा आघाडा, जीवक, ऋषभक व कोरांटा यांपैकीं मिळतील तीं औषधें पाण्यांत वाटून, तो कल्क पुष्य नक्षत्रावर प्राशन करावा.

क्षीरेण श्वेतबृहतीमूलं नासापुटे स्वयम् ॥ ४० ॥

पुत्रार्थं दक्षिणे सिंचेद्वामे दुहितृवांछया ।

किंवा रिंगणीचें मूळ दुधांत उगाळून तें स्वतः स्त्रीनें, पुत्राची इच्छा असल्यास आपल्या उजव्या नाकपुडींत व कन्येची इच्छा असल्यास डाव्या नाकपुडींत, थोडेंसें घालून ध्यावें.

पयसा लक्ष्मणामूलं पुत्रोत्पादस्थितिप्रदम् ॥ ४१ ॥
नासयास्येन वा पीतं वटशृंगाष्टकं तथा ।

पांढऱ्या रिंगणीचें मूळ व वडाचे कोंवळे डेख ८ तोळे दुधांत उगाळून किंवा चटणीसारखे बारीक वाटून, नाकानें किंवा तोंडानें तें प्राशन केलें असतां, पुत्राची उत्पत्ति होते; किंवा पुत्र होऊन जगत नसल्यास तो जगतो.

ओषधीर्जीवनीयाश्च बाह्यांतरुपयोजयेत् ॥ ४२ ॥

या योगाशिवाय जीवनीय गणांतील औषधांचा अंतर्बाह्य उपयोग करावा.

उपचारः प्रियहितैर्भर्त्रा भृत्यैश्च गर्भधृक् ।

नवऱ्यानें व सेवकांनीं स्त्रीस आवडत्या व हितकारक पदार्थांनीं संतोषी ठेवलें असतां गर्भ पूर्णतेला पावतो.

नवनीतघृतक्षीरैः सदा चैनामुदाचरेत् ॥ ४३ ॥

गर्भिणी स्त्रीला हमेश लोणी, तूप व दूध हे पदार्थ देत असावें.

अतिव्यवायमायासं भारं प्रावरणं गुरु ।
अकालजागरस्वप्नकठिनोत्कटकासनम् ॥ ४४ ॥
शोकक्रोधभयोद्वेगवेगश्रद्धाविधारणम् ।
उपवासाध्वतीक्ष्णोष्णगुरुविष्टंभिभोजनम् ॥ ४५ ॥
रक्तं निवसनं श्वभ्रकूपेक्षां मद्यमामिषम् ।
उत्तानशयनं यच्च स्त्रियो नेच्छंति तत्त्यजेत् ॥ ४६ ॥
तथा रक्तस्रुतिं शुद्धिं बस्तिमा मासतोऽष्टमात् ।
एभिर्गर्भः स्रवेदामः कुक्षौ शुष्येन्म्रियेत वा ॥ ४७ ॥

अति मैथुन, अतिश्रम, ओझें वाहणें, जड वस्त्रें पांघरणें, भलत्याच वेळीं जागणें किंवा निजणें, काठिण जागेवर बसणें, उकिडवें बसणें; शोक, क्रोध, भय, त्रास, मल व मूत्र इत्यादिकांचे वेग धारण करणें किंवा बलानें वेग करणें; डोहाळे होतील ते पुरे न

करणें; उपास व मार्गक्रमण करणें; तीक्ष्ण, उष्ण, जड व मलावरोधक पदार्थ खाणें; तसेंच परंपरेनें स्त्रिया ज्या गोष्टी वर्ज्य मानतात त्या, आणि वमन, विरेचन, रक्त काढणें व आठव्या महिन्यापर्यंत बस्तिप्रयोग या क्रिया गर्भिणीनें वर्ज्य कराव्या. हीं कर्मे केल्यास गर्भपात होतो, किंवा सल रहातो अथवा गर्भ मृत होतो.

**वातलैश्च भवेद्गर्भः कुब्जांधजडवामनः।**
**पित्तलैः खलतिः पिंगः श्वित्री पांडुः कफात्मभिः ॥ ४८ ॥**

वातुळ पदार्थ जास्त खाण्यानें गर्भ वांकडा, आंधळा, जड बुद्धीचा किंवा खुजा होतो. पित्तकारक पदार्थ जास्त खाण्यानें टक्कल पडलेला किंवा पिंगट वर्णाचा होतो. आणि कफाच्या योगानें कोडासारखा पांढरा किंवा भुरकट होतो.

**व्याधींश्चास्या मृदुसुखैरतीक्ष्णैरौषधैर्जयेत्।**

गर्भिणीच्या रोगांवरील औषधें तीक्ष्ण नसून सौम्य व तीस आवडणारीं अशीं असावीं.

**द्वितीये मासि कललाद्घनः पेश्यथवार्बुदम्॥ ४९ ॥**
**पुंस्त्रीक्लीबाः क्रमात्तेभ्यः**

गर्भधारण झाल्यापासून दुसऱ्या महिन्यांत पुरुषगर्भ असल्यास घट्ट वर्तुळ; स्त्रीगर्भ असल्यास लांबटगोल पिशवीसारखा व नपुंसक असल्यास अर्धवर्तुल अशा आकाराचा होतो.

**तत्र व्यक्तस्य लक्षणम्।**
**क्षामता गरिमा कुक्षौ मूर्छा छर्दिररोचकः ॥ ५० ॥**
**जृंभा प्रसेकः सदनं रोमराज्याः प्रकाशनम्।**
**अम्लेष्टता स्तनौ पीनौ सस्तन्यौ कृष्णचूचुकौ ॥ ५१ ॥**
**पादशोफो विदाहोऽन्ये श्रद्धाश्च विविधात्मिकाः।**

याप्रमाणें गर्भ स्पष्ट झाला असतां गर्भिणीला पुढील लक्षणें होतातः—शरीर कृश होणें; ज्या कुशींत गर्भ असेल ती कूस जड होणें; मूर्च्छा, वमन, अरुचि, जांभई, तोंडाला पाणी सुटणें, ग्लानि, नाभीच्या खालील रोमराजी स्पष्ट दिसूं लागणें, आंबट पदार्थांवर इच्छा; स्तन पुष्ट व दुग्धयुक्त होऊन त्यांचीं मुखें ( काळसर भाग )

जास्त काळीं होणें; पाय सुजणें, दाह आणि निष्कारण अनेक प्रकारच्या इच्छा ( डोहळे ) होणें.

मातृजं ह्यस्य हृदयं मातुश्च हृदयेन तत् ॥ ५२ ॥
संबद्धं तेन गर्भिण्या नेष्टं श्रद्धाविघारणम् ।

गर्भाचें हृदय आईच्या अंशापासून उत्पन्न होतें व तिच्या हृदयाशींच तें संबद्ध असतें, म्हणून गर्भिणीचे डोहळे पुरविणें फार जरूरीचें आहे.

देयमप्यहितं तस्यै हितोपहितमल्पकम् ॥ ५३ ॥
श्रद्धाविघाताद्गर्भस्य विकृतिश्च्युतिरेव वा ।

तिनें अहितकारक पदार्थ मागितले तरी ते तिला निदान थोडे तरी, हितकर पदार्थांबरोबर द्यावे. तसें न केल्यास गर्भास विकार होतो, किंवा कदाचित् गर्भपातही होतो.

व्यक्तीभवति मासेऽस्य तृतीये गात्रपंचकम् ॥ ५४ ॥
मूर्धा द्वे सक्थिनी बाहू सर्वसूक्ष्मांगजन्म च ।
सममेव हि मूर्धाद्यैर्ज्ञानं च सुखदुःखयोः ॥ ५५ ॥

तिसऱ्या महिन्यांत गर्भाचे हात, पाय, डोकें असे पांच अवयव स्पष्ट होऊन, सर्व सूक्ष्म अंगांचीही उत्पत्ति होऊं लागते. आणि मस्तकादि अवयवांबरोबर गर्भास सुखदुःखाचें ज्ञानही उत्पन्न होतें.

गर्भस्य नाभौ मातुश्च हृदि नाडी निबध्यते ।
तया स पुष्टिमाप्नोति केदार इव कुल्यया ॥ ५६ ॥

मातेच्या हृदयापासून गर्भाच्या बेंबीपर्यंत एक नाडी जोडलेली असते, तिच्यामुळें, जसें पाटाच्या पाण्यामुळें शेताचें रक्षण होतें, तसें गर्भाचें रक्षण होतें.

चतुर्थे व्यक्ततांगानां चेतनायाश्च पंचमे ।
षष्ठे स्नायुसिरारोमबलवर्णनखत्वचाम् ॥ ५७ ॥
सर्वैः सर्वांगसंपूर्णो भावैः पुष्यति सप्तमे ।

चवथ्या महिन्यांत लहान मोठीं अंगें अगदीं स्पष्ट होतात, व पांचव्या महिन्यांत गर्भांत चैतन्य उत्पन्न होतें. सहाव्या महिन्यांत स्नायु, शिरा, केस, रंग, नखें व त्वचा यांची स्पष्टता होते. सातव्या महिन्यांत गर्भाचे सर्व अवयव परिपूर्ण दशेला येऊन, त्या त्या अवयवांच्या गुणधर्मांसह तो पुष्ट होऊं लागतो.

गर्भेणोत्पीडिता दोषास्तस्मिन् हृदयमाश्रिताः ।
कंडूं विदाहं कुर्वंति गर्भिण्याः किक्किसानि च ॥ ५८ ॥

या महिन्यांत गर्भ वाढल्यामुळें त्याच्या दाबानें वातादि दोष गर्भिणीच्या हृदयांत जास्त संचार करून तिला कंड, हातापायांची आग, आणि स्तन व पोट यांवर वळ्या इत्यादि विकार उत्पन्न करितात.

नवनीतं हितं तत्र कोलांबुमधुरौषधैः ।
सिद्धमल्पपटुस्नेहं लघु स्वादु च भोजनम् ॥ ५९ ॥
चंदनोशीरकल्केन लिंपेदूरुस्तनोदरम् ।
श्रेष्ठया चैणहरिणशशशोणितयुक्तया ॥ ६० ॥
अश्वघ्नपत्रसिद्धेन तैलेनाभ्यज्य मर्दयेत् ।
पटोलनिंबमंजिष्ठासुरसैः सेचयेत्पुनः ॥ ६१ ॥
दार्वीमधुकतोयेन मृजां च परिशीलयेत् ।

त्या वेळीं बोराचें पाणी व मधुर औषधें यांनीं तयार केलेलें लोणी देणें हितकर आहे. तसेंच ज्यांत मीठ व तेलकट पदार्थ कमी आहेत, असें हलकें व मधुर भोजनही हितकर आहे. मांड्या, स्तन व पोट यांवर चंदन आणि वाळा यांचा कल्क करून लेप करावा. किंवा काळवीट, हरिण अथवा ससा यांच्या रक्तांत त्रिफळा मिश्र करून लेप करावा. किंवा कण्हेरीच्या पानांनीं तयार केलेलें तेल लावून कडू पडवळ, कडूलिंब, मंजिष्ठ व तुळस यांच्या उटण्यानें अंगाचें मर्दन करावें. आणि दारुहळद व ज्येष्ठमध यांच्या काढ्याचा वारंवार परिषेक करावा.

ओजोऽष्टमे संचरति मातापुत्रौ मुहुः क्रमात् ॥ ६२ ॥
तेन तौ म्लानमुदितौ तत्र जातो न जीवति ।
शिशुरोजोऽनवस्थानान्नारी संशयिता भवेत् ॥ ६३ ॥

आठव्या महिन्यांत गर्भिणीच्या व गर्भाच्या देहांत ओज (तेज) आळीपाळीनें संचार करितें; त्यामुळें ज्यांत तें येतें, तो त्या त्या वेळीं हर्षित होतो व जातें तेव्हां खेदयुक्त होतो. यामुळें आठव्या महिन्यांत जर गर्भिणी प्रसूत झाली, तर गर्भांत ओज स्थिर झालें नसल्यामुळें गर्भाचा नाश होतो, आणि गर्भिणीच्या जगण्याविषयींही संशयच असतो.

क्षीरपेया च पेयाऽत्र सघृतान्वासनं घृतम् ।
मधुरैः साधितं शुद्ध्यै पुराणशकृतस्तथा ॥ ६४ ॥
शुष्कमूलककोलाम्लकषायेण प्रशस्यते ।
शताह्वाकल्किता बस्तिः सतैलघृतसैंधवः ॥ ६५ ॥

या महिन्यांत गर्भिणीला दुधांत केलेली भाताची पेज तूप घालून पाजावी; मधुर पदार्थांत तयार केलेल्या तुपाचा अनुवासनबस्ति द्यावा. सांचलेल्या मलाची शुद्धि व्हावी म्हणून वाळलेले मुळे व आंबट बोरें यांचा काढा, बडीशेपचा कल्क, तेल, तूप व शेंदेलोण एकत्र करून बस्ति द्यावा.

तस्मिंस्त्वेकाहयातेऽपि कालः सूतेरतः परम् ।

आठ महिने पुरे होऊन एक दिवस गेल्याबरोबर जरी गर्भिणी प्रसूत झाली, तरी तो तिचा योग्य काल समजण्यास हरकत नाहीं.

वर्षाद्विकारकारी स्यात्कुक्षौ वातेन धारितः ॥ ६६ ॥

वायूमुळें एक वर्षावर जर गर्भ पोटांत राहिला, तर मात्र तो विकार उत्पन्न करितो.

शस्तश्च नवमे मासि स्निग्धो मांसरसौदनः ।
बहुस्नेहा यवागूर्वा पूर्वोक्तं चानुवासनम् ॥ ६७ ॥

नवव्या महिन्यांत गर्भिणीला स्निग्ध पदार्थ किंवा मांसरस यांनीं मिश्र केलेला भात व पुष्कळ स्निग्ध पदार्थ घालून तयार केलेली यवागू ( तांदुळाच्या दुप्पट पाणी घालून शिजविलेला पातळ भात ) व पूर्वी सांगितलेला अनुवासनबस्ति हितकर आहे.

तत एव पिचुं चाऽस्या योनौ नित्यं निधापयेत् ।
वातघ्नपत्रभंगांभः शीतं स्नानेऽन्वहं हितम् ॥ ६८ ॥

तसेंच अनुवासनाच्या तेलांत भिजविलेला कापसाचा बोळा योनींत ठेवण्यास देऊन, वातघ्न औषधींच्या पानांचा ( वायवर्णा, निर्गुडी वगैरे ) काढा करून तो थंड झाल्यावर त्यानें गर्भिणीला दररोज स्नान घालीत जावें.

निःस्नेहांगीं न नवमान्मासात्प्रभृति वासयेत् ।

नववा महिना लागल्यापासून गर्भिणीनें अंगाला दररोज तेल लावल्याशिवाय राहूं नये.

प्राग्दक्षिणस्तनस्तन्या पूर्वं तत्पार्श्वचेष्टिनी ॥ ६९ ॥
पुन्नामदौर्हृदप्रश्नरता पुंस्वप्नदर्शिनी ।
उन्नते दक्षिणे कुक्षौ गर्भे च परिमंडले ॥ ७० ॥
पुत्रं सूते

जिच्या उजव्या स्तनांत प्रथमतः दूध येतें; जी कोणताही व्यवहार करितांना उजवा हात किंवा उजवा पाय पुढें करते; जिला पुल्लिंगी पदार्थांचे डोहळे होतात; तसेंच पुल्लिंगी पदार्थांचे प्रश्न आवडतात; स्वप्नांतही जी पुल्लिंगी पदार्थच पहाते; जिची उजवी कूस उंच दिसते आणि जिच्या गर्भाचा आकार वाटोळा दिसतो, तिला पुत्र होणार असें समजावें.

अन्यथा कन्यां या चेच्छति नृसंगतिम् ।
नृत्यवादित्रगांधर्वगंधमाल्यप्रिया च या ॥ ७१ ॥

आणि जिला या लक्षणांच्या उलट लक्षणें होऊन, पुरुषाची इच्छा, आणि गाणें, नाचणें, वाद्य वाजविणें, सुगंध घेणें व पुष्पें हीं फार आवडतात, तिला मुलगी होणार म्हणून समजावें.

क्लीबं तत्संकरे तत्र मध्यं कुक्षेः समुन्नतम् ।

तसेंच या दोन प्रकारच्या लक्षणांपैकीं मिश्र लक्षणें दिसून, जिच्या दोन्ही कुशींमधील भाग उंच दिसतो, तिला षंढ होणार म्हणून समजावें.

यमौ पार्श्वद्वयोन्नामात्कुक्षौ द्रोण्यामिव स्थिते ॥ ७२ ॥

आणि जिच्या दोन्ही कुशी उंचवट दिसून, मध्यें द्रोणीप्रमाणें खळगा दिसतो, तिला जुळीं मुलें होणार असें समजावें.

प्राक् चैव नवमान्मासात्सूतिकागृहमाश्रयेत् ।
देशे प्रशस्ते संभारैः संपन्नं साधकेऽहनि ॥ ७३ ॥
तत्रोदीक्षेत सा सूतिं सूतिकापरिवारिता ।

नऊ महिने पुरे होण्यापूर्वींच चांगला मुहूर्त पाहून, प्रशस्त जागेंत सर्व सामुग्रीनें युक्त सूतिकागृहांत गर्भिणीनें प्रवेश करावा.

आणि सुईणीसहवर्तमान त्या ठिकाणीं राहून प्रसूतिकालाची वाट पहावी.

अद्यश्वः प्रसवे ग्लानिः कुक्ष्यक्षिश्लथता क्लमः ॥ ७४ ॥
अधोगुरुत्वमरुचिः प्रसेको बहुमूत्रता ।
वेदनोरूदरकटीपृष्ठहृद्बस्तिवंक्षणे ॥ ७५ ॥
योनिभेदरुजातोदस्फुरणस्रवणानि च ।
आवीनामनुजन्मातस्ततो गर्भोदकस्रुतिः ॥ ७६ ॥

एक दोन दिवसांत प्रसूत होणारीला पुढील लक्षणें होतातः— विशेष ग्लानि येते, कुशी व डोळे गळल्यासारखे होतात, श्रमावांचून थकवा, ओटीपोट व त्याखालील शरीरांत जडत्व, अरुचि, तोंडाला पाणी सुटणें, बहुमूत्र आणि मांड्या, पोट, कंबर, पाठ, हृदय, बस्ति (ओटीपोट) आणि अडसंधि (जांघा) यांत वेदना; तसेंच योनींत फुटल्यासारखी किंवा तुटल्यासारखी पीडा, अथवा दुखणें, स्फुरण आणि योनींतून स्राव होणें. हीं लक्षणें झाल्यावर पोट दुखूं लागून त्यानंतर गर्भोदकाचा (पाण्यासारखा) स्राव होऊं लागतो.

अथोपस्थितगर्भां तां कृतकौतुकमंगलाम् ।
हस्तस्थपुन्नामफलां स्वभ्यक्तोष्णाम्बुसेचिताम् ॥ ७७ ॥
पाययेत्सघृतां पेयाम्

गर्भ बाहेर येतो असें वाटतांच स्वस्तिवाचन करून, गर्भिणीच्या अंगास तेल लावून तिला ऊन पाण्यानें स्नान घालावें, आणि तिच्या हातांत पुल्लिंगवाच्य (नारळ) फळ देऊन, तिला तूप घातलेली कण्हेरी पाजावी.

तनौ भूशयने स्थिताम् ।
आभुग्नसक्थिमुत्तानामभ्यक्ताङ्गीं पुनः पुनः ॥ ७८ ॥
अधोनाभेर्विमृद्नीयात्कारयेज्जृंभचंक्रमम् ।
गर्भः प्रयात्यवागेवम्

नंतर तिला पातळ बिछान्यावर उताणी निजवून व तिच्या दोन्ही मांड्या थोड्या उंच करून बेंबीपासून खालीं तेल लावून मर्दन करावें. तिच्याकडून जांभया देववाव्या, लौकर लौकर चालवावें, या योगानें गर्भ खालीं येतो.

तल्लिंगं हृद्विमोक्षतः ॥ ७९ ॥
आविश्य जठरं गर्भो बस्तेरुपरि तिष्ठति ।
आव्यो हि त्वरयंत्येनां खट्वामारोपयेत्ततः ॥ ८० ॥

अशा रीतीनें तो हृदयापासून मुक्त होऊन व ओटींत शिरून बस्तीच्या वर रहातो. तिला वेणा येऊन व्याकुळता आली म्हणजे बाजेवर निजवावें.

अथ संपीडिते गर्भे योनिमस्याः प्रसादयेत् ।
मृदु पूर्वं प्रवाहेत बाढमाप्रसवाच्च सा ॥ ८१ ॥

जर योनिमुख वायूनें संकुचितच राहिलें असेल, तर योनीस तेल लावून ती विस्तृत करावी. गर्भिणीनें प्रथम हळू हळू कुंथावें, व गर्भ योनिमुखाजवळ आल्यावर प्रसूति होईपर्यंत तर जोरानें कुंथावें.

हर्षयेत्तां मुहुः पुत्रजन्मशब्दजलानिलैः ।
प्रत्यायांति तथा प्राणाः सूतिक्लेशावसादिताः ॥ ८२ ॥

'तुला मुलगा झाला' वगैरे शब्दांनीं तिला आनंदवून व उमेद देऊन तिच्यावर थंड पाणी शिंपडून वारा घालावा. असें केल्यानें, प्रसूतिवेदनांनीं व्याकुळ झालेल्या बाळंतिणीस हुषारी येते.

धूपयेद्गर्भसंगे तु योनिं कृष्णाहिकंचुकैः ।
हिरण्यपुष्पीमूलं च पाणिपादेन धारयेत् ॥ ८३ ॥
सुवर्चलां विशल्यां वा

गर्भ अडकून राहिल्यास योनीला काळ्या सर्पाच्या कातीचा धूर द्यावा. सोनचाफ्याची मुळी, स्थलकमलिनी (सुवर्चला) अथवा कळलावीचा कांदा, हीं तिच्या हातांत किंवा पायास बांधावीं.

जराय्वपतनेऽपि च ।
कार्यमेतत्तथोत्क्षिप्य बाह्वोरेनां विकंपयेत् ॥ ८४ ॥
कटीमाकोटयेत्पाष्ण्या स्फिजौ गाढं निपीडयेत् ।
तालुकंठं स्पृशेद्वेण्या मूर्ध्नि दद्यात्स्नुहीपयः ॥ ८५ ॥
भूर्जलांगलिकीतुंबीसर्पत्वक्कुष्ठसर्षपैः ।
पृथग्द्वाभ्यां समस्तैर्वा योनिलेपनधूपनम् ॥ ८६ ॥
कुष्ठतालीसकल्कं वा सुरामंडेन पाययेत् ।
यूषेण वा कुलत्थानां बिल्वजेनाऽसवेन वा ॥ ८७ ॥
शताह्वासर्षपाजाजीशिग्रुतीक्ष्णकचित्रकैः ।

सहिंगुकुष्ठमदनैर्मूत्रे क्षीरे च सार्षपम् ॥ ८८ ॥
तैलं सिद्धं हितं पायौ योन्यां वाप्यनुवासनम् ।

वार न पडल्यास बाळंतिणीस दोन्ही हातांनीं ( एक हात पोटावर व दुसरा पाठीवर ) धरून हालवावी, म्हणजे वार पडेल. अथवा कमरेवर मारावें; कुल्ले खूप घट्ट दाबावे; टाळू व घशास वेणीचे केस लावावे; डोक्यावर तिधारी निवडुंगाचा चीक घालावा; अथवा भूर्जपत्र, कळलावी, कडू दुधी, सापाची कात, कोष्ठ व शिरस यांपैकीं मिळतील तेवढ्या जिनसांचा लेप योनीस करावा; किंवा धूर द्यावा. तसेंच कोष्ठ व तालीसपत्र यांचा कल्क, सुरेवरील निवळीबरोबर, कुळथाच्या काढ्याबरोबर अथवा बेलाच्या आसवाबरोबर द्यावा. बडीशेप, मोहोऱ्या, जिरें, शेवग्याचें बी, ओंवा, चित्रकमूळ, हिंग, कोष्ठ व गेळफळ यांनीं गोमूत्र व दूध यांत सिद्ध केलेला शिरसेल तेलाचा अनुवासन बस्ति द्यावा.

शतपुष्पावचाकुष्ठकणासर्षपकल्कितः ॥ ८९ ॥
निरूहः पातयत्याशु सस्नेहलवणोऽपराम् ।
तत्संगे ह्यनिलो हेतुः सा निर्यात्याशु तज्जयात् ॥ ९० ॥

अथवा बडीशेप, वेखंड, कोष्ठ, पिंपळी व मोहऱ्या यांचा कल्क, तेल व शेंदेलोण एकत्र केलेला निरूहबस्ति द्यावा; म्हणजे वार लागलीच पडते. कारण, वार पडण्यास वायु प्रतिबंध करीत असतो, आणि त्याचा जय झाला म्हणजे आपोआप वार पडते.

कुशला पाणिनाऽक्तेन हरेत्कृत्तनखेन वा ।

अथवा कुशळ सुइणीनें, हाताचीं नखें काढून व बोटांस तेल लावून, त्यानें वार ओढून काढावी.

मुक्तगर्भापरां योनिं तैलेनांगं च मर्दयेत् ॥ ९१ ॥

गर्भ व वार बाहेर आल्यावर तेल लावून, प्रसूतिकेच्या योनीचें व अंगाचें मर्दन करावें.

मकल्लाख्ये शिरोबस्तिकोष्ठशूले तु पाययेत् ।
सुचूर्णितं यवक्षारं घृतेनोष्णजलेन वा ॥ ९२ ॥
धान्यांबु वा गुडव्योषत्रिजातकरजोन्वितम् ।

बाळंतिणीच्या डोक्यांत, ओटींत व कोठ्यांत जो शूल होतो, त्याला मकल्ल असें म्हणतात. त्यावर जवखाराचें बारीक केलेलें चूर्ण, तुपांत किंवा ऊन पाण्याशीं द्यावें. अथवा धण्याच्या काढ्यांत, हिमांत किंवा फांटांत गूळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, दालचिनी, तमालपत्र व वेलची यांचें चूर्ण घालून द्यावें.

अथ बालोपचारेण बालं योषिदुपाचरेत् ॥ ९३ ॥

नंतर सुइणीनें उत्तरस्थानांत (पहिल्या अध्यायांत) सांगितल्याप्रमाणें बालकाला उपचार करावे.

सूतिका क्षुद्वती तैलाद्धृताद्वा महतीं पिबेत् ।
पंचकोलकिनीं मात्रामनु चोष्णं गुडोदकम् ॥ ९४ ॥
वातघ्नौषधतोयं वा तथा वायुर्न कुप्यति ।
विशुध्यति च दुष्टास्त्रं द्वित्रिरात्रमयं क्रमः ॥ ९५ ॥

बाळंतिणीस प्रथम दोन तीन दिवस आठ प्रहरांनीं जिरेल इतक्या तेलांत किंवा तुपांत पंचकोलाचें चूर्ण घालून द्यावें; आणि त्यावर ऊन केलेलें गुळाचें पाणी पिण्यास द्यावें. वातघ्न औषधांचा काढा द्यावा. या योगानें वायूचा कोप न होतां वाईट झालेलें रक्तही शुद्ध होतें.

स्नेहायोग्या तु निःस्नेहममुमेव विधिं भजेत् ।
पीतवत्याश्च जठरं यमकाक्तं विवेष्टयेत् ॥ ९६ ॥

जिला स्निग्ध पदार्थ देणें अयोग्य दिसेल, तिला वरील औषधें तेल किंवा तूप न घालतां द्यावीं, आणि नंतर पोटास तेल व तूप चोळून, तें फडक्यांनीं आवळून बांधावें.

जीर्णे स्नाता पिबेत्पेयां पूर्वोक्तौषधसाधिताम् ।
त्र्यहादूर्ध्वं विदार्यादिवर्गक्काथेन साधिता ॥ ९७ ॥
हिता यवागूः स्नेहाढ्या सात्म्यतः पयसाथवा ।
सप्तरात्रात्परं चास्यै क्रमशो बृंहणं हितम् ॥ ९८ ॥

याप्रमाणें दिलेलें औषध पचन झाल्यावर तिला स्नान घालून वरील पांच औषधांच्या काढ्यांत तयार केलेली कण्हेरी द्यावी. तीन दिवसांनंतर विदार्यादिगणांतील औषधांच्या काढ्यांत तयार केलेली व पुष्कळ तूप घातलेली यवागू द्यावी, अथवा संवय अस-

त्यास दुधांत सिद्ध केलेली यवागू द्यावी. सात रात्रींनंतर बाळंतिणीस हळुहळू बृंहण ( पौष्टिक पदार्थ ) द्यावें.

द्वादशाहेऽनतिक्रांते पिशितं नोपयोजयेत् ।

बारा दिवस झाल्यावांचून बाळंतिणीस मांस खाण्यास देऊं नये.

यत्नेनोपचरेत्सूतां दुःसाध्या हि तदामयाः ॥ ९९ ॥
गर्भवृद्धिप्रसवरुक्क्लेदास्रस्रुतिपीडनैः ।

बाळंतिणीचे उपचार फार जपून करावे. कारण, गर्भाची वाढ, प्रसववेदना, क्लेद व रक्ताचा स्राव आणि गर्भाचा कोठ्यावरील दाब यामुळें ती अगदीं थकलेली असते. त्यामुळें अशा स्थितींत तिला जर रोग झाले तर ते फार भयंकर असतात.

एवं च मासादध्यर्धान्मुक्ताहारादियंत्रणा ।
गतसूताभिधाना स्यात्पुनरार्तवदर्शनात् ॥ १०० ॥

म्हणून बाळंतिणीस महिना दीड महिना नियमानें वागण्यास लावून, पुढें मग नियम हळुहळू कमी करावे. परंतु तिला पुनः रजोदर्शन होईपर्यंत ती बाळंतीणच आहे.

---

## अध्याय दुसरा.

अथाऽतो गर्भव्यापदं शारीरं व्याख्यास्यामः ।

आतां गर्भास होणाऱ्या विकारांविषयीं सांगतों.

गर्भिण्याः परिहार्याणां सेवया रोगतोऽपि वा ।
पुष्पे दृष्टेऽथवा शूले बाह्यांतः स्निग्धशीतलम् ॥ १ ॥

गर्भिणीस वर्ज्य सांगितलेल्या प्रकारांचें तिनें सेवन केल्यास, किंवा रोगामुळें रजोदर्शन झाल्यास अथवा शूल उत्पन्न झाल्यास अंतर्बाह्य स्निग्ध व शीत उपचार करावे.

सेव्यांभोजहिमक्षीरीवल्ककल्काज्यलेपितान् ।
धारयेद्योनिबस्तिभ्यामार्द्रार्द्रान् पिचुनक्तकान् ॥ २ ॥

तसेंच वाळा, कमळ, चंदन व क्षीरी वृक्षांच्या ( वड, पिंपळ, उंबर, नांदरूख व पायरी ) सालींचा कल्क करून, तो कल्क व तूप यांत कापसाच्या व फडक्याच्या घड्या आणि बोळे भिजवून ते योनींत आणि बस्तीवर ठेवून वरचेवर ओले करीत जावे.

शतधौतघृताक्तां स्त्रीं तदंभस्यवगाहयेत् ।
ससिताक्षौद्रकुमुदकमलोत्पलकेसरम् ॥ ३ ॥
लिह्यात् क्षीरघृतं खादेच्छृंगाटककसेरुकम् ।
पिबेत्कांताब्जशालूकबालोदुंबरवत्पयः ॥ ४ ॥
श्रृतेन शालिकाकोलीद्विबलामधुकेक्षुभिः ।
पयसा रक्तशाल्यन्नमद्यात्समधुशर्करम् ॥ ५ ॥
रसैर्वा जांगलैः

शंभर वेळां पाण्यानें धुतलेलें तूप गर्भिणीच्या अंगास लावून, वर लिहिलेल्या औषधांचा काढा मोठ्या पात्रांत भरून त्यांत तिला बसवावें. आणि साखर, मध व चंद्रविकासी, सूर्यविकासी आणि निळीं कमळें यांचें केसर हीं मिश्र केलेलें दूध व तूप तिला द्यावें. तसेंच शिंगाडे व कचरा तुपांत खाण्यास द्याव्या. अथवा गव्हला, कमळ, निळ्या कमळाचें मूळ व कोंवळे उंबर यांत सिद्ध केलेलें दूध पिण्यास द्यावें. किंवा भाताचें मूळ, काकोली, बला, अतिबला, ज्येष्ठमध व उंसाचें मूळ यांत तयार केलेल्या दुधाबरोबर किंवा जांगल मांसरसाबरोबर मध व साखर घालून तांबसाळीचा भात द्यावा.

शुद्धिवर्ज चाऽस्रोक्तमचारेत् ।

वमन, विरेचन व निरूहबस्ति या शिवाय करून रक्तपित्ताच्या चिकित्सेंत सांगितलेले बाकीचे सर्व उपचार अशा गर्भिणीस हितकर आहेत.

असंपूर्णत्रिमासायाः प्रत्याख्याय प्रसाधयेत् ॥ ६ ॥
आमान्वये च

तीन महिने पूर्ण होण्यापूर्वीं जर गर्भिणीस रजोदर्शन झालें तर किंवा आमदोष झाल्यास, गर्भ कायम राहणें कठिण आहे असें सांगून उपचार करावे.

तत्रेष्टं शीतं रूक्षोपसंहितम् ।
उपवासो घनोशीरगुडूच्यरलुधान्यकाः ॥ ७ ॥
दुरालभापर्पटकचंदनातिविषाबलाः ।
क्वथिताः सलिले पानं तृणधान्यादिभोजनम् ॥ ८ ॥

आमदोष असेल तर रूक्षानें युक्त असे शीतोपचार करावे. तसेंच नागरमोथा, वाळा, गुळवेल, टेंटू, धणे, धमासा, पित्तपापडा, चंदन, अतिविष व चिकणा यांचा काढा पिण्यास द्यावा. आणि देवभात, वरी इत्यादि तृणधान्यें खाण्यास द्यावीं.

मुद्गादियूषैरामे तु जिते स्निग्धादि पूर्ववत्।

तसेंच मूग, मसुरा वगैरे धान्यांचें कढण ( यूष ) द्यावें. त्यामुळें आमदोष नाहींसा झाल्यावर पुनः पूर्वीप्रमाणें स्निग्धादि उपचार करावे.

गर्भे निपतिते तीक्ष्णं मद्यं सामर्थ्यतः पिबेत् ॥ ९ ॥
गर्भकोष्ठविशुद्ध्यर्थमर्तिविस्मरणाय च ।

याप्रमाणें उपचार करूनही गर्भपात होईल, तर गर्भाशयाची शुद्धि होण्यासाठीं व वेदनांचा विसर पडण्यासाठीं पिण्यास तीक्ष्ण मद्य ( किंवा तसा मादक पदार्थ ) द्यावें.

लघुना पंचमूलेन रूक्षां पेयां ततः पिबेत् ॥ १० ॥

आणि तूप न घालतां, लघुपंचमूलानें तयार केलेली कण्हेरी द्यावी.

पेयाममद्यपा कल्के साधितां पांचकौलिके ।
बिल्वादिपंचकक्वाथे तिलोद्दालकतंडुलैः ॥ ११ ॥

जिला मद्याची संवय नाहीं, तिला पंचकोलाच्या कल्कांत व महत्पंचमूलांच्या काढ्यांत, तीळ व उद्दालक जातीचे तांदूळ घालून केलेली कण्हेरी द्यावी.

मासतुल्यदिनान्येवं पेयादिः पतिते क्रमः ।
लघुरस्नेहलवणो दीपनीययुतो हितः ॥ १२ ॥

जितक्या महिन्यांचा गर्भ होऊन पतन झाला असेल, तितके दिवस हे उपचार करावे. अशा उपचारांत स्निग्ध पदार्थ व मीठ घालूं नये, व त्यांतील पदार्थ दीपनीय व हलके असावे.

दोषधातुपरिक्लेदशोषार्थं विधिरित्ययम् ।

गर्भाशयसंबंधीं वातादि दोष, दूषित धातु व क्लेद ( स्राव ) यांचा क्षय होण्यासाठीं वरील प्रकार सांगितला आहे.

स्नेहान्नबस्तयश्चोर्ध्वं बल्यजीवनदीपनाः ॥ १३ ॥

त्यानंतर बल वाढविणारीं, ओजाची वृद्धि करणारीं व अग्नीस प्रदीप्त करणारीं अशीं स्निग्ध द्रव्यें, अन्न व बस्तिप्रयोग यांची योजना करावी.

संजातसारे महति गर्भे योनिपरिस्रवात् ।
वृद्धिमप्राप्नुवन् गर्भः कोष्ठे तिष्ठति सस्फुरः ॥ १४ ॥
उपविष्टकमाहुस्तं वर्धते तेन नोदरम् ।

गर्भ बलवान् होऊन वाढत असतां, योनिस्राव सुरू झाल्यास त्याची वाढ खुंटून तो तसाच पोटांत रहातो. तसा गर्भ स्फुरण पावत असतो, पण वाढत नाहीं; अर्थात् पोटही वाढत नाहीं. याला उपविष्टक ( मराठींत सल ) म्हणतात.

शोकोपवासरूक्षाद्यैरथ वा योन्यतिस्रवात् ॥ १५ ॥
वाते क्रुद्धे कृशः शुष्येद्गर्भो नागोदरं तु तत् ।
उदरं वृद्धमप्यत्र हीयते स्फुरणं चिरात् ॥ १६ ॥

शोक, उपवास, रूक्ष वगैरे पदार्थांचें सेवन व अतिशय योनिस्राव या कारणांनीं वायु कुपित होऊन गर्भ कृश होत ( वाळत ) जातो. त्यास नागोदर ( यासही मराठींत सलच ) म्हणतात. यांत वाढलेलें पोट कमी होतें व गर्भाचें स्फुरण अगदीं सावकाश होतें.

तयोर्बृंहणवातघ्नमधुरद्रव्यसंस्कृतैः ।
घृतक्षीररसैस्तृप्तिरामगर्भांश्च खादयेत् ॥ १७ ॥
तैरेव च सुतृप्तायाः क्षोभणं यानवाहनैः ।

या दोन्ही प्रकारच्या (उपविष्टक किंवा नागोदर झालेल्या) गर्भिणीस बृंहण (तृप्तिकारक), वातघ्न व गोड अशा पदार्थांनीं तयार केलेलें तूप, दूध किंवा मांसरस देऊन तिला पुष्ट करावें. आणि निरनिराळ्या प्रकारांनीं अंडीं खाण्यास द्यावीं. अशा रीतीनें ती पुष्ट झाल्यावर गाडी, घोडे, हत्ती इत्यादिकांवर बसवून, तिला अतिशय फिरवून क्षोभण[1] संस्कार करावा.

---

१ गर्भिणीला यानावर बसवून जास्त फिरविल्यानें गर्भाला क्षोभण होतें. परंतु या प्रसंगीं तसें करण्याची आवश्यकता आहे. त्यामुळें दबलेला गर्भ पुनः वाढीस लागतो.

लीनाख्ये निस्फुरे श्येनगोमत्स्योत्क्रोशबर्हिजाः ॥ १८ ॥
रसा बहुघृता देया माषमूलकजा अपि ।
बालबिल्वं तिलान्माषान्सक्तूंश्च पयसा पिबेत् ॥ १९ ॥
समेद्यमांसं मधु वा कट्यभ्यंगं च शीलयेत् ।
हर्षयेत्सततं चैनामेवं गर्भः प्रवर्धते ॥ २० ॥
पुष्टोऽन्यथा वर्षगणैः कृच्छ्राज्जायेत नैव वा ।

जो गर्भ स्फुरण न पावतां गर्भाशयांत लीन होऊन रहातो, त्याला 'लीनगर्भ' असें म्हणतात. त्यावर ससाणा, गाय, मासे, सुतारपक्षी व मोर यांचे मांसरस पुष्कळ तूप घालून पाजावे. किंवा उडीद व मुळे यांच्या सारांत पुकळ तूप घालून तें द्यावें. तसेंच कोंवळें बेलफळ, तीळ, उडीद व भाजलेल्या सातूंचें पीठ हीं दुधाबरोबर द्यावीं. मेदस्वी मांस किंवा द्राक्षासव द्यावें. कमरेस नेहमीं तेल जिरवीत जावें. आणि अशा स्त्रीला नेहमीं आनंदी ठेवावें; म्हणजे लीनगर्भ वाढीस लागतो. अशा प्रकारचें आचरण न केल्यास गर्भ वाढण्यास अनेक वर्षे लागतात, व तो वाढल्यावरही मोठ्या प्रयासानें गर्भिणी प्रसूत होते. अथवा तो गर्भिणीच्या आयुष्यांत कधींही वाढूं शकत नाहीं.

उदावर्तं तु गर्भिण्याः स्नेहैराशुतरां जयेत् ॥ २१ ॥
योग्यैश्च बस्तिभिर्हन्यात्सगर्भां स हि गर्भिणीम् ।

गर्भिणीस उदावर्त झाला असतां, स्नेहपान करवून व योग्य बस्तींची योजना करून तो लौकर बरा करावा. नाहींपेक्षां तो रोग गर्भ व गर्भिणी या दोघांचाही नाश करतो.

गर्भेऽतिदोषोपचयादपथ्यैर्दैवतोऽपि वा ॥ २२ ॥
मृतेऽतरुदरं शीतं स्तब्धं ध्मातं भृशव्यथम् ।
गर्भास्पंदो भ्रमस्तृष्णा कृच्छ्रादुच्छ्वसनं क्रमः ॥ २३ ॥
अरतिः स्रस्तनेत्रत्वमावीनामसमुद्भवः ।

वातादि दोषांचा अतिशय संचय झाल्यानें किंवा अपथ्यानें अथवा दैवगतीमुळें गर्भ पोटांत मेला असतां पुढील लक्षणें होतात. पोटांत थंड व स्तब्ध होऊन तें फुगतें, व अतिशय दुखतें; गर्भाचें स्फुरण बंद पडतें; गर्भिणीला भ्रम, तहान, ग्लानि व अस्वस्थता

प्राप्त होऊन तिच्यानें श्वास टाकवत नाहीं; डोळे गळून जातात, आणि प्रसूतिवेदना बंद होतात.

तस्याः कोष्णांबुसिक्ताया पिष्ट्वा योनिं प्रलेपयेत् ॥ २४ ॥
गुडं किण्वं सलवणं तथांतः पूरयन्मुहुः ।
घृतेन कल्कीकृतया शाल्मल्यतासिपिच्छया ॥ २५ ॥

अशा वेळीं कोमट पाण्यानें तिला स्नान घालून गूळ व किण्व (धान्याचा काढा आंबला म्हणजे त्यावर फेंस येतो तो; याला सुराबीज किंवा खमीरही म्हणतात.) यांत मीठ मिसळून, त्याचा योनीस लेप करावा. अथवा मोचरस व अळशीचा डींक तुपांत खलून योनींत भरावा.

मंत्रैर्योगैर्जरायूक्तैर्मूढगर्भो न चेत्पतेत् ।
अथापृच्छयेश्वरं वैद्यो यत्नेनाशु तमाहरेत् ॥ २६ ॥
हस्तमभ्यज्य योनिं च साज्यशाल्मलिपिच्छया ।
हस्तेन शक्यं तेनैव

तसेंच वार पाडण्यासाठीं जे उपचार सांगितले आहेत, त्यांचाही उपयोग करावा. इतकेंही करून गर्भ नच पडेल, तर राजाज्ञा घेऊन (कारण, त्यांत कदाचित् गर्भिणी दगावण्याचा संभव असतो.) हातानें गर्भ काढतां येण्याजोगा असल्यास, हातास व योनीस मोचरस व तूप एकत्र खलून लावून, मोठ्या प्रयत्नानें तो हातानें काढावा.

गात्रं च विषमं स्थितम् ॥ २७ ॥
आंछनोत्पीडसंपीडविक्षेपोत्क्षेपणादिभिः ।
अनुलोम्य समाकर्षेद्योनिं प्रत्यार्जवागतम् ॥ २८ ॥

गर्भाचा एखादा अवयव सहज ओढण्यासारखा नसेल, तर फिरवून सरळ करणें, दाबणें, लांब करणें, दुमडणें, फेंकणें, उचलणें, अशा कोणत्याही रीतीनें त्याला बाहेर येईसा करून, द्वाराशीं सरळ रेषेंत आल्यावर ओढून काढावा.

हस्तपादशिरोभिर्यो योनिं भुग्नः प्रपद्यते ।
पादेन योनिमेकेन भुग्नोऽन्येन गुदं च यः ॥ २९ ॥
विष्कंभौ नाम तौ मूढौ शस्त्रदारणमर्हतः ।
मंडलांगुलिशस्त्राभ्यां तत्र कर्म प्रशस्यते ॥ ३० ॥

ज्या गर्भाचा हात, पाय किंवा डोकें योनींत आडवें येतें त्यास, व ज्याचा एक पाय योनींत व दुसरा गुदाशीं आडवा येतो अशा या दोन गर्भांस विष्कंभमूढगर्भ असें म्हणतात. त्यावर शस्त्रक्रिया केली पाहिजे. त्यासाठीं 'मंडलाग्र' व 'अंगुलिशस्त्र' त्यावर हीं योग्य शस्त्रें होत.

वृद्धिपत्रं हि तीक्ष्णाग्रं न योनाववचारयेत् ।

'वृद्धिपत्र' शस्त्राचें अग्र फार तीक्ष्ण असतें, म्हणून तें योनींत चालवूं नये.

पूर्वं शिरःकपालानि दारयित्वा विशोधयेत् ॥ ३१ ॥
कक्षोरस्तालुचिबुके प्रदेशेऽन्यतमे ततः ।
समालंब्य दृढं कर्षेत्कुशलो गर्भशंकुना ॥ ३२ ॥
अभिन्नशिरसं त्वक्षिकूटयोर्गण्डयोरपि ।

अशा शस्त्रक्रियेंत कुशल वैद्यानें प्रथमतः गर्भाच्या डोक्याचीं हाडें फोडून, तीं बाहेर काढून टाकावीं. नंतर कांख, ऊर, टाळू किंवा हनुवटी यांच्यापैकीं एखादा भाग गर्भशंकूनें बळकट धरून गर्भ बाहेर ओढून काढावा. मस्तकाचें विदारण केलें नसेल, तर गाल अथवा डोळ्याचे खळगे यांस धरून गर्भ जोरानें बाहेर ओढावा.

बाहुं छित्त्वांऽसंसक्तस्य वाताध्मातोदरस्य तु ॥ ३३ ॥
विदार्य कोष्ठमंत्राणि बहिर्वा संनिरस्य च ।
कटीसक्तस्य तद्वच्च तत्कपालानि दारयेत् ॥ ३४ ॥

गर्भ खांद्यामुळें अडकला असेल तर, हात तोडून काढून शंकूनें गर्भ ओढावा. वायूनें गर्भाचें पोट फुगल्यानें अडकला असेल तर, त्याचा कोठा फाडून अथवा जरूर दिसल्यास आंतडींही बाहेर काढून, नंतर गर्भ बाहेर ओढावा. गर्भाच्या कमरेमुळें तो ओढतां येत नसेल, तर वरच्याप्रमाणेंच क्रिया करून व कमरेचीं हाडें फोडून गर्भ बाहेर काढावा.

यद्यद्वायुवशादंगं सज्जेद्गर्भस्य खंडशः ।
तत्तच्छित्त्वा हरेत्सम्यग्रक्षेन्नारीं च यत्नतः ॥ ३५ ॥

एकंदरींत वायूमुळें गर्भाचें जें जें अंग आडवें येईल, त्या त्या भागाचे तुकडे करून, मोठ्या कुशलतेनें गर्भ बाहेर काढून स्त्रीचें रक्षण मोठ्या प्रयत्नानें करावें.

गर्भस्य हि गतिं चित्रां करोति विगुणोऽनिलः।
तत्राऽनल्पमतिस्तस्मादवस्थापेक्षमाचरेत्॥ ३६॥

वायु कोप पावला म्हणजे गर्भास अनेक प्रकारच्या गति मिळून तो चमत्कारिक रीतीनें क्रिया करीत असतो; यासाठीं कुशल वैद्यानें गर्भाची स्थिति जाणून चिकित्सा करावी.

छिंद्याद्गर्भं न जीवंतं मातरं स हि मारयेत्।
सहात्मना न चोपेक्ष्यः क्षणमप्यस्तजीवितः॥ ३७॥

गर्भ जिवंत असला तर शस्त्रक्रिया करूं नये. नाहींपेक्षां गर्भ मरून, तो गर्भिणीसही मारतो. परंतु मृतगर्भाची मात्र क्षणभरही उपेक्षा करूं नये.

योनिसंवरणभ्रंशमकल्लश्वासपीडिताम्।
पूत्युद्गारां हिमांगीं च मूढगर्भां परित्यजेत्॥ ३८॥

ज्या गर्भिणीच्या गर्भाशयाचें मुख आकुंचित झालें आहे; जी योनिभ्रंश, मकल्लशूळ व श्वास या रोगांनीं पीडित झाली आहे; आणि जिचें अंग गार पडून, जिला दुर्गंधयुक्त ढेंकरा येत आहेत, अशा गर्भिणीचा मूढगर्भ असाध्य आहे.

अथापतंतीमपरां पातयेत्पूर्ववद्भिषक्।

मूढगर्भ ( मृतगर्भ ) बाहेर पडल्यावर वार पडली नाहीं तर ती पाडण्याकरितां ( पहिल्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें ) योजना करावी.

एवं निर्हृतशल्यां तु सिंचेदुष्णेन वारिणा॥ ३९॥
दद्यादभ्यक्तदेहायै योनौ स्नेहपिचुं ततः।
योनिर्मृदुर्भवेत्तेन शूलं चाऽस्याः प्रशाम्यति॥ ४०॥

अशा रीतीनें तिच्यांतील एक प्रकारचें शल्य निघून गेल्यावर तिला ऊन पाण्यानें स्नान घालून, तिच्या अंगास तेलमर्दन करावें. नंतर तेलानें भिजविलेले कापसाचे बोळे योनींत ठेवावे. त्यामुळें योनि मृदु होऊन वेदनाही कमी होतात.

दीप्यकातिविषारास्नाहिंग्वेलापंचकोलकान् ।
चूर्णं स्नेहेन कल्कं वा क्वाथं वा पाययेत्ततः ॥ ४१ ॥
कटुकातिविषापाठाशाकत्वग्घिगुतेजिनीः ।
तद्वच्च दोषस्यंदार्थं वेदनोपशमाय च ॥ ४२ ॥
त्रिरात्रमेवं सप्ताहं स्नेहमेव ततः पिबेत् ।
सायं पिबेदरिष्टं वा तथा सुकृतमासवम् ॥ ४३ ॥

तसेंच दोषांचा स्राव व वेदनांची शांति होण्यासाठीं ओंवा, अतिविष, रास्ना, वेलदोडे, हिंग व पंचकोल यांचें अथवा कुटकी अतिविष, पहाडमूळ, सागाचें बी, दालचिनी, हिंग व तेजबळ यांचें चूर्ण, कल्क अथवा काढा करून, स्नेहपदार्थाबरोबर द्यावें. मूढगर्भ बाहेर काढल्यापासून तीन दिवसपर्यंत याप्रमाणें करावें. नंतर सात दिवस नुस्ता स्नेहच द्यावा. संध्याकाळीं ( एखादें वात-नाशक ) अरिष्ट किंवा उत्तम प्रकारचें आसव द्यावें.

शिरीषककुभक्वाथपिचून् योनौ विनिक्षिपेत् ।

शिरस व अर्जुनसादडा यांच्या काढ्यांत कापसाच्या घड्या भिजवून योनींत ठेवाव्या.

उपद्रवाश्च येऽन्ये स्युस्तान् यथास्वमुपाचरेत् ॥ ४४ ॥

व दुसरे जे जे कांहीं विकार उत्पन्न होतील, त्यांवर योग्य औषधें देऊन त्यांचा नाश करावा.

पयो वातहरैः सिद्धं दशाहं भोजने हितम् ।
रसो दशाहं च परं लघुपथ्याल्पभोजना ॥ ४५ ॥
स्वेदाभ्यंगपरा स्नेहान् बलातैलादिकान् भजेत् ।
ऊर्ध्वं चतुर्भ्यो मासेभ्यः सा क्रमेण सुखानि च ॥ ४६ ॥

आणखी पुढें दहा दिवसपर्यंत प्रसूतिकेला भोजनाबरोबर वातहारक पदार्थांनीं तयार केलेलें दूध देणें हितकर आहे; अथवा मांसरस द्यावा. त्यानंतर चार महिने तिला हलकें, हितकर (पथ्यकर) व थोडें असें भोजन देत जावें. अभ्यंग व स्वेदकर्म (घाम काढ-ण्याचा विधि) आणि बलातैल यांचा हळूहळू उपयोग करावा. यापुढें आहारविहार वाटेल तसा करण्यास हरकत नाहीं.

बलामूलकषायस्य भागाः षट् पयसस्तथा ।
यवकोलकुलत्थानां दशमूलस्य चैकतः ॥ ४७ ॥

निःक्वाथभागो भागश्च तैलस्य च चतुर्दशः ।
द्विमेदादारुमंजिष्ठाकाकोलीद्वयचंदनैः ॥ ४८ ॥
सारिवाकुष्ठतगरजीवकर्षभसैंधवैः ।
कालानुसार्याशैलेयवचागुरुपुनर्नवैः ॥ ४९ ॥
अश्वगंधावरीक्षीरशुक्लायष्टीवरारसैः ।
शताह्वाशूर्पपर्ण्यैलात्वक्पत्रैः श्लक्ष्णकल्कितैः ॥ ५० ॥
पक्वं मृद्वग्निना तैलं सर्ववातविकारजित् ।
सूतिकाबालमर्मास्थिक्षतक्षीणेषु पूजितम् ॥ ५१ ॥
ज्वरगुल्मग्रहोन्मादमूत्राघातांत्रवृद्धिजित् ।
धन्वंतरेरभिमतं योनिरोगक्षयापहम् ॥ ५२ ॥

चिकणमूळाचा काढा व दूध प्रत्येकीं सहा भाग; सातु, बोरें, कुळीथ व दशमुळें या सर्वांचा काढा एक भाग; तेल एक भाग; मेदा, महा-मेदा, देवदार, मंजिष्ठ, काकोली, क्षीरकाकोली, चंदन, उपळसरी, कोष्ठ, तगर, जीवक, ऋषभक, शेंदेलोण, दारुहळद, दगडफूल, वेखंड, अगरु, पुनर्नवा, आस्कंद, शतावरी, पांढरा भुइकोहळा, ज्येष्ठ-मध, त्रिफळा, तांबडा बोळ, बडीशेप, शूर्पपर्णी, दालचिनी, वेलची व तमालपत्र हीं सर्व कुटून, त्या सर्वांचा कल्क (स्नेहपाकाच्या परिभाषेप्रमाणें) चतुर्थांश द्यावा. हीं सर्व एकत्र करून मंदाग्नी-वर तेल सिद्ध करावें. हें तेल सर्व प्रकारचे वातविकार दूर करतें. बाळंतीण, सोळा वर्षांपर्यंतचीं मुलें आणि क्षतक्षीण (मर्म व अस्थि यांवर क्षत झाल्यामुळें क्षीण होणारीं) माणसें यांना हें फारच उपयोगी आहे. तसेंच ज्वर, गुल्म, भूतोन्माद, इतर उन्माद, मूत्रा-घात, अंतर्गल, व योनीसंबंधीं रोग व क्षय यांचाही हें नाश करितें. धन्वंतरीनेंही याची स्तुति केली आहे.

बस्तिद्वारे विपन्नायाः कुक्षिः प्रस्पंदते यदि ।
जन्मकाले ततः शीघ्रं पाटयित्वोद्धरेच्छिशुम् ॥ ५३ ॥

प्रसूत होतांना स्त्री मेली असून पोट हालत असेल तर गर्भ जिवंत आहे असें जाणून बस्तिद्वाराजवळ फाडून मूल बाहेर काढावें.

मधुकं शाकबीजं च पयस्या सुरदारु च ।
अश्मंतकः कृष्णतिलास्ताम्रवल्ली शतावरी ॥ ५४ ॥
वृक्षादनी पयस्या च लता चोत्पलसारिवा ।

अनंता सारिवा रास्ना पद्मा च मधुयष्टिका ॥ ५५ ॥
बृहतीद्वयकाश्मर्यः क्षीरिशृंगत्वचो घृतम् ।
पृश्निपर्णी बला शिग्रुः श्वदंष्ट्रा मधुपर्णिका ॥ ५६ ॥
शृंगाटकं बिसं द्राक्षा कसेरु मधुकं सिता ।
सप्तैतान् पयसा योगानर्धश्लोकसमापनान् ॥ ५७ ॥
क्रमात्सप्तसु मासेषु गर्भे स्रवति योजयेत् ।
कपित्थबिल्वबृहतीपटोलेक्षुनिदिग्धिजैः ॥ ५८ ॥
मूलैः शृतं प्रयुंजीत क्षीरं मासे तथाऽष्टमे ।
नवमे सारिवाऽनंतापयस्यामधुयष्टिभिः ॥ ५९ ॥
योजयेद्दशमे मासि सिद्धं क्षीरं पयस्यया ।
अथवा यष्टिमधुकनागरामरदारुभिः ॥ ६० ॥

पहिल्या महिन्यांत गर्भपात होत असेल तर ज्येष्ठमध, सागाचें बीं, क्षीरकाकोली व देवदार यांचा कल्क दुधाबरोबर द्यावा. तशाच रीतीनें, दुसऱ्या महिन्यांत, आपटा, काळे तीळ, मंजिष्ठा व शतावरी यांचा कल्क द्यावा. तिसऱ्या महिन्यांत बांडगूळ, क्षीरकाकोली, पांढरी व काळी उपळसरी यांचा द्यावा. चवथ्यांत धमासा, पांढरी उपळसरी, रास्ना, मंजिष्ठा व ज्येष्ठमध यांचा; आणि पांचव्यांत रिंगणी, डोरली, शिवण, क्षीरी वृक्षांचे अंकुर व साल यांचा कल्क तूप मिश्र करून द्यावा. सहाव्यांत पिठवण, चिकणा, शेवगा, गोखरू व मधुपर्णिका यांचा; व सातव्यांत शिंगाडे, कमळाचे देंठ, द्राक्षें, कचरा, ज्येष्ठमध यांचा कल्क करून, त्यांत खडीसाखर व दूध मिसळून द्यावा. आठव्यांत कवठ, बेल, रिंगणी, पडवळ, ऊंस व डोरली यांच्या मुळांच्या कल्कांत तयार केलेलें दूध द्यावें. तसेंच गर्भरक्षणार्थ नवव्या महिन्यांत पांढरी उपळसरी, धमासा, क्षीरकाकोली व ज्येष्ठमध यांनीं तयार केलेलें दूध पिण्यास द्यावें. आणि दहाव्या महिन्यांत क्षीरकाकोलींत तयार केलेलें, अथवा ज्येष्ठमध, सुंठ व देवदार यांत तयार केलेलें दूध द्यावें.

अवस्थितं लोहितमंगनाया वातेन गर्भं ब्रुवतेऽनभिज्ञाः ।
गर्भाकृतित्वात्कटुकोष्णतीक्ष्णैः स्रुते पुनः केवल एव रक्ते ॥ ६१ ॥
गर्भं जडा भूतहृतं वदंति मूर्तेर्न दृष्टं हरणं यतस्तैः ।
ओजोशनत्वादथ वाऽव्यवस्थैर्भूतैरुपेक्ष्येत न गर्भमाता ॥ ६२ ॥

वायूच्या योगानें स्त्रीच्या गर्भाशयांत रक्तसंचय झाला तरी देखील कांहीं लक्षणें गर्भासारखीं होतात. त्यावरून अज्ञान वैद्य त्यालाही गर्भ म्हणतात, आणि दैववशात् तिखट, उष्ण व तीक्ष्ण पदार्थांनीं रक्ताचा स्राव झाला, तर मूर्ख वैद्य तो गर्भ भुतानें पळविला असेंही म्हणतात. हें त्यांचें अज्ञान होय. कारण, भुतांचें खाणें ओज होय; ते स्थूल देह खात नाहींत. आणि जर ते गर्भ खातात असें म्हटलें तर ते गर्भिणीसही खाऊं शकतील.

---

## अध्याय तिसरा.

अथातोऽगविभागं शारीरं व्याख्यास्यामः ।

यापुढें आतां शरीराच्या विभागांविषयीं माहिती सांगतों.

शिरोऽतराधिद्वौं बाहू सक्थिनी च समासतः ।
षडंगमंगं प्रत्यंगं तस्याक्षिहृदयादिकम् ॥ १ ॥

मस्तक, मध्यभाग, दोन हात व दोन पाय अशीं शरीराचीं सहा अंगें ( विभाग ) होत. व डोळे, हृदय इत्यादि प्रत्यंगें (पोटविभाग ) होत.

शब्दः स्पर्शश्च रूपं च रसो गंधः क्रमाद्गुणाः ।
खाऽनिलाग्न्यब्भुवामेकगुणवृद्ध्यन्वयः परे ॥ २ ॥

शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे अनुक्रमानें आकाश, वायु, अग्नि, जल व पृथ्वी यांचे गुण होत. प्रत्येक महाभूताचा एकेक गुण त्या महाभूतांत विशेष असून त्याच्या मागील महाभूतांचा-गुणही त्यांत असतो.[१]

तत्र खात् खानि देहेऽस्मिन् श्रोत्रं शब्दो विविक्तता ।
वातात्स्पर्शत्वगुच्छ्वासा वह्नेर्दृग्रूपपक्तयः ॥ ३ ॥
आप्या जिह्वारसक्लेदाघ्राण गंधास्थि पार्थिवम् ।

शरीरांतील एकंदर छिद्रें, श्रवणेंद्रिय ( कान ), शब्द व पोकळी यांची उत्पत्ति आकाशापासून आहे. स्पर्श, त्वचा व उच्छ्वास

---

१ आकाशाचा गुण शब्द. पण आकाश हें पहिलें असल्यामुळें, त्याच्यांत एकच शब्द गुण मुख्य होय. वायूंत स्पर्श मुख्य व शब्दगुण गौण; याप्रमाणेंच इतरांत समजावें.

यांची उत्पत्ति वायूपासून आहे. दृष्टि, रूप व पचनशक्ति हीं अग्नीपासून होत. रसनेंद्रिय ( जीभ ), रस व क्लेद ( लाळ, लस वगैरे ) हीं जलापासून होत. आणि घ्राणेंद्रिय ( नाक ), गंध ( वास ) व हाडें हीं पृथ्वीपासून होत.

मृद्वत्र मातृजं रक्तमांसमज्जगुदादिकम् ॥ ४ ॥

रक्त, मांस, मज्जा, गुद इत्यादि शरीरांतील मृदु पदार्थांची उत्पत्ति मातेच्या अंशापासून होते.

पैतृकं तु स्थिरं शुक्रधमन्यस्थिकचादिकम् ।

वीर्य, धमन्या, अस्थि, केंस इत्यादि घट्ट पदार्थांची उत्पत्ति पित्याच्या अंशापासून होते.

चैतनं चित्तमक्षाणि नानायोनिषु जन्म च ॥ ५ ॥

इंद्रियें ( कार्यकारी शक्ति ), तसेंच अनेक प्रकारच्या योनींत होणारा जन्म व मन हे जीवात्म्यापासून होत.

सात्म्यजं त्वायुरारोग्यमनालस्यं प्रभा बलम् ।

आयुष्य, आरोग्य, उद्योग, कांति व बल हीं आईबापांच्या सात्म्यापासून उत्पन्न होतात.

रसजं वपुषो जन्म वृत्तिर्वृद्धिरलोलता ॥ ६ ॥

शरीराची उत्पत्ति, स्थिति, वाढ व स्थिरता हीं रसापासून होतात.

सात्त्विकं शौचमास्तिक्यं शुक्लधर्मरुचिर्मतिः ।

शुद्धता, आस्तिक बुद्धि, शुद्ध धर्माविषयीं आवड व बुद्धि ( सारासार विवेचनाची शक्ति ) हे सात्विक गुण होत.

राजसं बहुभाषित्वं मानक्रुद्दंभमत्सराः ॥ ७ ॥

फार बोलणें, घमेंड, क्रोध, दंभ ( ढोंग ) व मत्सर हे राजस गुण होत.

तामसं भयमज्ञानं निद्राऽलस्यं विषादिता ।

भीति, मूर्खपणा, झोंप, आळस व खेद हे तामस गुण होत.

इति भूतमयो देहः

याप्रमाणें हा पांचभौतिक देह आहे.

तत्र सप्त त्वचोऽसृजः ॥ ८ ॥
पच्यमानात्प्रजायंते क्षीरात्संतानिका इव ।

ज्याप्रमाणें दूध तापलें असतां त्यावर साय येते, त्याप्रमाणें रक्ताचा पाक होऊन त्यावर सात प्रकारच्या त्वचा येतात.

धात्वाशयांतरक्लेदो विपक्वः स्वंस्वमूष्मणा ॥ ९ ॥
श्लेष्मस्नाय्वपराच्छन्नः कलाख्यः काष्ठसारवत् ।
ताः सप्त

सप्त धातूंच्या आशयांतील क्लेदाचा (द्रव पदार्थाचा), त्या त्या धातूंतील उष्णतेनें पाक होऊन कफ, स्नायु व वार यांनीं आच्छादित, लाकडांत ज्याप्रमाणें नार असतो, त्याप्रमाणें प्रत्येकांत एकेक अशा सात कला आहेत.

सप्त चाधारा रक्तस्याद्यः क्रमात् परे ॥ १० ॥
कफामपित्तपक्कानां वायोर्मूत्रस्य च स्मृताः ।
गर्भाशयोऽष्टमः स्त्रीणां पित्तपक्काशयांतरे ॥ ११ ॥

अनुक्रमानें रक्ताशय, कफाशय, आमाशय, पित्ताशय, पक्काशय, वाय्वाशय व मूत्राशय असे सात प्रकारचे आधार उत्पन्न होतात. स्त्रियांना मात्र गर्भाशय आठवा असतो, आणि तो, पित्ताशय व पक्काशय यांच्या मध्यभागीं असतो.

कोष्ठांगानि स्थितान्येषु हृदयं क्लोम फुप्फुसम् ।
यकृत्प्लीहोंदुकं वृक्कौ नाभिडिंभांत्रबस्तयः ॥ १२ ॥

हृदय, क्लोम (पिपासास्थान) फुफ्फुस, यकृत्, प्लीहा, उंदुक, दोन वृक्क, नाभि, डिंब, अंत्र व बस्ति हे कोठ्याचे विभाग या आशयांजवळ आहेत.

दश जीवितधामानि शिरोरसनबंधनम् ।
कंठोस्रं हृदयं नाभिर्बस्तिः शुक्रौजसी गुदम् ॥ १३ ॥

शिरोबंधन, जिव्हाबंधन, गळा, रक्त, हृदय, नाभि, बस्ति, शुक्र, ओज व गुद हीं दहा प्राणस्थानें आहेत.

जालानि कंडराश्चाङ्गे पृथक् षोडश निर्दिशेत् ।
षट् कूर्चाः सप्त सीवन्यो मेढ्रजिह्वाशिरोगताः ॥ १४ ॥
शस्त्रेणैताः परिहरेत्

शरीरांत सोळा जाळें ( जाळीं ) व सोळा कंडरा आहेत. कूर्च ( दोन्ही हात, दोन्ही पाय, गळा व शिस्न यांतील मांसरज्जूंचे समुदाय ) सहा आहेत. आणि शिस्न व जीभ यांची एकेक शिवण आणि मस्तकांतिल पांच, मिळून सात शिवणी आहेत. यांना शस्त्र लागूं देऊं नये.

चतस्रो मांसरज्जवः ।
चतुर्दशास्थिसंघाताः सीमंता द्विगुणा नव ॥ १५ ॥

शरीरांत एकंदर मांसरज्जु चार आहेत; अस्थींचे संधि १४ आहेत; सीमंत ( भांग ) अठरा आहेत.

अस्थ्नां शतानि षष्टिश्च त्रीणि दंतनखैः सह ।
धन्वंतरिस्तु त्रीण्याह

दांत व नखें यांसुद्धां एकंदर तीनशें साठ अस्थि आहेत. धन्वंतरीच्या मतें एकंदर ३०० अस्थि आहेत.

संधीनां च शतद्वयम् ॥ १६ ॥
दशोत्तरं सहस्रे द्वे निजगादात्रिनंदनः ।

संधि २१० आहेत. आत्रेयांनीं तर हे संधि दोन हजार आहेत असें सांगितलें आहे.

स्नाव्नां नवशती पंच पुंसां पेशीशतानि च ॥ १७ ॥
अधिका विंशतिः स्त्रीणां योनिस्तनसमाश्रिताः ।

स्नायु एकंदर नऊशें आहेत. पुरुषांच्या शरीरांत पेशी ( पिशव्या ) पांचशें आहेत व स्त्रियांच्या शरीरांत योनी व स्तन यांत २० जास्त आहेत.

दश मूलसिरा हृत्स्थास्ताः सर्वं सर्वतो वपुः ॥ १८ ॥
रसात्मकं वहंत्योजस्तन्निबद्धं हि चेष्टितम् ।
स्थूलमूलाः सुसूक्ष्माग्राः पत्ररेखाप्रतानवत् ॥ १९ ॥
भिद्यंते तास्ततः सप्तशतान्यासां भवंति तु ।

हृदयांत मुख्य शिरा दहा आहेत; त्या सर्व शरीरांत रसात्मक ओज पोंचवितात, आणि म्हणून मनुष्याच्या चलनवलनादि क्रिया त्यांच्या स्वाधीन असतात. त्या शिरांचीं मुळें जाड असून, त्या पुढें पुढें बारीक होऊन पानांवरील शिरांच्या जाळ्याप्रमाणें त्यांचे पुढें एकंदर सातशें विभाग होतात.

तत्रैकैकं च शाखायां शतं तस्मिन्न वेधयेत् ॥ २० ॥
सिरां जालंधरां नाम तिस्रश्चाभ्यंतराश्रिताः ।

त्यांपैकीं प्रत्येक शाखेंत १००।१०० शिरा ( दोन्ही पाय मिळून चारशें ) आहेत. त्यांपैकीं जालंधरा नांवाची शीर व दुसऱ्या खोल असणाऱ्या तीन अशा प्रत्येकांत चार शिरा तोडूं नयेत.

षोडश द्विगुणाः श्रोण्यां तासां द्वे द्वे तु वंक्षणे ॥ २१ ॥
द्वे द्वे कटीकतरुणे शस्त्रेणाष्टौ स्पृशेन्न ताः ।

कमरेंत ३२ शिरा आहेत. त्यांपैकीं जांघाड्यांतील चार व कुल्ल्यांतील चार अशा आठ शिरांस शस्त्र लावूं नये.

पार्श्वयोः षोडशैकैकामूर्ध्वगां वर्जयेत्सिराम् ॥ २२ ॥

दोन्ही कुशींत सोळा सोळा शिरा आहेत. त्यांतून प्रत्येक बाजूची वर जाणारी एकेक शीर तोडूं नये.

द्वादश द्विगुणाः पृष्ठे पृष्ठवंशस्य पार्श्वगे ।
द्वे द्वे तत्रोर्ध्वगामिन्यौ न शस्त्रेण परामृशेत् ॥ २३ ॥

पाठींत शिरा २४ आहेत. त्यांतून पाठीच्या कण्याच्या प्रत्येक बाजूच्या वरती जाणाऱ्या २।२ शिरा तोडूं नयेत.

पृष्ठवज्जठरे तासां मेहनस्योपरि स्थिते ।
रोमराजीमुभयतो द्वे द्वे शस्त्रेण न स्पृशेत् ॥ २४ ॥

त्याचप्रमाणें पोटांतही २४ शिरा आहेत. त्यांपैकीं शिस्नाच्या वर व रोमराजीच्या दोहों बाजूंस असलेल्या २।२ शिरा तोडूं नयेत.

चत्वारिंशदुरस्यासां चतुर्दश न वेधयेत् ।
स्तनरोहिततन्मूलहृदये तु पृथग्द्वयम् ॥ २५॥
अपस्तंभाख्ययोरेकां तथापालापयोरपि ।

छातींत ४० शिरा आहेत. त्यांतून स्तनमूलें व स्तनरोहित या प्रत्येकावरील दोन दोन मिळून आठ, आणि हृदयाच्या दोहों भागांवरील २।२ मिळून चार, व अपस्तंभ नांवाच्या २ शिरांपैकीं १, आणि अपालाप नांवाच्या दोन शिरांपैकीं १ मिळून एकंदर १४ शिरा तोडूं नयेत.

ग्रीवायां पृष्ठवत्तासां नीले मन्ये कृकाटिके ॥ २६ ॥
विधुरे मातृकाश्चाष्टौ षोडशेति परित्यजेत् ।

मानेंत २४ शिरा आहेत. त्यांतून नीला नांवाच्या २, मन्या नांवाच्या २, नरडीच्या २, विधुरा २, आणि मातृका ८, अशा १६ शिरा तोडूं नयेत.

हन्वोः षोडश तासां द्वे संधिबंधनकर्मणी ॥ २७ ॥

हनुवटींत सोळा शिरा आहेत; त्यांपैकीं हनुसंधीवरील २ शिरा तोडूं नयेत.

जिह्वायां हनुवत्तासामधो द्वे रसबोधने ।
द्वे च वाचः प्रवर्तिन्यौ

जिभेंत १६ शिरा आहेत. त्यांतून रसज्ञान होणाऱ्या २ शिरा व ज्यांच्या योगानें बोलतां येतें, अशा २ शिरा मिळून ४ शिरा तोडूं नयेत.

नासायां चतुरुत्तरा ॥ २८ ॥
विंशतिर्गंधवेदिन्यौ तासामेकां च तालुगाम् ।

नाकांत २४ शिरा आहेत. त्यांतून गंधज्ञान करणाऱ्या २ व टाळूकडे जाणारी एक मिळून ३ शिरा तोडूं नयेत.

षट्पंचाशन्नयनयोर्निमेषोन्मेषकर्मणी ॥ २९ ॥
द्वे द्वे अपांगयोर्द्वे च तासां षडिति वर्जयेत् ।

दोन्ही डोळयांच्या मिळून ५६ शिरा आहेत. त्यांतून—डोळा मिटण्याचें कार्य करणाऱ्या—प्रत्येक डोळयांत १।१ प्रमाणें २, व तशाच २ डोळा उघडण्याचें कार्य करणाऱ्या; आणि डोळयांच्या बाहेरच्या कोंपऱ्याजवळच्या २, मिळून एकंदर सहा शिरा तोडूं नयेत.

नासानेत्राश्रिताः षष्टिर्ललाटे स्थपनीश्रिताम् ॥ ३० ॥
तत्रैकां द्वौ तथाऽवर्तौ चतस्रश्च कचांतगाः ।
सप्तैवं वर्जयेत्तासाम्

नाक व डोळे यांजवळून कपाळावर जाणाऱ्या ६० शिरा आहेत. त्यांतून स्थपनीवरील एक, आवर्तांच्या दोन व केंसाजवळच्या भागाच्या चार मिळून सात शिरा तोडूं नयेत.

कर्णयोः षोडशाऽत्र तु ॥ ३१ ॥
द्वे शब्दबोधने शंखौ सिरास्ता एव चाश्रिताः ।

द्वे शंखसंधिगे तासाम्

दोन्ही कानांच्या शिरा १६ आहेत. त्यांतून शब्दज्ञान करून देणाऱ्या दोन शिरा तोडूं नयेत. पुढें त्याच शिरा शंखांवर (आखांवर) पसरलेल्या आहेत. त्यांतून दोन्ही शंखसंधीच्या मिळून २ शिरा तोडूं नयेत.

मूर्ध्नि द्वादश तत्र तु ॥ ३२ ॥
एकैकां पृथगुत्क्षेपसीमंताधिपतिस्थिताम् ।

डोक्यांत १२ शिरा आहेत. त्यांतून दोन्ही उत्क्षेपांवरील (उंचवट्यावरील) दोन, पांच सीमंतावरील पांच व अधिपतीवरील एक मिळून आठ शिरा तोडूं नयेत.

इत्यवेध्यविभागार्थं प्रत्यंगं वर्णिताः सिराः ॥ ३३ ॥

याप्रमाणें कोणत्या शिरा तोडूं नये, हें कळण्यासाठीं प्रत्येक भागांतील अवेध्य शिरा सांगितल्या आहेत.

अवेध्यास्तत्र कार्त्स्न्येन देहेऽष्टानवतिस्तथा ।
संकीर्णा ग्रथिताः क्षुद्रा वक्राः संधिषु चाश्रिताः ॥ ३४ ॥

सर्व शरीरांत एकंदर ९८ शिरा अवेध्य (तोडूं नयेत अशा) आहेत. तथापि त्यांशिवाय एकमेकांत गुंतलेल्या (जाळें बनलेल्या), गांठाळलेल्या, बारीक, वांकड्या तिकड्या व सांध्यावरील शिराही तोडूं नयेत.

तासां शतानां सप्तानां पादोऽस्रं वहते पृथक् ।
वातपित्तकफैर्जुष्टं शुद्धं चैवं स्थिता मलाः ॥ ३५ ॥
शरीरमनुगृह्णंति पीडयंत्यन्यथा पुनः ।

एकंदर ७०० शिरांपैकीं १७५ शिरांतून वातयुक्त रक्त वाहत असतें; १७५ शिरांतून पित्तयुक्त रक्त वाहतें; १७५ शिरांतून कफयुक्त व १७५ शिरांतून शुद्ध रक्त वाहत असतें. आणि अशाच रीतीनें रक्त राहिलें तर दोषांची समास्थिति होऊन त्यापासून शरीराचें पोषण होतें; यांत कांहीं न्यूनाधिक झालें तर शरीरास अपाय होतो.

तत्र श्यावारुणाः सूक्ष्माः पूर्णरिक्ताः क्षणात्सिराः ॥ ३६ ॥
प्रस्पंदिन्यश्च वातास्रं वहंते

या शिरांपैकीं काळसर, तांबूस, बारीक, क्षणांत भरलेल्या दिसून

क्षणांत रिकाम्या दिसणाऱ्या व जोरानें ज्यांतून रक्त स्रवत आहे अशा शिरा, वातयुक्त रक्त नेत असतात.

पित्तशोणितम् ।

स्पर्शोष्णाः शीघ्रवाहिन्यो नीलपीताः

ज्या शिरा निळ्या-पिंवळ्या असून स्पर्शास उष्ण लागतात, आणि ज्या जलद वाहतात, त्या पित्तयुक्त रक्त वाहणाऱ्या होत.

कफं पुनः ॥ ३७ ॥

गौर्यः स्निग्धाः स्थिराः शीताः

ज्या शिरा पांढऱ्या, स्निग्ध, सावकाश वाहणाऱ्या व स्पर्शानें गार असतात, त्या शिरांतून कफयुक्त रक्त वाहत असतें.

संसृष्टं लिंगसंकरे ।

ज्या शिरांत या लक्षणांचा संकर ( मिश्रण ) असतो, त्या शिरा त्या त्या दोषांच्या ( द्विदोषी किंवा त्रिदोषी ) समजाव्या.

गूढाः समस्थिताः स्निग्धा रोहिण्यः शुद्धशोणितम् ३८

ज्या शिरांतून शुद्ध रक्त वाहत असतें, त्या खोल गेलेल्या, सरळ, स्निग्ध व उडणाऱ्या असतात.

धमन्यो नाभिसंबद्धा विंशतिश्चतुरुत्तरा ।
ताभिः परिवृतो नाभिश्चक्रनाभिरिवारकैः ॥ ३९ ॥
ताभिश्चोर्ध्वमधस्तिर्यग्देहोऽयमनुगृह्यते ।

बेंबीजवळ २४ धमन्या आहेत. ज्याप्रमाणें चाकाच्या तुंब्यासभोंवतीं अरे असतात, त्याप्रमाणें या धमन्या नाभीसभोंवतीं पसरल्या आहेत. त्याच शरीरांत सर्वत्र पसरून शरीराचें पोषण करतात.

स्रोतांसि नासिके कर्णौ नेत्रे पाय्वास्यमेहनम् ॥ ४० ॥
स्तनौ रक्तपथश्चेति नारीणामाधिकं त्रयम् ।

२ नाकपुड्या, २ कान, २ डोळे, आणि तोंड, गुदद्वार व मूत्रद्वार अशीं मनुष्याच्या शरीरांत नऊ स्रोतें आहेत. स्त्रियांसही याप्रमाणें असून, दोन स्तन व योनि हीं तीन स्रोतें जास्त आहेत.

जीवितायतनान्यंतःस्रोतांस्याहुस्त्रयोदश ॥ ४१ ॥
प्राणधातुमलांभोऽन्नवाहीनि

जीवाचीं स्थानें अशीं तेरा अंतःस्रोतें आहेतः—प्राणवह, रस-

वह, रक्तवह, मांसवह, मेदोवह, अस्थिवह, मज्जावह, शुक्रवह, शकृद्वह, मूत्रवह, स्वेदवह, उदकवह व अन्नवह.

अहितसेवनात् ।
तानि दुष्टानि रोगाय विशुद्धानि सुखाय च ॥ ४२ ॥

हीं अपथ्यसेवनानें दूषित झाल्यास रोग उत्पन्न होतात, व शुद्ध असल्यास मनुष्य निरोगी असतो.

स्वधातुसमवर्णानि वृत्तस्थूलान्यणूनि च ।
स्रोतांसि दीर्घाण्याकृत्या प्रतानसदृशानि च ॥ ४३ ॥

या अंतःस्रोतांचे रंग त्यांतून वाहणाऱ्या धातूप्रमाणें असून तीं वाटोळीं, जाड व लांब असतात, आणि पानांवरील शिरांप्रमाणें शरीरांत लांबवर त्यांचें जाळें पसरलेलें असतें.

आहारश्च विहारश्च यः स्याद्दोषगुणैः समः ।
धातुभिर्विगुणो यश्च स्रोतसां स प्रदूषकः ॥ ४४ ॥

दोषांच्या गुणांशीं समान गुणाचा व धातूंच्या गुणांशीं विपरीत गुणाचा असा आहार किंवा विहार केला असतां स्रोतें दूषित होतात.

अतिप्रवृत्तिः संगो वा सिराणां ग्रंथयोऽपि वा ।
विमार्गतो वा गमनं स्रोतसां दुष्टिलक्षणम् ॥ ४५ ॥

तीं बिघडलीं असतां धातूंची अतिप्रवृति, संचय, भलत्याच मार्गानें गमन किंवा शिरा गांठाळणें अशीं लक्षणें होतात.

विसानामिव सूक्ष्माणि दूरं प्रविसृतानि च ।
द्वाराणि स्रोतसां देहे रसो यैरुपनीयते ॥ ४६ ॥

कमलबिसाच्या केशाकार सूक्ष्म तंतूप्रमाणें असणारीं व दूरवर गेलेलीं स्रोतांचीं द्वारें सर्व शरीरभर रस पोंचवितात.

व्यधे तु स्रोतसां मोहकंपाध्मानवमिज्वराः ।
प्रलापशूलविण्मूत्ररोधो मरणमेव वा ॥ ४७ ॥

या स्रोतांचा वेध झाला असतां मोह, कंप, आध्मान (पोटफुगी), ओकारी, ताप, बडबड, शूल व मलमूत्रांचा अवरोध हीं होतात. कदाचित् एकदम मृत्युही येतो.

स्रोतोविद्धमतो वैद्यः प्रत्याख्याय प्रसाधयेत् ।
उद्धृत्य शल्यं यत्नेन सद्यः क्षतविधानतः ॥ ४८ ॥

यासाठीं अशा प्रसंगीं रोगी प्रत्याख्येय जाणून, वैद्यानें मोठ्या प्रयत्नानें शल्य काढून टाकून व्रणावरील उपचार करावे.

अन्नस्य पक्ता पित्तं तु पाचकाख्यं पुरेरितम्।
दोषधातुमलादीनामूष्मेत्यात्रेयशासनम्॥ ४९॥

पूर्वीं (सूत्रस्थानांत) जें पाचक पित्त सांगितलें आहे तोच जठराग्नि होय (असें धन्वंतरींचें मत आहे.). परंतु आत्रेयमुनींचें मत असें आहे कीं, वातादि दोष, रसादि धातु व मल यांच्या उष्म्यास जठराग्नि म्हणतात.

तदधिष्ठानमन्नस्य ग्रहणाद् ग्रहणी मता।
सैव धन्वंतरिमते कला पित्तधराह्वया॥ ५०॥
आयुरारोग्यवीर्यौजोभूतधात्वग्निपुष्टये।
स्थिता पक्वाशयद्वारि भुक्तमार्गार्गलेव सा॥ ५१॥

अग्नीची जागा अन्नाचें ग्रहण करते, म्हणून तिला ग्रहणी म्हणतात. तीच धन्वंतरींनें 'पित्तधरा कला' मानली आहे. आयुष्य, आरोग्य, वीर्य, ओज, पंचमहाभूतांचे पांच अग्नि व सप्त धातूंचे सात अग्नि, यांस वाढविण्यासाठीं अन्नमार्गाच्या अडसराप्रमाणें पक्वाशयाच्या द्वाराजवळ ती राहिलेली आहे.

भुक्तमामाशये रुद्ध्वा सा विपाच्य नयत्यधः।
बलवत्यबला त्वन्नमाममेव विमुंचति॥ ५२॥

ती बलिष्ठ असली म्हणजे आमाशयांत अन्न थांबवून, त्याचें पचन करून खालीं सोडते. पण निर्बळ झाली तर अपक्व अन्नच खालीं सोडते.

ग्रहण्या बलमग्निर्हि स चापि ग्रहणीबलः।
दूषितेऽग्नावतो दुष्टा ग्रहणी रोगकारिणी॥ ५३॥

अग्नि व ग्रहणी हीं एकमेकांच्या बलावर अवलंबून असतात. त्यामुळें अग्नि दुष्ट झाला असतां ग्रहणी दूषित होऊन रोग उत्पन्न करते.

यदन्नं देहधात्वोजोबलवर्णादिपोषणम्।
तत्राऽग्निर्हेतुराहारान्न ह्यपक्वाद्रसादयः॥ ५४॥

अन्न हें शरीरस्थ धातु, ओज, बळ, वर्ण इत्यादिकांचें पोषण करतें; पण त्यास कारण अग्नि आहे. (कारण, अग्नीमुळें आहा-

राचा पाक होऊन रसादिकांची उत्पत्ति होते.) अपक आहारापासून रसादि उत्पन्न होत नाहींत.

अन्नं कालेऽभ्यवहृतं कोष्ठं प्राणानिलाहृतम् ।
द्रवैर्विभिन्नसंघातं नीतं स्नेहेन मार्दवम् ॥ ५५ ॥
संधुक्षितः समानेन पचत्यामाशयस्थितम् ।
औदर्योऽग्निर्यथा बाह्यः स्थालीस्थं तोयतंडुलम् ॥ ५६ ॥

बाहेरचा अग्नि भांड्यांत पाणी घातलेल्या तांदुळांस शिजवितो, त्याप्रमाणें समान वायूनें प्रदीप्त झालेला जठराग्नि योग्य वेळीं खाल्लेल्या, प्राणवायूनें योग्य मार्गानें कोठ्यांत नेलेल्या, पातळ द्रव्यांनीं ज्यांतील घट्टपणा अगदीं नाहींसा झाला आहे अशा, आणि स्निग्ध पदार्थानें मृदु झालेल्या आमाशयांतील अन्नरसाचें पचन करूं शकतो.

आदौ षड्रसमप्यन्नं मधुरीभूतमीरयेत् ।
फेनीभूतं कफं यातं विदाहादम्लतां ततः ॥ ५७ ॥
पित्तमामाशयात्कुर्याच्च्यवमानं च्युतं पुनः ।
अग्निना शोषितं पक्वं पिंडितं कटु मारुतम् ॥ ५८ ॥

अन्न जरी प्रथम षड्रस असतें, तरी तें पुढें (लाळेच्या संयोगानें) मधुर व फेंसाळ होऊन कफरूपास येतें. नंतर विदाही व अम्ल होऊन, आमाशयापासून पक्वाशयांत जातांना पित्त उत्पन्न करतें. नंतर पक्वाशयांत गेल्यावर अग्नीनें वाळलेलें, पक्व, पिंडित (वाटोळें झालेलें) व तिखट होऊन वायु उत्पन्न करतें.

भौमाप्याग्नेयवायव्याः पंचोष्माणः सनाभसाः ।
पंचाहारगुणान्स्वान् स्वान् पार्थिवादीन् पचंत्यनु ॥ ५९ ॥

नंतर भौम, आप्य, आग्नेय, वायव्य व नाभस हे पांच अग्नि हे आपापल्या आहारसंबंधीं पार्थिवादि पांच गुणांचें पचन करतात.

यथास्वं ते च पुष्यंति पक्त्वा भूतगुणान् पृथक् ।
पार्थिवाः पार्थिवानेव शेषाः शेषांश्च देहगान् ॥ ६० ॥

याप्रमाणें भूतगुणांचें पचन करुन ते अग्नि स्वतःलाही वाढवितात. शरीरांतील पार्थिव गुण पार्थिव गुणांस व इतर गुणही आपापल्या गुणांस पुष्ट करतात.

किट्टं सारं च तत्पक्वमन्नं संभवति द्विधा।
तत्राऽच्छं किट्टमन्नस्य मूत्रं विद्याद्धनं शकृत्॥ ६१॥

पक्व झालेल्या अन्नाचे किट्ट (मल) व सार (पुष्टिदायक भाग) असे दोन भाग होतात. त्यांपैकीं किट्टांत जो पातळ भाग असतो तो मूत्र व घट्ट भाग असतो तो मल (पुरीष) होय.

सारस्तु सप्तभिर्भूयो यथास्वं पच्यतेऽग्निभिः।

रसादि सप्त धातूंतील अग्नि सारभागाचें पुन्हा पचन करून त्यांस रसादिकांचें रूप देतात.

रसाद्रक्तं ततो मांसं मांसान्मेदस्ततोऽस्थि च॥ ६२॥
अस्थ्नो मज्जा ततः शुक्रं शुक्राद्गर्भः प्रजायते।

रसानंतर रक्त, त्यानंतर मांस, नंतर मेद, नंतर अस्थि, नंतर मज्जा व शेवटीं वीर्य यांची उत्पत्ति होते. वीर्यापासून गर्भाची उत्पत्ति होते.

कफः पित्तं मलः खेषु प्रस्वेदो नखरोम च॥ ६३॥
स्नेहोऽक्षित्वग्विशामोजो धातूनां क्रमशो मलाः।

रसधातूचा मळ कफ; रक्ताचा पित्त; मांसाचा नाक, डोळे, कान इत्यादि ठिकाणचा मळ; मेदाचा घाम; अस्थींचीं नखें व केंस; मज्जेचा मळ डोळे, त्वचा व विष्ठेंतील स्निग्ध भाग आणि गर्भोत्पत्तीला कारणरूप ओज वीर्याचा मल होय.

प्रसादकिट्टौ धातूनां पाकादेवं द्विधर्च्छतः॥ ६४॥

याप्रमाणें धातूंचे सुद्धां पाकानें सार व किट्ट असे दोन विभाग होतात.

परस्परोपसंस्तंभाद्धातुस्नेहपरंपरा।

याप्रमाणें धातु व स्नेह यांचें चक्र नेहमीं एकमेकांवर अवलंबून असतें.

केचिदाहुरहोरात्रात्षडहादपरे परे॥ ६५॥
मासेन याति शुक्रत्वमन्नं पाकक्रमादिभिः।

कोणी म्हणतात, पाकक्रमानें एक दिवसांत अन्नाचें वीर्य होतें; कोणी म्हणतात, सहा दिवसांनीं होतें; आणि कोणी तर एक महिन्यानें होतें, असें म्हणतात.

संततं भोज्यधातूनां परिवृत्तिस्तु चक्रवत्॥ ६६॥

रहाटगाडग्याप्रमाणें अन्नरस व धातु यांचा क्रम सारखा चालू असतो.

वृष्यादीनि प्रभावेण सद्यः शुक्रादि कुर्वते।
प्रायः करोत्यहोरात्रात्कर्मान्यदपि भेषजम् ॥ ६७ ॥

वृष्य वगैरे पदार्थांच्या प्रभावामुळें ताबडतोब देखील वीर्य उत्पन्न होतें. इतर औषधांचाही बहुतकरून आठ प्रहरांत परिणाम दिसूं लागतो.

व्यानेन रसधातुर्हि विक्षेपोचितकर्मणा।
युगपत्सर्वतोऽजस्रं देहे विक्षिप्यते सदा ॥ ६८ ॥

व्यान वायूचें कर्म कोणताही पदार्थ दूर फेंकणें हें आहे. त्या त्याच्या स्वभावानुरूप तो सर्व शरीरभर रसधातु एकसारखा फेंकीत असतो.

क्षिप्यमाणः स्ववैगुण्याद्रसः सज्जति यत्र सः।
तस्मिन्विकारं कुरुते खे वर्षमिव तोयदः॥ ६९ ॥

वायूनें फेकलेले मेघ ज्याप्रमाणें जेथें अडकतील तेथें वृष्टि करितात, त्याप्रमाणें जेथें स्रोतें दुष्ट झालेलीं असतात, त्या ठिकाणीं तो रस अडकतो, आणि विकार उत्पन्न करतो.

दोषाणामपि चैवं स्यादेकदेशप्रकोपणम्।

दोषांचा एकदेशीय कोपही अशाच रीतीनें होतो.

अन्नभौतिकधात्वग्निकर्मेति परिभाषितम् ॥ ७० ॥

याप्रमाणें जठराग्नि, पांचभौतिकाग्नि व धात्वग्नि यांचीं कार्यें सांगितलीं.

अन्नस्य पक्ता सर्वेषां पक्तॄणामधिको मतः।
तन्मूलास्ते हि तद्वृद्धिक्षयवृद्धिक्षयात्मकाः ॥ ७१ ॥
तस्मात्तं विधिवद्युक्तैरन्नपानेन्धनैर्हितैः।
पालयेत्प्रयतस्तस्य स्थितौ ह्यायुर्बलस्थितिः ॥ ७२ ॥

शरीरस्थ सर्व अग्नींत जठराग्नि श्रेष्ठ आहे. कारण, इतर अग्नि त्याच्यावर अवलंबून असतात. त्याच्या वृद्धिक्षयानुरूप इतर अग्नींचीही वृद्धि किंवा क्षय होतो. म्हणून शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें पथ्यकर अन्नरूप इंधनानें (जळणानें) त्याचें पालन करावें. तो

जर चांगल्या स्थितींत असेल, तर आयुष्य व बल हींही सुस्थितींत असतात.

समः समाने स्थानस्थे विषमोऽग्निर्विमार्गगे ।
पित्ताभिमूर्छिते तीक्ष्णो मंदोऽस्मिन्कफपीडिते ॥ ७३ ॥
समोऽग्निर्विषमस्तीक्ष्णो मंदश्चैवं चतुर्विधः ।

समान वायु स्वस्थानीं असला म्हणजे अग्नि सम असतो, आणि त्यानें मार्ग सोडला म्हणजे अग्नि विषम होतो. पित्तानें आच्छादित झाला तर तीक्ष्ण होतो, व कफानें युक्त झाला तर मंद होतो. अशा रीतीनें अग्नि सम, विषम, तीक्ष्ण व मंद असा चार प्रकारचा आहे.

यः पचेत्सम्यगेवान्नं भुक्तं सम्यक् समस्त्वसौ ॥ ७४ ॥

योग्य रीतीनें खाल्लेलें अन्न उत्तम पचल्यास अग्नि सम आहे, असें समजावें.

विषमोऽसम्यगप्याशु सम्यक् क्वापि चिरात्पचेत् ।

एखादे वेळीं अयोग्य अन्नही जो लौकर पचवूं शकतो, किंवा योग्य रीतीनें खाल्लेलेंही जो उशिरानें पचवितो, तो विषम अग्नि होय.

तीक्ष्णो वन्हिः पचेच्छीघ्रमसम्यगपि भोजनम् ॥ ७५ ॥

कसेंही खाल्लेलें असलें तरी जो त्वरित पचवितो, तो तीक्ष्णाग्नि होय.

मंदस्तु सम्यगप्यन्नमुपयुक्तं चिरात्पचेत् ।
कृत्वाऽऽस्यशोषाटोपांत्रकूजनाऽऽध्मानगौरवम् ॥ ७६ ॥

आणि योग्य रीतीनें खाल्लेलें अन्नही पचवितांना मुखशोष, पोटांत गुडगुड शब्द अथवा कुरकुरणें, पोट फुगणें व जडत्व हे विकार करून जो फार वेळानें पचवितो तो मंदाग्नि होय.

सहजं कालजं युक्तिकृतं देहबलं त्रिधा ।

शरीराचें बल सहज, कालज व युक्तिकृत असें तीन प्रकारचें आहे.

तत्र सत्वशरीरोत्थं प्राकृतं सहजं बलम् ॥ ७७ ॥
वयस्कृतमृतूत्थं च कालजं युक्तिजं पुनः ।
विहाराहारजनितं तथोर्जस्करयोगजम् ॥ ७८ ॥

त्यांत जें सत्व, रज व तम यांपासून झालेलें बळ तें सहज होय. वयाच्या व ऋतूंच्या योगानें झालेलें असतें तें कालज बल होय.

आणि आहारविहारांनीं व बलवर्धक उपायांनीं जें बल उत्पन्न केलें असतें, तें युक्तिकृत बल होय.

देशोऽल्पवारिद्रुनगो जांगलः स्वल्परोगदः ।
आनूपो विपरीतोस्मात्समः साधारणः स्मृतः ॥ ७९ ॥

ज्या देशांत पाणी, झाडें व डोंगर कमी असून, रोगराई फारशी नसते, तो जांगल देश; व याच्या उलट तो आनूप; आणि ज्यांत हीं दोन्ही लक्षणें मिश्र असतात, तो साधारण देश होय.

मज्जमेदोवसामूत्रपित्तश्लेष्मशकृंत्यसृक् ॥ ८० ॥
रसो जलं च देहेऽस्मिन्नेकैकांजलिवर्धितम् ।

मज्जा, मेद, वसा, मूत्र, पित्त, कफ, पुरीष, रक्त, रस व जल हे पदार्थ, शरीरांत एकेक ओंजळीनें जास्त आहेत.

पृथक्स्वप्रसृतं प्रोक्तमोजोमस्तिष्करेतसाम् ॥ ८१ ॥
द्वावंजली तु स्तन्यस्य चत्वारो रजसः स्त्रियाः ।

ओज, मस्तिष्क (मेंदु) व वीर्य हीं, मनुष्याच्या ओंजळीनें एकेक ओंजळीभर असतात. स्त्रियांना दूध, त्यांच्या ओंजळीनें २ ओंजळी, व आर्तव ४ ओंजळी असतें.

समधातोरिदं मानं विद्याद्वृद्धिक्षयावतः ॥ ८२ ॥

हीं सर्व मानें समधातु माणसांचीं आहेत; अर्थात् धातूंच्या वृद्धिक्षयानें कमीजास्त प्रमाण होईल.

शुक्रासृग्गर्भिणीभोज्यचेष्टागर्भाशयर्तुषु ।
यः स्याद्दोषोऽधिकस्तेन प्रकृतिः सप्तधोदिता ॥ ८३ ॥

वीर्य व आर्तव, गर्भिणी व तिचे अहारविहार, गर्भाशय व ऋतु, यांत ज्या एक किंवा अनेक दोषांचें आधिक्य असेल, तदनुरूप त्या गर्भाच्या सात प्रकारच्या प्रकृति बनतात.

विभुत्वादाशुकारित्वाद्बलित्वादन्यकोपनात् ।
स्वातंत्र्याद्बहुरोगत्वाद्दोषाणां प्रबलोऽनिलः ॥ ८४ ॥
प्रायोऽत एव पवनाध्युषिता मनुष्या
दोषात्मकाः स्फुटितधूसरकेशगात्राः ।
शीतद्विषश्चलधृतिस्मृतिबुद्धिचेष्टा-
सौहार्ददृष्टिगतयोऽतिबहुप्रलापाः ॥ ८५ ॥
अल्पपित्तबलजीवितनिद्राः सन्नसक्तचलजर्जरवाचः ।

नास्तिका बहुभुजः सविलासा गीतहास्यमृगयाकलिलोलाः ८६
मधुराम्लपटूष्णसात्म्यकांक्षाः कृशदीर्घाकृतयः सशब्दयाताः ।
न दृढा न जितेंद्रिया न चार्या न च कांतादयिता बहुप्रजा वा
नेत्राणि चैषां खरधूसराणि वृत्तान्यचारूणि मृतोपमानि ॥
उन्मीलितानीव भवंति सुप्ते शैलद्रुमांस्ते गगनं च यांति ॥८८॥
अधन्या मत्सराध्माताः स्तेनाः प्रोद्बद्धपिंडिकाः ।
श्वशृगालोष्ट्रगृध्राखुकाकानूकाश्च वातिकाः ॥ ८९ ॥

सर्वांत वायु हा सर्वव्यापक व बलवान् आहे. तो दुसऱ्यास कुपित करून स्वतःही स्वतंत्रपणें कुपित होऊं शकतो; त्याच्या संबंधी रोगही अनेक प्रकारचे होतात. व तो आपलें कार्यही फार लौकर करूं शकतो; म्हणून सर्व दोषांत वायु प्रबल होय. वातप्रकृति माणसांत सामान्यतः खालील लक्षणें दिसतातः—दुर्गुणी; केंस व अवयव धुरकट व फुटलेले; शीत पदार्थांचा द्वेष करणारे, धैर्य, स्मरणशक्ति, बुद्धि, मैत्री, दृष्टि, गति व कृति हीं सर्व अस्थिर; फार वाचाळ; पित्त, बळ, आयुष्य व झोंप हीं कमी असणें; शब्द खोल; अडखळत बोलणारे, जलद बोलणारे किंवा घोगऱ्या आवाजाचे; पुष्कळ खाणारे; विलासी; गायन, हास्य, शिकार व भांडण यांची आवड असणारे; मधुर, आंबट, खारट व उष्ण पदार्थांचे लोभी असून हे पदार्थ त्यांना सोसतात; कृश असून उंच; चालतांना पाय कटकटणारे; आणि बळकट, जितेंद्रिय व सभ्य नसून, बायकांना आवडत नाहींत. त्यांना मुलेंही फार होत नाहींत. त्यांचे डोळे रूक्ष, मळकट, वाटोळे, विद्रूप व प्रेतवत् असून झोंपेंतही उघडे असतात. स्वप्नांत ते झाडावर व डोंगरावर चढतात, आकाशांत उडतात. हलकट मनाचे, मत्सरी व चोरटे; त्यांच्या पोटऱ्या जास्त लठ्ठ असतात. त्यांचा स्वभाव कुत्रा, कोल्हा, उंट, गिधाड, उंदीर किंवा कावळा यांच्यासारखा असतो.

पित्तं वह्निर्वह्निजं वा यदस्मात्पित्तोद्रिक्तस्तीक्ष्णतृष्णाबुभुक्षः ।
गौरोष्णांगस्ताम्रहस्तांऽघ्रिवक्त्रः शूरो मानी पिंगकेशोऽल्परोमा
दयितमाल्यविलेपनमंडनः सुचरितः शुचिराश्रितवत्सलः ।
विभवसाहसबुद्धिबलान्वितो भवति भीषु गतिर्द्विषतामपि ९१

मेधावी प्रशिथिलसंधिबंधमांसो
नारीणामनभिमतोऽल्पशुक्रकामः ।
आवासः पलिततरंगनीलिकानां
भुंक्तेऽन्नं मधुरकषायतिक्तशीतम् ॥ ९२ ॥
घर्मद्वेषी स्वेदनः पूतिगंधिर्भूर्युच्चारक्रोधपानाशनेर्ष्यः ।
सुप्तः पश्येत्कर्णिकारान्पलाशान् दिग्दाहोल्काविद्युदर्कानलांश्च
तनूनि पिंगानि चलानि चैषां तन्वल्पपक्ष्माणि हिमप्रियाणि ।
क्रोधेन मद्येन रवेश्च भासा रागं व्रजंत्याशु विलोचनानि ॥९४॥
मध्यायुषो मध्यबलाः पंडिताः क्लेशभीरवः ।
व्याघ्रर्क्षकपिमार्जारयक्षानूकाश्च पैत्तिकाः ॥ ९५ ॥

पित्त हें अग्नि किंवा अग्नीपासून होणारें आहे. यास्तव पित्तप्रकृतीच्या मनुष्याची तहान व भूक फार प्रखर असते. तो गोरा असून त्याचें अंग कढत असतें. हात, पाय व तोंड लाल असतात. तो शूर व मानी असतो. त्याचे केंस पिंगट असून थोडे असतात. त्यास फुलें, चंदन, केशर, कस्तुरी वगैरे सुगंधि पदार्थांचे लेप आवडतात. तो सदाचारी, पवित्र, आपल्या आश्रिताविषयीं प्रीति बाळगणारा; वैभव, साहस, बुद्धि व बळ यांनीं युक्त असा असून संकटकालीं शत्रूवरही उपकार करणारा असा असतो. तो बुद्धिशाली असून त्याच्या शरीराचे सांधे व मांस हीं शिथिल असतात. तो स्त्रियांस आवडत नाहीं. त्यास वीर्य व कामवासना हीं थोडीं असतात. त्याचे केंस फार पिकतात, आणि त्याच्या अंगावर सुरकुत्या व काळे डाग फार असतात. त्यास गोड, तुरट, कडू व थंड असें अन्न आवडतें. त्यास ऊन्ह आवडत नाहीं; घाम फार येतो; अंगास घाण येते; मळ, राग, खाणें-पिणें व ईर्ष्या हीं त्यास फार असतात. त्यास स्वप्नांत पांगारा, पळस, प्रदीप्त दिशा, तारे तुटणें, वीज, सूर्य व अग्नि हीं दिसतात. त्याचे डोळे बारीक, पिंगळे व चपळ असून पापण्याचे केंस दूर दूर व थोडे असतात. डोळ्यांस थंड पदार्थ आवडतात. ते (डोळे) रागानें, दारू प्याल्यानें किंवा सूर्याकडे पाहिल्यानें लागलेच लाल होतात. पित्तप्रकृतीच्या मनुष्यांचें आयुष्य व बळ मध्यम असतें. ते विद्वान्

असून त्यांस कष्ट सोसत नाहींत. त्यांचा स्वभाव वाघ, अस्वल, माकड, मांजर व यक्ष यांच्यासारखा असतो.

श्लेष्मा सोमः श्लेष्मलस्तेन सौम्यो गूढस्निग्धश्लिष्टसंध्यस्थिमांसः
क्षुत्तृड्दुःखक्लेशघर्मैरतप्तो बुद्ध्या युक्तः सात्त्विकः सत्यसंधः ॥ ९६ ॥
प्रियंगुदूर्वाशरकांडशस्त्रगोरोचनापद्मसुवर्णवर्णः ।
प्रलंबबाहुः पृथुपीनवक्षा महाललाटो घननीलकेशः ॥ ९७ ॥
मृद्वंगः समसुविभक्तचारुवर्ष्मा बह्वोजोरतिरसशुक्रपुत्रभृत्यः ।
धर्मात्मा वदति न निष्ठुरं च जातु प्रच्छन्नं वहति दृढं चिरं च वैरम् ॥
समदद्विरदेंद्रतुल्ययातो जलदांभोधिमृदंगसिंहघोषः ।
स्मृतिमानभियोगवान्विनीतो न च बाल्येऽप्यतिरोदनो न लोलः ॥
तिक्तं कषायं कटुकोष्णरूक्षमल्पं स भुंक्ते बलवांस्तथाऽपि ।
रक्तांतसुस्निग्धविशालदीर्घसुव्यक्तशुक्लासितपक्ष्मलाक्षः ॥ १०० ॥
अल्पव्याहारक्रोधपानाशनेर्ष्यः प्राज्यायुर्वित्तो दीर्घदर्शी वदान्यः ।
श्राद्धो गंभीरः स्थूललक्ष्यः क्षमावानार्यो निद्रालुर्दीर्घसूत्रः कृतज्ञः
ऋजुर्विपश्चित्सुभगः सलज्जो भक्तो गुरूणां स्थिरसौहृदश्च ।
स्वप्ने सपद्मान्सविहंगमालांस्तोयाशयान् पश्यति तोयदांश्च ॥ १०२ ॥
ब्रह्मरुद्रेंद्रवरुणतार्क्ष्यहंसगजाधिपैः ।
श्लेष्मप्रकृतयस्तुल्यास्तथा सिंहाऽश्वगोवृषैः ॥ १०३ ॥

कफ हा सोमात्मक असल्यामुळें कफप्रकृतीचा मनुष्य सौम्य असून त्याचे सांधे, हाडें व मांस हीं गूढ, पुष्ट, स्निग्ध व घट्ट असतात. भूक, तहान, दुःख, कष्ट व ऊन्ह यांची त्यास फारशी बाधा होत नाहीं. तो बुद्धिवान्, सात्विक व सत्यवक्ता असतो. त्याच्या अंगाचा रंग गहुला, दूर्वा, रामबाण, शस्त्राची चमक, गोरोचन, पांढरें कमळ किंवा सोनें यांच्यासारखा असतो. त्याचे हात लांब, छाती रुंद व पुष्ट, कपाळ विशाळ, आणि केंस दाट व काळेभोर असतात. त्याचें अंग कोमल असतें, सर्व अवयव सुंदर, सारखे व रेखल्यासारखे असतात. त्यास ओज, विषयवासना, वीर्य, पुत्र व नोकर-चाकर विपुल असतात. तो धर्मात्मा असून निष्ठुर भाषण कधीं करीत नाहीं. मनांत दृढ वैर पुष्कळ दिवसपर्यंत गुप्त रीतीनें बाळगतो. तो मदोन्मत्त हत्तीप्रमाणें चालतो. त्याचा आवाज मेघ, समुद्र, मृदंग किंवा सिंहाची गर्जना यांच्यासारखा गंभीर असत

त्याची स्मरणशक्ति चांगली असते. तो उद्योगी व नम्र असतो. बाळपणीं देखील तो फार रडवा किंवा फार खादाड नसतो. त्यास कडू, तुरट, तिखट, उष्ण व रूक्ष हे पदार्थ आवडतात. तो थोडें खाऊनही बळकट असतो. त्याचे डोळे फार स्निग्ध, मोठे व लांब असतात. त्यांतील काळीं व पांढरीं बुबुळें स्पष्ट असतात. त्याच्या कडा लाल असतात. आणि पापण्या फार केंसाळ असतात. त्याचें बोलणें, राग, खाणें-पिणें व ईर्ष्या हीं अल्प असतात. आयुष्य व पैसा विपुल असतो. तो दूरदर्शी, मिष्टभाषी, श्रद्धाळु, गंभीर, दानशूर, क्षमाशील, सज्जन, झोंपाळू, चेंगट, कृतज्ञ, सरळ, विद्वान्, लोकप्रिय, भिडस्त, गुरुभक्त व चिरकाळपर्यंत मित्रता चालविणारा असा असतो. स्वप्नांत कमळें व पक्षी यांनीं युक्त असे जलाशय व मेघ हे दिसतात. त्याचा स्वभाव ब्रह्मा, रुद्र, इंद्र, वरुण, गरुड, हंस, ऐरावत, सिंह, घोडा, गाय किंवा बैल यांच्यासारखा असतो.

प्रकृतीर्द्वयसर्वोत्था द्वंद्वसर्वगुणोदये ।

वर प्रत्येक प्रकृतीचे निरनिराळे गुण सांगितले. यांपैकीं कोणत्याही दोहोंचीं लक्षणें जिच्यांत असतील ती द्वन्द्वज आणि जिच्यांत वरील सर्व लक्षणें आढळतील ती त्रिदोषात्मक प्रकृति जाणावी.

शौचास्तिक्यादिभिश्चैवं गुणैर्गुणमयीर्वदेत् ॥ १०४ ॥

पवित्रता, आस्तिकता आदि गुणांवरून सात्विक, राजस किंवा तामस प्रकृति ओळखावी.

वयस्त्वाषोडशाद्बालं तत्र धात्विन्द्रियौजसाम् ।
वृद्धिरासप्ततेर्मध्यं तत्रावृद्धिः परं क्षयः ॥ १०५ ॥

सोळा वर्षेपर्यंत बाळपण असतें; त्यांत धातु, इंद्रियें व ओज हीं वाढत असतात. तेथून पुढें सत्तर वर्षेपर्यंत मध्यम वय; यांत धात्वादिकांची वृद्धि होत नाहीं. तेथून पुढें म्हातारपण; त्यांत धात्वादिकांचा क्षय होतो.

स्वं स्वं हस्तत्रयं सार्धं वपुः पात्रं सुखायुषोः ।
न च यद्युक्तमुद्रिक्तैरष्टाभिर्निंदितैर्निजैः ॥ १०६ ॥
अरोमशासितस्थूलदीर्घत्वैः सविपर्ययैः ।

ज्याचें शरीर स्वतःच्या हातानें साडेतीन हात उंच असतें, तो सुखी व दीर्घायु होतो. केंस नसलेलें किंवा अतिशय केंसांचें, फार काळें किंवा फार गोरें, फार लठ्ठ किंवा फार किडकिडीत आणि फार उंच किंवा फार ठेंगणें, या आठ निंद्य गुणांनीं युक्त नसलेल्या शरीरास सुख व आयुष्य हीं प्राप्त होतात.

सुस्निग्धा मृदवः सूक्ष्मा नैकमूलाः स्थिराः कचाः १०७
ललाटमुन्नतं श्लिष्टशंखमर्धेंदुसंनिभम्।
कर्णौ नीचोन्नतौ पश्चान्महांतौ श्लिष्टमांसलौ॥ १०८॥
नेत्रे व्यक्तासितासिते सुबद्धे घनपक्ष्मणी।
उन्नताग्रा महोच्छ्वासा पीनर्जुर्नासिका समा॥ १०९॥
ओष्ठौ रक्तावनुद्वृत्तौ महत्यौ नोल्बणे हनू।
महदास्यं घना दंताः स्निग्धाः श्लक्ष्णाः सिताः समाः १०
जिह्वा रक्तायता तन्वी मांसलं चिबुकं महत्।
ग्रीवा ह्रस्वा घना वृत्ता स्कंधावुन्नतपीवरौ॥ १११॥
उदरं दक्षिणावर्तगूढनाभि समुन्नतम्।
तनुरक्तोन्नतनखं स्निग्धमाताम्रमांसलम्॥ ११२॥
दीर्घाच्छिद्रांगुलि महत्पाणिपादं प्रतिष्ठितम्।
गूढवंशं बृहत्पृष्ठं निगूढाः संधयो दृढाः॥ ११३॥
धीरः स्वरोऽनुनादी च वर्णः स्निग्धः स्थिरप्रभः।
स्वभावजं स्थिरं सत्वमविकारि विपत्स्वपि॥ ११४॥
उत्तरोत्तरसुक्षेत्रं वपुर्गर्भादिनीरुजम्।
आयामज्ञानविज्ञानैर्वर्धमानं शनैः शुभम्॥ ११५॥
इति सर्वगुणोपेते शरीरे शरदां शतम्।
आयुरैश्वर्यमिष्टाश्च सर्वे भावाः प्रतिष्ठिताः॥ ११६॥

केंस तुळतुळीत, मऊ, बारीक व बळकट असून त्यांचीं मुळें अनेक असावीं. कपाळ उंच व अर्धचंद्राकार व कानपट्टी फुगलेल्या असाव्या. कान मुळाशीं लहान असून वर उभारलेले आणि मागें पसरट, चांगल्या रीतीनें चिकटलेले, सुरेख व मांसल असलेले श्रेष्ठ होत. डोळ्यांचीं काळीं व पांढरीं बुबुळें स्पष्ट असून पांपण्यांचे केंस दाट असून त्या बळकट असाव्या. नाक सरळ, सारखें व पुष्ट असून त्याची बोंडी वर आलेली असावी, आणि त्यांतून श्वास पुष्कळ भरतां यावा. ओंठ लाल असून बाहेर

आलेले नसावे. जबडे मोठे असून वर उचललेले असावे. तोंड मोठें, आणि दांत जवळ जवळ, स्निग्ध, गुळगुळीत, पांढरे व सारखे असावे. जीभ लाल, लांब व पातळ असावी. हनुवटी मांसल असून मोठी असावी. मान आंखूड, जाड व वाटोळी असावी. खांदे उंच व मांसानें भरलेले असावे. पोट वर आलेलें असून बेंबी खोल गेलेली असावी आणि तिचा भोंवरा उजवीकडे असावा. नखें पातळ, लाल व फुगलेलीं असावीं. हात-पाय स्निग्ध, किंचित् लाल, मांसानें भरलेले व मोठे असावे आणि त्यांचीं बोटें लांब व एकमेकांस सारखीं जुळलेलीं असावीं. पाठीचा कणा मांसानें झांकलेला असावा. पाठ रुंद असावी आणि सांधे खोल व बळकट असावे. आवाज गंभीर असून घुमणारा असावा. स्वाभाविक, स्थिर आणि संकटांत न डगमगणारें धैर्य असावें. वरील लक्षणांपैकीं पुढील पुढील लक्षणें ज्यांत विशेष आहेत, गर्भावस्थेपासून ज्यास कांहीं विकार झाला नाहीं, आणि ज्यांत उंची, तसेंच व्यावहारिक व शास्त्रीय ज्ञान हीं हळू हळू क्रमानें वाढलीं आहेत, असें शरीर प्रशस्त होय. याप्रमाणें ज्याचें सर्वगुणसंपन्न शरीर असेल तो शंभर वर्षें वांचतो, आणि त्यास ऐश्वर्य व सर्व प्रकारच्या वांछित गोष्टी प्राप्त होतात.

त्वग्रक्तादीनि सत्वांतान्यग्राण्यष्टौ यथोत्तरम् ।
बलप्रमाणज्ञानार्थं साराण्युक्तानि देहिनाम् ॥ ११७ ॥
सारैरुपेतः सर्वैः स्यात्परं गौरवसंयुतः ।
सर्वारंभेषु चाशावान्सहिष्णुः सन्मतिः स्थिरः ॥ ११८ ॥

त्वचा, रक्त, मांस, मेद, हाडें, मज्जा, वीर्य व सत्व हीं जीं उत्तरोत्तर प्रकर्षशाली, शरीरांतील बळाचें प्रमाण कळण्याकरितां आठ सारभूत तत्वें सांगितलीं, तीं सर्व ज्याच्या अंगीं असतील तो अतिशय बळकट, सहनशील, सुबुद्धि व स्थिरचित्त असून सर्व कार्यांत त्यास यशःप्राप्तीची पूर्ण आशा असते.

अनुत्सेकमदैन्यं च सुखं दुःखं च सेवते ।
सत्ववांस्तप्यमानस्तु राजसो नैव तामसः ॥ ११९ ॥

सात्विक प्रकृतीच्या मनुष्यास सुख झाल्यास त्याचा त्यास अभिमानही वाटत नाहीं, किंवा दुःख झाल्यास तो दैन्यही दाखवीत नाहीं. राजस प्रकृतीच्या मनुष्यास सुख भोगतेवेळीं अनुक्रमें हर्ष व खेद होतो; आणि तामसी अत्यंत मूढ असल्यामुळें त्यास सुख व दुःख यांपैकीं एकाचेंही धड ज्ञान नसतें.

दानशीलदयासत्यब्रह्मचर्यकृतज्ञताः।
रसायनानि मैत्री च पुण्यायुर्वृद्धिकृद्गुणाः ॥ १२० ॥

दातृत्व, उत्तम स्वभाव, दया, सत्य, ब्रह्मचर्य, कृतज्ञता, रसायनांचें सेवन व सर्व भूतांच्या ठायीं आत्मभाव या गोष्टींनीं पुण्य व आयुष्य यांची वृद्धि होते.

---

## अध्याय ४ था.

अथाऽतो मर्मविभागं शारीरं व्याख्यास्यामः।

आतां शरीरांतील मर्मांचें विभागांनीं वर्णन करितों.

सप्तोत्तरं मर्मशतम्

शरीरांत सर्व मिळून १०७ मर्में आहेत.

तेषामेकादशादिशेत्।
पृथक्सक्थ्नोस्तथा बाह्वोस्त्रीणि कोष्ठे नवोरसि ॥ १ ॥
पृष्ठे चतुर्दशोर्ध्वं तु जत्रोस्त्रिंशच्च सप्त च।

त्यांपैकीं प्रत्येक पायांत व हातांत ११।११ मिळून ४४, कोठ्यांत तीन, छातींत नऊ, पाठींत चौदा आणि गळ्याच्या वरील भागांत ३७ मर्में आहेत.

मध्ये पादतलस्याहुरभितो मध्यमांगुलिम् ॥ २ ॥
तलहृन्नाम रुजया तत्र विद्धस्य पंचता।

पायाच्या तळव्याच्या मधोमध मधल्या बोटाजवळ तलहृत् नांवाचें मर्म आहे. त्या जागीं वेध झाल्यास मनुष्य वेदनांनीं मरतो.

अंगुष्ठांगुलिमध्यस्थं क्षिप्रमाक्षेपमारणम् ॥ ३ ॥

पायाचा आंगठा व शेजारचें बोट यांच्या मध्यें क्षिप्र नांवाचें मर्म आहे. त्याचा वेध झाल्यास धनुर्वातानें माणूस मरतो.

तस्योर्ध्वं द्व्यंगुले कूर्चः पादभ्रमणकंपकृत् ॥

क्षिप्रापासून दोन बोटें वर कूर्च नांवाचें मर्म आहे. त्याचा वेध झाला असतां पाय नेहमीं कांपतो व भ्रमण करतो.

**गुल्फसंधेरधः कूर्चशिरः शोफरुजाकरम् ॥ ४ ॥**

घोट्याच्या सांध्यांच्या खालीं कूर्चशिर नांवाचें मर्म आहे. त्याचा वेध झाल्यास सूज व वेदना उत्पन्न होतात.

**जंघाचरणयोः संधौ गुल्फो रुक्स्तंभमांद्यकृत्।**

पोटरी व पाय यांच्या सांध्यावर घोटा आहे. त्याचा वेध झाल्यास तो दुखतो, ताठतो व त्याची गति मंद होते.

**जंघांतरे त्विंद्रबस्तिर्मारयत्यसृजः क्षयात् ॥ ५ ॥**

पोटरीच्या गोळ्यांत इंद्रबस्ति नांवाचें मर्म आहे. त्याचा वेध झाल्यास मनुष्य रक्तस्राव होऊन मरतो.

**जंघोर्वोः संगमे जानु खंजता तत्र जीवतः।**

पोटरी व मांडी यांच्या सांध्यावर जानु नांवाचें मर्म आहे. त्याचा वेध झाल्यास मनुष्य बहुतकरून मरतो व कदाचित् जगलाच तर लंगडा होतो.

**जानुनस्त्र्यंगुलादूर्ध्वमाण्यूरुस्तंभशोफकृत् ॥ ६ ॥**

गुडघ्यापासून तीन बोटें वर आणी नांवाचें मर्म आहे. त्याचा वेध झाला असतां मांडी आंखडते किंवा सुजते.

**ऊर्व्यूरुमध्ये तद्वेधात्सक्थिशोषोऽस्रसंक्षयात्।**

मांडींत उर्वी नांवाचें मर्म आहे. त्याचा वेध झाल्यास रक्तस्राव होऊन मांडी वाळते.

**ऊरुमूले लोहिताख्यं हंति पक्षमसृक्क्षयात्॥ ७ ॥**

मांडीच्या मुळांत लोहित नांवाचें मर्म आहे. तें वेधलें गेल्यास रक्तस्राव होऊन अर्धांगवायु होतो.

**मुष्कवंक्षणयोर्मध्ये विटपं षंढताकरम्।**

वृषण व जांघाडे यांच्या मध्यभागीं विटप नांवाचें मर्म आहे; त्याचा वेध झाला असतां पुरुष षंढ होतो.

**इति सक्थ्नोस्तथा बाह्वोर्मणिबंधोऽत्र गुल्फवत् ॥ ८ ॥**
**कूर्परं जानुवत्कौण्यं तयोर्विटपवत्पुनः।**
**कक्षाक्षमध्ये कक्षाधृक् कुणित्वं तत्र जायते ॥ ९ ॥**

जशीं हीं पायांतील मर्में सांगितलीं, तशींच हातांतील समजावीं. फरक इतकाच कीं, पायाच्या घोट्याच्या जागीं हाताचें मणगट आणि पायाच्या गुडघ्याच्या ठिकाणीं हाताचें कोंपर जाणावें. यांचा वेध झाल्यास हात आंखडतो. खांदा व कांख यांच्या मध्यभागीं कक्षाधृक् नांवाचें मर्म आहे. त्याचा वेध झाला असतां हात आंखडून थोटा होतो.

स्थूलांत्रबद्धः सद्योघ्नो विड्वातवमनो गुदः ।

मोठ्या आंतड्यांस लागून असलेलें व मळ व अधोवायु बाहेर टाकणारें गुद नांवाचें मर्म आहे. त्याचा वेध झाला तर मनुष्य तत्काल मरतो.

मूत्राशयो धनुर्वक्रो बस्तिरल्पास्रमांसगः ॥ १० ॥
एकाधोवदनो मध्ये कट्याः सद्यो निहंत्यसून् ।
ऋतेऽश्मरीव्रणाद्विद्धस्तत्राप्युभयतश्च सः ॥ ११ ॥
मूत्रस्राव्येकतो भिन्नो व्रणो रोहेच्च यत्नतः ।

कंबरेच्या मध्यभागीं अल्प-मांस-रक्तमय जागेंत धनुष्याप्रमाणें वांकडा मूत्राशय आहे. त्यास बस्ति असें म्हणतात. त्यास खालच्या बाजूस एक तोंड आहे. मूतखडा काढण्याच्या शस्त्रक्रियेवांचून इतर प्रसंगीं वेध झाल्यास आणि मूतखडा काढतांनाही दोन्ही बाजूंस वेध झाल्यास मनुष्य तत्काल मरतो. मूत्राशयाच्या एका बाजूस जखम झाली असतां त्यांतून मूत्रस्राव झाल्यास व ती भरून येण्यास फार कष्ट पडल्यास मनुष्य जगत नाहीं.

देहामपक्वस्थानानां मध्ये सर्वसिराश्रयः ॥ १२ ॥
नाभिः सोऽपि हि सद्योघ्नः

आमाशय व पक्वाशय यांच्या मध्यभागीं शरीरांतील एकंदर शिरांची आधारभूत अशी बेंबी आहे. तिचा वेध झाला तर मनुष्य तत्काल मरतो.

द्वारमामाशयस्य च ।
सत्वादिधाम हृदयं स्तनोरःकोष्ठमध्यगम् ॥ १३ ॥

दोन्ही स्तनांच्या मधोमध आणि छाती व कोठा यांच्या मध्य-

भागीं आमाशयाचें द्वार आणि मन व बुद्धि इत्यादिकांचें स्थान असें हृदय आहे.

स्तनरोहितमूलाख्ये द्व्यंगुले स्तनयोर्वदेत् ।
ऊर्ध्वाधोऽस्रकफापूर्णकोष्ठो नश्येत्तयोः क्रमात् ॥ १४ ॥

प्रत्येक स्तनाच्या दोन बोटें वर स्तनरोहित व दोन बोटें खालीं स्तनमूल नांवाचीं मर्में आहेत. स्तनरोहितांचा वेध झाला असतां कोठ्यांत रक्त भरतें आणि स्तनमूलांचा वेध झाल्यानें कोठ्यांत कफ भरतो. दोन्ही स्थितींत मनुष्य मरतो.

अपस्तंभावुरःपार्श्वे नाड्यावनिलवाहिनी ।
रक्तेन पूर्णकोष्ठोऽत्र श्वासात्कासाच्च नश्यति ॥ १५ ॥

छातीच्या दोहों बाजूंस फुफ्फुसांत जाणाऱ्या दोन श्वासनलिका आहेत; त्यांस अपस्तंभ म्हणतात. त्यांचा वेध झाला असतां फुफ्फुसांत रक्त भरून खोकला व दमा होऊन मनुष्य मरतो.

पृष्ठवंशोरसोर्मध्ये तयोरेव च पार्श्वयोः ।
अधोंसकूटयोर्विद्यादपालापाख्यमर्मणी ॥ १६ ॥
तयोः कोष्ठेऽसृजा पूर्णे नश्येत्पाकेन पूयताम् ।

पाठीचा कणा व छाती यांच्या मध्यभागीं आणि दोहों बाजूंस खांद्यांच्या खालच्या भागीं कुशींत अपालाप नांवाचीं दोन मर्में आहेत. त्यांचा वेध झाला असतां कोठ्यांत रक्त भरून त्याचा पू होऊन मनुष्य मरतो.

पार्श्वयोः पृष्ठवंशस्य श्रोणिकर्णौ प्रतिष्ठिते ॥ १७ ॥
वंशाश्रिते स्फिजोरूर्ध्वं कटीकतरुणे स्मृते ।
तत्र रक्तक्षयात्पांडुर्हीनरूपो विनश्यति ॥ १८ ॥

पाठीच्या कण्याच्या दोहों बाजूस कुल्यांच्या वर कंबरेच्या दोहों बाजूंस दोन कानासारखीं हाडें आहेत. त्यांवर पाठीच्या कण्याच्या आश्रयानें कटीकतरुण नांवाचीं दोन मर्में आहेत. त्यांचा वेध झाल्यास रक्तस्राव होऊन मनुष्य पांढरा फटफटीत व निस्तेज होऊन मरतो.

पृष्ठवंशं ह्युभयतो यौ संधी कटिपार्श्वयोः ।
जघनस्य बहिर्भागे मर्मणी तौ कुकुंदरौ ॥ १९ ॥
चेष्टाहानिरधः काये स्पर्शाज्ञानं च तद्व्यधात् ।

---

१ याचा वेध झाला असतांही मनुष्य तत्काल मरतो.

पाठीच्या कण्याच्या दोहों बाजूस ढुंगणाच्या बाहेरच्या भागीं कंबर व कुशीच्या मधील जे सांधे—कनवटी, त्यांस कुकुंदर मर्में म्हणतात. त्यांचा वेध झाल्यास कंबरेच्या खालचा भाग लुला होऊन त्यास स्पर्शज्ञान होत नाहीं.

पार्श्वांतरनिबद्धौ यावुपरि श्रोणिकर्णयोः ॥ २० ॥
आशयच्छादनौ तौ तु नितंबौ तरुणास्थिगौ ।
अधःशरीरे शोफोऽत्र दौर्बल्यं मरणं ततः ॥ २१ ॥

बरगड्यांच्या आंत त्यांस लागून श्रोणिकर्णांच्यावर मूत्रादिकांच्या आशयांचें आच्छादन करणारीं तरुणास्थीवर नितंब नांवाचीं दोन मर्में आहेत. त्यांचा वेध झाला असतां शरीराचा खालचा भाग सुजून लुला होतो व त्यानें मनुष्य मरतो.

पार्श्वांतरनिबद्धौ च मध्ये जघनपार्श्वयोः ।
तिर्यगूर्ध्वं च निर्दिष्टौ पार्श्वसंधी तयोर्व्यधात् ॥ २२ ॥
रक्तपूरितकोष्ठस्य शरीरांतरसंभवः ।

बरगड्यांच्या आंतल्या भागीं त्यांस लागून, ढुंगण व बरगड्या यांच्या मध्यें दोहों बाजूंस तिरकस वर पार्श्वसंधि नांवाचीं मर्में आहेत. त्यांचा वेध झाल्यास कोठ्यांत रक्त भरून मनुष्य मरतो.

स्तनमूलार्जवे भागे पृष्ठवंशाश्रये सिरे ॥ २३ ॥
बृहत्यौ तत्र छिद्रस्य मरणं रक्तसंक्षयात् ।

स्तनमूळाच्या सरळ रेषेंत पाठीच्या कण्याच्या आश्रयानें दोन शिरा आहेत. त्यांस बृहतीमर्में म्हणतात. यांचा वेध झाला असतां रक्तस्राव होऊन मनुष्य मरतो.

बाहुमूलाभिसंबद्धे पृष्ठवंशस्य पार्श्वयोः ॥ २४ ॥
अंसयोः फलके बाहुस्वापशोषौ तयोर्व्यधात् ।

पाठीच्या कण्याच्या दोहों बाजूंस दंडाच्या मुळास जोडलेलीं जीं दोन हाडें आहेत, त्यांस अंसफलक मर्में म्हणतात. त्यांचा वेध झाल्यास हात बधिर होतो व वाळतो.

ग्रीवामुभयतः स्नाव्नी ग्रीवाबाहुशिरोंतरे ॥ २५ ॥
स्कंधांसपीठसंबंधावंसौ बाहुक्रियाहरौ ।

मानेच्या दोहों बाजूंस मान व दंड यांच्या टोंकाच्या मध्यभागीं

खांदा व अंसपीठ यांस लागून दोन स्नायु आहेत. त्यांस अंस-मर्में म्हणतात. त्यांचा वेध झाला असतां हात लुले होतात.

कंठनाडीमुभयतः सिरा हनुसमाश्रिताः ॥ २६ ॥
चतस्रस्तासु नीले द्वे मन्ये द्वे मर्मणी स्मृते ।
स्वरप्रणाशवैकृत्यं रसाज्ञानं च तद्व्यधे ॥ २७ ॥

कंठनलिकेच्या दोहों बाजूंस हनुवटीच्या आश्रयानें असलेल्या चार शिरा आहेत. त्यांपैकीं दोहोंस नीला व दोहोंस मन्या म्हणतात. यांचा वेध झाल्यास मनुष्य मुका होतो किंवा त्याचा आवाज बिघडतो; आणि जिभेस चव कळेनाशी होते.

कंठनाडीमुभयतो जिह्वानासागताः सिराः ।
पृथक् चतस्रस्ताः सद्यो घ्नंत्यसून्मातृकाह्वयाः ॥ २८ ॥

कंठनलिकेच्या दोहों बाजूंस, जीभ व नाक यांत गेलेल्या, प्रत्येक बाजूंस चारचार मिळून एकंदर आठ शिरा आहेत, त्यांस मातृका म्हणतात; त्यांचा वेध झाल्यास मनुष्य तत्काल मरतो.

कृकाटिके शिरोग्रीवासंधी तत्र चलं शिरः ।

डोकें व गळा यांच्या सांध्यांत दोहों बाजूंस कृकाटिक नांवाचीं दोन मर्में आहेत. त्यांचा वेध झाला असतां डोकें कांपूं लागतें.

अधस्तात्कर्णयोर्निम्ने विधुरे श्रुतिहारिणी ॥ २९ ॥

कानाच्या मागच्या बाजूस मुळाशीं जो खळगा आहे, त्यांत विधुर नांवाचीं दोन मर्में आहेत. त्यांचा वेध झाल्यानें मनुष्य बहिरा होतो.

फणावुभयतो घ्राणमार्गे श्रोत्रपथानुगौ ।
अंतर्गलस्थितौ वेधाद्गंधविज्ञानहारिणौ ॥ ३० ॥

नाकपुड्यांच्या दोहों बाजूंस कानांत जाणाऱ्या मार्गाजवळ घशांत फण नांवाचीं दोन मर्में आहेत. तीं वेधलीं गेलीं असतां वास कळणें बंद होतें.

नेत्रयोर्बाह्यतोऽपांगौ भ्रुवोः पुच्छांतयोरधः ।
तथोपरि भ्रुवोर्निम्नावावर्तावांध्यमेषु तु ॥ ३१ ॥

डोळ्यांच्या बाहेरच्या कोंपऱ्याजवळ भिवयांच्या टोंकाच्या खालीं अपांग नांवाचीं दोन मर्में आहेत. तशींच भिवयांच्या वर

खोलगट जागेंत आवर्त नांवाचीं दोन मर्में आहेत. यांच्या वेधानें मनुष्य आंधळा होतो.

अनुकर्णं ललाटांते शंखौ सद्योविनाशनौ ।

कपाळाच्या शेवटीं कानांच्या जवळ शंख नांवाचीं दोन मर्में आहेत; त्यांच्या वेधानें मनुष्य तत्काल मरतो.

केशांते शंखयोरूर्ध्वमुत्क्षेपौ स्थपनी पुनः ॥ ३२ ॥
भ्रुवोर्मध्ये त्रयेऽप्यत्र शल्ये जीवेदनुद्धृते ।
स्वयं वा पतिते पाकान्सद्यो नश्यति तूद्धृते ॥ ३३ ॥

केंसांच्या शेवटीं दोन्ही कानपटींच्या वर उत्क्षेप नांवाचीं दोन मर्में आहेत; आणि दोन्ही भिवयांच्या मधोमध स्थपनी नांवाचें एक मर्म आहे. या तिन्ही मर्मांत गेलेलें शल्य जर काढलें नाहीं, किंवा ती जागा पिकून तें आपोआप बाहेर पडलें तर मनुष्य जगतो. परंतु तेंच बाहेर उपटून काढलें तर मनुष्य तत्काल मरतो.

जिह्वाक्षिनासिकाश्रोत्रखचतुष्टयसंगमे ।
तालुन्यास्यानि चत्वारि स्रोतसां तेषु मर्मसु ॥ ३४ ॥
विद्धः शृंगाटकाख्येषु सद्यस्त्यजति जीवितम् ।

जीभ, डोळे, नाक व कान यांच्या चार स्रोतांचा ज्या जागीं संगम होतो, त्या जागीं म्हणजे टाळूंत त्या स्रोतांचीं चार तोंडें एके ठिकाणीं मिळतात. या सर्वांस शृङ्गाटक मर्में म्हणतात. यांचा वेध झाला असतां मनुष्य तत्काल मरतो.

कपाले संधयः पंच सीमंतास्तिर्यगूर्ध्वगाः ॥ ३५ ॥
भ्रमोन्मादमनोनाशैस्तेषु विद्धेषु नश्यति ।

डोक्याच्या करटींत तिरपे व उभे असे पांच सांधे आहेत. त्यांस सीमंत ( भांग ) म्हणतात. यांच्या वेधानें भ्रम, उन्माद व विस्मृति होऊन मनुष्य मरतो.

आंतरो मस्तकस्योर्ध्वं सिरासंधिसमागमः ॥ ३६ ॥
रोमावर्तोऽधिपो नाम मर्म सद्यो हरत्यसून् ।

मस्तकाच्या वरच्या भागीं आंतल्या अंगानें ज्या ठिकाणीं सर्व शिरा एकत्र जमून केंसाचा भोंवरा बनतो त्या ठिकाणीं अधिप नांवाचें मर्म आहे. याचा वेध झाला असतां मनुष्य तत्काल मरतो.

विषमं स्पंदनं यत्र पीडिते रुक् च मर्म तत् ॥ ३७॥

ज्या जागीं दाबलें असतां ती जागा इतर भागापेक्षां जास्त उडते व जास्त दुखते, तेंच मर्म होय.

मांसास्थिस्नायुधमनीसिरासंधिसमागमः ।
स्यान्मर्मेति च तेनाऽत्र सुतरां जीवितं स्थितम् ॥ ३८ ॥

किंवा ज्या जागीं मांसाचा, हाडांचा, स्नायूंचा, धमनींचा, शिरांचा किंवा सांध्यांचा संयोग झालेला असतो, तेंही मर्म असें समजावें. म्हणूनच त्या ठिकाणीं विशेषतः प्राण राहतो.

बाहुल्येन तु निर्देशः षढेवं मर्मकल्पना ।
प्राणायतनसामान्यादैक्यं वा मर्मणां मतम् ॥ ३९ ॥

येथपर्यंत जीं एकशें सात मर्में सांगितलीं तीं मुख्य मुख्य आहेत. यांचाही वरील सहा प्रकारच्याच मर्मांत अंतर्भाव होतो. किंवा एकंदर मर्में प्राणांचीं स्थानें आहेत या दृष्टीनें पाहिलें असतां मर्में एकाच प्रकारचीं आहेत असेंही मानतां येतें.

मांसजानि दशेंद्राख्यतलहृत्स्तनरोहिताः ।

चार इंद्रबस्ति, चार तलहृत् व दोन स्तनरोहित मिळून एकंदर मांसमर्में दहा आहेत.

शंखौ कटीकतरुणे नितंबावंसयोः फले ॥ ४० ॥
अस्थ्न्यष्टौ

दोन शंख, दोन कटीकतरुण, दोन नितंब व दोन अंसफलक मिळून एकंदर अस्थिमर्में आठ आहेत.

स्नावमर्माणि त्रयोविंशतिराणयः ।
कूर्चकूर्चशिरोऽपांगक्षिप्रोत्क्षेपांसबस्तयः ॥ ४१ ॥

आणी चार, कूर्च चार, कूर्चशिर चार, अपांग दोन, क्षिप्र चार, उत्क्षेप दोन, अंस दोन व बस्ति एक, मिळून एकंदर स्नायुमर्में तेवीस आहेत.

गुदोपस्तंभविधुरशृंगाटानि नवादिशेत्
मर्माणि धमनीस्थानि

धमनीमर्में नऊ आहेत. गुद एक, अपस्तंभ दोन, विधुर दोन व शृंगाटक चार.

सप्तत्रिंशत्सिराश्रयाः ॥ ४२ ॥
बृहत्यौ मातृका नीले मन्ये कक्षाधरौ फणौ ।
विटपौ हृदयं नाभिः पार्श्वसंधी स्तनांतरे ॥ ४३ ॥
अपालापौ स्थपन्यूर्व्यश्चतस्रो लोहितानि च ।

सिरामर्मे सदतीस आहेत. बृहती दोन, मातृका आठ, नीला दोन, मन्या दोन, कक्षाधृक् दोन, फण दोन, विटप दोन, हृदय, नाभि, पार्श्वसन्धि दोन, स्तनमूल दोन, अपालाप दोन, स्थपनी एक, ऊर्वी चार व लोहित चार.

संधौ विंशतिरावर्तौ मणिबंधौ कुकुंदरौ ॥ ४४ ॥
सीमंताः कूर्परौ गुल्फौ कृकाट्यौ जानुनी पतिः ।

सन्धिमर्मे वीस आहेतः—आवर्त दोन, मणिबन्ध दोन, कुकुंदर दोन, सीमंत पांच, कोंपरे दोन, घोटे दोन, कृकाटिक दोन, गुडघे दोन व अधिपति एक.

मांसमर्म गुदोऽन्येषां स्नाव्नी कक्षाधरौ तथा ॥ ४५ ॥
विटपौ विधुराख्ये च शृंगाटानि सिरासु तु ।
अपस्तंभावपांगौ च धमनीस्थं न तैः स्मृतम् ॥ ४६ ॥

इतर आचार्यांच्या मतें गुद हें मांसमर्म, कक्षाधृक्, विटप व विधुर हीं स्नायुमर्मे, आणि शृंगाट, अपस्तंभ व अपांग हीं शिरामर्मे आहेत. ते धमनीमर्म मुळींच मानीत नाहींत.

विद्धेऽजस्रमसृक्स्रावो मांसधावनवत्तनुः ।
पांडुत्वमिंद्रियाज्ञानं मरणं चाशु मांसजे ॥ ४७ ॥

मांसमर्माचा वेध झाल्यास मांसाच्या धुवणासारखें पातळ रक्त एकसारखें वाहत असतें, शरीर पांढरें फटफटीत होतें, इंद्रियांस आपापले विषय कळेनासे होतात, आणि मनुष्य लवकर मरतो.

मज्जान्वितोऽच्छो विच्छिन्नस्रावो रुक् चास्थिमर्मणि ।

अस्थिमर्माचा वेध झाला असतां मज्जामिश्रित व पातळ असा स्राव राहून राहून होतो, व वेदना होतात.

आयामाक्षेपकस्तंभा स्नावजेऽभ्यधिकं रुजा ॥ ४८ ॥
यानस्थानासनाशक्तिर्वैकल्यमथवांतकः ।

स्नायुमर्माचा वेध झाल्यास धनुर्वात होतो, आंचके येतात, वेधलेली जागा ताठते, अतिशय वेदना होतात; जाणें, येणें, उठणें,

बसणें वगैरे क्रिया करवत नाहींत, वेधलेला अवयव लुला होतो किंवा मनुष्य मरतो.

रक्तं सशब्दफेनोष्णं धमनीस्थे विचेतसः ॥ ४९ ॥

धमनींतील मर्माचा वेध झाल्यास फेंसाळ कढत रक्त शब्द करीत बाहेर पडतें व मनुष्य बेशुद्ध होतो.

सिरामर्मव्यधे सांद्रमजस्रं बहुसृक्स्रवेत् ।
तत्क्षयात्तृड्भ्रमश्वासमोहहिध्माभिरंतकः ॥ ५० ॥

शिरांतील मर्मांचा वेध झाल्यास दाट रक्ताची एकसारखी धार लागून पुष्कळ रक्त वाहून जातें. त्यायोगानें तहान, भ्रम, दमा, मोह व उचकी हे रोग होऊन मनुष्य मरतो.

वस्तु शूकैरिवाकीर्णं रूढे च कुणिखंजता ।
बलचेष्टाक्षयः शोषः पर्वशोफश्च संधिजे ॥ ५१ ॥

सांध्यांतील मर्मांचा वेध झाल्यास ती जागा धान्याच्या कुसांनीं व्याप्त झाल्याप्रमाणें वाटते, त्या ठिकाणची जखम भरून आल्यानंतर तो भाग कुबडा किंवा लंगडा होतो. शक्ति व चलन-वलन-सामर्थ्य कमी होतें, तो भाग वाळून बारीक होतो व पेरें सुजतात.

नाभिशंखाधिपापानहृच्छृंगाटकबस्तयः ।
अष्टौ च मातृकाः सद्यो निघ्नंत्येकोनविंशतिः ॥ ५२ ॥
सप्ताहः परमस्तेषां कालः कालस्य कर्षणे ।

बेंबी, शंख दोन, अधिपति, गुद, हृदय, शृंगाटक चार, बस्ति व मातृका आठ या एकोणीस मर्मांचा वेध झाल्यास मनुष्य ताबडतोब मरतो. आणि कदाचित् जगलाच तर फार फार म्हणजे सात दिवस जगतो.

त्रयस्त्रिंशदपस्तंभतलहृत्पार्श्वसंधयः ॥ ५३ ॥
कटीतरुणसीमंतस्तनमूलेंद्रबस्तयः ।
क्षिप्रापालापबृहतीनितंबस्तनरोहिताः ॥ ५४ ॥
कालांतरप्राणहरा मासमासार्धजीविताः ।

अपस्तंभ २, तलहृत् ४, पार्श्वसंधि २, कटीकतरुण २, सीमंत ५, स्तनमूल २, इंद्रबस्ति ४, क्षिप्र ४, अपालाप २, बृहती २, नितंब २ व स्तनरोहित २, या तेहतीस मर्मांचा वेध झाल्यास पंधरा दिवसांनीं किंवा एक महिन्यानें मनुष्य मरतो.

उत्क्षेपौ स्थपनी त्रीणि विशल्यघ्नानि तत्र हि ॥ ५५ ॥
वायुर्मांसवसामज्जमस्तुलुंगानि शोषयन् ।
शल्यापाये विनिर्गच्छन् श्वासात्कासाच्च हंत्यसून् ॥५६॥

दोन उत्क्षेप व स्थपनी या तीन मर्मांचा वेध होऊन आंत शल्य गेलें असल्यास तें काढल्यावर माणूस मरतो. कारण त्याबरोबर वायु हा मांस, वसा, मज्जा व मेंदू यांचें शोषण करून बाहेर निघून जातो, आणि मग दमा व खोकला होऊन रोगी मरतो.

फणावपांगौ विधुरौ नीले मन्ये कृकाटिके ।
अंसांसफलकावर्तविटपोर्वीकुकुंदराः ॥ ५७ ॥
सजानुलोहिताख्याऽणिकक्षाधृक्कूर्चकूर्पराः ।
वैकल्यमिति चत्वारि चत्वारिंशच्च कुर्वते ॥ ५८ ॥
हरंति तान्यपि प्राणान् कदाचिदभिघाततः ।

फण २, अपांग २, विधुर २, नीला २, मन्या २, कृकाटिका २, अंस २, अंसफलक २, आवर्त २, विटप २, ऊर्वी ४, कुकुंदर २, गुडघे २, लोहित ४, आणी ४, कक्षाधृक २, कूर्च ४, व कोंपरें २, या एकंदर ४४ मर्मांस आघात झाला असतां तो तो भाग लुळा होतो किंवा कदाचित् मनुष्य मरणही पावतो.

अष्टौ कूर्चशिरोगुल्फमणिबंधा रुजाकराः ॥ ५९ ॥

चार कूर्चशिर, दोन घोटे व दोन मणगटें या आठ जागीं आघात झाल्यास वेदना होतात.

तेषां विटपकक्षाधृगुर्व्यः कूर्चासिरांसि च ।
द्वादशांगुलमानानि द्व्यंगुले मणिबंधने ॥ ६० ॥
गुल्फौ च स्तनमूले च त्र्यंगुलौ जानुकूर्परौ ।

विटप, कक्षाधृक, उर्वी व कूर्चशिरा हीं बारा मर्में एकेक बोट आहेत. मनगटें, घोटे व स्तनमूल हीं दोन बोटें आहेत. गुडघे व कोपरें तीन बोटें आहेत.

अपानबस्तिहृन्नाभिनीलाः सीमंतमातृकाः ॥ ६१ ॥
कूर्चशृंगाटमन्याश्च त्रिंशदेकेन वर्जिताः ।
आत्मपाणितलोन्मानाः

गुद, बस्ति, हृदय, बेंबी, नीला, सीमंत, मातृका, कूर्च, शृंगाटक व मन्या हीं एकोणतीस मर्में स्वतःच्या तळहाताएवढीं असतात.

शेषाण्यर्धांगुलं वदेत् ॥ ६२ ॥
पंचाशत्षट् च मर्माणि तिलव्रीहिसमान्यपि ।
इष्टानि मर्माण्यन्येषाम्

बाकीचीं ५६ मर्में अर्धबोट असतात. इतर कांहीं आचार्यांच्या मतें तीं तीळ किंवा भात यांच्याएवढीं असतात.

चतुर्धोक्ताः सिरास्तु याः ॥ ६३ ॥
तर्पयंति वपुः कृत्स्नं ता मर्माण्याश्रितास्ततः ।
तत्क्षतात्क्षतजात्यर्थप्रवृत्तेर्धातुसंक्षये ॥ ६४ ॥
वृद्धश्चलो रुजस्तीव्राः प्रतनोति समीरयन् ।
तेजस्तदुद्धूतं धत्ते तृष्णाशोषमदभ्रमान् ॥ ६५ ॥
स्विन्नस्रस्तश्लथतनुं हरत्येनं ततोऽतकः ।

सर्व शरीराचें पोषण करणाऱ्या ज्या चार प्रकारच्या रक्तवाहक शिरा मागें सांगितल्या आहेत, त्या सर्व मर्मांच्या आश्रयानें आहेत. म्हणून मर्मावर जखम झाली असतां त्यांवरून जाणाऱ्या शिरांतून अतिशय रक्त निघून जाऊन धातूंचा क्षय होतो. त्यामुळें वायु प्रकुपित होऊन तीव्र वेदना उत्पन्न करितो. त्यानें पित्त वाढतें व तें तहान, शोष, मद व भ्रम हे विकार उत्पन्न करितें; आणि रोग्याचें शरीर स्विन्न व शिथिल होऊन गळून जातें व तो मरतो.

वर्धयेत्संधितो गात्रं मर्मण्यभिहते द्रुतम् ॥ ६६ ॥
छेदनात्संधिदेशस्य संकुचंति सिरा ह्यतः ।
जीवितं प्राणिनां तत्र रक्ते तिष्ठति तिष्ठति ॥ ६७ ॥

मर्मावर आघात झाला असतां तावडतोब तो भाग सांध्यापासून चिरून वेगळा करावा. सांधा तोडल्यानें शिरांचा संकोच होतो, त्या योगानें रक्त बंद होतें. आणि रक्त बंद झालें म्हणजे मनुष्य मरत नाहीं. (कारण वस्तुतः रक्त हेंच प्राण्याचें जीवन आहे.

सुविक्षतोऽप्यतो जीवेदमर्मणि न मर्मणि ।
प्राणघातिनि जीवेत्तु कश्चिद्वैद्यगुणेन चेत् ॥ ६८ ॥
असमग्राभिघाताच्च सोऽपि वैकल्यमश्नुते ।
तस्मात्क्षारविषाग्न्यादीन् यत्नान्मर्मसु वर्जयेत् ॥ ६९ ॥

मर्माशिवाय इतर ठिकाणीं मोठासा जरी व्रण झाला तरी मनुष्य मरत नाहीं. परंतु तोच जर प्राणघातक मर्मावर झाला तर मनुष्य

जगत नाहीं. प्राणघातक मर्माच्या कांहीं भागावर आघात झाला असून योग्य चिकित्सक मिळाल्यास कधीं एखादा रोगी वांचतो, परंतु तो लुला होतो. याकरितां मर्मांवर क्षार, विष, डाग वगैरे काळजीपूर्वक वर्ज करावे.

मर्माभिघातः स्वल्पोऽपि प्रायशो बाधतेतराम्।
रोगा मर्माश्रितास्तद्वत्प्रक्रांता यत्नतोऽपि च ॥ ७० ॥

मर्मांवर यत्किंचित् जरी आघात झाला तरी अतिशय पीडा होते. त्याचप्रमाणें मर्मांवरील रोगही फार मेहनत घेऊन चिकित्सा केली तरी अतिशय कष्ट देतात.

---

## अध्याय पांचवा.

अथाऽतो विकृतिविज्ञानीयं शारीरं व्याख्यास्यामः।

आतां मृत्युसूचक चिन्हें ( विकृति ) सांगतों.

पुष्पं फलस्य धूमोऽग्नेर्वर्षस्य जलदोदयः।
यथा भविष्यतो लिंगं रिष्टं मृत्योस्तथा ध्रुवम् ॥ १ ॥

पुढें येणाऱ्या फळाचें पूर्वचिन्ह जसें फूल, अग्नीचें चिन्ह जसें धूर, आणि पुढें पडणाऱ्या पावसाचें पूर्व चिन्ह जसें अभ्र, त्याप्रमाणें पुढें येणाऱ्या मृत्यूचें पूर्वचिन्ह रिष्ट हें होय.

अरिष्टं नास्ति मरणं दृष्टरिष्टं च जीवितम्।
अरिष्टे रिष्टविज्ञानं न च रिष्टेऽप्यनैपुणात् ॥ २ ॥

रिष्टावांचून मनुष्य मरत नाहीं व रिष्ट चिन्ह दिसल्यावर जगत नाहीं. रिष्टचिन्हांची बरोबर ओळख नसल्यास रिष्ट नसूनही आहे असें वाटतें आणि असतांनाही कळत नाहीं.

केचित्तु तद्विधेत्याहुः स्थाय्यस्थायिविभेदतः।

कांहीं आचार्य स्थायि व अस्थायि अशीं दोन प्रकारचीं रिष्टें मानतात.

दोषाणामपि बाहुल्याद्रिष्टाभासः समुद्भवेत् ॥ ३ ॥
स दोषाणां शमे शाम्येत्स्थाय्यवश्यं तु मृत्यवे।

दोष अतिशय वाढले असतांही रिष्टाचा भास होतो. परंतु त्या

दोषांचें शमन झालें म्हणजे तीं चिन्हें नाहींशीं होतात. हें अस्थायि रिष्ट होय. स्थायि रिष्ट झालें असतां मनुष्य खात्रीनें मरतोच.

रूपेंद्रियस्वरच्छायाप्रतिच्छायाक्रियादिषु ॥ ४ ॥
अन्येष्वपि च भावेषु प्राकृतेष्वनिमित्ततः ।
विकृतिर्या समासेन रिष्टं तदिति लक्षयेत् ॥ ५ ॥

रूप, इंद्रियें, स्वर, छाया, पडछाया, शारीरिक, मानसिक, व वाचिक क्रिया आणि इतरही शरीरसंबंधी ज्या स्वाभाविक गोष्टी आहेत त्यांत कारणावांचून विकृति उत्पन्न होणें, हें थोडक्यांत रिष्टाचें लक्षण आहे.

केशरोम निरभ्यंगं यस्याऽभ्यक्तमिवेक्ष्यते ।
यस्यात्यर्थं चले नेत्रे स्तब्धांतर्गतनिर्गते ॥ ६ ॥
जिह्मे विस्तृतसंक्षिप्ते संक्षिप्तविनतभ्रुणी ।
उद्भ्रांतदर्शने हीनदर्शने नकुलोपमे ॥ ७ ॥
कपोताभे अलाताभे स्रुते लुलितपक्ष्मणी ।
नासिकाऽत्यर्थविवृता संवृता पिटिकाचिता ॥ ८ ॥
उच्छूना स्फुटिता म्लाना यस्यौष्ठो यात्यधोऽधरः ।
ऊर्ध्वं द्वितीयः स्यातां वा पक्वजंबूनिभावुभौ ॥ ९ ॥
दंताः सशर्कराः श्यावास्ताम्राः पुष्पितपंकिताः ।
सहसैव पतेयुर्वा जिह्वा जिह्मा विसर्पिणी ॥ १० ॥
श्वेता शुष्का गुरुः श्यावा लिप्ता सुप्ता सकंटका ।
शिरः शिरोधरा वोढुं पृष्ठं वा भारमात्मनः ॥ ११ ॥
हनू वा पिंडमास्यस्थं शक्नुवंति न यस्य च ।
यस्यानिमित्तमंगानि गुरूण्यतिलघूनि वा ॥ १२ ॥
विषदोषाद्विना यस्य खेभ्यो रक्तं प्रवर्तते ।
उत्सिक्तं मेहनं यस्य वृषणावतिनिःसृतौ ॥ १३ ॥
अतोऽन्यथा वा यस्य स्यात्सर्वे ते कालचोदिताः ।

ज्याचे डोक्याचे केंस व रोम (अंगावरचे) तेल लावल्यावांचून तें लावल्याप्रमाणें तुळतुळीत दिसतात; ज्याचे डोळे अतिशय चंचळ, स्तब्ध, खोल गेलेले, बाहेर आलेले, वांकडे, पसरलेले किंवा आकुंचित होतात; ज्याच्या भिंवया आकुंचित व खालीं पडल्याप्रमाणें होतात; ज्यास पदार्थ उलटे किंवा कमी दिसतात; ज्याचे डोळे मुंगुसासारखे, कबूतरासारखे किंवा विस्तवासारखे होतात; ज्याच्या डोळ्यांतून कार-

णावांचून अश्रुधारा वाहतात; ज्याच्या पापण्या लुल्या होतात; ज्याचें नाक फार पसरतें किंवा संकुचित होतें, पुळ्यांनीं भरतें, सुजतें, म्लान होतें, किंवा त्यावर चिरा पडतात; ज्याचा खालचा ओंठ खालीं व वरचा वर जातो किंवा दोन्ही पिकलेल्या जांभळाप्रमाणें होतात; ज्याच्या दांतावर रेंव जमते, किंवा ते काळे, तांबडे, फुलल्यासारखे, किंवा चिखल लागल्यासारखे होतात, किंवा एकाएकीं विनाकारण पडतात; ज्याची जीभ वांकडी, चंचळ, पांढरी व कोरडी, जड, काळी लिंपल्यासारखी किंवा बधिर होते, अथवा तिजवर कांटे येतात; ज्याच्या मानेस डोकें सांवरेनासें होतें, पाठीस स्वतःचा, मानेचा व डोक्याचा भार सहन होत नाहीं, किंवा ज्याचे जबडे तोंडात घांस धरूं शकत नाहींत; ज्याचीं अंगें कारणावांचून फार जड किंवा फार हलकीं होतात, किंवा विषदोषावांचून ज्याच्या नाकें वगैरे द्वारांतून रक्त वाहूं लागतें; ज्याचें शिस्न फार वर जाऊन वृषण फार खालीं लोंबकळतात, किंवा वृषण फार वर जाऊन शिस्न फार खालीं लोंबतें, या सर्वांस मृत्यूचें बोलावणें आलें आहे, असें समजावें.

यस्याऽपूर्वाः सिरालेखा बालेंद्वाकृतयोऽपि वा ॥ १४ ॥
ललाटे बस्तिशीर्षे वा षण्मासान्न स जीवति ।

ज्याच्या कपाळावर अथवा बस्तीच्या वरच्या भागीं एकाएकीं शिरांच्या ओळी अथवा अर्धचन्द्राकार आकृति उमटतात, तो सहा महिन्यांवर जगत नाहीं.

पद्मिनीपत्रवत्तोयं शरीरे यस्य देहिनः ॥ १५ ॥
प्लवते प्लवमानस्य षण्मासं तस्य जीवितम् ।

पाण्यांत स्नान करीत असतां ज्याच्या अंगावर कमळाच्या पानाप्रमाणें पाणी न ठरतां वरवर निसटून जातें, त्याचें आयुष्य सहा महिने जाणावें.

हरिताभाः सिरा यस्य रोमकूपाश्च संवृताः ॥ १६ ॥
सोऽम्लाभिलाषी पुरुषः पित्तान्मरणमश्नुते ।

ज्याच्या अंगावर हिरव्या शिरा दिसतात, व रोमरन्ध्रें बुजून जातात, त्यास आंबट पदार्थांची इच्छा होऊन तो पित्तानें मरण पावतो.

यस्य गोमयचूर्णाभं चूर्णं मूर्ध्नि मुखेऽपि वा ॥१७॥
सस्नेहं मूर्ध्नि धूमो वा मासांतं तस्य जीवितम् ।

ज्याच्या डोक्यावर किंवा तोंडांत तेल मिळविलेल्या गाईच्या शेणाच्या ( गोंवऱ्याच्या ) चूर्णासारखें चूर्ण दिसतें, किंवा ज्याच्या डोक्यांतून धुराप्रमाणें वाफा निघतात, तो एक महिन्यानें मरणार असें समजावें.

मूर्ध्नि भ्रुवोर्वा कुर्वंति सीमंतावर्तका नवाः ॥ १८ ॥
मृत्युं स्वस्थस्य षड्रात्रात्त्रिरात्रादातुरस्य तु ।

ज्याच्या डोक्यावर किंवा भिवईवर एकाएकीं नवेच भांग व भोंवरे उत्पन्न होतात, तो निरोगी असल्यास सहा दिवसांत व आजारी असल्यास तीन दिवसांत मरणार असें जाणावें.

जिह्वा श्यावा मुखं पूति सव्यमक्षि निमज्जति ॥ १९ ॥
खगा वा मूर्ध्नि लीयंते यस्य तं परिवर्जयेत् ।

ज्याची जीभ काळी पडते, तोंडास दुर्गंधि येते, डावा डोळा खोल जातो, किंवा ज्याच्या डोक्यावर पक्षी बसतात, तो रोगी मरणार म्हणून सोडून द्यावा.

यस्य स्नातानुलिप्तस्य पूर्वं शुष्यत्युरो भृशम् ॥ २० ॥
आर्द्रेषु सर्वगात्रेषु सोऽर्धमासं न जीवति ।

स्नान करून सर्वांगास उटी लाविली असतां ज्याची छातीच अगोदर वाळते आणि बाकी सर्व शरीर पुष्कळ वेळ ओलें असतें, तो पंधरा दिवसांच्या आंत मरतो.

अकस्माद्युगपद्गात्रे वर्णौ प्राकृतवैकृतौ ॥ २१ ॥
तथैवोपचयग्लानिरौक्ष्यस्नेहादि मृत्यवे ।

एकाएकीं व एकाच वेळीं ज्याच्या अंगावर गोरा वगैरे प्राकृत व निळा वगैरे विकृत रंग दिसूं लागतात, त्याचप्रमाणें पुष्टि व ग्लानि, रूक्षता व स्निग्धता या व अशाच दुसऱ्या परस्परविरुद्ध गोष्टी एकाच वेळीं दिसूं लागतात, तो मनुष्य मरतो.

यस्य स्फुटेयुरंगुल्यो नाकृष्टा न स जीवति ॥ २२ ॥

ज्याचीं बोटें मोडलीं असतां वाजत नाहींत, तो मनुष्य वांचत नाहीं.

क्षवकासादिषु तथा यस्याऽपूर्वो ध्वनिर्भवेत् ।
ह्रस्वो दीर्घोऽति वोच्छ्वासः पूतिः सुरभिरेव वा ॥ २३ ॥
आप्लुतानाप्लुते काये यस्य गंधोऽतिमानुषः ।
मलवस्त्रव्रणादौ वा वर्षांतं तस्य जीवितम् ॥ २४ ॥

शिंकतांना, खोकतांना, वगैरे ज्याचा चमत्कारिक आवाज निघतो, ज्याचा श्वास फार आंखूड किंवा फार लांब असतो, ज्याच्या श्वासाला सुगंध किंवा दुर्गंध येतो, स्नान केल्यानंतर किंवा स्नान करण्यापूर्वीं ज्याचा मळ, वस्त्रें, जखमा यांस कांहीं निराळ्या प्रकारचा वास येतो, तो एक वर्षभर वांचतो.

भजंतेऽत्यंगसौरस्याद्यं यूकामक्षिकादयः ।
त्यजंति वाऽतिवैरस्यात्सोऽपि वर्षं न जीवति ॥ २५ ॥

अतिशय गोडीमुळें ज्याच्या अंगावर उवा, माशा वगैरे फार बसतात किंवा अति विरसतेमुळें ज्याच्या अंगावर त्या मुळींच बसत नाहींत, तो वर्षाच्या आंत मरतो.

सततोष्मसु गात्रेषु शैत्यं यस्योपलक्ष्यते ।
शीतेषु भृशमौष्ण्यं वा स्वेदः स्तंभोऽप्यहेतुकः ॥ २६ ॥
यो जातशीतपिटिकः शीतांगो वा विदह्यते ।
उष्णद्वेषी च शीतार्तः स प्रेताधिपगोचरः ॥ २७ ॥

ज्याचीं नेहमीं उष्ण असणारीं अंगें कारणावांचून एकाएकीं गार पडतात, नेहमीं गार असणारीं तशींच अतिशय ऊन होतात, ज्यास कारणाशिवाय अतिशय घाम येतो, किंवा घाम काढण्याचे यत्न करूनही ज्यास तो येत नाहीं, अंगावर कफापासून थंड पुळ्या उठल्या असून व अंग गार असून ज्याच्या अंगाची आग होते व थंडीचा विकार असून जो उष्ण वस्तूचा तिटकारा करतो, तो मृत्यूच्या स्वाधीन झाला आहे, असें समजावें.

उरस्यूष्मा भवेद्यस्य जठरे चातिशीतता ।
भिन्नं पुरीषं तृष्णा च यथा प्रेतस्तथैव सः ॥ २८ ॥

ज्याची छाती ऊन असून पोट अतिशय थंड असतें आणि

ज्याच्या अंगावर हिरव्या शिरा दिसतात, व रोमरन्ध्रे बुजून जातात, त्यास आंबट पदार्थांची इच्छा होऊन तो पित्तानें मरण पावतो.

यस्य गोमयचूर्णाभं चूर्णं मूर्ध्नि मुखेऽपि वा ॥१७॥
सस्नेहं मूर्ध्नि धूमो वा मासांतं तस्य जीवितम् ।

ज्याच्या डोक्यावर किंवा तोंडांत तेल मिळविलेल्या गाईच्या शेणाच्या ( गोंवऱ्याच्या ) चूर्णासारखें चूर्ण दिसतें, किंवा ज्याच्या डोक्यांतून धुराप्रमाणें वाफा निघतात, तो एक महिन्यानें मरणार असें समजावें.

मूर्ध्नि भ्रुवोर्वा कुर्वंति सीमंतावर्तका नवाः ॥ १८ ॥
मृत्युं स्वस्थस्य षड्रात्रात्त्रिरात्रादातुरस्य तु ।

ज्याच्या डोक्यावर किंवा भिंवईवर एकाएकीं नवेच भांग व भोंवरे उत्पन्न होतात, तो निरोगी असल्यास सहा दिवसांत व आजारी असल्यास तीन दिवसांत मरणार असें जाणावें.

जिह्वा श्यावा मुखं पूति सव्यमक्षि निमज्जति ॥ १९ ॥
खगा वा मूर्ध्नि लीयंते यस्य तं परिवर्जयेत् ।

ज्याची जीभ काळी पडते, तोंडास दुर्गंधि येते, डावा डोळा खोल जातो, किंवा ज्याच्या डोक्यावर पक्षी बसतात, तो रोगी मरणार म्हणून सोडून द्यावा.

यस्य स्नातानुलिप्तस्य पूर्वं शुष्यत्युरो भृशम् ॥ २० ॥
आर्द्रेषु सर्वगात्रेषु सोऽर्धमासं न जीवति ।

स्नान करून सर्वांगास उटी लाविली असतां ज्याची छातीच अगोदर वाळते आणि बाकी सर्व शरीर पुष्कळ वेळ ओलें असतें, तो पंधरा दिवसांच्या आंत मरतो.

अकस्माद्युगपद्गात्रे वर्णौ प्राकृतवैकृतौ ॥ २१ ॥
तथैवोपचयग्लानिरौक्ष्यस्नेहादि मृत्यवे ।

एकाएकीं व एकाच वेळीं ज्याच्या अंगावर गोरा वगैरे प्राकृत व निळा वगैरे विकृत रंग दिसूं लागतात, त्याचप्रमाणें पुष्टि व ग्लानि, रूक्षता व स्निग्धता या व अशाच दुसऱ्या परस्परविरुद्ध गोष्टी एकाच वेळीं दिसूं लागतात, तो मनुष्य मरतो.

यस्य स्फुटेयुरंगुल्यो नाकृष्टा न स जीवति ॥ २२ ॥

ज्याचीं बोटें मोडलीं असतां वाजत नाहींत, तो मनुष्य वांचत नाहीं.

क्षवकासादिषु तथा यस्याऽपूर्वो ध्वनिर्भवेत् ।
ह्रस्वो दीर्घोऽति वोच्छ्वासः पूतिः सुरभिरेव वा ॥ २३ ॥
आप्लुतानाप्लुत काये यस्य गंधोऽतिमानुषः ।
मलवस्त्रव्रणादौ वा वर्षांतं तस्य जीवितम् ॥ २४ ॥

शिंकतांना, खोकतांना, वगैरे ज्याचा चमत्कारिक आवाज निघतो, ज्याचा श्वास फार आंखूड किंवा फार लांब असतो, ज्याच्या श्वासाला सुगंध किंवा दुर्गंध येतो, स्नान केल्यानंतर किंवा स्नान करण्यापूर्वीं ज्याचा मळ, वस्त्रें, जखमा यांस कांहीं निराळ्या प्रकारचा वास येतो, तो एक वर्षभर वांचतो.

भजंतेऽत्यंगसौरस्याद्यं यूकामक्षिकादयः ।
त्यजंति वाऽतिवैरस्यात्सोऽपि वर्षं न जीवति ॥ २५ ॥

अतिशय गोडीमुळें ज्याच्या अंगावर उवा, माशा वगैरे फार बसतात किंवा अति विरसतेमुळें ज्याच्या अंगावर त्या मुळींच बसत नाहींत, तो वर्षाच्या आंत मरतो.

सततोष्मसु गात्रेषु शैत्यं यस्योपलक्ष्यते ।
शीतेषु भृशमौष्ण्यं वा स्वेदः स्तंभोऽप्यहेतुकः ॥ २६ ॥
यो जातशीतपिटिकः शीतांगो वा विदह्यते ।
उष्णद्वेषी च शीतार्तः स प्रेताधिपगोचरः ॥ २७ ॥

ज्याचीं नेहमीं उष्ण असणारीं अंगें कारणावांचून एकाएकीं गार पडतात, नेहमीं गार असणारीं तशींच अतिशय ऊन होतात, ज्यास कारणाशिवाय अतिशय घाम येतो, किंवा घाम काढण्याचे यत्न करूनही ज्यास तो येत नाहीं, अंगावर कफापासून थंड पुळ्या उठल्या असून व अंग गार असून ज्याच्या अंगाची आग होते व थंडीचा विकार असून जो उष्ण वस्तूचा तिटकारा करतो, तो मृत्यूच्या स्वाधीन झाला आहे, असें समजावें.

उरस्यूष्मा भवेद्यस्य जठरे चातिशीतता ।
भिन्नं पुरीषं तृष्णा च यथा प्रेतस्तथैव सः ॥ २८ ॥

ज्याची छाती ऊन असून पोट अतिशय थंड असतें आणि

ज्यास जुलाब होत असून फार तहान लागते, तो प्रेताप्रमाणेंच समजावा.

मूत्रं पुरीषं निष्ठयूतं शुक्रं वाप्सु निमज्जति ।
निष्ठ्यूतं बहुवर्णं वा यस्य मासात्स नश्यति ॥ २९ ॥

ज्याचें मूत्र, मल, थुंकी व वीर्य हीं पाण्यांत बुडतात किंवा ज्याचे थुंकींत पुष्कळ तऱ्हेचे रंग असतात, तो एक महिन्यानें मरतो.

घनीभूतमिवाकाशमाकाशमिव यो घनम्।
अमूर्तमिव मूर्तं च मूर्तं चामूर्तवत्स्थितम् ॥ ३० ॥
तेजस्व्यतेजस्तद्वच्च शुक्लं कृष्णमसच्च सत् ।
अनेत्ररोगश्चंद्रं च बहुरूपमलांछनम् ॥ ३१ ॥
जाग्रद्रक्षांसि गंधर्वान् प्रेतानन्यांश्च तद्विधान् ।
रूपं व्याकृति तद्वच्च यः पश्यति स नश्यति ॥ ३२ ॥

ज्याला आकाश घन पदार्थाप्रमाणें व घन पदार्थ आकाशाप्रमाणें दिसतात, निराकार ते साकार व साकार ते निराकार दिसतात, तसेच तेजस्वी पदार्थ निस्तेज आणि पांढरे ते काळे दिसतात, नसलेले पदार्थ प्रत्यक्षाप्रमाणें दिसतात, ज्यास तिमिरादि नेत्ररोग नसतांही अनेक चंद्र दिसतात व चंद्रावरील डाग दिसत नाहीं, जागृत अवस्थेंतच ज्यास राक्षस, गन्धर्व, प्रेतें, यक्ष, किन्नर वगैरे दिसतात, तसेंच इतर विद्रूप आकृति दिसतात, तो एक वर्षाच्या आंत मरतो.

सप्तर्षीणां समीपस्थां यो न पश्यत्यरुंधतीम् ।
ध्रुवमाकाशगंगां वा स न पश्यति तां समाम् ॥ ३३ ॥

ज्यास आकाशांतील सप्त ऋषींच्या जवळील अरुंधतीचा तारा, ध्रुवाचा तारा, किंवा आकाशगंगा दिसत नाहीं, तो वर्षाच्या आंत मरतो.

मेघतोयौघनिर्घोषवीणापणववेणुजान् ।
शृणोत्यन्यांश्च यः शब्दानसतो न सतोपि वा ॥ ३४ ॥
निष्पीड्य कर्णौ शृणुयान्न यो धुकधुकस्वनम् ।
तद्वद्गंधरसस्पर्शान् मन्यते यो विपर्ययात् ॥ ३५ ॥
सर्वशो वा न यो यश्च दीपगंधं न जिघ्रति ।
विधिना यस्य दोषाय स्वास्थ्यायाविधिना रसाः ॥ ३६ ॥

यः पांसुनेव कीर्णांगो योंऽगघातं न वेत्ति वा ।
अंतरेण तपस्तीव्रं योगं वा विधिपूर्वकम् ॥ ३७ ॥
जानात्यतींद्रियं यश्च तेषां मरणमादिशेत् ।

ज्यास मेघांची गर्जना, पाण्याच्या प्रवाहाचा शब्द, वीणा, पांवा, मुरली वगैरे वाद्यांचे शब्द नसतांही ऐकूं येतात व असून ऐकूं येत नाहींत; ज्यास कानांत बोटें घातलीं असतां होणारा धुक्धुक् शब्द ऐकूं येत नाहीं; ज्यास गंध, रस व स्पर्श हे असतील त्यांच्या उलट भासतात किंवा यांचें ज्ञान होत नाहीं; ज्यास दिवा मालवल्याबरोबर जी एक प्रकारची घाण येते ती कळत नाहीं; यथाविधि तत्तद्दोषनाशक रस दिले असूनही ज्याचे दोष वाढतात व विधिविपरीत दिले असतां रोगांचें शमन होतें; ज्याचें आंग धूळ फांसल्यासारखें दिसतें; ज्यास अंगावर आघात झाला असतां कळत नाहीं, अथवा तीव्र तपश्चर्येवांचून किंवा विधिपूर्वक योगाभ्यास केल्यावांचून ज्यास अतीन्द्रिय ज्ञान होतें, तो मरणार असें जाणावें.

हीनो दीनः स्वरोऽव्यक्तो यस्य स्याद्गद्गदोऽपि वा ॥ ३८ ॥
सहसा यो विमुह्येद्वा विवक्षुर्न स जीवति ।

ज्याचा स्वर हीन, दीन, अस्पष्ट किंवा घर्घर होतो, अथवा बोलूं लागला असतां ज्याला एकाएकीं मूर्च्छा येते, तो जगत नाहीं.

स्वरस्य दुर्बलीभावं हानिं वा बलवर्णयोः ॥ ३९ ॥
रोगवृद्धिमयुक्त्या च दृष्ट्वा मरणमादिशेत् ।

स्वर दुर्बळ होणें, शक्ति व कांति यांचा क्षय होणें, व कारणावांचून एकाएकीं रोग वाढणें, हीं लक्षणें झालीं असतां रोगी मरणार असें जाणावें.

अपस्वरं भाषमाणं प्राप्तं मरणमात्मनः ॥ ४० ॥
श्रोतारं चास्य शब्दस्य दूरतः परिवर्जयेत् ।

मी मरणार, मी मरणार, असे शब्द विकृत स्वरानें उच्चारणारा व ऐकणारा रोगी वैद्यानें दुरूनच सोडून द्यावा.

संस्थानेन प्रमाणेन वर्णेन प्रभयाऽपि वा ॥ ४१ ॥
छाया विवर्तते यस्य स्वप्नेऽपि प्रेत एव सः ।

ज्याच्या छायेचा आकार, प्रमाण, रंग व तेज हीं स्वप्नामध्यें सुद्धां बदललेलीं दिसतील, तो मेलेलाच आहे असें समजावें.

आतपादर्शतोयादौ या संस्थानप्रमाणतः ॥ ४२ ॥
छायांऽगात्संभवत्युक्ता प्रतिच्छायेति सा पुनः ।
वर्णप्रभाश्रया या तु सा छायैव शरीरगा ॥ ४३ ॥

ऊन, आरसा, पाणी वगैरे पदार्थांत शरीराची आकृति व प्रमाण यांच्या अनुरूप जी छाया पडते, तीस प्रतिच्छाया म्हणतात; आणि जी शरीरावरच, पण शरीराचा वर्ण व कांति यांवर अवलंबून असते, तीस छाया म्हणतात.

भवेद्यस्य प्रतिच्छाया छिन्ना भिन्नाधिकाकुला ।
विशिरा द्विशिरा जिह्मा विकृता यदि वान्यथा ॥ ४४ ॥
तं समाप्तायुषं विद्यान्न चेल्लक्ष्यनिमित्तजा ।
प्रतिच्छायामयी यस्य न चाक्षणीक्ष्येत कन्यका ॥ ४५ ॥

ज्याची पडछाया दृश्य कारणावांचून तुटलेली, मोडलेली, छिद्रयुक्त, प्रमाणाहून मोठी, हालणारी, बिनडोक्याची, दोन डोक्याची, वांकडी, किंवा अन्य कोणत्याही तऱ्हेनें विकृत झालेली दिसते, त्याचें आयुष्य संपलें असें समजावें. ज्याच्या डोळ्यांत पाहणाराची बाहुली दिसत नाहीं, त्याचें आयुष्य संपलें असें जाणावें.

खादीनां पंच पंचानां छाया विविधलक्षणाः ।
नाभसी निर्मला नीला सस्नेहा सप्रभेव च ॥ ४६ ॥
वाताद्रजोरुणा श्यावा भस्मरूक्षा हतप्रभा ।
विशुद्धरक्ता त्वाग्नेयी दीप्ताभा दर्शनप्रिया ॥ ४७ ॥
शुद्धवैदूर्यविमला सुस्निग्धा तोयजा सुखा ।
स्थिरा स्निग्धा घना शुद्धा श्यामा श्वेता च पार्थिवी ४८
वायवी रोगमरणक्लेशायान्याः सुखोदयाः ।

आकाशादि पंच महाभूतांच्या पांच छायांचीं निरनिराळीं लक्षणें आहेत. आकाशाची छाया निर्मळ, निळी, स्निग्ध व तेजस्वी असते. वायूची छाया मळकट, तांबूस, पिंगट, काळसर, राखेसारखी रूक्ष व फटफटीत असते. अग्नीची छाया शुद्ध रक्ताप्रमाणें लाल, चकचकीत व दिसण्यांत सुंदर असते. पाण्याची छाया निर्मल, लसण्या रत्नाप्रमाणें स्वच्छ, चांगली स्निग्ध व सुखकर असते. पार्थिव छाया स्थिर, दाट, स्निग्ध, शुद्ध, सांवळी व पांढरी असते. वायूची छाया रोग, मरण व क्लेश देणारी असून बाकीच्या चार छाया सुखदायक आहेत.

प्रभोक्ता तैजसी सर्वा सा तु सप्तविधा स्मृता ॥ ४९ ॥
रक्ता पीता सिता श्यामा हरिता पांडुरा सिता ।
तासां याः स्युर्विकासिन्यः स्निग्धाश्च विमलाश्च याः ५०
ताः शुभा मलिना रूक्षाः संक्षिप्ताश्च सुखोदयाः ।

प्रभा सात प्रकारच्या आहेत, व त्या सर्वांत अग्नितत्व मुख्य आहे. लाल, पिंवळी, पांढरी, सांवळी, हिरवी, फटफटीत पांढरी, व काळी हे ते सात प्रकार होत. यांपैकीं ज्या स्निग्ध व निर्मळ असून ज्यांचें तेज फांकतें त्या शुभ जाणाव्या; आणि ज्या मळकट व रूक्ष असून ज्यांचें तेज फांकत नाहीं त्या अशुभ जाणाव्या.

वर्णमाक्रामति च्छाया प्रभा वर्णप्रकाशिनी ॥ ५१ ॥
आसन्ने लक्ष्यते छाया विकृष्टे भा प्रकाशते ।

छाया वर्णास झांकून टाकिते आणि प्रभा वर्णास खुलविते. छाया जवळून दिसते व प्रभा लांबून चमकते.

नाच्छायो नाप्रभः कश्चिद्विशेषाश्चिह्नयंति तु ॥ ५२ ॥
नृणां शुभाशुभोत्पत्तिं काले छायासमाश्रयाः ।

छाया व प्रभा नाहीं असा मनुष्यच नाहीं. छायेच्या विशेष प्रकारांवरून प्रसंगविशेषीं मनुष्यांच्या शुभ व अशुभ गोष्टी ओळखतां येतात.

निकषन्निव यः पादौ च्युतांसः परिसर्पति ॥ ५३ ॥
हीयते बलतः शश्वद्योऽन्नमश्नन् हितं बहु ।
योऽल्पाशी बहुविण्मूत्रो बह्वाशी चाल्पमूत्रविट् ॥ ५४ ॥
योऽल्पाशी वा कफेनार्तो दीर्घं श्वसिति चेष्टते ।
दीर्घमुच्छ्वस्य यो ह्रस्वं निःश्वस्य परिताम्यति ॥ ५५ ॥
ह्रस्वं च यः प्रश्वसिति व्याविद्धं स्पंदते भृशम् ।
शिरो विक्षिपते कृच्छ्राद्योऽचयित्वा प्रपाणिकौ ॥५६॥
यो ललाटात्स्रुतस्वेदः श्लथसंधानबंधनः ।
उत्थाप्यपानः संमुह्येद्यो बली दुर्बलोऽपि वा ॥ ५७ ॥
उत्तान एव स्वपिति यः पादौ विकरोति च ।
शयनासनकुड्यादौ योऽसदेव जिघृक्षति ॥ ५८ ॥
अहास्यहासी संमुह्यन् यो लेढि दशनच्छदौ ।
उत्तरोष्ठं परिलिहन् फूत्कारांश्च करोति यः ॥ ५९ ॥
यमभिद्रवति च्छाया कृष्णा पीताऽरुणापि वा ।

भिषग्भेषजपानान्नगुरुमित्रद्विषश्च ये ॥ ६० ॥
वशगाः सर्व एवैते विज्ञेयाः समवर्तिनः ।

ज्याचे खांदे गळले असून जो जमिनीवर पायांनीं फरपटत जातो; हितकर व पुष्कळ अन्न खात असूनही ज्याची शक्ति क्षीण होत जाते; थोडें खात असूनही ज्यास मलमूत्र फार होतात, व पुष्कळ खाऊन मलमूत्र थोडें होतें; थोडें खात असून कफानें पीडिल्यामुळें जो दीर्घ श्वास टाकितो व जमिनीवर गडबडां लोळतो; जो दीर्घश्वास बाहेर टाकून आंखूड श्वास आंत घेतो व तळमळतो; जो ऱ्हस्व श्वास टाकून एकसारखा वेडावांकडा कांपत असतो; जो हाताच्या मुठी वळून कष्टानें डोकें इकडे तिकडे टाकतो; ज्याच्या कपाळावरून घामाच्या धारा वाहत असतात, व ज्याचे सांधे ढिले पडतात; सशक्त किंवा अशक्त असून ज्यास उठवितांना घेरी येते; जो नेहमीं उताणाच निजतो; जो पाय वेडेवांकडे टाकतो; जो बिछाना, आसन, भिंत यांवर कांहीं एक पदार्थ नसतांच धरावयास जातो; जो कारणावांचून हंसून मूर्छित होतो व ओंठ चाटतो; जो वरच्या ओंठास जिभेनें स्पर्श करून फूत्कार टाकितो; ज्याची छाया काळी, पिंवळी, किंवा पिंगट रंगाची होते; आणि जो रोगी वैद्य, औषध, अन्नपान, वडील माणसें व इष्टमित्र यांचा द्वेष करितो, असे सर्व यमाच्या ताब्यांत गेले असें समजावें.

ग्रीवाललाटहृदयं यस्य स्विद्यति शीतलम् ॥ ६१ ॥
उष्णोऽपरः प्रदेशश्च शरणं तस्य देवता ।

ज्याचा गळा, कपाळ व हृदय हीं गार असून त्यांस घाम येतो व बाकीचें सगळें अंग गरम असतें, त्यास देवावांचून कोणी राखणारा नाहीं.

योऽणुज्योतिरनेकाग्रो दुश्छायो दुर्मनाः सदा ॥ ६२ ॥
बालिं बलिभृतो यस्य प्रणीतं नोपभुंजते ।
निर्निमित्तं च यो मेधां शोभामुपचयं श्रियम् ॥ ६३ ॥
प्राप्नोत्यतो वा विभ्रंशं स प्राप्नोति यमक्षयम् ।

ज्याची दृष्टि किंवा तेज कमी होतें, ज्याचें चित्त व्यग्र असतें, ज्याच्या शरीराची कांति बिघडते, जो नेहमीं चिंताग्रस्त असतो,

ज्याच्या नांवानें घातलेला भाताचा बळी कावळे वगैरे खात नाहींत, कारणावांचून ज्यास धारणाशक्ति, शोभा, पुष्टि व लक्ष्मी हीं मिळतात, किंवा तशींच एकाएकीं तीं नाहींशीं होतात, तो यमसदनीं जातो.

गुणदोषमयी यस्य स्वस्थस्य व्याधितस्य वा ॥ ६४ ॥
यात्यन्यथात्वं प्रकृतिः षण्मासान्न स जीवति ।

ज्या मनुष्याचा वाईट किंवा चांगला स्वभाव विपरीत होतो, तो मनुष्य रोगी असो किंवा निरोगी असो, सहा महिन्यांवर वांचत नाहीं.

भक्तिः शीलं स्मृतिस्त्यागो बुद्धिर्बलमहेतुकम् ॥ ६५ ॥
षडेतानि निवर्तंते षड्भिर्मासैर्मरिष्यतः ।

भक्ति, सुशीलपणा, स्मरणशक्ति, दातृत्व, बुद्धि व शक्ति हे गुण ज्याचे कारणावांचून नाहींसे होतात तो सहा महिन्यांनीं मरतो.

मत्तवद्गतिवाक्कंपमोहा मासान्मरिष्यतः ॥ ६६ ॥

जो दारू पिऊन झिंगलेल्या किंवा उन्माद झालेल्या मनुष्याप्रमाणें चालतो, बोलतो, कांपतो व मूर्छित होतो, तो एक महिन्यानें मरतो.

नश्यत्यजानन् षडहात्केशलुंचनवेदनाम् ।

ज्यास त्याचे केंस उपटले असतां वेदना होत नाहीं, तो सहा दिवसांनीं मरतो.

न याति यस्य चाहारः कंठं कंठामयादृते ॥ ६७ ॥
प्रेष्याः प्रतीपतां यांति प्रेताकृतिरुदीर्यते ।
यस्य निद्रा भवेन्नित्यं नैव वा न स जीवति ॥ ६८ ॥

गळ्यांत कांहीं रोग नसूनही ज्याच्या घशाखालीं अन्नपाणी उतरत नाहीं, ज्याचे नोकर-चाकर प्रतिकूळ होतात, ज्याच्या शरीरावर प्रेतकळा दिसते, ज्यास सतत झोंप येते किंवा मुळींच येत नाहीं, तो वांचत नाहीं.

वक्त्रमापूर्यतेऽश्रूणां स्विद्यतश्चरणौ भृशम् ।
चक्षुश्चाकुलतां याति यमराज्यं गमिष्यतः ॥ ६९ ॥

ज्याचें तोंड अश्रुधारांनीं भरून जातें, पायांस अतिशय घाम येतो व डोळे गढूळ होतात, तो यमराज्यांत जाणार असें जाणावें.

यैः पुरा रमते भावैररतिस्तैर्न जीवति ।

पूर्वी ज्या गोष्टीपासून आनंद व सुख वाटत होतें, त्याच गोष्टी-पासून ज्यास त्रास होतो तो वांचत नाहीं.

सहसा जायते यस्य विकारः सर्वलक्षणः ॥ ७० ॥
निवर्तते वा सहसा सहसा स विनश्यति ।

ज्यास एकाएकीं एखादा सर्वलक्षणयुक्त रोग उत्पन्न होतो किंवा झालेला एकाएकीं बरा होतो, तो एकदम मरतो.

ज्वरो निहंति बलवान् गंभीरो दैर्घरात्रिकः ॥ ७१ ॥
सप्रलापभ्रमश्वासक्षीणं शूनं हतानलम् ।
अक्षामं सक्तवचनं रक्ताक्षं हृदि शूलिनम् ॥ ७२ ॥
संशुष्ककासः पूर्वाह्ने योपराह्णेऽपि वा भवेत् ।
बलमांसविहीनस्य श्लेष्मकाससमन्वितः ॥ ७३ ॥

जोरदार, सर्वधातुगत व फार दिवसांचा ताप असून, बडबड, भ्रम व दमा हे उपद्रव त्यांत होत असून, रोगी सशक्त असूनही त्यास धातुक्षय झाला असेल, त्याचें अंग सुजलें असेल, अग्नि मंद झाला असेल, बोलतांना अडखळत असेल, डोळे लाल झाले असतील व छातींत शूळ असेल तर तो वांचत नाहीं. ज्या रोग्यास सकाळीं किंवा तिसऱ्या प्रहरीं ताप येत असून त्यांत कोरडी ढांसही असेल, अथवा जो रोगी बलमांसहीन असून त्यास कफ व खोकला यांसहित ताप येतो, तोही मरतो.

रक्तपित्तं भृशं रक्तं कृष्णमिंद्रधनुःप्रभम् ।
ताम्रहारिद्रहरितं रूपं रक्तं प्रदर्शयेत् ॥ ७४ ॥
रोमकूपप्रविसृतं कंठास्यहृदये सजत् ।
वाससो रंजनं पूति वेगवच्चातिभूरि च ॥ ७५ ॥
वृद्धं पांडुज्वरच्छर्दिकासशोफातिसारिणम् ।

ज्या रक्तपित्त झालेल्या रोग्यास अति लाल, अति काळें, इंद्र-धनुष्याप्रमाणें अनेक रंगाचें असें रक्त पडतें, रोमच्छिद्रांतून बाहेर येतें, किंवा गळा तोंड व हृदय यांस अडळखत बाहेर निघतें, व ज्यास पदार्थ तांबडे, पिंवळे व हिरवे दिसतात, तो रोगी मरतो. तसेंच ज्या रक्तपित्तांतील रक्ताचा वस्त्रावर डाग जात नाहीं, ज्या रक्तास घाण येते. जें वेगानें व पुष्कळ प्रमाणांत पडतें

तें रोग्यास मारतें. पांडु, ताप, उलटी, खोकला, सूज व अतिसार हे विकार असलेल्या मनुष्यास रक्तपित्त होऊन तें फार वाढल्या-सही रोगी मरतो.

कासश्वासौ ज्वरच्छर्दितृष्णातीसारशोफिनम् ॥ ७६ ॥

ताप, उलटी, तहान, जुलाब व सूज हे विकार असलेल्या मनुष्यास खोकला व दमा उत्पन्न झाल्यास रोगी मरतो.

यक्ष्मा पार्श्वरुजानाहरक्तच्छर्द्यंसतापिनम् ।

क्षयरोग्यास बरगड्यांत दुखणें, पोट फुगणें, रक्ताच्या उल-ट्या होणें व खांदे दुखणें हे विकार झाले असतां तो मरतो.

छर्दिर्वेगवती मूत्रशकृद्गंधिः सचंद्रिका ॥ ७७ ॥
सास्त्रविट्पूयरुक्कासश्वासवत्यनुषंगिणी ।

वांति वेगानें होत असून तीस मलमूत्रासारखी घाण येत असेल, तींत अनेक रंगांची झांक मारीत असेल, ती रक्त, विष्ठा व पू यांनीं मिश्रित असेल, आणि ती फार दिवसांची असून तिच्या बरोबर शूळ, खोकला व दमा हे विकार होत असतील तर ती मनुष्यास मारते.

तृषणान्यरोगक्षपितं बहिर्जिह्वं विचेतनम् ॥ ७८ ॥

तृष्णारोगांत दुसऱ्या रोगानें क्षीण झालेला मनुष्य जीभ बाहेर काढून निश्चेष्ट पडला असेल, तर तो मरतो.

मदात्ययोऽतिशीतार्तं क्षीणं तैलप्रभाननम् ।

मदात्यय झालेल्या मनुष्यास थंडी वाजूं लागेल, तो क्षीण झाला असेल किंवा त्याच्या तोंडावर तेलकट प्रभा दिसेल, तर तो जगणार नाहीं असें समजावें.

अर्शांसि पाणिपन्नाभिगुदमुष्कास्यशोफिनम् ॥ ७९ ॥
हृत्पार्श्वांगरुजाछर्दिपायुपाकज्वरातुरम् ।

• हात, पाय, बेंबी, गुद, वृषण व तोंड हीं ज्याचीं सुजलीं आहेत, छाती, बरगड्या व अंग हीं ज्याचीं दुखत आहेत, ज्याचें मल-द्वार पिकलें आहे, आणि ज्यास ताप व उलटीही आहे, असा मूळव्याधीचा रोगी मरतो.

अतीसारो यकृत्पिंडमांसधावनमेचकैः ॥ ८० ॥
तुल्यस्तैलघृतक्षीरदधिमज्जवसासवैः ।
मस्तुलुंगमषीपूयवेसवारांबुमाक्षिकैः ॥ ८१ ॥
अतिरक्तासितस्निग्धपूत्यच्छघनवेदनः ।
कर्बुरः प्रस्रवन् धातून् निष्पुरीषोऽथवातिविट् ॥ ८२ ॥
तंतुमान् मक्षिकाक्रांतो राजीमांश्चंद्रकैर्युतः ।
शीर्णपायुवलिं मुक्तनालं पर्वास्थिशूलिनम् ॥ ८३ ॥
स्रस्तपायुं बलक्षीणमन्नमेवोपवेशयेत् ।
सतृट्श्वासज्वरच्छर्दिदाहानाहप्रवाहिकः ॥ ८४ ॥

ज्यास यकृत्पिंड, मांसाचें धुवण, नीळ, तेल, दूध, तूप, दहीं, मज्जा, वसा, आसव, मेंदू, शाई, पू, खीमा, पाणी किंवा मध यांच्यासारखे जुलाब होतात; ज्यास अतिशय लाल, अतिशय काळे, अति चिकट, अति दुर्गंधी, अति पातळ, अति दाट, चित्रविचित्र रंगांचे आणि ज्यांत फार वेदना होतात असे जुलाब होतात; ज्यांत रक्तमांसादि धातूंचा स्राव होतो, ज्यांत मळ मुळींच नसतो किंवा अतिशय असतो, ज्यांची तार निघते, ज्यांवर माशा भणाणतात, ज्यांवर रेघा व अनेक प्रकारचे रंग दिसतात असे जुलाब ज्यास होतात; ज्याच्या मलद्वाराच्या वळ्या गळून गेल्या आहेत, गुदद्वार शिथिल होऊन बाहेर येतें, ज्याचीं पेरें व हाडें ठणकतात, ज्याची शक्ति क्षीण झाली आहे, ज्यास जुलाबावाटे नुस्तें अन्नच पडतें, जो जुलाबाच्या वेळीं कुंथतो आणि ज्यास तहान, दमा, ताप, उलटी, दाह व पोटफुगी हे विकार होतात, तो अतिसाराचा रोगी मरतो.

अश्मरी शूनवृषणं बद्धमूत्रं रुजार्दितम् ।

ज्याचे वृषण सुजले आहेत, लघ्वी बंद झाली आहे व ज्यास वेदना होत आहेत, असा मुतखडा झालेला रोगी मरतो.

मेहस्तृड्दाहपिटिकामांसकोथातिसारिणम् ॥ ८५ ॥

तहान, दाह, पुळ्या, मांस कुजणें व अतिसार हे विकार असलेला प्रमेहाचा रोगी मरतो.

पिटिका मर्महृत्पृष्ठस्तनांसगुदमूर्धगाः ।
मर्मपादकरस्था वा मंदोत्साहं प्रमेहिणम् ॥ ८६ ॥

सर्वं च मांससंकोचदाहतृष्णामदज्वरैः ।
विसर्पमर्मसंरोधहिध्माश्वासभ्रमक्लमैः ॥ ८७ ॥

प्रमेहानें गळलेल्या मनुष्यास मर्मे, हृदय, पाठ, स्तन, खांदे, गुद, डोकें, पेरें, पाय किंवा हात यांवर पुळ्या झाल्या असतां तो मरतो. मांसाचा संकोच, दाह, तहान, उन्माद, ताप, विसर्प, मर्मांचा अवरोध, उचकी, दमा, भ्रम व ग्लानि हे विकार कोणत्याही रोग्यास असले तरी त्यास पुळ्या झाल्या असतां तो मरतो.

गुल्मः पृथुपरीणाहो घनः कूर्म इवोन्नतः ।
सिरानद्धो ज्वरच्छर्दिहिध्माध्मानरुजान्वितः ॥ ८८ ॥
कासपीनसहृल्लासश्वासातीसारशोफवान् ।

ज्याचा घेर मोठा असून जो कठिण व कांसवाच्या पाठीप्रमाणें उंच, शिरांनीं घेरलेला असून ज्यांत ताप, उलटी, उचकी पोटफुगी, खोकला, पीनस, मळमळ, दमा, अतिसार व सूज हे उपद्रव असतात, असा गुल्म मनुष्यास मारतो.

विण्मूत्रसंग्रहश्वासशोफहिध्माज्वरभ्रमैः ॥ ८९ ॥
मूर्छाछर्द्यतिसारैश्च जठरं हंति दुर्बलम् ।
शूनाक्षं कुटिलोपस्थमुपक्लिन्नतनुत्वचम् ॥ ९० ॥
विरेचनहतानाहमानह्यंतं पुनःपुनः ।

मलमूत्रांचा अवरोध, दमा, सूज, उचकी, ताप, भ्रम, मूर्च्छा, उलटी व हगवण या विकारांनीं युक्त असें उदर, अशक्त, ज्याचे डोळे सुजले आहेत, शिस्न वांकडें झालें आहे, ज्याचें शरीर व चामडी ओलसर झाली आहे, जुलाब दिला असतां ज्याचें पोट उतरतें परंतु पुन्हा पहिल्याप्रमाणें फुगतें, अशा रोग्यास मारतें.

पांडुरोगः श्वयथुमान् पीताक्षिनखदर्शनम् ॥ ९१ ॥

ज्याचें सर्वांग सुजलें असून डोळे व नखें पिवळीं आहेत आणि आणि ज्यास सर्व पदार्थ पिंवळे दिसतात, अशा प्रकारचा पांडुरोगी मरतो.

तंद्रादाहारुचिच्छर्दिमूर्छाध्मानातिसारवान् ।
अनेकोपद्रवयुतः पादाभ्यां प्रसृतो नरम् ॥ ९२ ॥
नारीं शोफो मुखाद्धंति कुक्षिगुह्यादुभावपि ।
राजीचितः स्रवंश्छर्दिज्वरश्वासातिसारिणम् ॥ ९३ ॥

झांपड, दाह, अरुचि, उलटी, मूर्च्छा, पोटफुगी, अतिसार व व इतर अनेक उपद्रवांसहित, पुरुषास पायांकडून आणि स्त्रियांस तोंडाकडून आलेली सूज त्यांस मारते. पोट व गुह्येन्द्रियें यांपासून चढूं लागलेली सूज उभयतांस मारते. सुजेवर रेघा दिसत असून तींतून स्राव होत असेल आणि उलटी, ताप, दमा व अतिसार हे विकार असतील तरीही रोगी मरतो.

ज्वरातिसारौ शोफांते श्वयथुर्वा तयोः क्षये ।
दुर्बलस्य विशेषेण जायेतेऽताय देहिनः ॥ ९४ ॥

ज्यास सर्वांगसुजेनंतर ताप व अतिसार होतो, किंवा ज्यास ताप व अतिसार यांच्या शेवटीं सूज येते, या दोन्ही प्रकारांनीं विशेषेंकरून अशक्त रोगी मरतो.

श्वयथुर्यस्य पादस्थः परिस्रस्ते च पिंडिके ।
सीदतः सक्थिनी चैव तं भिषक् परिवर्जयेत् ॥ ९५ ॥

ज्याचे पाय सुजले असून पोटऱ्या शिथिल झाल्या असतील व मांड्या गळल्या असतील, त्यास वैद्यानें सोडून द्यावें.

आननं हस्तपादं च विशेषाद्यस्य शुष्यतः ।
शूयेते वा विना देहात्स मासाद्याति पंचताम् ॥ ९६ ॥

ज्याचें तोंड, हात व पाय एवढेच फक्त वाळतात किंवा सुजतात आणि बाकीचें अंग जसेंच्या तसेंच असतें, तो एक महिन्यानें मरतो.

विसर्पः कासवैवर्ण्यज्वरमूर्छांगभंगवान् ।
भ्रमास्यशोषहृल्लासदेहसादातिसारवान् ॥ ९७ ॥

विसर्पांत खोकला, निस्तेजपणा, ताप, मूर्च्छा, अंग मोडणें, भ्रम, तोंडास कोरड, मळमळ, अंग गळणें व अतिसार हे उपद्रव झाले असतां रोगी मरतो.

कुष्ठं विशीर्यमाणांगं रक्तनेत्रं हतस्वरम् ।
मंदाग्निं जंतुभिर्जुष्टं हंति तृष्णातिसारिणम् ॥ ९८ ॥

ज्याचें अंग सडूं लागलें आहे, डोळे लाल झाले आहेत, अग्नि मंदावला आहे, जखमेंत किडे पडले आहेत, तहान लागत आहे व अतिसार झाला आहे, अशा प्रकारचा कुष्ठ रोगी मरतो.

वायुः सुप्तत्वचं भग्नं कंपशोफरुजातुरम् ।

त्वचा बधिर होणें, अंग जखडून वांकडें होणें, कांपरें, सूज व वेदना हे उपद्रव झालेल्यास वायु मारितो.

वातास्रं मोहमूर्च्छायमदस्वप्नज्वरान्वितम् ॥ ९९ ॥
शिरोग्रहारुचिश्वाससंकोचस्फोटकोथवत् ।

मोह, मूर्च्छा, मद, झोंप, ताप, डोकें दुखणें, अरुचि, दमा, सांधे संकुचित होणें, फोड येणें व सडणें हे उपद्रव झालेल्यास वातरक्त मारितें.

शिरोरोगारुचिश्वासमोहविड्भेदतृड्भ्रमैः ॥ १०० ॥
घ्नंति सर्वामयाः क्षीणस्वरधातुबलानलम् ।

शिरोरोग, अरुचि, दमा, मोह, अतिसार, तहान व भ्रम हे विकार कोणत्याही रोगांत झाल्यास आणि रोग्याचा आवाज, धातु, शक्ति, व अग्नि क्षीण असल्यास तो मरतो.

वातव्याधिरपस्मारी कुष्ठी रक्त्युदरी क्षयी ॥ १०१ ॥
गुल्मी मेही च तान् क्षीणान् विकारेऽल्पेऽपि वर्जयेत् ।

वातरोग, फेंपरें, कुष्ठ, रक्तपित्त, उदर, क्षय, गुल्म व प्रमेह हे रोग साधारण असले तरी यांचे रोगी क्षीण झाले असल्यास सोडून द्यावे.

बलमांसक्षयस्तीव्रो रोगवृद्धिररोचकः ॥ १०२ ॥
यस्यातुरस्य लक्ष्यंते त्रीन् पक्षान्न स जीवति ।

ज्या रोगांत शक्ति व मांस यांचा फारच क्षय, रोगाची वृद्धि व अरुचि हीं तीन लक्षणें दिसतात तो दीड महिन्यावर वांचत नाहीं.

वाताष्ठीलाऽतिसंवृद्धा तिष्ठंती दारुणा हृदि ॥ १०३ ॥
तृष्णया तु परीतस्य सद्यो मुष्णाति जीवितम् ।

वाताष्ठीला अतिशय वाढून हृदयांत राहून दारुण वेदना उत्पन्न करूं लागत असेल, आणि रोग्याला जर तहान फार लागत असेल, तर ती रोग्यास तावडतोब मारते.

शैथिल्यं पिंडिके वायुर्नीत्वा नासां च जिह्मताम् ॥ १०४ ।
क्षीणस्यायम्य मन्ये वा सद्यो मुष्णाति जीवितम् ।

वायु क्षीण मनुष्याच्या पोटऱ्या शिथिल करून, नाक वांकडें करून किंवा मान वांकडी करून रोग्यास मारतो.

नाभीगुदांतरं गत्वा वंक्षणौ वा समाश्रयन् ॥ १०५ ॥
गृहीत्वा पायुहृदये क्षीणदेहस्य वा बली ।
मलान् बस्तिशिरो नाभिं विबद्ध्य जनयन् रुजम् ॥ १०६॥
कुर्वन् वंक्षणयोः शूलं तृष्णां भिन्नपुरीषताम् ।
श्वासं वा जनयन् वायुर्गृहीत्वा गुदवंक्षणम् ॥ १०७ ॥
वितत्य पर्शुकाग्राणि गृहीत्वोरश्च मारुतः ।
स्तिमितस्याततताक्षस्य सद्यो मुष्णाति जीवितम् ॥ १०८॥

बेंबी व गुद यांच्यामध्यें किंवा जांघाडयांच्या आश्रयानें राहिलेला जोरदार वायु क्षीण मनुष्याचें गुद व हृदय यांस पखडून राहतो; आणि मळ, बस्तीचें शिर व बेंबी यांचा अवरोध करून वेदना उत्पन्न करितो. नंतर जांघाडयांत शूळ, तहान किंवा जुलाब उत्पन्न करून गुद व अडसंधीस धरून दमा उत्पन्न करून, शरीर ओलसर करून, डोळे पसरून, बरगडयांचीं टोंकें ताणून, छाती जखडून मनुष्यास तत्काल मारतो.

सहसा ज्वरसंतापस्तृष्णा मूर्छा बलक्षयः ।
विश्लेषणं च संधीनां मुमूर्षोरुपजायते ॥ १०९ ॥

ताप, सर्वांगाचा दाह, तहान, मूर्च्छा, शक्तिक्षय व सांधे लटपटणें हीं लक्षणें एकाएकीं झालीं असतां रोगी लवकरच मरणार असें समजावें.

गोसर्गे वदनाद्यस्य स्वेदः प्रच्यवते भृशम् ।
लेपज्वरोपतप्तस्य दुर्लभं तस्य जीवितम् ॥ ११० ॥

पहाटेस कफज्वरी मनुष्याच्या तोंडास दरदरून घाम सुटल्यास तो जगणें कठिण.

प्रवालगुलिकाभासा यस्य गात्रे मसूरिकाः ।
उत्पद्याशु विनश्यंति न चिरात्स विनश्यति ॥ १११ ॥

ज्याच्या अंगावर पोंवळयाप्रमाणें लाल देवी उत्पन्न होऊन लागल्याच मावळतात तो लवकरच मरतो.

मसूरविदलप्रख्यास्तथा विद्रुमसन्निभाः ।
अंतर्वक्त्राः किणाभाश्च विस्फोटा देहनाशनाः ॥ ११२ ॥

मसुराच्या डाळीएवढे, पोंवळयाच्या रंगाचे, आंतील तोंडाचे व घट्टयासारखे फोड उठल्यास ते शरीराचा नाश करितात.

कामलाऽक्ष्णोर्मुखं पूर्णं शंखयोर्मुक्तमांसता ।
संत्रासश्चोष्णताऽङ्गे च यस्य तं परिवर्जयेत् ॥ ११३ ॥

ज्याचे डोळे पिंवळे, तोंड फुगलेलें, आखांवरील मांस सुटलेलें, आणि अंग उष्ण व भीति हीं लक्षणें ज्यास असतील त्यास वैद्यानें सोडून द्यावें.

अकस्मादनुधावच्च विघृष्टं त्वक्समाश्रयम् ।

चामडी खरडून झालेला व्रण एकाएकीं पसरूं लागला असतां रोगी मरणार असें समजावें.

यो वातजो न शूलाय स्यान्न दाहाय पित्तजः ॥ ११४ ॥
कफजो न च पूयाय मर्मजश्च रुजे न यः ।
अचूर्णश्चूर्णकीर्णाभो यत्राऽकस्माच्च दृश्यते ॥ ११५ ॥
रूपं शक्तिध्वजादीनां सर्वांस्तान्वर्जयेद् व्रणान् ।

ज्या वातजन्य व्रणांत शूळ होत नाहीं, पित्तजन्य व्रणांत दाह होत नाहीं, कफजन्य व्रणांत पू होत नाहीं, आणि मर्मावरील व्रणांत वेदना होत नाहीं, ज्यावर औषधाची पूड टाकली नसतां ती टाकल्यासारखी दिसते, आणि ज्यावर एकाएकीं शक्ति, ध्वज, शल्य इत्यादिकांचें रूप दिसतें, अशा प्रकारच्या व्रणांची चिकित्सा करूं नये.

विण्मूत्रमारुतवहं कृमिणं च भगंदरम् ॥ ११६ ॥

ज्या भगंदरांत किडे पडले असून ज्यांतून मळ, मूत्र व वायु येतात तो असाध्य जाणावा.

घट्टयन् जानुना जानु पादावुद्यम्य पातयन् ।
योऽपास्यति मुहुर्वक्त्रमातुरो न स जीवति ॥ ११७ ॥

जो गुडघ्यावर गुडघा घांसून दोन्ही पाय वर उचलून खालीं आपटतो व उगीच वरचेवर इकडे तिकडे तोंड फिरवितो, तो वांचत नाहीं.

दंतैश्छिदन्नखाग्राणि तैश्च केशांस्तृणानि च ।
भूमिं काष्ठेन विलिखन् लोष्टं लोष्टेन ताडयन् ॥ ११८ ॥
हृष्टरोमा सांद्रमूत्रः शुष्ककासी ज्वरी च यः ।
मुहुर्हसन् मुहुः क्ष्वेडन् शय्यां पादेन हंति यः ॥ ११९ ॥
मुहुश्छिद्राणि विमृशन्नातुरो न स जीवति ।

जो दांतांनीं नखें कुरतुडतो, नखांनीं केंस व गवताच्या काडचा तोडितो, काठीनें जमिनीवर रेघा ओढितो, ढेंकळावर ढेंकूळ आपटीत राहतो, ज्याच्या अंगावर रोमांच उभे राहतात, ज्यास दाट लव्वी होते, सुका खोकला व ताप येतो, जो वरचेवर हंसतो, ओरडतो, बिछान्यावर पाय आपटतो, आणि वारंवार नाक, कान, यांस हात लावितो, असा रोगी जगत नाहीं.

मृत्यत्रे सहसार्तस्य तिलकव्यंगविप्लवः ॥ १२० ॥
मुखे दंतनखे पुष्पं जठरे विविधाः सिराः ।

रोग्याच्या तोंडावर अकस्मात् पुष्कळसे तीळ व वांग उत्पन्न झाल्यास, दांतांवर व नखांवर पांढरे डाग उत्पन्न झाल्यास किंवा पोटावर अनेक तऱ्हेच्या शिरा उमटल्यास तो रोगी मरतो.

ऊर्ध्वश्वासं गतोष्माणं शूलोपहतवंक्षणम् ॥ १२१ ॥
शर्म वाऽनधिगच्छंतं बुद्धिमान् परिवर्जयेत् ।

ज्यास ऊर्ध्वश्वास लागला असेल, अंग गार पडलें असेल, जांघाडच्यांत फार शूळ होत असेल, किंवा ज्यास कोणत्याही उपायानें बर वाटत नसेल त्यास बुद्धिमान् वैद्यानें सोडून द्यावें.

विकारा यस्य वर्धंते प्रकृतिः परिहीयते ॥ १२२ ॥
सहसा सहसा तस्य मृत्युर्हरति जीवितम् ।

ज्याचे विकार एकदम वाढतात व प्रकृति एकदम पालटते त्याचें जीवितही यम एकाएकींच हरण करितो.

यमुद्दिश्यातुरं वैद्यः संपादयितुमौषधम् ॥ १२३ ॥
यतमानो न शक्नोति दुर्लभं तस्य जीवितम् ।

ज्या रोग्याकरितां वैद्य औषध मिळविण्याचा यत्न करीत असतांही त्यास तें मिळत नाहीं, तो रोगी जगणें कठिण समजावें.

विज्ञातं बहुशः सिद्धं विधिवच्चावतारितम् ॥ १२४ ॥
न सिध्यत्यौषधं यस्य नास्ति तस्य चिकित्सितम् ।

ज्या रोग्यास, पुरतेपणीं माहीत असलेल्या, पुष्कळ वेळां अनुभव घेऊन गुणकारी ठरलेल्या व यथाविधि तयार करून दिलेल्या औषधापासूनही गुण येत नाहीं, त्यास औषधच नाहीं.

भवेद्यस्यौषधेऽन्ने वा कल्प्यमाने विपर्ययः ॥ १२५ ॥
अकस्माद्वर्णगंधादेः स्वस्थोऽपि न स जीवति ।

ज्या मनुष्याकरितां एखादें औषध किंवा अन्न तयार करीत असतां एकाएकीं त्याचा रंग, वास वगैरे बदलतो, तो निरोगी असला तरी मरतो.

निवाते सेंधनं यस्य ज्योतिश्चाप्युपशाम्यति ॥ १२६ ॥
आतुरस्य गृहे यस्य भिद्यंते वा पतंति वा ।
अतिमात्रममत्राणि दुर्लभं तस्य जीवितम् ॥ १२७ ॥

ज्या रोग्याच्या घरीं निवात स्थानीं जळत असलेला जाळ, लांकडें वगैरे असूनही एकदम विझतो, ज्याच्या घरांत भांडीं अतिशय फुटतात, किंवा एकावर एक रचलेलीं भांडीं वरचेवर कोसळतात, तो रोगी जगणें कठिण.

यं नरं सहसा रोगो दुर्बलं परिमुंचति ।
संशयं प्राप्तमात्रेयो जीवितं तस्य मन्यते ॥ १२८ ॥

अशक्त होऊन मरणोन्मुख झालेल्या रोग्याचा रोग एकाएकीं बरा झाल्यास त्याच्या जगण्याविषयीं संशय आहे, असें महर्षि आत्रेयांचें मत आहे.

कथयेन्नैव पृष्टोऽपि दुःश्रवं मरणं भिषक् ।
गतासोर्बंधुमित्राणां न चेच्छेत्तं चिकित्सितुम् ॥ १२९ ॥

ज्याचें आयुष्य सरलें असेल अशा रोग्याच्या इष्टमित्रांनीं विचारलें तरी वैद्यानें त्यांस रोगी मरेल ही दुःखद वार्ता सांगूं नये. तसेंच असल्या रोग्यास औषध देऊं नये.

यमदूतपिशाचाद्यैर्यत्परासुरुपास्यते ।
घ्नद्भिरौषधवीर्याणि तस्मात्तं परिवर्जयेत् ॥ १३० ॥

मरावयास टेंकलेल्या मनुष्याच्या जवळ यमदूत, पिशाच्च वगैरे बसलेले असतात, ते दिलेल्या औषधांची शक्ति नाहींशी करितात. यास्तव अशा रोग्यास औषध देऊंच नये.

आयुर्वेदफलं कृत्स्नं यदायुर्ज्ञे प्रतिष्ठितम् ।
रिष्टज्ञानादृतस्तस्मात्सर्वदैव भवेद्भिषक् ॥ १३१ ॥

आयुर्वेदाचें संपूर्ण फळ आयुष्य जाणणाऱ्या वैद्यासच मिळतें. याकरितां वैद्यानें रिष्टज्ञान मिळविण्याविषयीं झटून यत्न करावा.

मरणं प्राणिनां दृष्टमायुःपुण्योभयक्षयात् ।
तयोरप्यक्षयाद्दृष्टं विषमापरिहारिणाम् ॥ १३२ ॥

साधारणपणें आयुष्य किंवा पुण्य अथवा दोन्ही संपलीं म्हणजे मनुष्य मरतो. परंतु जो विषम प्रसंग टाळीत नाहीं, तो आयुष्य व पुण्य संपण्यापूर्वींही मरतो.[१]

---

## अध्याय ६ वा.

अथाऽतो दूतादिविज्ञानीयं शारीरं व्याख्यास्यामः ।

आतां दूत व शुभाशुभ शकुन यांविषयींचा अध्याय सांगतों.

पाखंडाश्रमवर्णानां सवर्णाः कर्मसिद्धये ।
त एव विपरीताः स्युर्दूताः कर्मविपत्तये ॥ १ ॥

पाखंडी ( वर्णाश्रमरहित, व्रात्य ), ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास हे चार आश्रम आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण यांपैकीं ज्या वर्णाश्रमाचा रोगी असेल, त्याच वर्णाश्रमाचा दूत वैद्यास बोलावण्यास गेला असतां चिकित्सा सफळ होते, आणि याच्या उलट प्रकाराचा दूत गेल्यास ती निष्फळ होते.

दीनं भीतं द्रुतं त्रस्तं रूक्षामंगलवादिनम् ।
शस्त्रिणं दंडिनं षंडं मुंडश्मश्रुं जटाधरम् ॥ २ ॥
अमंगलाह्वयं क्रूरकर्माणं मलिनं स्त्रियम् ।
अनेकव्याधितं व्यंगं रक्तमाल्यानुलेपनम् ॥ ३ ॥
तैलपंकांकितं-जीर्णविवर्णार्द्रैकवाससम् ।
खरोष्ट्रमहिषारूढं काष्ठलोष्टादिमर्दिनम् ॥ ४ ॥
नानुगच्छेद्भिषग्दूतमाह्वयंतं च दूरतः ।

घाबरलेला, भ्यालेला, धांवत येऊन फार घाई करणारा, त्रासलेला, कठोर व अशुभ बोलणारा, हातांत शस्त्र किंवा काठी घेऊन आलेला, नपुंसक, दाढी-मिशी काढलेला, जटाधारी, अमंगळ नांवाचा,

---

१ यास उत्तम व्यावहारिक उदाहरण म्हटलें म्हणजे कोरें धोतर कांद्यावर घालून ओढणें, हें होय. जर धोतर कांद्यावर घातलें नसतें व नीट वापरलें असतें, तर तें पुष्कळ दिवस टिकलें असतें. त्याचप्रमाणें विषम प्रसंग टाळले तर मनुष्याला त्याच्या स्वाभाविक आयुर्मर्यादेपर्यंत ( १२० वर्षें व पांच दिवस ) जगतां येईल. [ समाः षष्टिर्द्विघ्ना मनुजकरिणां पंच च निशाः ॥ वराहमिहिरः । ]

व्यंग असलेला, क्रूर कर्मे करणारा, घाणेरडा, स्त्रीजातीचा, अनेक रोगांनीं पीडिलेला, व्यंग असलेला (आंधळा, बहिरा, लंगडा वगैरे), तांबडीं फुलें घालून तांबडें गंध लावून आलेला, तेल व चिखल यांनीं माखलेला; फाटकें, विटलेलें किंवा ओलें असें एकच वस्त्र नेसून आलेला; गाढवावर, उंटावर किंवा रेड्यावर बसून आलेला; लांकूड, ढेंकूळ वगैरे पदार्थ एकमेकांवर घांशीत आलेला, आणि दुरूनच हांका मारीत येणारा दूत बोलावण्यास आला असतां वैद्यानें त्याच्याबरोबर जाऊं नये.

अशस्तचिंतावचने नग्ने छिंदति भिंदति ॥ ५ ॥
जुह्वाने पावकं पिंडान् पितृभ्यो निर्वपत्यपि ।
सुप्ते मुक्तकचेऽभ्यक्ते रुदत्यप्रयते तथा ॥ ६ ॥
वैद्ये दूता मनुष्याणामागच्छंति मुमूर्षताम् ।

वैद्य एखाद्या वाईट गोष्टीचा विचार किंवा वाईट भाषण करीत असतां, नागवा असतां, कांहीं कापीत किंवा फोडीत असतां, अग्नींत हवन करीत असतां, पितरांस पिंड देत असतां, निजला असतां, त्याची शेंडी मोकळी असतां, त्यानें अंगास तेल लाविलें असतां, तो रडत असतां अथवा त्यास कसला तरी विटाळ असतां त्यास बोलावण्यास रोग्याकडून माणूस आल्यास तो रोगी मरणार असें समजावें.

विकारसामान्यगुणे देशे कालेऽथवा भिषक् ॥ ७ ॥
दूतमभ्यागतं दृष्ट्वा नातुरं तमुपाचरेत् ।

रोगाच्या समान गुणी देशांत अथवा तशा वेळीं रोग्याकडून माणूस बोलावण्यास आल्यास वैद्यानें रोग्याची चिकित्सा करूं नये.

स्पृशंतो नाभिनासास्यकेशरोमनखद्विजान् ॥ ८ ॥
गुह्यपृष्ठस्तनग्रीवाजठरानामिकांगुलीः ।
कार्पासबुससीसास्थिकपालमुशलोपलम् ॥ ९ ॥
मार्जनीशूर्पचैलांतभस्मांगारदशातुषान् ।
रज्जूपानत्तुलापाशमन्यद्वा भग्नविच्युतम् ॥ १० ॥
तत्पूर्वदर्शने दूता व्याहरंति मरिष्यताम् ।

वैद्यास बोलावण्यास आलेला मनुष्य जर प्रथमदर्शनीं बेंबी, नाक, तोंड, केंस, रोम, नखें, दांत, गुह्येन्द्रिय, पाठ, स्तन, मान,

पोट, करंगळीजवळचें बोट, कापूस, भूस, शिसें, हाड, खापर, मुसळ, दगड, केरसुणी, सूप, कपडयाचा पदर, राख, निखारे, कपडयाच्या दशा, तूस, दोरी, जोडा, तराजू, सांपळा, किंवा मोडलेली अथवा आपल्या जागेवरून निखळलेली कोणतीही वस्तु यांस स्पर्श करून वैद्याशीं भाषण करील, तर रोगी मरणार असें समजावें.

तथाऽर्धरात्रे मध्याह्ने संध्ययोः पर्ववासरे ॥ ११ ॥
षष्ठीचतुर्थीनवमीराहुकेतूदयादिषु ।
भरणीकृत्तिकाऽश्लेषापूर्वाऽर्द्रापैत्र्यनैर्ऋते ॥ १२ ॥

तसेंच अर्ध्या रात्रीस, दुपारीं, दोन्ही वेळच्या संधिकाळीं, अमावास्या, पूर्णिमा वगैरे पर्वणीच्या दिवशीं; षष्ठी, चतुर्थी व नवमी या तिथींस, सूर्य-चंद्रांच्या ग्रहणाच्या वेळीं; किंवा भरणी, कृत्तिका, आश्लेषा, पूर्वा, आर्द्रा, मघा व मूळ या नक्षत्रांत रोग्याकडून बोलावण्यास माणूस आल्यास रोगी मरणार असें जाणावें.

यस्मिंश्च दूते ब्रुवति वाक्यमातुरसंश्रयम् ।
पश्येन्निमित्तमशुभं तं च नानुव्रजेद्भिषक् ॥ १३ ॥

बोलावण्यास आलेला मनुष्य रोग्यासंबंधीं हकीकत सांगत असतां वैद्यास अपशकुन झाल्यास वैद्यानें त्या रोग्याकडे जाऊं नये.

तद्यथा विकलः प्रेतः प्रेतालंकार एव वा ।
छिन्नं दग्धं विनष्टं वा तद्वादीनि वचांसि वा ॥ १४ ॥
रसो वा कटुकस्तीव्रो गंधो वा कौणपो महान् ।
स्पर्शो वा विपुलः क्रूरो यद्वान्यदपि तादृशम् ॥ १५ ॥
तत्सर्वमभितो वाक्यं वाक्यकालेऽथवा पुनः ।
दूतमभ्यागतं दृष्ट्वा नातुरं तमुपाचरेत् ॥ १६ ॥

ते अपशकुन येणेंप्रमाणें:—लंगडा, लुला वगैरे अंगहीन माणूस; प्रेत किंवा प्रेताचें सामान दिसणें; एखादा पदार्थ तुटणें, जळणें, मोडणें, किंवा अमुक जिन्नस तुटली, मोडली किंवा जळली अशा प्रकारचें भाषण ऐकणें; तिखट पदार्थ नजरेस पडणें, उग्र वास किंवा प्रेतासारखी घाण येणें, विस्तीर्ण किंवा दुःसह पदार्थाचा शरीरास स्पर्श होणें, किंवा अशाच तऱ्हेच्या इतर अशुभ गोष्टी

दूत वैद्यास रोग्याची हकीकत सांगण्यापूर्वीं, सांगत असतां, सांगितल्यानंतर किंवा वैद्यास दूत येत असलेला दृष्टीस पडतांच घडल्यास वैद्यानें त्या रोग्यास औषध देऊं नये.

हाहाक्रंदितमुत्क्रुष्टं रुदितं स्खलनं क्षुतम् ।
वस्त्रातपत्रपादत्रव्यसनं व्यसनीक्षणम् ॥ १७ ॥
चैत्यध्वजानां पात्राणां पूर्णानां च निमज्जनम् ।
हतानिष्टप्रवादाश्च दूषणं भस्मपांसुभिः ॥ १८ ॥

हाहाकार, मोठ्यानें ओरडणें, रडणें, पाय पसरून पडणें, शिंकणें; वस्त्र, छत्री, जोडा हीं फाटणें, मोडणें, जळणें किंवा अन्य तऱ्हेनें त्यांचें नुकसान होणें, दुःखी मनुष्य दिसणें; पिंपळ, ध्वज वगैरे पडणें, भरलेलीं भांडीं सांडणें, वाईट--अभद्र शब्द ऐकूं येणें आणि अंगावर राख अथवा धूळ उडणें या गोष्टी वैद्यास रोग्याच्या घरीं जात असतांना घडल्यास अपशकून समजावा.

पथश्छेदोऽहिमार्जारगोधासरठवानरैः ।
दीप्तां प्रति दिशं वाचः क्रूराणां मृगपक्षिणाम् ॥ १९ ॥
कृष्णधान्यगुडोदश्विल्लवणासवचर्मणाम् ।
सर्षपाणां वसातैलतृणपंकेंधनस्य च ॥ २० ॥
क्लीबक्रूरश्वपाकानां जालवागुरयोपि ।
छर्दितस्य पुरीषस्य पूतिदुर्दर्शनस्य च ॥ २१ ॥
निःसारस्य व्यवायस्य कार्पासादेररेरपि ।
शयनासनयानानामुत्तानानां तु दर्शनम् ॥ २२ ॥
न्युब्जानामितरेषां च पात्रादीनामशोभनम् ।

रस्त्यांत साप, मांजर, घोरपड, सरडा व वानर यांचें आडवें जाणेंही अशुभच समजावें. ज्या बाजूस सूर्य आहे, तिकडून क्रूर पशुपक्ष्यांचे शब्द ऐकूं येणें; काळें धान्य, गूळ, ताक, मीठ, मद्य, चामडें, मोहऱ्या, वसा, तेल, गवत, चिखल, सरपण, नपुंसक, क्रूर माणूस, चांडाळ, जाळें, पारध्याचे फांस, वांति, विष्ठा, दुर्गंधि व अकाळ विकाळ पदार्थ, कोंडा, सालपटें, मैथुन, कापूस वगैरे पूर्वीं सांगितलेले पदार्थ, शत्रु, सूर वर केलेली बाज, पलंग, चौरंग, पाट, वर पाय केलेले घोडे वगैरे; आणि उपडीं घातलेलीं भांडीं वगैरे वैद्यास रोग्याकडे जातांना दिसणेंही अशुभ जाणावें.

पुंसंज्ञाः पक्षिणो वामाः स्त्रीसंज्ञा दक्षिणाः शुभाः ॥ २३ ॥

पुल्लिंगवाचक पक्षी वैद्याच्या डाव्या बाजूस आणि स्त्रीलिंगी पक्षी उजव्या बाजूस असलेले शुभ जाणावे.

प्रदक्षिणं खगमृगा यांतो नैवं श्वजंबुकाः।
अयुग्माश्च मृगाः शस्ताः शस्ता नित्यं च दर्शने ॥ २४ ॥
चाषभासभरद्वाजनकुलच्छागबर्हिणः।
अशुभं सर्वथोलूकबिडालसरठेक्षणम् ॥ २५ ॥
प्रशस्ताः कीर्तने कोलगोधाहिशशजाहकाः।
न दर्शने न विरुते वानरर्क्षावतोऽन्यथा ॥ २६ ॥
धनुरैंद्रं च लालाटमशुभं शुभमन्यतः।
अग्निपूर्णानि पात्राणि भिन्नानि विशिखानि च ॥ २७ ॥

पशुपक्षी डावीकडून उजवीकडे गेलेले चांगले; परंतु कुत्रे व कोल्हे उजवीकडून डावीकडे गेलेले चांगले. पशु विषम संख्येंत असलेले शुभ जाणावे. चाष, भास, कोकडकुंभा, मुंगुस, बकरा व मोर हे दिसलेले नेहमीं शुभकारक जाणावे. घुबड, मांजर व सरडा हे सर्वथा अशुभ जाणावे. डुक्कर, घोरपड, साप, ससा व काळा सरडा यांच्यासंबंधीं नुस्तें बोलणें शुभ आहे; परंतु त्यांस पहाणें किंवा त्यांचे शब्द ऐकणें हें अशुभ आहे. वानर व अस्वल यांचें याच्या उलट आहे. इंद्रधनुष्य सन्मुख दिसलें तर अशुभ आणि इतर कोणत्याही बाजूस दिसलें तर चांगलें. अग्नीनें भरलेलीं, फुटकीं व रिकामीं भांडीं दिसणें अशुभ आहे.

दध्यक्षतादि निर्गच्छन् वक्ष्यमाणं च मंगलम्।
वैद्यो मरिष्यतां वेश्म प्रविशन्नेव पश्यति ॥ २८ ॥

वैद्य रोग्याच्या घरांत शिरत असतां त्याच वेळीं घरांतून पुढें सांगितलेल्या दहीं, अक्षता वगैरे मंगल वस्तु बाहेर जात असलेल्या त्यास दिसल्यास रोगी मरतो.

दूताद्यसाधु दृष्ट्वैवं त्यजेदार्तमतोऽन्यथा।
करुणाशुद्धसंतानो यत्नतःसमुपाचरेत् ॥ २९ ॥

दूत वगैरेंचे अशुभ शकुन झाले असतां वैद्यानें रोग्यास औषध देऊं नये. आणि चांगले शकुन झाल्यास दयाळू अंतःकरणानें यत्नपूर्वक त्याची चिकित्सा करावी.

दध्यक्षतेक्षुनिष्पावप्रियंगुमधुसर्पिषाम् ।
यावकांजनभृंगारघंटादीपसरोरुहाम् ॥ ३० ॥
दूर्वार्द्रमत्स्यमांसानां लाजानां फलभक्ष्ययोः ।
रत्नेभपूर्णकुंभानां कन्यायाः स्यंदनस्य च ॥ ३१ ॥
नरस्य वर्धमानस्य देवतानां नृपस्य च ।
शुक्लानां सुमनोवालचामरांबरवाजिनाम् ॥ ३२ ॥
शंखसाधुद्विजोष्णीषतोरणस्वस्तिकस्य च ।
भूमेः समुद्धृतायाश्च वह्नेः प्रज्वलितस्य च ॥ ३३ ॥
मनोज्ञस्यान्नपानस्य पूर्णस्य शकटस्य च ।
नृभिर्धेन्वाः सवत्सायाः वडवायाः स्त्रिया अपि ॥ ३४ ॥
जीवंजीवकसारंगसारसप्रियवादिनाम् ।
रुचकादर्शसिद्धार्थरोचनानां च दर्शनम् ॥ ३५ ॥
गंधः सुसुरभिर्वर्णः सुशुक्लो मधुरो रसः ।
गोपतेरनुकूलस्य स्वरस्तद्वद्गवामपि ॥ ३६ ॥
मृगपक्षिनराणां च शोभिनां शोभना गिरः ।
छत्रध्वजपताकानामुत्क्षेपणमभिष्टुतिः ॥ ३७ ॥
भेरीमृदंगशंखानां शब्दाः पुण्याहनिःस्वनाः ।
वेदाध्ययनशब्दाश्च सुखो वायुः प्रदक्षिणः ॥ ३८ ॥
पथि वेश्मप्रवेशे च विद्यादारोग्यलक्षणम् ।

रोग्याच्या घरीं जातांना वाटेंत व रोग्याच्या घरांत शिरत असतां वैद्यास पुढील शकुन झाल्यास रोगी बरा होणार आहे असें समजावें. दहीं, अक्षता, ऊंस, पावटे, गहुला, मध, तूप, अळिता, अंजन, सोन्याची झारी, घंटा, दिवा, कमळें, दूर्वा, ताजे मासे, लाह्या, फळें, खाण्याचे पदार्थ, रत्नें, हत्ती, भरलेल्या घागरी, कुमारिका, रथ, प्रतिष्ठा पावत असलेला मनुष्य, देवांच्या मूर्ति, राजा, पांढरीं फुलें, पांढऱ्या चवऱ्या, पांढरीं वस्त्रें, पांढरे घोडे, शंख,साधु,ब्राह्मण, पागोटें, तोरण, स्वस्तिक, खणलेली जमीन, पेटलेला अग्नि, मनोहर खाण्यापिण्याचे पदार्थ, माणसें बसलेली गाडी, वासरासहित गाय, शिंगरासहित घोडी, मुलासहित स्त्री; जीवंजीवक, सारंग, सारस, कोकिला वगैरे मधुर शब्द करणारे पक्षी; सोन्याचें कडें किंवा आंगठी, आरसा, शिरस व गोरोचन हे पदार्थ दिसणें, उत्तम सुगंध येणें, पांढऱ्या शुभ्र रंगाचे पदार्थ दिसणें,

गोड पदार्थ दिसणें, शांत बैलाच्या डुरकण्या व गाईचें हंबरणें ऐकूं येणें, शुभ म्हणून सांगितलेल्या पशुपक्ष्यांचे व मनुष्यांचे मंगल शब्द ऐकणें; छत्र, ध्वज व पताका उभारलेल्या पाहणें; जयजयकार; भेरी, मृदंग, शंख यांचे शब्द, पुण्याहवाचन व वेदघोष ऐकणें आणि दक्षिणेकडून सुखकर वायु येणें, हे सर्व रोगी बरा होण्याचे शकुन होत.

**इत्युक्तं दूतशकुनं स्वप्नानूर्ध्वं प्रचक्षते ॥ ३९ ॥**

येथपर्यंत दूतसंबंधीं शकुन सांगितले. आतां पुढें स्वप्नें सांगतों.

**स्वप्ने मद्यं सह प्रेतैर्यः पिबन् कृष्यते शुना ।**
**स मर्त्यो मृत्युना शीघ्रं ज्वररूपेण नीयते ॥ ४० ॥**

जो मनुष्य स्वप्नांत प्रेताबरोबर दारू पितो व स्वप्नांत ज्यास कुत्रा ओढतो, तो लवकरच ताप येऊन मरतो.

**रक्तमाल्यवपुर्वस्त्रो यो हसन् ह्रियते स्त्रिया ।**
**सोऽस्रपित्तेन**

जो स्वप्नांत लाल फुलांच्या माळा गळ्यांत घालतो, लाल रंगाची उटी अंगास लावितो, तांबडें वस्त्र नेसतो किंवा पांघरतो, आणि अशा वेषांत हंसत हंसत स्त्रियांकडून ओढला जातो, तो रक्तपित्तानें मरणार असें समजावें.

**महिषश्ववराहोष्ट्रगर्दभैः ॥ ४१ ॥**
**यः प्रयाति दिशं याम्यां मरणं तस्य यक्ष्मणा ।**

जो मनुष्य स्वप्नांत रेडा, घोडा, डुक्कर, उंट किंवा गाढव यांवर बसून दक्षिण दिशेकडे जातो, तो क्षयानें मरेल असें समजावें.

**लता कंटकिनी वंशस्तालो वा हृदि जायते ॥ ४२ ॥**
**यस्य तस्याशु गुल्मेन**

ज्याच्या हृदयावर स्वप्नांत कांटेरी वेल, बांबू किंवा ताड हे उत्पन्न होतात, तो लवकरच गुल्म होऊन मरतो.

**यस्य वह्निमनर्चिषम् ।**
**जुह्वतो घृतसिक्तस्य नग्नस्योरसि जायते ॥ ४३ ॥**
**पद्मं स नश्येत्कुष्ठेन**

स्वप्नांत नागवा होऊन अंगास तूप माखून ज्वालारहित अग्नींत

आहुति टाकीत असतां ज्याच्या हृदयावर कमळ उत्पन्न होतें, तो कुष्ठानें मरतो.

चंडालैः सह यः पिबेत् ।
स्नेहं बहुविधं स्वप्ने स प्रमेहेण नश्यति ॥ ४४ ॥

जो मनुष्य स्वप्नांत चांडाळासहित अनेक प्रकारचे स्नेह पितो, तो प्रमेहानें मरतो.

उन्मादेन जले मज्जेद्यो नृत्यन् राक्षसैः सह ।

जो स्वप्नांत राक्षसांबरोबर नाचत नाचत पाण्यांत बुडतो, तो उन्मादानें मरतो.

अपस्मारेण यो मर्त्यो नृत्यन् प्रेतेन नीयते ॥ ४५ ॥

ज्यास स्वप्नांत प्रेतें नाचवीत नाचवीत नेतात, तो अपस्मारानें मरतो.

यानं खरोष्ट्रमार्जारकपिशार्दूलसूकरैः ।
यस्य प्रेतैः शृगालैर्वा स मृत्योर्वर्तते मुखे ॥ ४६ ॥

जो स्वप्नांत गाढव, उंट, मांजर, वानर, वाघ, डुक्कर, प्रेत किंवा कोल्हा यांच्या बरोबर जातो, तो मृत्यूचा तोंडांत सांपडला आहे असें समजावें.

अपूपशष्कुलीर्जग्ध्वा विबुद्धस्तद्विधं वमन् ।
न जीवति

जो स्वप्नांत घारगे, अनरसे व करंजा वगैरे खाऊन जागा झाल्यावर तशाच प्रकारचे पदार्थ ओकतो, तो जगत नाहीं.

अक्षिरोगाय सूर्येंदुग्रहणेक्षणम् ॥ ४७ ॥

स्वप्नांत सूर्यग्रहण किंवा चंद्रग्रहण पाहिल्यास नेत्ररोग होतो.

सूर्याचंद्रमसोः पातदर्शनं दृग्विनाशनम् ।

स्वप्नांत सूर्य-चंद्र पडलेले पाहिले असतां दृष्टिनाश होतो.

मूर्ध्नि वंशलतादीनां संभवो वयसां तथा ॥ ४८ ॥
निलयो मुंडता काकगृध्राद्यैः परिवारणम् ।
तथा प्रेतपिशाचस्त्रीद्रविडांध्रगवाशनैः ॥ ४९ ॥
संगो वेत्रलतावंशतृणकंटकसंकटे ।
श्वभ्रश्मशानशयनं पतनं पांसुभस्मनोः ॥ ५० ॥

मज्जनं जलपंकादौ शीघ्रेण स्रोतसा हृतिः ।
नृत्यवादित्रगीतानि रक्तस्रग्वस्त्रधारणम् ॥ ५१ ॥
वयोऽङ्गवृद्धिरभ्यंगो विवाहः श्मश्रुकर्म च ।
पक्वान्नस्नेहमद्याशः प्रच्छर्दनविरेचने ॥ ५२ ॥
हिरण्यलोहयोर्लाभः कलिर्बंधपराजयौ ।
उपानद्युगनाशश्च प्रपातः पादचर्मणोः ॥ ५३ ॥
हर्षो भृशं प्रकुपितैः पितृभिश्चावभर्त्सनम् ।
प्रदीपग्रहनक्षत्रदंतदैवतचक्षुषाम् ॥ ५४ ॥
पतनं वा विनाशो वा भेदनं पर्वतस्य च ।
कानने रक्तकुसुमे पापकर्मनिवेशने ॥ ५५ ॥
चितांधकारसंबाधे जनन्यां च प्रवेशनम् ।
प्रातः प्रासादशैलादेर्मत्स्येन ग्रसनं तथा ॥ ५६ ॥
काषायिणामसौम्यानां नग्नानां दंडधारिणाम् ।
रक्ताक्षाणां च कृष्णानां दर्शनं जातु नेष्यते ॥ ५७ ॥

डोक्यावर बांबू, वेली वगैरे उगवणें; पांखरें बसणें, शेंडीसकट हजामत करणें; कावळे वगैरे पक्षी, प्रेतें, पिशाच्चें, बायका, द्रविड, तैलंग व गोमांसभक्षक (म्लेंच्छ) सभोंवतीं जमणें; वेत, वेली, वेळू, गवत, कांटे यांच्या जाळींत अडकणें, खळग्यांत किंवा स्मशानांत निजणें; धुळींत किंवा राखेंत पडणें; पाणी, चिखल यांत बुडणें; वेगानें वाहणाऱ्या जलप्रवाहांतून वाहून जाणें; नाच, वाद्य, गाणें, तांबड्या फुलांच्या माळा घालणें, तांबडीं वस्त्रें धारण करणें, वय व शरीर असेल त्यापेक्षां जास्त वाढलेलें दिसणें; अंगास तेल लावणें; लग्न; हजामत करणें, पक्कान्नें, स्नेह व मद्य यांचें सेवन करणें; उलटी; जुलाब, सोनें व लोखंड सांपडणें, भांडण, अटकेंत पडणें, पराभव, दोन्ही जोडे नाहींसे होणें, पाय व चामडी गळून पडणें, अतिशय हर्ष होणें, आईबापांनीं रागावून निर्भर्त्सना करणें, दिवा, ग्रह, तारा, दांत, देवाची मूर्ति व डोळे हे गळून पडणें किंवा नाहींसे होणें, पर्वत फुटणें, लाल फुलांच्या रानांत, पापी मनुष्यांच्या घरांत, चितेंत, काळोख्या जागेंत, किंवा आईच्या पोटांत शिरणें; वाडा, पर्वत यांवरून पडणें; माशानें गिळणें,

भगवीं वस्त्रें धारण केलेले, उग्र, नागवे, दंडधारी, लाल डोळे झालेले व काळे मनुष्य पाहणें, हीं स्वप्नें केव्हांही चांगलीं नव्हत.

कृष्णा पापाननाचारा दीर्घकेशनखस्तनी ।
विरागमाल्यवसना स्वप्ने कालनिशा मता ॥ ५८ ॥

काळी, वाईट तोंडाची व वाईट आचरणाची; जिचे केंस, नखें व स्तन लांब आहेत अशी, आणि सुकलेलीं फुलें व विटलेलीं वस्त्रें धारण केलेली अशी स्त्री स्वप्नांत दिसल्यास ती काळरात्रच समजावी.

मनोवहानां पूर्णत्वात्स्रोतसां प्रबलैर्मलैः ।
दृश्यंते दारुणाः स्वप्ना रोगी यैर्याति पंचताम् ॥ ५९ ॥
अरोगः संशयं प्राप्य कश्चिदेव विमुच्यते ।

प्रबळ दोषांनीं मनोवह स्रोतें भरून गेल्यामुळें नानाप्रकारचीं भयंकर स्वप्नें पडतात. तीं पडलीं असतां रोगी तर मरतोच, परंतु निरोगी माणूसही संशयानें आजारी पडतो; आणि त्यांतून एखादाच जगतो.

दृष्टः श्रुतोऽनुभूतश्च प्रार्थितः कल्पितस्तथा ॥ ६० ॥
भाविको दोषजश्चेति स्वप्नः सप्तविधो मतः ।

१ दृष्ट (पाहिलेल्या) गोष्टी स्वप्नांत दिसणें, २ श्रुत (ऐकलेल्या) दिसणें, ३ अनुभूत ( मनानें अनुभवलेल्या ) दिसणें; ४ प्रार्थित (इच्छिलेल्या) दिसणें, ५ कल्पित ( आपण ज्या गोष्टींविषयीं कल्पना करीत असतों त्या ) दिसणें; ६ भावि ( पुढील ) गोष्टी सुचविणारीं स्वप्नें, आणि ७ दोषज ( वातपित्तकफामुळें पडणारीं ); याप्रमाणें एकंदर सात प्रकारचीं स्वप्नें आहेत.

तेष्वाद्या निष्फलाः पंच यथास्वप्रकृतिर्दिवा ॥ ६१ ॥
विस्मृतो दीर्घह्रस्वोऽति

त्यापैकीं पहिलीं पांच प्रकारचीं स्वप्नें, ज्याची जशी प्रकृति तदनुसार पडलेलीं, ( शारीरस्थान, अध्याय तिसरा पहा ) दिवसा पडलेलीं, विसरलेलीं, फार लांब व फार लहान अशीं स्वप्नें निष्फळ समजावीं.

पूर्वरात्रे चिरात्फलम् ॥ ६२ ॥
दृष्टः करोति तुच्छं च

पूर्व रात्रीस पडलेल्या स्वप्नाचें फळ पुष्कळ दिवसांनीं व थोडें मिळतें.

गोसर्गे तदहर्महत् ॥ ६३ ॥
निद्रया चानुपहतः प्रतीपैर्वचनैस्तथा ।

पहाटेस स्वप्न पडून त्यावर झोंप घेतली नाहीं व कोणी उलट बोलला नाहीं, तर त्याच दिवशीं त्याचें मोठें फळ प्राप्त होतें.

याति पापोऽल्पफलतां दानहोमजपादिभिः ॥ ६४ ॥

वाईट स्वप्न पडलें असतां दान, होम, जप वगैरे धार्मिक उपाय केल्यानें त्याचें फळ कमी होतें.

अकल्याणमपि स्वप्नं दृष्ट्वा तत्रैव यः पुनः ।
पश्येत्सौम्यं शुभं तस्य शुभमेव फलं भवेत् ॥ ६५ ॥

अगोदर वाईट स्वप्न पडून त्याच्यावर त्याच रात्रीं जर दुसरें चांगलें स्वप्न पडलें, तर पहिल्या वाईट स्वप्नाचें फळ नाहींसें होऊन दुसऱ्याचें शुभ फळच प्राप्त होईल.

देवान् द्विजान् गोवृषभान् जीवतः सुहृदो नृपान् ।
साधून् यशस्विनो वह्निमिद्धं स्वच्छान् जलाशयान् ६६
कन्यां कुमारकान् गौरान् शुक्लवस्त्रान्सुतेजसः ।
नराशनं दीप्ततनुं समंताद्रुधिरोक्षितः ॥ ६७ ॥
यः पश्येल्लभते यो वा छत्रादर्शविषामिषम् ।
शुक्लाः सुमनसो वस्त्रममेध्यालेपनं फलम् ॥ ६८ ॥
शैलप्रासादसफलवृक्षसिंहनरद्विपान् ।
आरोहेद्गोऽश्वयानं च तरेन्नदहृदोदधीन् ॥ ६९ ॥
पूर्वोत्तरेण गमनमगम्यागमनं मृतिम् ।
संबाधान्निःसृतिर्देवैः पितृभिश्चाभिनंदनम् ॥ ७० ॥
रोदनं पतितोत्थानं द्विषतां चावमर्दनम् ।
यस्य स्यादायुरारोग्यं वित्तं बहु च सोऽश्नुते ॥ ७१ ॥

देव, ब्राह्मण, गाय, बैल, जिवंत मित्र, राजे, साधु, यशस्वी पुरुष, पेटलेला अग्नि, स्वच्छ जलाशय; गोऱ्या, शुभ्रवस्त्रें धारण केलेल्या व तेजस्वी मुली व मुलगे; तेजःपुंज, स्वतःच्या अंगावर व सभोंवतीं रक्त सांडलें असतांना नरमांस खाणारे राक्षस स्वप्नांत दिसणें;

छत्री, आरसा, बचनाग व मांस हे पदार्थ मिळणें; तसेंच पांढरीं फुलें, पांढरीं वस्त्रें, अपवित्र लेप व फळें हीं मिळणें; पर्वत, वाडा, फळें लागलेले वृक्ष, सिंह, घोडा, हत्ती यांवर चढणें किंवा बसणें; बैलाच्या किंवा घोड्याच्या गाडींत बसणें; नद, तळें, समुद्र यांतून तरून जाणें; पूर्वोत्तर दिशेकडे जाणें; निषिद्ध स्त्रीशीं समागम करणें; मरणें; संकटांतून पार पडणें; देवता व पितर यांकडून शाबासकी मिळणें; रडणें; पडून उठणें; आणि शत्रूचें मर्दन करणें हीं स्वप्नें ज्यांस पडतात, त्यांस आयुष्य, आरोग्य व सम्पत्ति हीं विपुल मिळतात.

मंगलाचारसंपन्नः परिवारस्तथातुरः ।
श्रद्दधानोऽनुकूलश्च प्रभूतद्रव्यसंग्रहः ॥ ७२ ॥
सत्त्वलक्षणसंयोगो भक्तिर्वैद्यद्विजातिषु ।
चिकित्सायामनिर्वेदस्तदारोग्यस्य लक्षणम् ॥ ७३ ॥

रोग्याच्या परिवाराचें आचरण चांगलें असणें, रोग्याचा वैद्यावर व औषधावर विश्वास असणें, वैद्याच्या सांगण्याप्रमाणें रोग्यानें वागणें, रोग्याजवळ विपुल द्रव्यसंचय असणें, पूर्वीं सांगितलेलीं सात्विक लक्षणें रोग्यांत असणें, वैद्य व ब्राह्मण यांच्याठायीं भक्ति असणें, आणि औषध घेण्याच्या बाबतींत कंटाळा नसणें या गोष्टी असल्या म्हणजे रोगी बरा होणार असें समजावें.

इत्यत्र जन्ममरणं यतः सम्यगुदाहृतम् ।
शरीरस्य ततः स्थानं शारीरमिदमुच्यते ॥ ७४ ॥

याप्रमाणें या स्थानांत शरीराचा जन्म व मरण यांचें विस्तृत विवेचन केलें आहे, म्हणून यास शारीरस्थान असें म्हटलें आहे.

इति श्रीवैद्यपतिसिंहगुप्तसूनोर्वाग्भटस्य कृतावष्टांगहृदयसंहितायां शारीरस्थानं समाप्तम् ॥

याप्रमाणें वैद्यपति श्रीसिंहगुप्ताचा पुत्र श्रीवाग्भट यानें रचिलेल्या अष्टांगहृदय संहितेंतील शारीरस्थान संपलें.

## शारीरस्थान समाप्त.

---

# निदानस्थान.

## अध्याय पहिला.

अथाऽतः सर्वरोगनिदानं व्याख्यास्यामः ।
इति ह स्माहुरात्रेयादयो महर्षयः ।

आतां सर्व रोगांचें ( सामान्य ) निदान सांगतों. आत्रेयादि महर्षींनींही असेंच सांगितलें आहे.

रोगः पाप्मा ज्वरो व्याधिर्विकारो दुःखमामयः ॥ १ ॥
यक्ष्मातंकगदाबाधशब्दाः पर्यायवाचिनः ।

रोग, पाप्मा, ज्वर, व्याधि, विकार, दुःख, आमय, यक्ष्मा, आतंक, गद व आबाध हे सर्व शब्द परस्परपर्याय आहेत.

निदानं पूर्वरूपाणि रूपाण्युपशयस्तथा ॥ २ ॥
संप्राप्तिश्चेति विज्ञानं रोगाणां पंचधा स्मृतम् ।

निदान, पूर्वरूप, रूप, उपशय व सम्प्राप्ति हीं रोग जाणण्याचीं पांच साधनें आहेत.

निमित्तहेत्वायतनप्रत्ययोत्थानकारणैः ॥ ३ ॥
निदानमाहुः पर्यायैः

निमित्त, हेतु, आयतन, प्रत्यय, उत्थान व कारण हे निदानशब्दाचे पर्याय आहेत.

प्राग्रूपं येन लक्ष्यते ।
उत्पित्सुरामयो दोषविशेषेणानधिष्ठितः ॥ ४ ॥
लिंगमव्यक्तमल्पत्वाद्व्याधीनां तद्यथायथम् ।

ज्यांत वातादि दोष स्पष्टपणें प्रकट झाले नाहींत, असा पुढें उत्पन्न होणारा रोग ज्या लक्षणांनीं अगोदर समजतो, त्यास प्राग्रूप

---

१ निदान म्हणजे रोगाचें आदिकारण. गार पाणी, वारा, ऊन, अपथ्य पदार्थ, यांच्या सेवनानें एकादा रोग उत्पन्न झाला, तरच त्यांस त्या त्या रोगाचें निदान समजावयाचें; पण त्यांनीं रोग उत्पन्न झाला नाहीं, तर त्यास निदान म्हणावयाचें नाहीं, असें मधुकोशकारांचें मत आहे.

किंवा पूर्वरूप म्हणतात. हें पूर्वरूप त्या त्या रोगाचें अल्पावस्थेंतील अस्पष्ट लक्षणच असतें.

तदेव व्यक्ततां यातं रूपमित्यभिधीयते ॥ ५ ॥
संस्थानं व्यंजनं लिंगं लक्षणं चिह्नमाकृतिः ।

तेंच स्पष्ट झालें म्हणजे त्यास रूप हें नांव दिलें जातें. त्या रूपाचे संस्थान, व्यंजन, लिंग, लक्षण, चिन्ह व आकृति, हे सहा पर्यायशब्द आहेत.

हेतुव्याधिविपर्यस्तविपर्यस्तार्थकारिणाम् ॥ ६ ॥
औषधान्नविहाराणामुपयोगं सुखावहम् ।
विद्यादुपशयं व्याधेः स हि सात्म्यमिति स्मृतः ॥ ७ ॥

रोगाचें कारण व रोग यांच्या उलट व उलट परिणामाची क्रिया करणारीं औषधें, खाणें, पिणें व व्यायाम वगैरे इतर व्यवहार यांचा जो शरीरास सुखकर उपयोग तो उपशय जाणावा. यासच व्याधिसात्म्य असें म्हणतात.

---

१ त्या त्या रोगांचीं अस्पष्ट लक्षणें म्हणजे पूर्वरूप होय, असें सांगण्याचें कारण असें आहे कीं, ज्या रोगाच्या वर्णनांत पूर्वरूपें सांगितलीं नाहींत, तेथें रूपावरूनच पूर्वरूपें ओळखतां यावीं.

२ या श्लोकांत चिकित्सेचें तत्व इतक्या व्यापक स्वरूपानें सांगितलें आहे कीं, जगांत आजपर्यंत निघालेल्या व यापुढेंही कदाचित् निघणाऱ्या कोणत्याही चिकित्सापद्धतीचा समावेश यांत झालाच पाहिजे. रोग दोन प्रकारांनीं बरा करतां येतो; एक 'विपरीत' चिकित्सेनें, किंवा दुसरा 'विपरीतार्थकारी' चिकित्सेनें. पहिली क्रिया उलट स्वरूपाची आणि दुसरी उलट स्वरूपाची नव्हे, पण उलट प्रकारचा गुण, उलट परिणाम करणारी. याचाच थोडा विस्तार केला म्हणजे तीन प्रकार होतात. कारणांच्या उलट, रोगाच्या उलट, आणि स्वरूपतः सारखीच दिसून उलट गुण मात्र करणारी. याच्याच विशेष खुलाशाकरितां सूक्ष्म भेद केले असतां सहा प्रकार होतात. एक हेतुविपरीत, दुसरा व्याधिविपरीत, तिसरा हेतुव्याधिविपरीत, चवथा हेतुविपरीतार्थकारी, पांचवा व्याधिविपरीतार्थकारी, आणि सहावा हेतुव्याधिविपरीतार्थकारी. थंडीपासून ताप आला तर त्यावर उष्ण उपचार करणें, ही हेतुविपरीतचिकित्सा. तापांत कारणावर लक्ष न ठेवतां नागरमोथा, पित्तपापडा वगैरे औषधें देणें, ही व्याधिविपरीत चिकित्सा. हेतु व व्याधि या दोहोंच्या उलट गुणाची ती हेतुव्याधिविपरीत चिकित्सा. स्वरूपतः कारणाच्या उलट नव्हे, तर कारणासारखीच दिसणारी पण गुण मात्र उलट देणारी—जसें जास्त मद्यपानानें होणाऱ्या रोगावर मद्यच पाजून

**विपरीतोऽनुपशयो व्याध्यसात्म्याभिसंज्ञितः ।**

**याच्याच उलट म्हणजे औषधादिकांचा जो शरीरास दुःखकारक उपयोग त्यास अनुपशय व व्याध्यसात्म्य असें म्हणतात.**

**यथा दुष्टेन दोषेण यथा चानुविसर्पता ॥ ८ ॥**

---

तो बरा करणें—ही हेतुविपरीतार्थकारी चिकित्सा. उलटी होत असतां गेळफळ देणें, ही व्याधिविपरीतार्थकारी. कारण गेळफळानें आरंभीं उलटी बंद न होतां, उलट ती जास्त येते. परिणामीं मात्र ती त्यानें बंद होते. हेतुव्याधिविपरीतार्थकारी चिकित्सेचेंही हेंच उदाहरण घेतां येईल. असें समजा, पित्तामुळें उलटी होते. त्यावर थोड्या प्रमाणांत गेळफळ देऊन उलटी करणारा दोष काढून टाकला कीं उलटी बंद होईल. परंतु गेळफळ पित्ताचेंही नाशक नाहीं व उलटी बंद करण्याचाही त्यांत धर्म नाहीं; परंतु परिणामीं त्यानें अभीष्ट गुण आला. विपरीत दिसत नसून विपरीत अर्थ म्हणजे प्रयोजन मात्र सिद्ध करणारी ती विपरीतार्थकारी. 'अलोप्याथी' म्हणजे सर्वसाधारण डाक्टर लोक ज्या पद्धतीनें चिकित्सा करितात, ती विपरीतचिकित्सा आहे. मात्र ती कधीं हेतुविपरीत व कधीं व्याधिविपरीत असणारच. तापावर क्विनाईन देणें ही हेतुविपरीत क्रिया आहे. क्विनाइन थंड नाहीं. तर तापाची उष्ण क्रिया दाखविणारी अन्तर्यामीं जी हेतुस्थिति आहे, ती घालविण्यासाठीं आमपाचक उष्णशक्तिविशिष्ट असें तें औषध आहे, त्याच क्विनाइनांत अनुपानाच्या योगानें शीतसंसर्ग करतां आल्यास तें हेतुव्याधिविपरीत होऊं शकेल. 'होमिओप्याथी' ही विपरीतार्थकारी चिकित्सा आहे. तथापि तींत कधींच हेतु किंवा व्याधि यांच्या विपरीत क्रिया घडतच नसेल, असें खात्रीनें म्हणतां येणार नाहीं. कारण नुसतें पाणी देखील कदाचित हेतु किंवा व्याधि यांच्या विपरीत गुणांचें असूं शकेल. परंतु इतकें खरें कीं, होमियोपाथीचें मुख्य लक्ष विपरीतार्थकारी क्रियेवरच असतें; विपरीत स्वरूपावर नसतें. 'क्रोम्योपाथी' 'हायड्रोपाथी' वगैरे ज्या नवीन नवीन 'प्याथीज्' निघत आहेत, त्यांचा अन्तर्भाव विपरीत किंवा विपरीतार्थकारी या दोहोंपैकीं कोणत्यांत तरी होतोच. जसें अमुक रोगावर अमुक औषध न देतां दुसरें द्यावें, किंवा नुसतें अमुक पथ्य करावें, किंवा अमुक तऱ्हेनें वागावें असें सांगणें; तसेंच अमुकच एका औषधानें किंवा अमक्याच प्रकारच्या वर्तनानें रोग बरा करणें, हें या प्याथींचें तत्व आहे परंतु मूलतत्वांत कांहीं फरक नाहीं. परंतु हल्लीं चूक होते ती अशी कीं, प्रत्येक जण आपलीच 'प्याथी' खरी व इतर खोट्या असा अभिमान धरून बसतो. खरें तत्व आमच्या आर्यवैद्यकानें सांगितलें आहे; व तें हें कीं, देश, काल, रोग, रोगी इत्यादिकांच्या भेदानुरूप पूर्वोक्त सर्वच प्रकारची चिकित्सा करावी लागते. एकीवरच भर टाकणें सयुक्तिक नाहीं. निरनिराळ्या वेळीं व निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रकाराची चिकित्सा उपयोगीं पडते.

निर्वृत्तिरामयस्यासौ संप्राप्तिर्जातिरागतिः ।

अमुक दोष अमुक रीतीनें दूषित होऊन अमुक प्रकारानें शरीरांत संचार करून कोणत्याही विशेष रोगाची उत्पत्ति करितो, या अवस्थेचें नांव सम्प्राप्ति; तिला जाति व आगति अशींही नांवें आहेत.

संख्याविकल्पप्राधान्यबलकालविशेषतः ॥ ९ ॥
सा भिद्यते

संख्या, विकल्प, प्राधान्य, बल व काल यांच्या भेदानें ती पांच प्रकारची आहे.

यथाऽत्रैव वक्ष्यंतेऽष्टौ ज्वरा इति ।

याच स्थानांत पुढें ज्वर आठ प्रकारचे आहेत, असें सांगितलें जाणार आहे, तें संख्यासम्प्राप्तीचें उदाहरण होय.

दोषाणां समवेतानां विकल्पोऽशांशकल्पना ॥ १० ॥

एकाच रोगांत कुपित झालेल्या वातादि अनेक दोषांच्या तारतम्याच्या कमीजास्तपणाचा जो विचार, ती विकल्पसम्प्राप्ति.

स्वातंत्र्यपारतंत्र्याभ्यां व्याधेः प्राधान्यमादिशेत् ।

रोगाची स्वतंत्रता व परतंत्रता यांवरून त्याचें प्राधान्य किंवा अप्राधान्य समजावयाचें. ही प्राधान्यसंप्राप्ति.

हेत्वादिकात्स्न्यावयवैर्बलाबलविशेषणम् ॥ ११ ॥

कोणत्याही रोगाचीं सांगितलेलीं कारणें, पूर्वरूपें व रूपें हीं सर्व असणें किंवा त्यांपैकीं कांहीं असणें, यावरून सम्प्राप्तीचें बलाबल समजावयाचें; ही बलसम्प्राप्ति.

नक्तंदिनर्तुभुक्तांशैर्व्याधिकालो यथामलम् ।

रात्र, दिवस, ऋतु व भोजनकाल यांच्या ज्या भागामध्यें वातादि दोषांचा जोर असतो, त्याच वेळीं त्या त्या दोषापासून होणारे रोग उद्भवतात. ही कालसंप्राप्ति होय.

इति प्रोक्तो निदानार्थस्तं व्यासेनोपदेक्ष्यति ॥ १२ ॥

याप्रमाणें निदान या शब्दांत येणाऱ्या गोष्टी संक्षेपानें सांगितल्या. त्याच पुढें विस्तारानें सांगितल्या जातील.

सर्वेषामेव रोगाणां निदानं कुपिता मलाः ।
तत्प्रकोपस्य तु प्रोक्तं विविधाहितसेवनम् ॥ १३ ॥
अहितं त्रिविधो योगस्त्रयाणां प्रागुदाहृतः ।

सर्वच रोगांचें कारण कुपित झालेले वातादि दोष आहेत. आणि दोषप्रकोपाचें कारण नानाप्रकारचें अहितसेवन हें सांगितलें आहे. अहित म्हणजे काल, अर्थ व कर्म यांचे हीन, मिथ्या व अति असे तीन प्रकारचे योग, हें मागें ( सूत्रस्थानांत ) सांगितलेंच आहे.

तिक्तोषणकषायाल्परूक्षप्रमितभोजनैः ॥ १४ ॥
धारणोदीरणनिशाजागरात्युच्चभाषणैः ।
क्रियातियोगभीशोकचिंताव्यायाममैथुनैः ॥ १५ ॥
ग्रीष्माहोरात्रिभुक्तांते प्रकुप्यति समीरणः ।

कडू, तिखट, तुरट, थोडें, रूक्ष व मोजकें जेवण; मलमूत्रादिकांचे उपस्थित वेग आवरून धरणें किंवा आले नसतां बळेंच प्रवृत्त करणें, रात्रीं जागणें, फार मोठ्यानें बोलणें, वमनविरेचनादि कर्मांचा अतियोग, भय, शोक, चिंता, व्यायाम व मैथुन या कारणांनीं; ग्रीष्मऋतु, दिवस, रात्र व अन्नपचनकाळ यांच्या अंतीं वायूचा प्रकोप होतो.

पित्तं कट्वम्लतीक्ष्णोष्णपटुक्रोधविदाहिभिः ॥ १६ ॥
शरन्मध्याह्नरात्र्यर्धविदाहसमयेषु च ।

तिखट, आंबट, तीक्ष्ण, उष्ण, खारट व विदाही पदार्थांचें भक्षण आणि राग या कारणांनीं शरदृतूंत, दुपारीं, मध्यरात्रीं आणि अन्नपचनकाळीं पित्तप्रकोप होतो.

---

१ निदान शब्दाचा आदिकारण असा अर्थ मागें दिलेला आहे, तथापि निदान शब्दानें निदानपंचकाचाही बोध होतो. या दुसऱ्या अर्थानेंच निदान शब्द या ठिकाणीं वापरला आहे. उदाहरणार्थ, माधवनिदान यांत निदानपंचकाचें विवेचन केलें आहे, हें प्रसिद्धच आहे. निदानस्थान यांतील सुद्धां निदान शब्दाचा अर्थ असाच आहे.

स्वाद्वम्ललवणस्निग्धगुर्वभिष्यंदिशीतलैः ॥ १७ ॥
आस्यास्वप्नसुखाजीर्णदिवास्वप्नातिबृंहणैः ।
प्रच्छर्दनाद्ययोगेन भुक्तमात्रवसंतयोः ॥ १८ ॥
पूर्वाह्णे पूर्वरात्रे च श्लेष्मा

गोड, आंबट, खारट, स्निग्ध, जड, कफोत्पादक व थंड पदार्थांचें सेवन; फार बसणें, फार निजणें, अजीर्ण, दिवसा निजणें, फार पौष्टिक पदार्थांचें सेवन आणि वमनादि कर्मांचा अयोग, या कारणांनीं वसंत ऋतूंत, दिवसाच्या व रात्रीच्या पहिल्या भागांत आणि जेवतांक्षणींच कफाचा प्रकोप होतो.

द्वंद्वं तु संकरात् ।

दोहोंचीं कारणें एकत्र झाल्यानें दोन दोषांचा प्रकोप होतो.

मिश्रीभावात्समस्तानां सन्निपातस्तथा पुनः ॥ १९ ॥
संकीर्णाजीर्णविषमाविरुद्धाध्यशनादिभिः ।
व्यापन्नमद्यपानीयशुष्कशाकाममूलकैः ॥ २० ॥
पिण्याकमृद्यवसुरापूतिशुष्ककृशामिषैः ।
दोषत्रयकरैस्तैस्तैस्तथान्नपरिवर्ततः ॥ २१ ॥
धातोर्दुष्टात्पुरोवाताद् ग्रहवेशाद्विषाद्गरात् ।
दुष्टान्नात्पर्वताश्लेषाद्ग्रहैर्जन्मर्क्षपीडनात् ॥ २२ ॥
मिथ्यायोगाच्च विविधात्पापानां च निषेवणात् ।
स्त्रीणां प्रसववैषम्यात्तथा मिथ्योपचारतः ॥ २३ ॥

आणि वर सांगितलेलीं सर्व कारणें एकत्र झाल्यास सन्निपात अर्थात् त्रिदोषांचा प्रकोप होतो. याशिवाय संकीर्ण ( पथ्य व अपथ्य एकत्र केलेलें ) भोजन, अजीर्णावर भोजन, विषम भोजन, अतिभोजन, इत्यादिकांनीं; तसेंच नासलेलें मद्य व पाणी, वाळलेल्या भाज्या, हिरवे मुळे, पेंड, माती, जवांची दारू ( Beer ), सडकें, वाळलेलें व रोडक्या पशूचें मांस हे पदार्थ खाल्यानें, त्रिदोषकारक म्हणून सांगितलेले पदार्थ खाल्यानें, अन्नांत एकदम फेरफार केल्यानें, धातु दूषित झाल्यानें, पूर्वेकडील वारा घेतल्यानें, पिशाच-बाधा, विष, कृत्रिमविष व दुष्टान्नसेवन यांच्या योगानें, पर्वतावर चढल्यानें, जन्मनक्षत्रावर पापग्रह आल्यानें, पूर्वोक्त अनेक प्रकारच्या मिथ्यायोगानें, पाप केल्यानें, बायकांच्या बाळंतपणासंबंधानें

कांहीं विपरीत प्रकार घडल्यानें आणि भलतेच उपचार केल्यानें त्रिदोषप्रकोप होतो.

प्रतिरोगमिति क्रुद्धा रोगाधिष्ठानगामिनीः ।
रसायनीः प्रपद्याशु दोषा देहे विकुर्वते ॥ २४ ॥

याप्रमाणें कुपित झालेले दोष रोगाच्या त्या त्या स्थानांत जाणाऱ्या रसवाहक नाड्यांत प्रवेश करून लागलेच शरीरांत विकार उत्पन्न करितात.

---

## अध्याय दुसरा.

अथाऽतो ज्वरनिदानं व्याख्यास्यामः ।

आतां ज्वरनिदान विस्तारानें सांगतों.

ज्वरो रोगपतिः पाप्मा मृत्युरोजोऽशनोऽतकः ।
क्रोधो दक्षाध्वरध्वंसी रुद्रोर्ध्वनयनोद्भवः ॥ १ ॥
जन्मांतयोर्मोहमयः संतापात्माऽपचारजः ।
विविधैर्नामभिः क्रूरो नानायोनिषु वर्तते ॥ २ ॥

ताप हा सर्व रोगांत मुख्य असून दुष्ट स्वभावाचा आहे. इतर रोगांपेक्षां यानेंच जास्त माणसें मरतात. हा मनुष्याचें ओज खाऊन टाकितो. हा मारक आहे व दक्षयज्ञाचा विध्वंस करणाऱ्या शंकराच्या तिसऱ्या डोळ्यापासून निघालेला रोग आहे. जन्मापासून अन्तकाळपर्यंत हा मोहमय व संतापमय असतो. हा अपथ्यापासून होतो. तसेंच हा दुश्चिकित्स्य असून नानाप्रकारच्या [१] प्राण्यांत निरनिराळ्या नांवांनीं राहतो.

स जायतेऽष्टधा दोषैः पृथङ्मिश्रैः समागतैः ।
आगंतुश्च

वातज, पित्तज, कफज, वातपित्तज, वातकफज, पित्तकफज, सान्निपातिक व आगन्तु असे तापाचे आठ भेद आहेत.

मलास्तत्र स्वैः स्वैर्दुष्टाः प्रदूषणैः ॥ ३ ॥
आमाशयं प्रविश्याममनुगम्य पिधाय च ।

---

१ हत्तीच्या तापास पालक, घोड्यांच्यास अभिताप, गाईच्यास गोकर्ण, पक्ष्यांच्यास मकर, कुत्र्याच्यास अलर्क, माशांच्यास इन्द्रमद, वनस्पतींच्यास ज्योति, धान्याच्यास चूर्णक, इत्यादि नांवें आहेत.

स्रोतांसि पक्तिस्थानाच्च निरस्य ज्वलनं बहिः ॥ ४ ॥
सह तेनाभिसर्पंतस्तपंतः सकलं वपुः ।
कुर्वंतो गात्रमत्युष्णं ज्वरं निर्वर्तयंति ते ॥ ५ ॥
स्रोतोविबंधात्प्रायेण तत्र स्वेदो न जायते ।

आपापल्या प्रकोपकारक कारणांनीं दुष्ट झालेले वातादि दोष आमाशयांत शिरून आमाच्या मागून जाऊन रसादिवाहक स्रोतें बंद करून टाकितात. नंतर ग्रहणींतून जठराग्नीस बाहेर काढून त्यासहित सर्व शरीरभर पसरून शरीर संतप्त करून, अंगें अतिशय उष्ण करून ताप उत्पन्न करितात. स्रोतें बंद झालीं असल्यामुळें बहुधा तापांत घाम येत नाहीं.

तस्य प्राग्रूपमालस्यमरतिर्गात्रगौरवम् ॥ ६ ॥
आस्यवैरस्यमरुचिर्जृंभा सास्राकुलाक्षता ।
अंगमर्दोऽविपाकोऽल्पप्राणता बहुनिद्रता ॥ ७ ॥
रोमहर्षो विनमनं पिंडिकोद्वेष्टनं क्लमः ।
हितोपदेशेष्वक्षांतिः प्रीतिरम्लपटूषणे ॥ ८ ॥
द्वेषः स्वादुषु भक्ष्येषु तथा बालेषु तृड् भृशम् ।
शब्दाग्निशीतवातांबुच्छायोष्णेष्वनिमित्ततः ॥ ९ ॥
इच्छा द्वेषश्च तदनु ज्वरस्य व्यक्तता भवेत् ।

त्याचें पूर्वरूप येणेंप्रमाणें—आळस, चैन न पडणें, अंग जड होणें, तोंड बेचव होणें, अरुचि, जांभया येणें, डोळ्यांतून पाणी येणें व ते गढूळ होणें, अंग मोडणें, अन्न न पचणें, थकून गेल्यासारखें वाटणें, फार झोंप येणें, अंगावर शहारे येणें, अंग वांकणें, पोटऱ्या वळणें, ग्लानि, वडील माणसांचा हितकर उपदेश सहन न होणें; आंबट, खारट व तिखट पदार्थांवर प्रीति, गोड पदार्थ व मुलें यांचा तिटकारा येणें, फार तहान लागणें, आणि शब्द, अग्नि, थंडी, वारा, पाणी, सावली व ऊन यांची कारणावांचून इच्छा व द्वेष वाटणें; हीं लक्षणें प्रकट होतात.

आगमापगमक्षोभमृदुतावेदनोष्मणाम् ॥ १० ॥
वैषम्यं तत्र तत्रांगे तास्ताः स्युर्वेदनाश्चलाः ।
पादयोः सुप्तता स्तंभः पिंडिकोद्वेष्टनं श्रमः ॥ ११ ॥
विश्लेष इव संधीनां साद ऊर्वोः कटीग्रहः ।

पृष्ठं क्षोदमिवाप्नोति निष्पीड्यत इवोदरम् ॥ १२ ॥
छिद्यंत इव चास्थीनि पार्श्वगानि विशेषतः ।
हृदयस्य ग्रहस्तोदः प्राजनेनेव वक्षसः ॥ १३ ॥
स्कंधयोर्मथनं बाह्वोर्भेदः पीडनमंसयोः ।
अशक्तिर्भक्षणे हन्वोर्जृंभणं कर्णयोः स्वनः ॥ १४ ॥
निस्तोदः शंखयोर्मूर्ध्नि वेदना विरसास्यता ।
कषायास्यत्वमथवा मलानामप्रवर्तनम् ॥ १५ ॥
रूक्षारुणत्वगास्याक्षिनखमूत्रपुरीषता ।
प्रसेकारोचकाश्रद्धाविपाकास्वेदजागराः ॥ १६ ॥
कंठौष्ठशोषस्तृट् शुष्कौ छर्दिकासौ विषादिता ।
हर्षो रोमांगदंतेषु वेपथुः क्षवथोर्ग्रहः ॥ १७ ॥
भ्रमः प्रलापो घर्मेच्छा विनामश्चानिलज्वरे ।

ताप येणें, जाणें, जास्त होणें, कमी होणें, वेदना व उष्णता यांचा कोणत्याही प्रकारचा नियम नसणें; त्या त्या अंगांत राहून राहून वेदना होणें, पाय बधिर होणें, ताठणें, पोटऱ्या वळणें, थकवा येणें, सांधे सुटल्यासारखे वाटणें, मांड्या गळल्याप्रमाणें वाटणें, कंबर धरणें, पाठींत ठेंचल्यासारखी पीडा होणें, पोटांत पिळवटल्यासारखें वाटणें, विशेषतः बरगड्यांचीं हाडें कापल्यासारखीं वाटणें, हृदय जखडल्यासारखें होणें, छातींत टोंचल्यासारखें वाटणें, खांदे घुसळल्यासारखे वाटणें, दंडांत फुटण होणें, खांद्यांत पिळल्यासारखें वाटणें, जबड्यांनीं खातां न येणें, जांभया येणें, कानांत शब्द होणें, कानशिलांत अतिशय टोंचण होणें, डोकें दुखणें, तोंड बेचव किंवा तुरट होणें, मलमूत्रादिक न होणें; चामडी, तोंड, डोळे, नखें, मूत्र व विष्ठा हीं रूक्ष व पिंगट होणें, लाळ सुटणें, अरुचि, अन्नावर प्रीति नसणें, अन्न न पचणें, घाम व झोंप न येणें, घसा व ओंठ सुकणें, तहान लागणें, कोरडी ओकारी व खोकला, मनाची उद्विग्नता, रोमांच उभे राहणें, अंग व दांत शिवशिवणें, कांपरें भरणें, शिंका न येणें, भोंवळ, बडबड, उन्हाची इच्छा आणि अंग वांकणें हीं लक्षणें वातज्वरांत होतात.

युगपद्व्याप्तिरंगानां प्रलापः कटुवक्त्रता ॥ १८ ॥
नासास्यपाकः शीतेच्छा भ्रमो मूर्च्छा मदोऽरतिः ।

विट्स्रंसः पित्तवमनं रक्तष्ठीवनमम्लकः ॥ १९ ॥
रक्तकोठोद्गमः पीतहरितत्वं त्वगादिषु।
स्वेदो निःश्वासवैगंध्यमतितृष्णा च पित्तजे ॥ २० ॥

सर्वांग एकदम तापणें, बडबड, तोंड तिखट होणें, नाक व तोंड येणें, थंड पदार्थांची इच्छा, भोंवळ, घेरी, मद, चैन न पडणें, जुलाब, पित्ताची उलटी, रक्ताची थुंकी पडणें, आंबट ढेंकर येणें, अंगावर तांबडया गांधी उठणें, चामडी वगैरे पूर्वोक्त अवयवांचा रंग पिंवळा किंवा हिरवा होणें, घाम येणें, श्वासास दुर्गंध येणें, आणि फार तहान लागणें, हीं लक्षणें पित्तज्वरांत होतात.

विशेषादरुचिर्जाड्यं स्रोतोरोधोऽल्पवेगता।
प्रसेको मुखमाधुर्यं हृल्लेपश्वासपीनसाः ॥ २१ ॥
हृल्लासश्छर्दनं कासः स्तंभः श्वैत्यं त्वगादिषु।
अंगेषु शीतपिटिकास्तंद्रोदर्दः कफोद्भवे ॥ २२ ॥

विशेष अरुचि, जडपणा, स्रोतांचा अवरोध, तापाचा जोर कमी असणें, लाळ गळणें, तोंड गुळमट होणें, छातींत कफाचा चिकटा बसणें, दमा, पीनस, मळमळ, उलटी, खोकला, अंग ताठणें, पूर्वोक्त चामडी वगैरे पांढरी होणें, अंगावर शीत पिटिका व गांधी (उदर्द) उठणें आणि डोळ्यांवर झांपड, हीं लक्षणें कफज्वरांत होतात.

काले यथास्वं सर्वेषां प्रवृत्तिर्वृद्धिरेव वा।

वातादि दोषांच्या वृद्धीचा जो काळ सांगितला आहे, त्या काळीं त्या त्या दोषजन्य तापाचा आरंभ व उत्पन्न झालेल्या तापाची वृद्धि होते.

निदानोक्तोऽनुपशयो विपरीतोपशायिता ॥

त्या त्या दोषजन्य ज्वराचीं जीं जीं कारणें सांगितलीं आहेत, त्यांच्या सेवनानें ताप वाढतो व त्यांच्या उलट कारणांनीं कमी किंवा बरा होतो.

यथास्वलिंगसंसर्गे ज्वरः संसर्गजः

दोन निरनिराळ्या दोषांपासून होणाऱ्या तापांचीं लक्षणें एकत्र झालीं असतां तो द्वन्द्वज ज्वर जाणावा.

अपि च ॥२३॥

शिरोऽर्तिमूर्च्छावमिदाहमोहकंठास्यशोषारतिपर्वभेदाः।
उन्निद्रता तृड्भ्रमरोमहर्षा जृंभातिवाक्त्वं च चलात्सपित्तात् २४

शिवाय वातपित्तज्वरांत डोकें दुखणें, घेरी, वांति, दाह, मोह, घसा व तोंड कोरडें पडणें, चैन न पडणें, पेरें फुटणें, झोंप न येणें, तहान, भोंवळ, रोमांच उभे राहणें, जांभया व बडबड, हीं लक्षणें होतात.

तापहान्यरुचिपर्वशिरोरुक्पीनसश्वसनकासविबंधाः।
शीतजाड्यतिमिरभ्रमतंद्राः श्लेष्मवातजनितज्वरलिंगम् ॥२५॥

ताप कमी असणें, अरुचि, पेरें व डोकें दुखणें, पीनस, दमा, खोकला, मलमूत्रादिकांचा अवरोध, थंडी लागणें, जडपणा, डोळ्यापुढें अंधेरी येणें, चक्कर व झांपड हीं लक्षणें कफवातज्वरांत होतात.

शीतस्तंभस्वेददाहाव्यवस्थास्तृष्णा कासः श्लेष्मपित्तप्रवृत्तिः।
मोहस्तंद्रा लिप्ततिक्तास्यता च ज्ञेयं रूपं श्लेष्मपित्तज्वरस्य २६

थंडी लागणें, अंग ताठणें, घाम येणें व दाह यांविषयीं कांहीं नियम नसणें म्हणजे कधीं हीं लक्षणें होणें व कधीं न होणें; तहान, खोकला, थुंकींतून कफ व पित्त पडणें, मोह, झांपड आणि तोंड चिकट व कडू होणें, हीं कफपित्तज्वराचीं लक्षणें होत.

सर्वजो लक्षणैः सर्वैर्दाहोऽत्र च मुहुर्मुहुः।
तद्वच्छीतं महानिद्रा दिवा जागरणं निशि ॥ २७॥
सदा वा नैव वा निद्रा महास्वेदोऽति नैव वा।
गीतनर्तनहास्यादिविकृतेहाप्रवर्तनम् ॥ २८॥
साश्रुणी कलुषे रक्ते भुग्ने लुलितपक्ष्मणी।
अक्षिणी पिंडिकापार्श्वमूर्धपर्वास्थिरुग्भ्रमः ॥ २९॥
सस्वनौ सरुजौ कर्णौ कंठः शूकैरिवाचितः।
परिदग्धा खरा जिह्वा गुरुः स्रस्तांगसंधिता ॥ ३०॥
रक्तपित्तकफष्ठीवो लोलनं शिरसोऽतिरुक्।
कोठानां श्यावरक्तानां मंडलानां च दर्शनम् ॥ ३१॥
हृद्व्यथा मलसंसर्गः प्रवृत्तिर्वाल्पशोऽति वा।
स्निग्धास्यता बलभ्रंशः स्वरसादः प्रलापिता ॥ ३२॥
दोषपाकश्चिरात्तंद्रा प्रततं कंठकूजनम्।
सन्निपातमभिन्यासं तं ब्रूयाच्च हतौजसम् ॥ ३३॥

सन्निपातज्वरांत तीनही दोषांचीं लक्षणें असतात. शिवाय वरचेवर दाह होणें व थंडी लागणें, दिवसा अतिशय झोंप येणें व रात्रीं मुळींच न येणें, सदोदित झोंप येणें किंवा ती मुळींच केव्हांही न येणें, अतिशय घाम येणें किंवा मुळींच न येणें, गाणें, नाचणें, हंसणें इत्यादि गोष्टी वेडयावांकडया रीतीनें करणें, डोळे पाण्यानें भरणें किंवा गढूळ, लाल व वांकडे होणें, पापण्यांचे केंस लुले होणें, पोटऱ्या, बरगडया, डोकें, पेरें व हाडें दुखणें, चक्कर, कानांत शब्द होणें व दुखणें, घशांत धान्याचीं कुसें अडकल्यासारखें होणें, जीभ करपल्यासारखी, खरखरीत व जड होणें, अंग व सांधे गळल्यासारखे होणें, थुंकींतून रक्त, पित्त व कफ पडणें; डोकें लटलट कांपणें व अतिशय दुखणें, अंगावर गांधी व काळया-लाल रंगाचीं मंडलें उठणें, हृदयांत पीडा होणें, मळाचा अवरोध, जुलाब किंवा थोडथोडें शौचास होणें, तोंड बुळबुळीत होणें, शक्तिपात होणें, आवाज बसणें, बडबड, दोषांचें पचन उशिरां होणें, झांपड, व घशांत अतिशय घरघर होणें, हीं लक्षणें होतात. सन्निपातास अभिन्यास व हृतौजस अशींही नांवें आहेत.

दोषे विवद्धे नष्टेऽग्नौ सर्वसंपूर्णलक्षणः ।
असाध्यः सोऽन्यथा कृच्छ्रो भवेद्वैकल्यदोऽपि वा ॥ २४॥

दोषांचा अवरोध झाला असतां, जठराग्नि अतिशय मंद झाला असतां आणि वर सांगितलेलीं सर्व लक्षणें पूर्ण झालीं असतां सन्निपात असाध्य होतो. एरव्हीं तो कष्टसाध्य असतो किंवा निदान इंद्रियें तरी लुलीं करितो.

अन्यच्च सन्निपातोत्थो यत्र पित्तं पृथक् स्थितम् ।
त्वचि कोष्ठेऽथवा दाहं विदधाति पुरोऽनु वा ॥ २५ ॥
तद्वद्वातकफौ शीतम्

याशिवाय सन्निपातापासून निरनिराळे ज्वरही उत्पन्न होतात. त्यांत वातकफांपासून पित्त निराळें राहून चामडींत अथवा कोठ्यांत शिरून अनुक्रमें पूर्वीं किंवा मागून दाह उत्पन्न करितें. याच

प्रमाणें पित्तापासून कफवात निराळे राहून त्वचेंत किंवा कोठ्यांत अनुक्रमें आरंभीं किंवा शेवटीं थंडी उत्पन्न करितात.

दाहादिर्दुस्तरस्तयोः ।

सदरहू दोन्ही प्रकारच्या सन्निपातांत, ज्यांत पूर्वी दाह होतो तो कष्टसाध्य आहे.

शीतादौ तत्र पित्तेन कफे स्यंदितशोषिते ॥ ३६ ॥
शीते शांतेऽम्लको मूर्छा मदस्तृष्णा च जायते ।
दाहादौ पुनरंते स्युस्तंद्राष्ठीववमिक्लमाः ॥ ३७ ॥

आरंभीं थंडी लागणाऱ्या सन्निपातांत पित्तानें कफ पातळ होऊन व सुकून थंडी बंद झाली म्हणजे आंबट ढेंकर येतात, घेरी येते, गुंगी येते व तहान लागते. तसेंच ज्यांत पूर्वी दाह होतो, त्यांत दाह शांत झाल्यावर झांपड, तोंडास पाणी सुटणें, वांति व ग्लानि हीं लक्षणें होतात.

आगंतुरभिघाताभिषंगशापाभिचारतः ।
चतुर्धा

आगन्तु ताप अभिघात, अभिषंग, अभिशाप व अभिचार या चार कारणांपासून चार प्रकारचा आहे.

अत्र क्षतच्छेददाहाद्यैरभिघातजः ॥ ३८ ॥
श्रमाच्च तस्मिन्पवनः प्रायो रक्तं प्रदूषयन् ।
सव्यथाशोफवैवर्ण्यं सरुजं कुरुते ज्वरम् ॥ ३९ ॥

त्यांपैकीं क्षतानें, कापल्यानें, भाजल्यानें, श्रमानें व अशाच तऱ्हेच्या इतर आघातानें जो ताप येतो, तो अभिघातज होय. यांत बहुतकरून वायु रक्त दूषित करून ठणका, सूज, विवर्णता व शूळ या लक्षणांसहित ताप उत्पन्न करितो.

ग्रहावेशौषधिविषक्रोधभीशोककामजः ।
अभिषंगात्

पिशाचबाधा, उग्र औषधांचा वास, विष, राग, भीति, शोक व काम यांपासून जो ताप येतो, तो अभिषंगज होय.

ग्रहेणास्मिन्नकस्माद्धासरोदने ॥ ४० ॥

पिशाचबाधेपासून येणाऱ्या तापांत मनुष्य उगीच हंसतो व रडतो.

ओषधीगंधजे मूर्छा शिरोरुग्वेपथुः क्षवः ।

औषधींच्या वासानें येणाऱ्या तापांत घेरी, डोकें दुखणें, कांपरें व शिंका हीं लक्षणें होतात.

विषान्मूर्छातिसारास्यश्यावतादाहहृद्ग्रदाः॥ ४१ ॥

विषजन्य तापांत घेरी, अतिसार, तोंड काळें होणें, दाह व हृदयांत पीडा हीं लक्षणें होतात.

क्रोधात्कंपः शिरोरुक् च

रागापासून येणाऱ्या तापांत कांपरें व डोकें दुखणें हीं लक्षणें होतात.

प्रलापो भयशोकजे ।

भीति व शोक यापासून येणाऱ्या तापांत रोगी बडबड करितो.

कामाद्भ्रमोऽरुचिर्दाहो ह्रीनिद्राधीधृतिक्षयः ॥ ४२ ॥

कामापासून येणाऱ्या तापांत चक्कर, अरुचि, दाह; आणि लज्जा झोंप, बुद्धि, व धैर्य यांचा नाश हीं लक्षणें होतात.

ग्रहादौ सन्निपातस्य भयादौ मरुतस्त्रये ।
कोपः कोपेऽपि पित्तस्य

पिशाचबाधा, औषधांचा वास व विष यांपासून येणाऱ्या तापांत त्रिदोषाचा; भीति, शोक व काम यांपासून येणाऱ्या तापांत वाताचा; आणि रागानें येणाऱ्या तापांत वातपित्तांचा प्रकोप होतो.

यौ तु शापाभिचारजौ ॥ ४३ ॥
सन्निपातज्वरौ घोरौ तावसह्यतमौ मतौ ।

शाप व अभिचार ( जारणमारणक्रिया ) यांपासून होणारे सन्निपातज्वर भयंकर व अत्यंत असह्य असतात.

तत्राभिचारिकैर्मंत्रैर्हूयमानस्य तप्यते॥ ४४ ॥
पूर्वं चेतस्ततो देहस्ततो विस्फोटतृड्भ्रमैः ।
सदाहमूर्छैर्ग्रस्तस्य प्रत्यहं वर्धते ज्वरः ॥ ४५ ॥

ज्या मनुष्याचें नांव घेऊन ( अथर्ववेदोक्त ) आभिचारिक मंत्र म्हणून हवन केलें जातें, त्याचें मन प्रथम सन्तप्त होतें, नंतर अंग तापतें, आणि त्यानंतर अंगावर फोड उठतात; तहान लागते, चक्कर येते, दाह आणि मूर्च्छा येते, आणि प्रत्येक दिवशीं ताप वाढतो.

इति ज्वरोऽष्टधा दृष्टः

याप्रमाणें ज्वर आठ प्रकारचा आहे.

समासाद्विविधस्तु सः ।

शारीरो मानसः सौम्यस्तीक्ष्णोऽतर्बहिराश्रयः ॥ ४६ ॥

प्राकृतो वैकृतः साध्योऽसाध्यः सामो निरामकः ।

परंतु संक्षेपानें त्याचे दोनच प्रकार होतात. ते येणेंप्रमाणेः— शारीरिक व मानसिक; सौम्य व तीक्ष्ण; अन्तराश्रित व बहिराश्रित; प्राकृत व वैकृत; साध्य व असाध्य; आणि साम व निराम.

पूर्वं शरीरे शारीरे तापो मनसि मानसे ॥ ४७ ॥

शारीर ज्वरांत प्रथम अंगांत ताप भरतो, आणि मानसिक ज्वरांत प्रथम मन तप्त होतें.

पवने योगवाहित्वाच्छीतं श्लेष्मयुते भवेत् ।

दाहः पित्तयुते मिश्रं मिश्रे

वायु योगवाही असल्यामुळें तो कफाशीं मिळाला असतां शैत्य होतें म्हणजे थंडी लागते. ( म्हणून वातकफज्वर सौम्य होय. ) पित्ताशीं मिळाला असतां दाह होतो. (हा तीक्ष्ण होय. ) पित्तकफांशीं मिळाला असतां कधीं दाह होतो व कधीं थंडी लागते.

अंतःसंश्रये पुनः ॥ ४८ ॥

ज्वरेऽधिकविकाराः स्युरंतःक्षोभो मलग्रहः ।

बहिरेव बहिर्वेगे तापोऽपि च सुसाध्यता ॥ ४९ ॥

अंतराश्रित तापांत अन्तर्गत विकार फार असतात, अन्तर्भागीं अतिशय दाह होतो व मलमूत्रादिकांचा अवरोध होतो. बहिराश्रित ज्वरांत बाहेरच दाह होतो व हा सुखसाध्य असतो.

वर्षाशरद्वसंतेषु वाताद्यैः प्राकृतः क्रमात् ।

वैकृतोऽन्यः स दुःसाध्यः प्रायश्च प्राकृतोऽनिलात् ॥५०॥

वर्षाऋतूंत वायूपासून, शरदृतूंत पित्तापासून आणि वसंतऋतूंत कफापासून येणाऱ्या तापास प्राकृत आणि याहून निराळ्या प्रकारानें येणाऱ्यास वैकृत असें म्हणतात. वैकृतज्वर आणि वायूपासून येणारा प्राकृतज्वर बहुतकरून कष्टसाध्य असतो.

वर्षासु मारुतो दुष्टः पित्तश्लेष्मान्वितो ज्वरम् ।

कुर्यात्

वर्षाऋतूंत दूषित झालेला वायु पित्तकफांशीं मिळून ताप उत्पन्न करितो.

पित्तं च शरदि तस्य चानुबलः कफः ॥ ५१ ॥
तत्प्रकृत्या विसर्गाच्च तत्र नानशनाद्भयम् ।

वर्षाऋतूंत सांचलेलें पित्त शरदृऋतूंत कुपित होऊन त्यास कफाचें पाठबळ मिळून ताप उत्पन्न होतो. या तापांत कफाच्या स्वभावामुळें व विसर्गकाळ सौम्य असल्यामुळें लंघन केलें असतां अपाय होण्याची भीति नाहीं.

कफो वसंते तमपि वातपित्तं भवेदनु ॥ ५२ ॥

वसंतऋतूंत[1] कफाचा प्रकोप होऊन त्यास वातपित्तांचें पाठबळ मिळून त्यापासून ज्वर उत्पन्न होतो.

बलवत्स्वल्पदोषेषु ज्वरः साध्योऽनुपद्रवः ।

रोगी सशक्त व दोष अल्प असून त्यांत उपद्रव नसले म्हणजे तो ताप सुसाध्य असतो.

सर्वथा विकृतिज्ञाने प्रागसाध्य उदाहृतः ॥ ५३ ॥

असाध्य तापाचें लक्षण पूर्वी विकृतिविज्ञानीय शारीरांत सांगितलेंच आहे.

ज्वरोपद्रवतीक्ष्णत्वमग्लानिर्बहुमूत्रता ।
न प्रवृत्तिर्न विड् जीर्णा न क्षुत्सामज्वराकृतिः ॥ ५४ ॥

बडबड, भ्रम वगैरे ज्वराचे उपद्रव जोराचे असणें, ग्लानि नसणें, लघ्वी फार होणें, शौचास न होणें किंवा झालेंच तर अपक्व मळ पडणें व भूक न लागणें हीं आम-( अपक्व ) ज्वराचीं लक्षणें जाणावीं.

ज्वरवेगोऽधिकस्तृष्णा प्रलापः श्वसनं भ्रमः ।
मलप्रवृत्तिरुत्क्लेशः पच्यमानस्य लक्षणम् ॥ ५५ ॥

तापाचा फार जोर असणें, तहान, बडबड, दम, भ्रम शौचास होणें व मळमळ हीं लक्षणें ज्वराचें पचन होत असतां होतात.

---

१ वसंतऋतु आग्नेय काळ असल्यामुळें व वातपित्तांचें पाठबळ असल्यामुळें लंघनानें अपाय होण्याची धास्ती असते.

जीर्णतामविपर्यासात्सप्तरात्रं च लंघनात् ।

पूर्वोक्त आमज्वराच्या लक्षणांच्या उलट लक्षणें झालीं असतां व सात दिवस लंघन केल्यानें ज्वर निराम म्हणजे पक्क होतो.

ज्वरः पंचविधः प्रोक्तो मलकालबलाबलात् ॥ ५६ ॥
प्रायशः सन्निपातेन भूयसा तूपदिश्यते ।
संततः सततोन्येद्युस्तृतीयकचतुर्थकौ ॥ ५७ ॥

वातादि दोष व काळ यांच्या कमी जास्त बळानुसार ज्वराचे संतत, सतत, अन्येद्यु, तृतीयक व चतुर्थक असे पांच प्रकार होतात. हे संततादि ज्वर बहुतकरून सान्निपातिकच असतात. परंतु त्यांत जो दोष अधिक असतो, त्यावरून त्यांस नांवें दिलीं जातात.

धातुमूत्रशकृद्वाहिस्रोतसां व्यापिनो मलाः ।
तापयंतस्तनुं सर्वां तुल्यदूष्यादिवर्धिताः ॥ ५८ ॥
बलिनो गुरवः स्तब्धा विशेषेण रसाश्रिताः ।
संततं निष्प्रतिद्वंद्वा ज्वरं कुर्युः सुदुःसहम् ॥ ५९॥
मलं ज्वरोष्मा धातून्वा स शीघ्रं क्षपयेत्

रसादि धातु, मूत्र व मळ यांस वाहणाऱ्या स्रोतांना व्यापून राहणारे वातादि दोष समान दूष्य, देश, काल व प्रकृति, यांनीं वाढले जाऊन, बलवान्, ( आमयुक्त असल्यामुळें ) जड व जागच्या जागीं स्तब्ध होऊन सर्व शरीर तापवितात; आणि विशेषतः रसाच्या आश्रयानें राहून प्रतिबंधक नसल्यामुळें फार दुःसह असा संततज्वर उत्पन्न करितात. ती ज्वराची उष्णता मळांस किंवा धातूंस लवकर क्षीण करिते.

ततः ।
सर्वाकारं रसादीनां शुद्ध्याऽशुद्ध्याऽपि वा क्रमात् ६०
वातपित्तकफैः सप्तदशद्वादशवासरान् ।
प्रायोऽनुयाति मर्यादां मोक्षाय च वधाय च ॥ ६१ ॥
इत्यग्निवेशस्य मतम्

रसादि धातु, मल-मूत्र इत्यादिकांची ज्वराच्या उष्णतेनें निखालस शुद्धि झाली असतां बहुतकरून वातादिक संततज्वर सात दिवसांत, पित्तज्वर दहा दिवसांत व कफज्वर बारा दिवसांत निघतो. आणि तीं पूर्णपणें अशुद्ध झालीं असतां वातज्वरानें सात दिव-

सांत, पित्तज्वरानें दहा दिवसांत व कफज्वरानें बारा दिवसांत मनुष्य मरतो, असें अग्निवेशाचें मत आहे.

हारीतस्य पुनः स्मृतिः ।
द्विगुणा सप्तमी यावन्नवम्येकादशी तथा ॥ ६२ ॥
एषा त्रिदोषमर्यादा मोक्षाय च वधाय च ।

परंतु हारीत ऋषीचें मत असें आहे कीं, वातज संतत ज्वराची मुदत चवदा दिवस, पित्तज्वराची अठरा दिवस आणि कफज्वराची बावीस दिवस आहे. इतक्या मुदतींत रोगी बरा होतो किंवा मरतो.

शुद्ध्यशुद्धौ ज्वरः कालं दीर्घमप्यनुवर्तते ॥ ६३ ॥

कांहीं धातु शुद्ध व कांहीं अशुद्ध असें मिश्रण झालें असतां संतत ज्वर याहीपेक्षां जास्त दिवस राहतो.

कृशानां व्याधिमुक्तानां मिथ्याहारादिसेविनाम् ।
अल्पोऽपि दोषो दूष्यादेर्लब्ध्वाऽन्यतमतो बलम् ॥ ६४ ॥
सविपक्षो ज्वरं कुर्याद्विषमं क्षयवृद्धिभाक् ।
दोषः प्रवर्तते तेषां स्वे काले ज्वरयन् बली ॥ ६५ ॥
निवर्तते पुनश्चैष प्रत्यनीकबलाबलः ।

नुक्तेच रोगांतून उठलेल्या कृश मनुष्यांनीं अपथ्य आहारविहाराचें सेवन केल्यानें त्यांचे वातादि दोष अल्प असूनही दूष्य, देश, काल, प्रकृति यांपैकीं एका किंवा अनेकांपासून प्रबळ होऊन धात्वादिकांसहवर्तमान त्यांच्या क्षयवृद्धीप्रमाणें कमीजास्त होऊन विषमज्वर उत्पन्न करितात. ( संतत ज्वरांत दोषांस दूष्य वगैरे सर्व अनुकूळ असतात; अर्थात् दोष निर्वैर असतात. आणि विषमांत याच्या उलट असतें. ) या विषमज्वरांत वातादि दोष मागें सांगितलेल्या आपापल्या वृद्धिकाळीं प्रबळ होऊन ताप उत्पन्न करितात; आणि दूष्यादिकांच्या बळानें निर्बळ झाले म्हणजे निवृत्त होतात.

क्षीणे दोषे ज्वरः सूक्ष्मो रसादिष्वेव लीयते ॥ ६६ ॥
लीनत्वात्कार्श्यवैवर्ण्यजाड्यादीनादधाति सः ।

विषमज्वरोत्पादक दोष क्षीण झाला असतां ज्वर साफ न निघतां सूक्ष्मरूपानें रसादि धातूंत लपून राहतो, आणि लपून राहिल्यामुळें कृशता, विवर्णता व जडत्व उत्पन्न करितो.

आसन्नविवृतास्यत्वात्स्रोतसां रसवाहिनाम् ॥ ६७ ॥
आशु सर्वस्य वपुषो व्याप्तिर्दोषेण जायते ।
संततः सततस्तेन

रसवाही स्रोतांचीं तोंडें जवळ जवळ व मोठीं असल्यामुळें सर्व शरीरांत दोषांचा फैलाव त्वरित होतो, आणि म्हणूनच संतत ज्वर एकसारखा राहतो.

विपरीतो विपर्ययात् ॥ ६८ ॥
विषमो विषमारंभक्रियाकालोनुषंगवान् ।

याच्या उलट कारणांमुळें म्हणजे रक्तवाहक स्रोतांचीं तोंडें दूर दूर व आकुंचित असल्यामुळें दोषांची व्याप्ति एकाच काळीं सर्व शरीरभर होत नाहीं. म्हणून सततादि विषमज्वर संतताप्रमाणें सदोदित राहत नाहींत. विषमज्वराची सुरवात ( अगोदर अमुक भागांत येणें ), क्रिया ( थंडी, दाह वगैरे ) व येण्याची वेळ हीं अनियमित असून तो फार दिवसपर्यंत राहतो.

दोषो रक्ताश्रयः प्रायः करोति सततं ज्वरम् ॥ ६९ ॥
अहोरात्रस्य स द्विः स्यात्

विशेषतः रक्ताश्रित दोषापासून सतत ज्वर उत्पन्न होतो, व तो दिवसरात्रींत मिळून दोनदां येतो.

सकृदन्येद्युराश्रितः ।
तस्मिन्मांसवहा नाडीः

मांसवाहक स्रोतांचा आश्रय करून बसलेल्या दोषांपासून अन्येद्यु ज्वर उत्पन्न होतो, व तो दिवसरात्रींत केव्हां तरी एकदां येतो.

मेदोनाडीस्तृतीयके ॥ ७० ॥
ग्राही पित्तानिलान्मूर्ध्नस्त्रिकस्य कफपित्ततः ।
सपृष्ठस्यानिलकफात्स चैकाहांतरः स्मृतः ॥ ७१ ॥

मेदोवाहक स्रोतांत जाऊन बसलेल्या दोषांपासून तृतीयक ज्वर उत्पन्न होतो व तो एक दिवसाआड येतो. हा तीन प्रकारचा असतो. वातपित्तज, कफपित्तज व वातकफज. यांपैकीं पहिल्या प्रकारांत डोकें दुखतें, दुसऱ्यांत माकडहाडांत दुखतें, आणि तिसऱ्यांत पाठींत व माकडहाडांत दुखतें.

**चतुर्थको मले मेदोमज्जास्थ्यन्यतमस्थिते।**
**मज्जस्थ एवेत्यपरे प्रभावं स तु दर्शयेत् ॥ ७२ ॥**
**द्विधा कफेन जंघाभ्यां स पूर्वं शिरसोऽनिलात्।**

मेद, मज्जा व हाडें यांपैकीं कोणत्या तरी एकांत दोष गेले असतां चातुर्थिक ज्वर उत्पन्न होतो. कांहीं आचार्यांच्या मतें फक्त मज्जेंतच दोष गेल्यानें चातुर्थिक ज्वर उत्पन्न होतो. (हा दोन दिवसांआड येतो.) याचा दोन प्रकारचा प्रभाव दृष्टीस पडतो. हा कफाधिक असला म्हणजे प्रथम पोटऱ्यांतून व वाताधिक असला म्हणजे मस्तकांतून त्याची सुरवात होते.

**अस्थिमज्जोभयगते चतुर्थकविपर्ययः ॥ ७३ ॥**
**त्रिधा द्व्यहं ज्वरयति दिनमेकं तु मुंचति।**

हाडें व मज्जा या दोहोंत दोष असल्यास चतुर्थकाच्या विपरीत लक्षणाचा एक प्रकारचा ताप येतो. यांत एक दिवस आड करून दोन दिवस सतत ताप येतो. हा वाताधिक, पित्ताधिक व कफाधिक असा तीन प्रकारचा आहे.

**बलाबलेन दोषाणामन्नचेष्टादिजन्मना ॥ ७४ ॥**
**ज्वरः स्यान्मनसस्तद्वत्कर्मणश्च तदा तदा।**
**दोषदूष्यर्त्वहोरात्रप्रभृतीनां बलाज्ज्वरः ॥ ७५ ॥**
**मानसो विषयाणां च कालं तं तं प्रपद्यते।**

आहारविहारांपासून होणाऱ्या वातादि दोषांच्या, मानसिक दोषांच्या व पूर्वजन्मार्जित कर्मांच्या शक्तितारतम्याप्रमाणें त्या त्या काळीं सततादि विषम ज्वर उत्पन्न होतात. वातादि दोष, रसादि दूष्यें, ऋतु, दिवस, रात्र, मनाची क्रिया व शब्दस्पर्शादि विषय यांच्या शक्त्यनुसार त्या त्या वेळीं तापाची पाळी येते.

**धातून् प्रक्षोभयन् दोषो मोक्षकाले विलीयते ॥ ७६ ॥**
**ततो नरः श्वसन् स्विद्यन् कूजन् वमति चेष्टते।**
**वेपते प्रलपत्युष्णैः शीतैश्चांगैर्हतप्रभः ॥ ७७ ॥**
**विसंज्ञो ज्वरवेगार्तः सक्रोध इव वीक्षते।**
**सदोषशब्दं च शकृद्द्रवं सृजति वेगवत् ॥ ७८ ॥**

ताप जातेवेळीं वातादि दोष धातूंस क्षुब्ध करून सूक्ष्मरूपानें लपून बसतात; त्या योगानें रोग्यास श्वास लागतो, घाम येतो, तो

कुंथतो, ओकतो, गडबडा लोळतो, कांपतो, बडबडतो, त्याचें कांहीं अंग ऊन लागतें व कांहीं थंड लागतें, तो निस्तेज होतो, बेशुद्ध होतो, तापाच्या जोरानें व्याकुळ होऊन रागावल्यासारखा दिसतो, शौचास वेगानें आमयुक्त व पातळ मळ होतो आणि शौचास होतांना शब्द होतो.

देहो लघुर्व्यपगतक्लममोहतापः
पाको मुखे करणसौष्ठवमव्यथत्वम् ।
स्वेदः क्षवः प्रकृतियोगि मनोऽन्नलिप्सा
कंडूश्च मूर्ध्नि विगतज्वरलक्षणानि ॥ ७९ ॥

शरीर हलकें वाटणें, ग्लानि, मोह व तप्तता हीं नाहींशीं होणें, तोंड येणें, इन्द्रियें तरतरीत असणें, कोणत्याही प्रकारची व्यथा नसणें, घाम व शिंका येणें, मन नेहमींच्या स्थितीवर येणें, अन्नावर वासना जाणें आणि डोक्यास खाज सुटणें हीं ताप गेल्याचीं लक्षणें होत.

---

## अध्याय ३ रा.

अथाऽतो रक्तपित्तकासनिदानं व्याख्यास्यामः ।

आतां रक्तपित्त व खोकला यांचें निदान सांगतों.

भृशोष्णतीक्ष्णकट्वम्ललवणादिविदाहिभिः ।
कोद्रवोद्दालकैश्चान्नैस्तद्युक्तैरतिसेवितैः ॥ १ ॥
कुपितं पित्तलैः पित्तं द्रवं रक्तं च मूर्छिते ।
ते मिथस्तुल्यरूपत्वमागम्य व्याप्नुतस्तनुम् ॥ २ ॥

अतिशय उष्ण, तीक्ष्ण, तिखट, आंबट, खारट, क्षारादिक व विदाही पदार्थ, हरीक व रानहरीक यांचे तांदूळ किंवा हे तांदूळ मिळवून केलेलीं अन्नें, यांच्या अतिशय सेवनानें, तसेंच पित्तकर पदार्थ फार खाल्ल्यानें, द्रव पित्त व रक्त कुपित होऊन एकमेकांत मिसळतात, आणि दोन्ही एकरूप होऊन सर्व शरीरभर पसरतात.

पित्तं रक्तस्य विकृतेः संसर्गाद्दूषणादपि ।
गंधवर्णानुवृत्तेश्च रक्तेन व्यपदिश्यते ॥ ३ ॥

पित्त, ही रक्ताची विकृति अर्थात् तें रक्तापासून उत्पन्न झालें असल्यामुळें, त्याचें रक्ताशीं मिश्रण झाल्यामुळें, रक्तदोषानें तें दूषित

होत असल्यामुळें आणि त्याचा वास व रंग हे रक्तासारखेच होत असल्यामुळें रक्त या शब्दानेंच त्याचा निर्देश करितात.

प्रभवत्यसृजः स्थानात्प्लीहतो यकृतश्च तत् ।

रक्ताचें स्थान, प्लीहा व यकृत् यांपासून तें पित्त अधिक उत्पन्न होतें.

शिरोगुरुत्वमरुचिः शीतेच्छा धूमकोऽम्लकः ॥ ४ ॥
छर्दिश्छर्दितबैभत्स्यं कासः श्वासो भ्रमः क्लमः ।
लोहलोहितमत्स्यामगंधास्यत्वं स्वरक्षयः ॥ ५ ॥
रक्तहारिद्रहरितवर्णता नयनादिषु ।
नीललोहितपीतानां वर्णानामविवेचनम् ॥ ६ ॥
स्वप्ने तद्वर्णदर्शित्वं भवत्यस्मिन्भविष्यति ।

डोकें जड होणें, अरुचि, थंड पदार्थांची इच्छा, घशांत जळजळ होणें, आंबट ढेंकर येणें, उलटी होणें, वांति चमत्कारिक असणें, खोकला, दमा, भ्रम व ग्लानि; तोंडास लोखंड, रक्त, मासे यांच्यासारखी किंवा आंबुस घाण येणें; आवाज बसणें; डोळे, तोंड, त्वचा, मळ, मूत्र व नखें यांचा रंग तांबडा, पिंवळा किंवा हिरवा होणें; निळा, तांबडा व पिंवळा हे रंग ओळखतां न येणें (ते तांबडे आहेत असेंच वाटणें) आणि स्वप्नांत तांबड्या रंगाचे पदार्थ दिसणें, हीं लक्षणें रक्तपित्त होण्यापूर्वी होतात.

ऊर्ध्वं नासाक्षिकर्णास्यैर्मेढ्रयोनिगुदैरधः ॥ ७ ॥
कुपितं रोमकूपैश्च समस्तैस्तत्प्रवर्तते ।

कुपित झालेलें ऊर्ध्वगामी रक्तपित्त नाक, डोळे, कान व तोंड या चार मार्गांनीं बाहेर पडतें. अधोगामी रक्तपित्त शिस्न, योनि व गुद या मार्गांनीं बाहेर पडतें, आणि उभयगामी रक्तपित्त संपूर्ण रोमरन्ध्रांतून, तसेंच वर सांगितलेल्या खालच्या व वरच्या सर्व मार्गांनीं बाहेर पडतें.

ऊर्ध्वं साध्यं कफाद्यस्मात्तद्विरेचनसाधनम् ॥ ८ ॥
बह्वौषधं च पित्तस्य विरेको हि वरौषधम् ।
अनुबंधी कफो यश्च तत्र तस्यापि शुद्धिकृत् ॥ ९ ॥
कषायाः स्वादवोऽप्यस्य विशुद्धश्लेष्मणो हिताः ।
किमु तिक्ताः कषाया वा ये निसर्गात्कफापहाः ॥ १० ॥

ऊर्ध्वगामी रक्तपित्त कफापासून होतें व तें साध्य आहे. कारण त्यावर विरेचनचिकित्सा देतां येते आणि त्यावर औषधेंही पुष्कळ आहेत. विरेचन हें पित्तावर उत्तम औषध आहे, आणि त्यास ज्याचें बळ असतें त्या कफाचेंही शोधन या विरेचनानें होतें. ज्याच्या कफाचें शोधन झालें आहे अशा रोग्यास मधुर गणांतील औषधींचेही काढे हितकर होतात; मग स्वभावतःच कफनाशक असलेले कडू व तुरट औषधांचे काढे हितकर होतील यांत नवल कसलें?

अधो याप्यं चलाद्यस्मात्तत्प्रच्छर्दनसाधनम् ।
अल्पौषधं च पित्तस्य वमनं न वरौषधम् ॥ ११ ॥
अनुबंधी चलो यश्च शांतयेऽपि न तस्य तत् ।
कषायाश्च हितास्तस्य मधुरा एव केवलम् ॥ १२ ॥

अधोगामी रक्तपित्त याप्य आहे. कारण तें वायूपासून होतें व त्यावर वमनचिकित्सा करावयाची असते. दुसरें, त्यावर औषधेंही थोडींच आहेत, आणि वमन हें पित्तावर फारसें चांगलें औषध नाहीं. शिवाय यांत पित्तास पाठबळ देणारा जो वायु असतो त्याचेंही शमन वमनानें होत नाहीं, आणि वर सांगितलेले तुरट व कडू काढे वातप्रकोपक असल्यामुळें यांत त्यांचा उपयोग होत नाहीं. म्हणून फक्त मधुर औषधांचेच काढे यावर हितकर होतात.

कफमारुतसंसृष्टमसाध्यमुभयायनम् ।
अशक्यप्रातिलोम्यत्वादभावादौषधस्य च ॥ १३ ॥
न हि संशोधनं किंचिदस्त्यस्य प्रतिलोमगम् ।
शोधनं प्रतिलोमं च रक्तपित्ते भिषग्जितम् ॥ १४ ॥
एवमेवोपशमनं सर्वशो नास्य विद्यते ।
संसृष्टेषु हि दोषेषु सर्वजिच्छमनं हितम् ॥ १५ ॥

उभयमार्गी रक्तपित्तांत कफ व वायु या दोहोंचा संसर्ग असतो. आणि दोन्ही मार्ग चालू असल्यामुळें दोहोंची विपरीत क्रिया म्हणजे खालचें वर व वरचें खालीं करणें अशक्य असल्यामुळें व याशिवाय दुसरें कांहीं औषध यावर उपयोगीं पडणारें नसल्यामुळें हें असाध्य असतें. उलट मार्गानें प्रवृत्ति करून शोधन करणारें असें जें औषध असेल तेंच रक्तपित्तावर उपयोगीं पडतें.

आणि उभयमार्गी रक्तपित्तांत अशा प्रकारचें विपरीत संशोधन असणें शक्य नाहीं, म्हणून तें असाध्य म्हटलें आहे. जसें याचें संशोधन करणारें औषध नाहीं, तसेंच सर्वांशीं शमन करणारेंही औषध नाहीं. कारण यांत तिन्ही दोष एकत्र झालेले असतात. तेव्हां तिहींचें एकदम शमन करणारें औषध पाहिजे. ( तसें असणें शक्य नाहीं. कारण एका दोषाचें शमन करूं गेलें असतां दुसऱ्याचा कोप होतो. ) म्हणून उभयगामी रक्तपित्त असाध्य होय.

तत्र दोषानुगमनं सिरास्त्र इव लक्षयेत् ।
उपद्रवांश्च विकृतिज्ञानतः

रक्तपित्तांत वातादि दोषांचा संबंध, सूत्रस्थानांत सिराव्यधविधि-अध्यायांत शिरेंतून निघणाऱ्या रक्ताचीं जीं दोषविवेचक लक्षणें सांगितलीं आहेत त्यांवरून समजून घ्यावा. तसेच रक्तपित्तांतील उपद्रव विकृतिविज्ञानीय शारीरांत सांगितले आहेत, त्यावरून समजावे.

तेषु चाधिकम् ॥ १६ ॥
आशुकारी यतः कासस्तमेवाऽतः प्रवक्ष्यति ।

त्यांपैकीं खोकल्याचा उपद्रव फार होतो आणि तो फार लवकर आपली क्रिया करितो, म्हणून त्याचेंच निरूपण येथें विशेषतः करितों.

पंच कासाः स्मृता वातपित्तश्लेष्मक्षतक्षयैः ॥ १७ ॥
क्षयायोपेक्षिताः सर्वे बलिनश्चोत्तरोत्तरम् ।

वातापासून, पित्तापासून, कफापासून, क्षतापासून व क्षयापासून असे पांच प्रकारचे खोकले आहेत. हे उत्तरोत्तर एकापेक्षां एक बलवान् आहेत आणि कोणत्याही प्रकारचा खोकला असला तरी त्याची हयगय केली असतां तो क्षयावर जाऊन ठेपतो.

तेषां भविष्यतां रूपं कंठे कंडूररोचकम् ॥ १८ ॥
शूकपूर्णाभकंठत्वम्

खोकला होण्यापूर्वी घशांत कंड सुटणें, अरुचि व घशांत धान्याचीं कुसें अडकल्यासारखें वाटणें हीं लक्षणें होतात.

तत्राधो विहतोऽनिलः ।
ऊर्ध्वं प्रवृत्तः प्राप्योरस्तस्मिन् कंठे च संसजन् ॥ १९ ॥
शिरःस्रोतांसि संपूर्य ततोऽगान्युत्क्षिपन्निव ।

क्षिपन्निवाक्षिणी पृष्ठमुरःपार्श्वे च पीडयन् ॥ २० ॥
प्रवर्तते स वक्त्रेण भिन्नकांस्योपमध्वनिः ।
हेतुभेदात्प्रतीघातभेदो वायोः सरंहसः ॥ २१ ॥
यद्रुजाशब्दवैषम्यं कासानां जायते ततः ।

त्यांत खालून कोंडलेला वायु वरच्या बाजूस उलटून छातींत येऊन, घशांत अडकून मस्तकांतील शिरांत भरतो. त्यामुळें अंग वर फेंकल्यासारखें वाटतें व डोळे बाहेर फेंकल्यासारखे वाटतात. तो वायु पाठींत, छातींत व बरगडयांत पीडा करून फुटक्या कांशाच्या भांडयाच्या नादासारखा शब्द करीत तोंडांतून बाहेर पडतो. कारणभेदाप्रमाणें वेगानें बाहेर पडणाऱ्या वायूचे आघातही भिन्न भिन्न प्रकारचे होतात. आणि म्हणूनच निरनिराळया खोकल्यांत पीडा व शब्द निरनिराळया प्रकारचेच होतात.

कुपितो वातलैर्वातः शुष्कोरःकंठवक्त्रताम् ॥ २२ ॥
हृत्पार्श्वोरःशिरःशूलं मोहक्षोभस्वरक्षयान् ।
करोति शुष्कं कासं च महावेगरुजास्वनम् ॥ २३ ॥
सोऽगहर्षी कफं शुष्कं कृच्छ्रान्मुक्त्वाऽल्पतां व्रजेत् ।

फार वातुळ पदार्थांनीं कुपित झालेला वायु छाती, घसा व तोंड यांना कोरड; हृदय, बरगडया, छाती व डोकें यांत शूळ; मोह, अन्तःक्षोभ, स्वरक्षीणता व कोरडी ढांस उत्पन्न करितो. त्या ढांसेचा वेग, पीडा व शब्द हे मोठे असतात; अंगावर रोमांच उभे राहतात, आणि मोठ्या कष्टानें कोरडा कफ पडला म्हणजे वायूचा जोर कमी होतो.

पित्तात्पीताक्षिकफता तिक्तास्यत्वं ज्वरो भ्रमः ॥ २४ ॥
पित्तासृग्वमनं तृष्णा वैस्वर्यं धूमको मदः ।
प्रततं कासवेगेन ज्योतिषामिव दर्शनम् ॥ २५ ॥

पित्ताच्या खोकल्यांत डोळे व कफ पिंवळे होतात, तोंड कडू होतें; ताप, भ्रम, पित्ताची व रक्ताची उलटी, तहान, स्वर बिघडणें, घशांत जळजळणें, मूर्च्छा आणि डोळ्यापुढें काजवे दिसणें, हीं लक्षणें होतात.

कफादुरोऽल्परुङ्मूर्ध्नि हृदयं स्तिमितं गुरु ।
कंठोपलेपः सदनं पीनसच्छर्द्यरोचकाः ॥ २६ ॥

रोमहर्षो घनस्निग्धश्वेतश्लेष्मप्रवर्तनम् ।

कफजन्य खोकल्यांत छातींत किंचित् दुखणें, डोकें व हृदय स्तब्ध व जड होणें, घशास चिकटा बसणें, हातपाय गळणें, पीनस, उलटी, अरुचि, रोमांच उभे राहणें; आणि दाट, चिकट व पांढरा कफ पडणें हीं लक्षणें होतात.

युद्धाद्यैः साहसैस्तैस्तैः सेवितैरयथाबलम् ॥ २७ ॥
उरस्यंतःक्षते वायुः पित्तेनानुगतो बली ।
कुपितः कुरुते कासं कफं तेन सशोणितम् ॥ २८ ॥
पीतं श्यामं च शुष्कं च ग्रथितं कुथितं बहु ।
ष्ठीवेत्कंठेन रुजता विभिन्नेनेव चोरसा ॥ २९ ॥
सूचीभिरिव तीक्ष्णाभिस्तुद्यमानेन शूलिना ।
पर्वभेदज्वरश्वासतृष्णावैस्वर्यकंपवान् ॥ ३० ॥
पारावत इवाकूजन् पार्श्वशूली ततोऽस्य च ।
क्रमाद्वीर्यं रुचिः पक्तिर्बलं वर्णश्च हीयते ॥ ३१ ॥
क्षीणस्य सासृङ्मूत्रत्वं स्याच्च पृष्ठकटीग्रहः ।

कुस्ती वगैरे पूर्वोक्त साहसाचीं कामें आपल्या शक्तीच्या बाहेर केल्यानें उरांत क्षत होतें. त्या योगानें वायु कुपित होऊन पित्ताच्या मदतीनें बलवान् होऊन खोकला उत्पन्न करितो. त्यांत रक्तमिश्रित पिंवळा, काळा, कोरडा, गांठळलेला व कुजलेला असा पुष्कळ कफ पडतो, घसा दुखतो, छाती फाटल्यासारखी वाटते, तींत तीक्ष्ण सुया टोंचल्याप्रमाणें वेदना होतात, शूळ होतो, पेरें फुटतात; ताप, दमा, तहान, स्वर बिघडणें व कंप हीं लक्षणें होतात, पारव्याच्या शब्दासारखा घशांतून आवाज निघत असतो, बरगड्या दुखतात, हळू हळू वीर्य, रुचि, पचनशक्ति, अंगशक्ति व कांति हीं क्षीण होतात, आणि अशा तऱ्हेनें तो क्षीण झाला म्हणजे त्यास रक्तमिश्रित लघ्वी होते, त्याची आणि पाठ व कंबर धरते.

वायुप्रधानाः कुपिता धातवो राजयक्ष्मिणः ॥ ३२ ॥
कुर्वंति यक्ष्मायतनैः कासं ष्ठीवेत्कफं ततः ।
पूतिपूयोपमं पीतं विस्रं हरितलोहितम् ॥ ३३ ॥
लुंच्येते इव पार्श्वे च हृदयं पततीव च ।
अकस्मादुष्णशीतेच्छा बह्वाशित्वं बलक्षयः ॥ ३४ ॥

स्निग्धप्रसन्नवक्त्रत्वं श्रीमद्दर्शननेत्रता ।
ततोऽस्य क्षयरूपाणि सर्वाण्याविर्भवंति च ॥ ३५ ॥
इत्येष क्षयजः कासः क्षीणानां देहनाशनः ।
याप्यो वा बलिनां तद्वत् क्षतजोऽभिनवौ तु तौ ॥ ३६ ॥
सिध्येतामपि सानाथ्यात्

राजयक्ष्मनिदानांत सांगितलेल्या क्षयाच्या साहसादि कारणांनीं क्षयरोग्याचे कुपित झालेले वातप्रधान दोष खोकला उत्पन्न करितात. त्यांत घाणेरडा, पुवासारखा पिंवळा, दुर्गंधी, हिरवा, तांबडा असा कफ पडतो; बरगड्या उपटून काढल्याप्रमाणें वाटतात, हृदय पडतेंच कीं काय असें वाटतें, कारणावांचून उष्णाची किंवा थंडाची इच्छा होते, रोगी फार खातो; शक्ति क्षीण होते; तोंड तुकतुकीत व प्रफुल्लित दिसतें आणि दांत व डोळे शोभिवंत दिसतात. त्यानंतर रोग्यावर क्षयाचीं सर्व लक्षणें दिसूं लागतात. हे क्षयापासून व क्षतापासून होणारे खोकले क्षीण मनुष्यांस झाले असतां त्यांचा नाश करितात. बलवान् मनुष्यांस झाले असतां ते याप्य असतात, आणि ते नुक्तेच झालेले असून जर वैद्य, औषध, रोगी व परिचारक यांची अनुकूलता असली, तर साध्य होतात.

साध्या दोषैः पृथक्त्रयः ।
मिश्रा याप्या द्वयात्सर्वे जरसा स्थविरस्य च ॥ ३७ ॥

एकदोषज खोकला साध्य आणि द्विदोषज व म्हाताऱ्यास म्हातारपणामुळें झालेला खोकला याप्य होय.

कासाच्छ्वासक्षयच्छर्दिस्वरसादादयो गदाः ।
भवंत्युपेक्षया यस्मात्तस्मात्तं त्वरया जयेत् ॥ ३८ ॥

खोकल्यावर औषधोपचाराची हयगय केल्यानें दमा, क्षय, वांति, आवाज बसणें इत्यादि अनेक दुर्धर रोग होतात. म्हणून खोकला झाल्यास तो सत्वर बरा करावा.

## अध्याय ४ था.

अथाऽतः श्वासहिध्मानिदानं व्याख्यास्यामः ।

आतां दमा व उचकी यांचें निदान सांगतों.

कासवृद्ध्या भवेच्छ्वासः पूर्वैर्वा दोषकोपनैः ।
आमातिसारवमथुविषपांडुज्वरैरपि ॥ १ ॥
रजोधूमानिलैर्मर्मघातादतिहिमांबुना ।
क्षुद्रकस्तमकच्छिन्नो महानूर्ध्वश्च पंचमः ॥ २ ॥

खोकला वाढल्यानें, निदानाच्या पहिल्या अध्यायांत सांगितलेल्या दोषप्रकोपक कारणांनीं, त्याचप्रमाणें आमातिसार, वांति, विष, पांडु व ताप या रोगांनीं, तसेंच धूळ, धूर व वारा यांच्या अतिसेवनानें, मर्मावर लागल्यानें व अतिशय थंड पाणी प्याल्यानें दमा उत्पन्न होतो. त्याचे क्षुद्र, तमक, छिन्न, महान् व ऊर्ध्व असे पांच प्रकार आहेत.

कफोपरुद्धगमनः पवनो विष्वगास्थितः ।
प्राणोदकान्नवाहीनि दुष्टः स्रोतांसि दूषयन् ॥ ३ ॥
उरःस्थः कुरुते श्वासमामाशयसमुद्भवम् ।

उरांत राहून सर्व शरीर व्यापणाऱ्या व्यान वायूची गति कफानें बंद झाली असतां तो वायु दूषित होऊन प्राणवाहक, उदकवाहक व अन्नवाहक स्रोतांस दूषित करून दमा उत्पन्न करितो. हा आमाशयाच्या विकारापासून उत्पन्न होतो.

प्राग्रूपं तस्य हृत्पार्श्वशूलं प्राणविलोमता ॥ ४ ॥
आनाहः शंखभेदश्च

हृदयांत व बरगडच्यांत शूल, श्वासोच्छ्वास नेहमींप्रमाणें न चालणें, पोटफुगी व आंखांत फुटण हें दम्याचें पूर्वरूप होय.

तत्रायासातिभोजनैः ।
प्रेरितः प्रेरयेत् क्षुद्रं स्वयंसंशमनं मरुत् ॥ ५ ॥

त्यांत श्रम व अतिशय जेवण यांनीं चाळवलेला वायु क्षुद्रश्वास उत्पन्न करितो. हा क्षुद्र श्वास कांहीं वेळानें आपोआपच शांत होतो.

प्रतिलोमं सिरा गच्छन्नुदीर्य पवनः कफम् ।
परिगृह्य शिरोग्रीवमुरः पार्श्वे च पीडयन् ॥ ६ ॥
कासं घुर्घुरकं मोहमरुचिं पीनसं तृषम् ।
करोति तीव्रवेगं च श्वासं प्राणोपतापिनम् ॥ ७ ॥
प्रताम्येत्तस्य वेगेन निष्ठ्यूतांते क्षणं सुखी ।
कृच्छ्राच्छयानः श्वसिति निषण्णः स्वास्थ्यमृच्छति ॥८॥

उच्छ्रिताक्षो ललाटेन स्विद्यता भृशमर्तिमान् ।
विशुष्कास्यो मुहुः श्वासी कांक्षत्युष्णं सवेपथुः ॥ ९ ॥
मेघांबुशीतप्राग्वातैः श्लेष्मलैश्च विवर्धते ।
स याप्यस्तमकः साध्यो नवो वा बलिनो भवेत् ॥ १० ॥

वायु शिरांत उलट मार्गानें संचार करून, कफास वर ढकलून डोकें व मान जखडून धरून, छातीस व बरगडयांस वेदना उत्पन्न करून खोकला, घुरघूर, मोह, अरुचि, पीनस, तहान आणि मोठ्या जोराचा व जिवास अतिशय क्लेश देणारा असा श्वास उत्पन्न करितो. हा दमा चाळवला असतां मनुष्य अतिशय तळमळतो, आणि कफाचा बेडका पडल्यावर त्यास क्षणभर बरें वाटतें. तो निजला असतां त्यास श्वास टाकतांना कष्ट होतात आणि बसला असतां बरें वाटतें. तो वर पाहतो, त्याच्या कपाळास घाम येतो, अतिशय वेदना होतात, तोंड सुकतें, वरचेवर दम लागतो, उष्णाची इच्छा होते व कंप येतो; ढग आले असतां, पाऊस पडत असतां, थंड ऋतूंत, पूर्वे-कडील वाऱ्यानें आणि कफकारक पदार्थ खाल्ल्यानें हा वाढतो. हा तमक श्वास याप्य आहे. बलवान् मनुष्यास नवीनच झाला असल्यास मात्र साध्य होण्याचा संभव असतो.

ज्वरमूर्च्छायुतः शीतैः शाम्येत्प्रतमकस्तु सः ।

तोच तमकश्वास ज्वर व मूर्च्छा यांनीं युक्त असून थंड उपचारांनीं कमी होत असल्यास त्यास प्रतमक असें म्हणतात.

छिन्नाच्छ्वसिति विच्छिन्नं मर्मच्छेदरुजार्दितः ॥ ११ ॥
सस्वेदमूर्च्छः सानाहो बस्तिदाहनिरोधवान् ।
अधोदृग्विप्लुताक्षश्च मुह्यन् रक्तैकलोचनः ॥ १२ ॥
शुष्कास्यः प्रलपन् दीनो नष्टच्छायो विचेतनः ।

छिन्नश्वासांत मनुष्य राहून राहून श्वास टाकितो, मर्मस्थानांत कापल्यासारखी पीडा होते, घाम येतो, मूर्च्छा येते, पोट फुगतें, बस्तींत दाह होतो, लघ्वी बंद होते, दृष्टि खालीं जाते, डोळे पाण्यानें भरतात; घेरी येते, डोळे लालभडक होतात, तोंडास कोरड पडते, बडबडतो, दीन व निस्तेज होतो आणि निचेष्ट पडून राहतो.

महता महता दीनो नादेन श्वसिति कथन् ॥ १३ ॥
उद्धूयमानः संरब्धो मत्तर्षभ इवानिशम् ।
प्रनष्टज्ञानविज्ञानो विभ्रांतनयनाननः ॥ १४ ॥
वक्षः समाक्षिपन् बद्धमूत्रवर्चा विशीर्णवाक् ।
शुष्ककंठो मुहुर्मुहुर्मुह्यन् कर्णशंखशिरोऽतिरुक् ॥ १५ ॥

महाश्वासांत मनुष्य दीन होतो. श्वास टाकतांना मोठा शब्द करितो, कुंथतो, एकसारखा चवताळलेल्या उन्मत्त बैलासारखा उसळत असतो, त्याचें व्यावहारिक ज्ञान व विचार नाहींसा होतो, डोळे व तोंड विक्षिप्तासारखीं दिसतात, छातींत धडधडतें, मलमूत्रांचा अवरोध होतो, बोलतांना अडखळतो, घसा सुकतो, वरचेवर मोह उत्पन्न होतो आणि कान, आंख व डोकें यांत पीडा होते.

दीर्घमूर्ध्वं श्वसित्यूर्ध्वान्न च प्रत्याहरत्यधः ।
श्लेष्मावृतमुखस्रोताः क्रुद्धगंधवहार्दितः ॥ १६ ॥
ऊर्ध्वदृग्वीक्षते भ्रांतमक्षिणी परितः क्षिपन् ।
मर्मसु च्छिद्यमानेषु परिदेवी निरुद्धवाक् ॥ १७ ॥

ऊर्ध्व श्वासांत मनुष्य श्वास लांब बाहेर टाकतो, परंतु त्याला परत आंत श्वास घेतां येत नाहीं. त्याच्या स्रोतांचीं तोंडें कफानें बंद होतात, तो प्रकुपित वायूनें पीडला जातो, त्याची दृष्टि वर असते, इकडे तिकडे डोळे फिरवून बावरल्याप्रमाणें पाहतो, मर्मस्थानांत कापल्यासारख्या वेदना होतात आणि शब्द आंत ओढतो.

एते सिद्ध्येयुरव्यक्ताः व्यक्ता प्राणहरा ध्रुवम् ।

जोंपर्यंत सर्व लक्षणें स्पष्टपणें उद्भवलीं नाहींत, तोंपर्यंत हे तमकादि श्वास साध्य असतात. आणि एकदां सर्व लक्षणें स्पष्ट झालीं कीं ते रोग्याचा खचित प्राण घेतात.

श्वासैकहेतुप्राग्रूपसंख्याप्रकृतिसंश्रयाः ॥ १८ ॥
हिध्मा भक्तोद्भवा क्षुद्रा यमला महतीति च ।
गंभीरा च

जीं कारणें, पूर्वरूपें, संख्या, प्रकृति व स्थानें श्वासाचीं सांगितलीं आहेत, तींच उचकीचींही असतात. उचकीचे भक्तोद्भवा, क्षुद्रा, यमला, महती व गंभीरा असे पांच प्रकार आहेत.

मरुत्तत्र त्वरयाऽयुक्तिसेवितैः ॥ १९ ॥
रूक्षतीक्ष्णखरासात्म्यैरन्नपानैः प्रपीडितः ।

करोति हिध्मामरुजां मंदशब्दां क्षवानुगाम् ॥ २० ॥
शमं सात्म्यान्नपानेन या प्रयाति च साऽन्नजा ।

रूक्ष, तीक्ष्ण, जाडें-भरडें व असात्म्य अन्नपान घाईघाईनें व यथेच्छ सेवन केल्यानें वायु पीडित होऊन उचकी उत्पन्न करितो. या उचकींत पीडा होत नाहीं, शब्द मंद असतो, ती शिंके-बरोबर येते आणि सात्म्य अन्नपानानें बंद होते. हीस अन्नजा म्हणतात.

आयासात्पवनः क्षुद्रः क्षुद्रां हिध्मां प्रवर्तयेत् ॥ २१ ॥
जत्रुमूलप्रविसृतामल्पवेगां मृदुं च सा ।
वृद्धिमायास्यतो याति भुक्तमात्रे च मार्दवम् ॥ २२ ॥

श्रमाच्या योगानें वायु किंचित् कुपित होऊन क्षुद्रा नांवाची उचकी उत्पन्न करितो. ही जत्रूच्या मुळापासून उत्पन्न होते, हिचा वेग थोडा असतो, ही फारशी पीडा करीत नाहीं, श्रम केले असतां वाढते, आणि जेवल्याबरोबर कमी होते.

चिरेण यमलैर्वेगैराहारे या प्रवर्तते ।
परिणामोन्मुखे वृद्धिं परिणामे च गच्छति ॥ २३ ॥
कंपयंती शिरो ग्रीवामाध्मातस्याततितृष्यतः ।
प्रलापच्छर्द्यतीसारनेत्रविप्लुतजृंभिणः ॥ २४ ॥
यमला वेगिनी हिध्मा परिणामवती च सा ।

आहाराचें पचन होऊं लागण्याच्या संधीस ज्या उचकीचे वेग जोडीजोडीनें व सावकाश येतात, व जी पचन झाल्यावर वाढते, जींत डोकें व मान हीं कांपतात, पोट फुगतें, अतिशय तहान लागते, मनुष्य बडबडतो, वांति व जुलाब होतात, डोळे कावरेबावरे होतात व जांभया येतात, तीस यमला, वेगिनी व परिणामवती हीं सार्थ नांवें दिलीं आहेत.

स्तब्धभ्रूशंखयुग्मस्य सास्रविप्लुतचक्षुषः ॥ २५ ॥
स्तंभयंती तनुं वाचं स्मृतिं संज्ञां च मुष्णती ।
रुंधती मार्गमन्नस्य कुर्वंती मर्मघट्टनम् ॥ २६ ॥
पृष्ठतो नमनं शोषं महाहिध्मा प्रवर्तते ।
महामूला महाशब्दा महावेगा महाबला ॥ २७ ॥

महती नांवाच्या उचकींत भिंवया व आंख ताठतात, डोळे पाण्यानें भरतात व गढूळ होतात, शरीर निश्चेष्ट होतें, वाचा बंद

होते, स्मृति व शुद्धि नाहींशी होते, अन्नमार्ग बंद होतात, हृद्यादि मर्मांस धक्का बसतो, रोगी पाठीच्या बाजूनें वांकतो, आणि शरीर शुष्क होतें. हिचें उत्पत्तिकारण, शब्द, वेग व बल हीं मोठीं असतात.

पक्वाशयाद्वा नाभेर्वा पूर्ववद्या प्रवर्तते ।
तद्रूपा सा मुहुः कुर्याज्जृंभामंगप्रसारणम् ॥ २८ ॥
गंभीरेणानुनादेन गंभीरा

गंभीरा नांवाची उचकी पक्वाशयांतून किंवा नाभिस्थानापासून उत्पन्न होते, आणि तिचा उत्पत्तिप्रकार व लक्षणें हीं महती नांवाच्या उचकीसारखींच असतात. विशेष एवढाच कीं, हींत वरचेवर जांभया येतात व रोगी हात पाय ताणून आळस देतो. हिच्या मागून गंभीर नाद होतो म्हणून हीस गंभीरा असें म्हणतात.

तासु साधयेत् ।
आद्ये द्वे वर्जयेदंत्ये सर्वलिंगां च वेगिनीम् ॥ २९ ॥
सर्वाश्च संचितामस्य स्थविरस्य व्यवायिनः ।
व्याधिभिः क्षीणदेहस्य भक्तच्छेदक्षतस्य वा ॥ ३० ॥

सदरहूपैकीं पहिल्या दोन उचक्या अन्नजा व क्षुद्रा या साध्य आहेत. शेवटच्या दोन महती व गंभीरा असाध्य समजून सोडून द्याव्या. तशीच बाकी राहिलेली यमला सर्वलक्षणयुक्त असल्यास तीही असाध्यच समजावी. तसेंच ज्याचा पुष्कळ दिवसांचा आम सांचला आहे असा मनुष्य, म्हातारा, फार स्त्रीसंग करणारा, रोगांनीं ज्याचें शरीर क्षीण झालें आहे असा, आणि अन्न तुटल्यामुळें क्षीण झालेला, अशा मनुष्यास कोणत्याही प्रकारची उचकी लागली तरी ती असाध्य समजावी.

सर्वेऽपि रोगा नाशाय न त्वेवं शीघ्रकारिणः ।
हिध्माश्वासौ यथा तौ हि मृत्युकाले कृतालयौ ॥ ३१ ॥

सर्वच रोग प्राणनाशक आहेत खरे, परंतु त्यांची क्रिया उचकी व दमा यांच्या इतकी जलद घडत नाहीं. मरणकाळीं तर ते जणुं काय मनुष्याच्या शरीरांत घरच करून राहतात.

---

# अध्याय ५ वा.

अथाऽतो राजयक्ष्मादिनिदानं व्याख्यास्यामः ।

आतां क्षय वगैरे रोगांचें निदान सांगतों.

अनेकरोगानुगतो[1] बहुरोगपुरोगमः ।
राजयक्ष्मा क्षयः शोषो रोगराडिति च स्मृतः ॥ १ ॥

क्षयरोग हा पुष्कळ रोगांच्या मागून उत्पन्न होतो व तो होतांच त्याच्या अंगभूत असे पुष्कळसे रोग उपद्रवाप्रमाणें उत्पन्न होतात. यास राजयक्ष्मा, क्षय, शोष व रोगराज अशीं नांवें आहेत.

नक्षत्राणां[2] द्विजानां च राज्ञोऽभूद्यदयं पुरा ।
यच्च राजा च यक्ष्मा च राजयक्ष्मा ततो मतः ॥ २ ॥
देहौषधक्षयकृतेः क्षयस्तत्संभवाच्च सः ।
रसादिशोषणाच्छोषो रोगराट् तेषु राजनात् ॥ ३ ॥

हा पूर्वकाळीं नक्षत्रें व ब्राह्मण यांचा राजा जो चंद्र त्यास झाला होता. तसेंच हा सर्व रोगांचा राजा आहे; म्हणून यास राजयक्ष्मा असें म्हणतात. हा शरीर व औषधें यांचा क्षय करितो म्हणजे हीं दोन्ही संपलीं तरी हा बरा होत नाहीं; म्हणून, तसेंच यांच्या क्षयापासून हा उत्पन्न होतो म्हणून यास क्षय असें म्हणतात. हा रसादि धातूंस शोषून टाकितो, म्हणून यास शोष असें म्हणतात आणि सर्व रोगांत श्रेष्ठ असल्यामुळें रोगराज असें म्हणतात.

साहसं वेगसंरोधः शुक्रौजःस्नेहसंक्षयः ।
अन्नपानविधित्यागश्चत्वारस्तस्य हेतवः ॥ ४ ॥

---

१ क्षयरोग हा स्वतंत्र असा रोग नसून पुष्कळ रोगांचें मिश्रण आहे, असें या दोन विशेषणांवरून सुचविलें आहे. तरी पण याच्या चिकित्सेची पद्धति फार च निराळी असल्यामुळें याचें निराळें वर्णन केलें आहे.

२ चंद्र आपली स्त्री रोहिणी इच्या ठायीं अत्यासक्त झाल्यामुळें त्याचा सासरा जो दक्षप्रजापति त्यास राग येऊन त्यानें हा रोग उत्पन्न केला, असें टीकाकारानें लिहिलें आहे. कित्येक ठिकाणीं चंद्रानें गुरुपत्नीशीं संग केल्यामुळें त्याला हा रोग उत्पन्न झाला असेंही लिहिलें आहे.

साहसाचीं कामें करणें; मलमूत्रादिकांचे वेग आवरून धरणें; वीर्य, ओज व शरीरांतील स्निग्धता यांचा क्षय होणें आणि शास्त्रीय विधि सोडून मनास वाटेल तसें अन्नपान सेवन करणें हीं क्षयाचीं चार मुख्य कारणें आहेत.

तैरुदीर्णोऽनिलः पित्तं कफं चोदीर्य सर्वतः ।
शरीरसंधीनाविश्य तान् सिराश्च प्रपीडयन् ॥ ५ ॥
मुखानि स्रोतसां रुद्ध्वा तथैवातिविवृत्य च ।
सर्पन्नूर्ध्वमधस्तिर्यग्यथास्वं जनयेद्गदान् ॥ ६ ॥

या कारणांनीं वाढलेला वायु पित्तास स्वस्थानांतून व कफास सर्व शरीरांतून चाळवून शरीराच्या सर्व सांध्यांत शिरून, सांधे व सर्व शिरा यांस घुसळून, स्रोतांचीं तोंडें बंद करून किंवा अतिशय मोठीं करून, वर, खालीं व आडवा अशा रीतीनें शरीरभर संचार करून त्या त्या भागांत निरनिराळे विकार उत्पन्न करितो.

रूपं भविष्यतस्तस्य प्रतिश्यायो भृशं क्षवः ।
प्रसेको मुखमाधुर्यं सदनं वह्निदेहयोः ॥ ७ ॥
स्थाल्यमत्रान्नपानादौ शुचावप्यशुचीक्षणम् ।
मक्षिकातृणकेशादिपातः प्रायोऽन्नपानयोः ॥ ८ ॥
हृल्लासश्छर्दिररुचिरश्नतोऽपि बलक्षयः ।
पाण्योरवेक्षा पादास्यशोफोऽक्ष्णोरतिशुक्लता ॥ ९ ॥
बाह्वोः प्रमाणजिज्ञासा काये बैभत्स्यदर्शनम् ।
स्त्रीमद्यमांसप्रियता घृणित्वं मूर्धगुंठनम् ॥ १० ॥
नखकेशातिवृद्धिश्च स्वप्ने चाभिभवो भवेत् ।
पतंगकृकलासाहिकपिश्वापदपक्षिभिः ॥ ११ ॥
केशास्थितुषभस्मादिराशौ समधिरोहणम् ।
शून्यानां ग्रामदेशानां दर्शनं शुष्यतोऽम्भसः ॥ १२ ॥
ज्योतिर्गिरीणां पततां ज्वलतां च महीरुहाम् ।

क्षयरोग होण्यापूर्वीं पडसें, अतिशय शिंका येणें, लाळ गळणें, तोंड गुळमट होणें, अग्नि मंद होणें, शरीर अशक्त होणें, भांडीं व व खाण्यापिण्याचे पदार्थ स्वच्छ असतांही घाणेरडे दिसणें, खाण्यापिण्याच्या पदार्थांत बहुतकरून माशा, गवत, केंस वगैरे पडणें, मळमळ, वांति, अरुचि, चांगल्या रीतीनें खातपीत असूनही अंगांत शक्ति नसणें, आपले हात पाहणें, पाय व तोंड

सुजणें, डोळे फटफटीत होणें, आपले दंड किती मोठे आहेत हें वारंवार जाणण्याची इच्छा होणें, स्वतःचें शरीर चांगलें असतांही तें वाईट दिसणें; बायका, दारू व मांस यांवर फार प्रीति बसणें, अंगीं दयाळूपणा वाढणें, डोक्यास नेहमीं कांहीं तरी वस्त्र गुंडाळणें, नखें व केंस अतिशय वाढणें; स्वप्नांत पतंग, सरडा, साप, वानर, पशु व पक्षी यांच्या हातून पराभव पावणें; केंस, हाडें, कोंडा, राख यांच्या राशीवर चढणें; ओसाड गांव व देश, आटलेलें पाणी, तारे व पर्वत यांचें पडणें, आणि पेटत असलेलीं झाडें पाहणें हीं लक्षणें होतात.

पीनसश्वासकासांऽसमूर्धस्वररुजोऽरुचिः ॥ १३ ॥
ऊर्ध्वं विड्भ्रंशसंशोषावधश्छर्दिश्च कोष्ठगे ।
तिर्यक्स्थे पार्श्वरुग्दोषे संधिगे भवति ज्वरः ॥ १४ ॥
रूपाण्येकादशैतानि जायंते राजयक्ष्मिणः ॥

दोष ऊर्ध्वगामी झाला असतां पीनस, दमा, खोकला, खांदे व डोकें दुखणें, स्वरभेद व अरुचि हे विकार होतात. अधोगामी दोषांत जुलाब होतात किंवा मळाचा अवरोध होतो; कोठ्यांत दोष असतां वांति होते, तिर्यग्गामी दोष झाला असतां बरगड्या दुखतात आणि संधिगत दोष असतां ताप येतो. क्षयरोग्यास हीं अकरा लक्षणें होतात.

तेषामुपद्रवान् विद्यात्कंठोध्वंसमुरोरुजम् ॥ १५ ॥
जृंभांगमर्दनिष्ठीववह्निसादास्यपूतिताः ।

गळा दुखणें, छातींत दुखणें, जांभया येणें, अंग मोडल्यासारखें होणें, कफाचे बेडके पडणें, अग्निमान्द्य व तोंडास दुर्गंध येणें हे क्षयरोगाचे उपद्रव जाणावे.

तत्र वाताच्छिरःपार्श्वशूलमंसांगमर्दनम् ॥ १६ ॥
कंठोध्वंसः स्वरभ्रंशः पित्तात्पादांसपाणिषु ।
दाहोऽतिसारोऽसृक्छर्दिर्मुखगंधो ज्वरो मदः ॥ १७ ॥
कफादरोचकश्छर्दिः कासो मूर्धांगगौरवम् ।
प्रसेकः पीनसः श्वासः स्वरसादोऽल्पवह्निता ॥ १८ ॥

त्यांत वाताधिक्यापासून डोकें व बरगड्या यांत दुखणें, खांदे व अंग मोडल्यासारखें होणें, घसा दुखणें व आवाज बसणें हे विकार होतात. पित्ताधिक्यापासून पाय, खांदे व हात यांचा दाह, अतिसार, रक्ताची वांति, तोंडास दुर्गंध येणें, ताप व गुंगी हे विकार होतात. कफाधिक्यापासून अरुचि, वांति, खोकला, मूर्च्छा, अंग जड होणें, लाळ सुटणें, पीनस, दमा, आवाज बसणें व अग्निमान्द्य हे विकार होतात.

दोषैर्मंदानलत्वेन सोपलेपैः कफोल्बणैः ।
स्रोतोमुखेषु रुद्धेषु धातूष्मस्वल्पकेषु च ॥ १९ ॥
विदह्यमानः स्वस्थाने रसस्तांस्तानुपद्रवान् ।
कुर्यादगच्छन्मांसादीनसृक् चोर्ध्वं प्रधावति ॥ २० ॥
पच्यते कोष्ठ एवान्नमन्नपक्तैव चाऽस्य यत् ।
प्रायोस्मान्मलतां यातं नैवालं धातुपुष्टये ॥ २१ ॥

कफप्रधान व त्यामुळें चिकट झालेल्या दोषांनीं रसादि धातूंच्या स्रोतांचीं तोंडें बंद केल्यामुळें, अग्निमांद्यामुळें, व रसादि धातूंतील अग्नि मंदावल्यानें, रसधातूचें चांगल्या रीतीनें पचन होत नाहीं, त्यापासून शुद्ध रक्त वगैरे तयार होत नाहीं, तो अग्नि जागच्या जागींच अर्धवट पक्व होऊन कंठोध्वंसादि उपद्रव उत्पन्न करितो. तें अर्धवट बनलेलें रक्त वर जाऊन वांतिद्वारें किंवा कफाच्या बेडक्याबरोबर बाहेर पडतें. शिवाय त्याचें अन्न जठराग्नीनें कोठ्यांतच पचन होत असल्यामुळें त्याच्या बहुतेक भागाचा मळच बनतो, यामुळें तें अन्न धातूंचें पोषण करण्यास समर्थ होत नाहीं.

रसोऽप्यस्य न रक्ताय मांसाय कुत एव तु ।
उपस्तब्धः स शकृता केवलं वर्तते क्षयी ॥ २२ ॥

क्षयरोग्याच्या अन्नरसापासून रक्त देखील बनत नाहीं मग त्याच्या पलीकडचें मांस कोठून बनणार ? अशा स्थितींत क्षयी मनुष्य निव्वळ मळाच्याच आधारावर जीव धरून असतो.

लिंगेष्वल्पेष्वपि क्षीणं व्याध्यौषधबलाक्षमम् ।
वर्जयेत्साधयेदेव सर्वेष्वपि ततोऽन्यथा ॥ २३ ॥

क्षीण झालेला आणि रोग व औषध यांचें बळ सोसण्याची

ज्यास शक्ति नाहीं, असा जो क्षयरोगी असेल त्यास थोडीं लक्षणें झालीं असलीं तरी असाध्य समजून वैद्यानें सोडून द्यावें. आणि सर्व लक्षणें झालीं असूनही जर रोगी पुष्ट व रोग आणि औषध यांचें बळ सहन करण्याजोगा असेल तर त्याची चिकित्सा करावी.

दोषैर्व्यस्तैः समस्तैश्च क्षयात् षष्ठश्च मेदसा ।
स्वरभेदो भवेत्

स्वरभेद सहा प्रकारांनीं होतो. वातानें, पित्तानें, कफानें, सन्निपातानें, धातुक्षयानें व मेदानें.

तत्र क्षामो रूक्षश्चलः स्वरः ॥ २४ ॥
शूकपूर्णाभकंठत्वं स्निग्धोष्णोपशयोऽनिलात् ।

वातापासून होणाऱ्या स्वरभेदांत स्वर क्षीण, रूक्ष व कांपरा होतो, आणि घशांत धान्याचीं कुसें अडकल्यासारखें वाटतें. यांत स्निग्ध व उष्ण उपचारांनीं गुण येतो.

पित्तात्तालुगले दाहः शोष उक्तावसूयनम् ॥ २५ ॥

पित्तजन्य स्वरभेदांत टाळू व गळा यांत दाह होतो, कोरड पडते आणि बोलणें म्हणजे जिवावर येतें.

लिंपन्निव कफात्कंठं मंदः खुरखुरायते ।
स्वरो विबद्धः

कफाच्या स्वरभेदांत घसा चिकटल्याप्रमाणें होतो आणि हळू हळू, अडखळत खुरखुर असा शब्द निघतो.

सर्वैस्तु सर्वलिंगः

सन्निपाताच्या स्वरभेदांत वरील सर्व लक्षणें होतात.

क्षयात्कषेत् ॥ २६ ॥
धूमायतीव चात्यर्थम्

क्षयाच्या स्वरभेदांत रोगी बोलतांना कुंथतो, आणि त्याच्या तोंडांतून व नाकांतून धुरासारख्या अतिशय उष्ण वाफा निघतात.

मेदसा श्लेष्मलक्षणः ।
कृच्छ्रलक्ष्याक्षरश्च

मेदाच्या स्वरभेदाचीं लक्षणें कफाच्या स्वरभेदासारखींच असतात. फरक इतकाच कीं, यांत रोग्याच्या भाषणांतील अक्षरें समजण्यास कठिण पडतें.

अत्र सर्वैरन्त्यं च वर्जयेत् ॥ २७ ॥

या सर्वांत सान्निपातिक व मेदापासून होणारा हे दोन स्वरभेद असाध्य आहेत.

अरोचको भवेद्दोषैर्जिह्वाहृदयसंश्रयैः ।
सन्निपातेन मनसः संतापेन च पंचमः ॥ २८ ॥

जीभ व हृदय यांत राहणाऱ्या दोषांपासून अरोचकाचे, वात, पित्त, कफ व सन्निपात यांनीं आणि मनाच्या संतापानें होणारे एकंदर पांच प्रकार आहे.

कषायतिक्तमधुरं वातादिषु मुखं क्रमात् ।
सर्वोत्थे विरसं शोकक्रोधादिषु यथामलम् ॥ २९ ॥

वातज अरुचींत तुरट, पित्तज अरुचींत कडू, कफज अरुचींत गुळमट आणि सान्निपातिक अरुचींत तोंड बेचव होतें. शोकक्रोधादिकांपासून उत्पन्न होणाऱ्या अरुचींत त्यांच्या उत्पादक दोषांच्या अनुसार तोंडाची रुचि होते.

छर्दिर्दोषैः पृथक्सर्वैर्द्विष्टैरर्थैश्च पंचमी ।

वातापासून, पित्तापासून, कफापासून, सान्निपातापासून आणि न आवडणाऱ्या विषयांचा इंद्रियांशीं संयोग घडल्यापासून होणारी अशी एकंदर पांच प्रकारची वांति आहे.

उदानो विकृतो दोषान् सर्वानप्यूर्ध्वमस्यति ॥ ३० ॥

या सर्व प्रकारांत विकृत उदान वायु सर्व दोषांस वर फेंकतो.

तासूत्क्लेशास्यलावण्यप्रसेकारुचयोऽग्रगाः ।

वांति येण्यापूर्वीं पोटांत उमळणें, तोंड खारट होणें, तोंडास पाणी सुटणें, व अरुचि हीं लक्षणें होतात.

नाभिपृष्ठं रुजन् वायुः पार्श्वे चाहारमुत्क्षिपेत् ॥ ३१ ॥
ततो विच्छिन्नमल्पाल्पं कषायं फेनिलं वमेत् ।
शब्दोद्गारयुतं कृष्णमच्छं कृच्छ्रेण वेगवत् ॥ ३२ ॥
कासास्यशोषहृन्मूर्धस्वरपीडाक्लमान्वितः ।

वातजन्य वांतींत वायु बेंबी, पाठ व बरगड्या पिळवटून खाल्लेलें अन्न वर फेंकतो. नंतर राहून राहून, थोडथोडी, तुरट, फसाळ, काळी व पातळ अशी वांति होते. ती होतांना शब्द

होतो, ढेंकर व वेग येतात, आणि फार कष्ट होतात. हींत खोकला, तोंडास कोरड, हृदय, डोकें व स्वर यांत पीडा व ग्लानि हे विकार होतात.

पित्तात्क्षारोदकनिभं धूम्रं हरितपीतकम् ॥ ३३ ॥
सास्रुगम्लं कटूष्णं च तृण्मूर्छातापदाहवत् ।

पित्तानें क्षाराच्या पाण्यासारखी, धुरकट रंगाची, हिरवी, पिंवळी, रक्तमिश्रित, आंबट, तिखट व उष्ण अशी वांति होते, आणि हींत तहान, मूर्च्छा, संताप व दाह हे विकार होतात.

कफात् स्निग्धं घनं शीतं श्लेष्मतंतुगवाक्षितम् ॥ ३४ ॥
मधुरं लवणं भूरि प्रसक्तं लोमहर्षणम् ।
मुखश्वयथुमाधुर्यतंद्राहृल्लासकासवत् ॥ ३५ ॥

कफाची वांति चिकट, दाट, थंड, गुळमट, खारट, पुष्कळ व अडखळत होते. हींत कफाचीं जळमटें असतात, अंगावर रोमांच उभे राहतात आणि तोंड सुजणें व गुळमट होणें, झांपड, मळमळ व खोकला हे विकार होतात.

सर्वलिंगा मलैः सर्वैं रिष्टोक्ता या च तां त्यजेत् ।

सान्निपातिक वांतींत वरील सर्व लक्षणें असतात. ती व विकृतिविज्ञानीय अध्यायांत सांगितलेल्या सर्व लक्षणांनीं युक्त अशी वांति वैद्यानें असाध्य जाणून सोडून द्यावी.

पूत्यमेध्याशुचिद्विष्टदर्शनश्रवणादिभिः ॥ ३६ ॥
तप्ते चित्ते हृदि क्लिष्टे छर्दिर्द्विष्टार्थयोगजा ।

दुर्गंधी, अमंगळ, अपवित्र व किळस येणाऱ्या गोष्टी पाहून, ऐकून किंवा इतर रीतींनें त्यांचा संसर्ग घडून चित्त संतप्त झाल्यानें व अंतःकरणास क्लेश झाल्यानें जी वांति होते, ती द्विष्टार्थयोगजा होय.

वातादीनेव विमृशेत्क्रिमितृष्णामदौहृदे ॥ ३७ ॥

कृमि, तहान व आमविकार यांपासून होणाऱ्या व गरोदरावस्थेंत होणाऱ्या वांतींतही वातादिकांचींच लक्षणें होतात.

शूलवेपथुहृल्लासैर्विशेषात् क्रिमिजां वदेत् ।
क्रिमिहृद्रोगलिंगैश्च

त्यांतल्या त्यांत शूळ, कांपरें, मळमळ हीं व पुढें सांगितलीं ाणारीं कृमिजन्य हृद्रोगाचीं लक्षणें विशेष असल्यास ती कृमिजन्य ांति समजावी.

स्मृताः पंच तु हृद्गदाः ॥ ३८ ॥
तेषां गुल्मनिदानोक्तैः समुत्थानैश्च संभवः ।

हृद्रोग पांच प्रकारचे आहेत. त्यांची उत्पत्ति गुल्मनिदानांत ांगितलेल्या कारणांनीं होते.

वातेन शूल्यतेऽत्यर्थं तुद्यते स्फुटतीव च ॥ ३९ ॥
भिद्यते शुष्यति स्तब्धं हृदयं शून्यता द्रवः ।
अकस्माद्दीनता शोको भयं शब्दासहिष्णुता ॥ ४० ॥
वेपथुर्वेष्टनं मोहः श्वासरोधोऽल्पनिद्रता ।

वातज हृद्रोगांत हृदय एकसारखें अतिशय ठणकत असतें, ोंचल्यासारख्या वेदना होतात; तें फुटल्याप्रमाणें वाटतें, फाटल्या- ामाणें वाटतें, शुष्क व शून्य होतें, अतिशय नाजुक होतें, त्यांत ःकाएकीं दैन्य, शोक व भय हे विकार उत्पन्न होतात, शब्द सहन ोत नाहीं, कांपरें भरतें, अंग पिळवटतें, मोह होतो, श्वास अड- ःतो व झोंप कमी होते.

पित्तात्तृष्णा भ्रमो मूर्च्छा दाहः स्वेदोऽम्लकः क्लमः ४१
छर्दनं चाम्लपित्तस्य धूमकः पीतता ज्वरः ।

पित्तजन्य हृद्रोगांत तहान, भ्रम, मूर्च्छा, दाह, घाम, आंबट ःकर, अम्लपित्ताची उलटी, नाकातोंडांतून धुरकट वाफा निघणें, ोळे, नखें वगैरे पिवळीं होणें आणि ताप हीं लक्षणें होतात.

श्लेष्मणा हृदयं स्तब्धं भारिकं साश्मगर्भवत् ॥ ४२ ॥
कासाग्निसादनिष्ठीवनिद्रालस्यारुचिज्वराः ।

कफजन्य हृद्रोगांत हृदय ताठतें, आंत दगड ठेवल्याप्रमाणें ाड होतें, आणि खोकला, अग्निमान्द्य, वरचेवर कफ पडणें, झोंप, ाळस, अरुचि व ताप हीं लक्षणें होतात.

सर्वलिंगस्त्रिभिर्दोषैः

सान्निपातिक हृद्रोगांत वरील सर्व लक्षणें होतात.

कृमिभिः श्यावनेत्रता ॥ ४३ ॥
तमःप्रवेशो हृल्लासः शोषः कंडूः कफस्रुतिः ।

हृदयं प्रततं चात्र क्रकचेनेव दार्यते ॥ ४४ ॥
चिकित्सेदामयं घोरं तं शीघ्रं शीघ्रकारिणम् ।

कृमिजन्य हृद्रोगांत डोळे धूसर रंगाचे होणें, अंधारांत शिरल्यासारखें वाटणें, मळमळ, शोष, कंडू, कफ पडणें व हृदयांत सतत करवतीनें कापल्यासारख्या वेदना होणें हीं लक्षणें होतात. या अतिशय जलद परिणाम करणाऱ्या भयंकर रोगाची फार त्वरित चिकित्सा करावी.

वातात्पित्तात्कफात्तृष्णा सन्निपाताद्रसक्षयात् ॥ ४५ ॥
षष्ठी स्यादुपसर्गाच्च

वातापासून, पित्तापासून, कफापासून, सान्निपातापासून, रसक्षयापासून आणि इतर रोगांचा उपद्रव म्हणून होणारी अशी एकंदर सहा प्रकारची तृष्णा आहे.

वातपित्ते तु कारणम् ।
सर्वासु

या सर्व तृष्णांचें कारण वात व पित्त हे दोन दोष आहेत.

तत्प्रकोपो हि सौम्यधातुप्रशोषणात् ॥ ४६ ॥
सर्वदेहभ्रमोत्कंपतापतृड्दाहमोहकृत् ।
जिह्वामूलगलक्लोमतालुतोयवहाः सिराः ॥ ४७ ॥
संशोष्य तृष्णा जायंते

शरीरांतील रसादि सौम्य ( जलप्रधान ) धातूंचें शोषण झाल्यानें ते प्रकुपित होऊन त्यापासून सर्व शरीर फिरणें, कंप, संताप, तहान, दाह व मोह हे विकार उत्पन्न होतात. जिभेचें मूळ, गळा, क्लोम व टाळू यांतील जलवाही शिरा शुष्क झाल्यानें तृष्णा उत्पन्न होते.

तासां सामान्यलक्षणम् ।
मुखशोषो जलातृप्तिरन्नद्वेषः स्वरक्षयः ॥ ४८ ॥
कंठौष्ठजिह्वाकार्कश्यं जिह्वानिष्क्रमणं क्लमः ।
प्रलापश्चित्तविभ्रंशस्तृड्ग्रहोक्तास्तथाऽमयाः ॥ ४९ ॥

एकंदर तृष्णांचें सामान्य लक्षण येणेंप्रमाणें—तोंडास कोरड, कितीही पाणी प्यालें तरी तृप्ति न वाटणें, अन्नाचा तिटकारा, स्वर क्षीण होणें; घसा, ओठ व जीभ हीं खरखरीत होणें, जीभ बाहेर

पडणें, ग्लानि, बडबड, चित्तभ्रम आणि मागें रोगानुत्पादनीय अध्यायांत सांगितलेले तहान मारल्यापासून होणारे रोग.

मारुतात् क्षामता दैन्यं शंखतोदः शिरोभ्रमः ।
गंधाज्ञानास्यवैरस्यश्रुतिनिद्राबलक्षयाः ॥ ५० ॥
शीतांबुपानाद्वृद्धिश्च

वातजन्य तृष्णेंत हलकेपणा, दैन्य, आंखांत टोंचण होणें, भोंवळ येणें, वास न कळणें, तोंड बेचव होणें, ऐकूं कमी येणें, झोंप कमी येणें व शक्ति क्षीण होणें, हीं लक्षणें होतात, आणि थंड पाणी प्याल्यानें तहान वाढते.

पित्तान्मूर्छास्यतिक्तता ।
रक्तेक्षणत्वं प्रततं शोषो दाहोऽतिधूमकः ॥ ५१ ॥

पित्तजन्य तृष्णेंत मूर्च्छा, तोंड कडू होणें, डोळे लाल होणें, एकसारखा शोष पडणें, दाह होणें आणि नाकातोंडांतून धुरकट वाफा फार निघणें हीं लक्षणें होतात.

कफो रुणद्धि कुपितस्तोयवाहिषु मारुतम् ।
स्रोतःसु स कफस्तेन पंकवच्छोष्यते ततः ॥ ५२ ॥
शूकैरिवाचितः कंठो निद्रा मधुरवक्रता ।
आध्मानं शिरसो जाड्यं स्तैमित्यच्छर्द्यरोचकाः ॥ ५३ ॥
आलस्यमविपाकश्च

कुपित झालेला कफ उदकवाही स्रोतांत वायूस कोंडतो व त्या कोंडलेल्या वायूच्या योगानें स्वतः चिखलाप्रमाणें सुकून जातो. त्यामुळें घशांत धान्याचीं कुसें अडकल्यासारखें वाटतें, झोंप फार येते, तोंड गुळमट होतें, पोट फुगतें, डोकें जड होतें, अंग जड लागतें, उलटी व अरुचि होते, आळस येतो आणि अन्न पचत नाहीं.

सर्वैः स्यात्सर्वलक्षणा ।

सान्निपातिक तृष्णेंत वरील सर्व लक्षणें होतात.

आमोद्भवा च भक्तस्य संरोधाद्वातपित्तजा ॥ ५४ ॥

आमजन्य तृष्णा भूक मारल्यानें उत्पन्न होते व ती वातपित्तज असते.

उष्णक्लांतस्य सहसा शीतांभो भजतस्तृषम् ।
ऊष्मा रुद्धो गतः कोष्ठं यां कुर्यात्पित्तजैव सा ॥ ५५ ॥
या च पानातिपानोत्था तीक्ष्णाग्नेः स्नेहजा च या ।

उन्हांतून दमून येतांक्षणींच एकदम थंड पाणी प्याल्यानें उष्मा अवरुद्ध होऊन कोठ्यांत जाऊन जी तहान उत्पन्न करितो, ती पित्तजन्य होय. तसेंच अतिमद्यपानानें उत्पन्न झालेली व ज्याचा अग्नि तीक्ष्ण आहे अशा मनुष्यास तेल-तूप फार खाण्यापासून झालेली तृष्णा ही पित्तज जाणावी.

स्निग्धगुर्वम्ललवणभोजनेन कफोद्भवा ॥ ५६ ॥

स्निग्ध, जड, आंबट व खारट पदार्थ खाल्ल्यानें उत्पन्न होणारी तृष्णा कफजन्य जाणावी.

तृष्णा रसक्षयोक्तेन लक्षणेन क्षयात्मिका ।

रसक्षयाच्या लक्षणांनीं युक्त तृष्णा रसक्षयज आहे, असें जाणावें.

शोषमोहज्वराद्यन्यदीर्घरोगोपसर्गतः ।
या तृष्णा जायते तीव्रा सोपसर्गात्मिका स्मृता ॥ ५७ ॥

क्षय, मोह, ताप वगैरे पुष्कळ दिवसांच्या जुन्या रोगांच्या संबंधानें जी तीव्र तृष्णा उत्पन्न होते तीस औपसर्गिक असें म्हणतात.

---

## अध्याय ६ वा.

अथाऽतो मदात्ययनिदानं व्याख्यास्यामः ।

आतां मदात्ययाचें निदान सांगतों.

तीक्ष्णोष्णरूक्षसूक्ष्माम्लं व्यवाय्याशुकरं लघु ।
विकासि विशदं मद्यमोजसोऽस्माद्विपर्ययः ॥ १ ॥

मद्य तीक्ष्ण, उष्ण, रूक्ष, सूक्ष्म, आंबट, शरीरभर पसरणारें, आपलें कार्य त्वरित करणारें, हलकें, विकासि व स्वच्छ आहे. आणि ओजाचे गुण याच्या अगदीं उलट आहेत.

तीक्ष्णादयो विषेऽप्युक्ताश्चित्तोपप्लाविनो गुणाः ।
जीवितांताय जायंते विषे तूत्कर्षवृत्तितः ॥ २ ॥

वरील चित्रभ्रमकारक तीक्ष्णादि गुण विषांतही सांगितले आहेत. परंतु विषांत ते अधिक प्रमाणानें असल्यामुळें मारक होतात.

तीक्ष्णादिभिर्गुणैर्मद्यं मंदादीनोजसो गुणान् ।
दशभिर्दश संक्षोभ्य चेतो नयति विक्रियाम् ॥ ३ ॥
आद्ये मदे

मदाच्या पहिल्या अवस्थेंत मद्य आपल्या तीक्ष्णादि दहा गुणांनीं ओजाच्या मंदादि दहा गुणांस सर्वथा दूषित करून चित्तास विकार उत्पन्न करितें.

द्वितीये स प्रमादायतने स्थितः ।
दुर्विकल्पहतो मूढः सुखमित्यधिमुच्यते ॥ ४ ॥

मदाची दुसरी अवस्था सर्व प्रकारच्या प्रमादांचें निवासस्थान आहे. ती प्राप्त झाली असतां अनेक प्रकारच्या दुष्ट कल्पनांनीं कार्याकार्यविचार नष्ट होऊन मनुष्य सुखास पहिल्यापेक्षां अधिकच मुकतो.

मध्यमोत्तमयोः संधिं प्राप्य राजसतामसः ।
निरंकुश इव व्यालो न किंचिन्नाचरेज्जडः ॥ ५ ॥
इयं भूमिरवद्यानां दौःशील्यस्येदमास्पदम् ।
एकोऽयं बहुमार्गाया दुर्गतेर्देशिकः परम् ॥ ६ ॥

राजस व तामस प्रकृतीच्या मनुष्यास दुसऱ्या व तिसऱ्या अवस्थांच्या मधली अवस्था प्राप्त झाली असतां तो उन्मत्त झालेल्या निरंकुश हत्तीप्रमाणें मूर्ख बनून काय करणार नाहीं? अर्थात् वाटेल तें वाईट काम करील. ही अवस्था म्हणजे निन्द्य गोष्टींची जन्मभूमि, दुःस्वभावाचें वसतिस्थान आणि अनेक मार्गांनीं येणाऱ्या अवदशेचा परमाचार्यच होय.

निश्चेष्टः शववच्छेते तृतीये तु मदे स्थितः
मरणादपि पापात्मा गतः पापतरां दशाम् ॥ ७ ॥

तिसऱ्या अवस्थेंत असतांना तर मनुष्य प्रेतासारखा निश्चेष्ट पडून राहतो. तो पापी मनुष्य त्या वेळीं मरणापेक्षांही नीच स्थितीस जाऊन पोंचतो.

धर्माधर्मं सुखं दुःखमर्थानर्थं हिताहितम् ।
यदासक्तो न जानाति कथं तच्छीलयेद्बुधः ॥ ८ ॥

ज्या मद्याच्या ठायीं आसक्त झाल्यानें सुख, दुःख, अर्थ, अनर्थ,

हित अहित कळेनासें होतें, त्या मद्याचें अतिसेवन शहाणा मनुष्य कसें करील ?

मद्ये मोहो भयं शोकः क्रोधो मृत्युश्च संश्रिताः।
सोन्मादमदमूर्छाया सापस्मारापतानकाः ॥ ९ ॥
यत्रैकः स्मृतिविभ्रंशस्तत्र सर्वमसाधु यत्।

मोह, भीति, शोक, क्रोध, मरण, उन्माद, मद, मूर्च्छा, अपस्मार व अपतानक हे सर्व विकार मद्यांत जणुं काय बिऱ्हाडच करून राहिले आहेत. फार कशाला, ज्या ठिकाणीं एका स्मृतीचा लोप झाला, त्या ठिकाणीं सर्व कांहीं अनिष्टच असावयाचें.

अयुक्तियुक्तमन्नं हि व्याधये मरणाय वा ॥ १० ॥
मद्यं त्रिवर्गधीधैर्यलज्जादेरपि नाशनम्।

शास्त्रविधि सोडून सेवन केलेलें अन्न रोग किंवा फार तर मृत्यु आणील. परंतु अयोग्य रीतीनें सेवन केलेलें मद्य धर्म, अर्थ, काम, बुद्धि, धैर्य, लज्जा इत्यादिकांचाही नाश करितें.

नातिमाद्यंति बलिनः कृताहारा महाशनाः ॥ ११ ॥
स्निग्धाः सत्ववयोयुक्ता मद्यनित्यास्तदन्वयाः।
मेदःकफाधिका मंदवातपित्ता दृढाग्नयः ॥ १२ ॥

बळकट, जेवलेले, फार खाणारे, स्निग्ध पदार्थ खाणारे, सत्वगुणी, तरुण, नेहमीं मद्य पिणारे, मद्य पिणारांच्या कुळांत जन्मलेले, अंगांत मेद व कफ जास्त असलेले, वातपित्त कमी असलेले व ज्यांचा जठराग्नि दृढ आहे, अशा मनुष्यांनीं मद्यपान केलें असतां त्यांस फारसा मद चढत नाहीं.

विपर्ययेऽतिमाद्यंति विश्रब्धाः कुपिताश्च ये।
मद्येन चाम्लरूक्षेण साजीर्णे बहुनाति च ॥ १३ ॥

याच्या उलट ज्यांची स्थिति आहे; ज्यांचें सर्व मन मद्याचे ठायीं गुंतलेलें आहे असे व रागावलेले मनुष्य यांस तसेंच आंबट व रूक्ष मद्य प्याल्यानें, किंचित अजीर्णावर प्याल्यानें, व अतिशयच प्याल्यानें फारच मद चढतो.

वातात्पित्तात्कफात्सर्वैश्चत्वारः स्युर्मदात्ययाः।
सर्वेऽपि सर्वैर्जायंते व्यपदेशस्तु भूयसा ॥ १४ ॥

वातापासून, पित्तापासून, कफापासून व सन्निपातापासून असे चार प्रकारचे मदात्यय होतात. वस्तुतः सर्व मदात्यय सान्निपातिकच असतात. परंतु त्यांत जो दोष अधिक असतो, त्याचें विशेष नांव त्यास देतात.

सामान्यं लक्षणं तेषां प्रमोहो हृदयव्यथा ।
विड्भेदः प्रततं तृष्णा सौम्याग्नेयो ज्वरोऽरुचिः ॥ १५ ॥
शिरःपार्श्वास्थिहृत्कंपो मर्मभेदस्त्रिकग्रहः ।
उरोविबंधस्तिमिरं कासः श्वासः प्रजागरः ॥ १६ ॥
स्वेदोऽतिमात्रं विष्टंभः श्वयथुश्चित्तविभ्रमः ।
प्रलापश्छर्दिरुत्क्लेशो भ्रमो दुःस्वप्नदर्शनम् ॥ १७ ॥

मदात्ययाचीं सामान्य लक्षणें येणेंप्रमाणें:—मोह, हृदयांत व्यथा, जुलाब, अतिशय तहान, थंडीचा किंवा उष्णतेचा ताप, डोकें, बरगड्यांचीं हाडें व हृदय हीं कांपणें, मर्म फाटल्यासारखें वाटणें, माकडहाड धरणें, उरांत दडा बसणें, डोळ्यांपुढें काळोखी येणें, खोकला, दमा, झोंप न येणें, अतिशय घाम येणें, शरीर ताठणें, सूज, चित्तभ्रम, बडबड, उलटी, उम्हासे, भ्रम व वाईट स्वप्नें पडणें.

विशेषाज्जागरश्वासकंपमूर्धरुजोऽनिलात् ।
स्वप्ने भ्रमत्युत्पतति प्रेतैश्च सह भाषते ॥ १८ ॥

झोंप न येणें, दमा, कांपरें, डोकें दुखणें; आणि स्वप्नांत भटकणें, उड्या मारणें व प्रेताबरोबर भाषण करणें हीं वातजन्य मदात्ययाचीं विशेष लक्षणें होत.

पित्ताद्दाहज्वरस्वेदमोहातीसारतृड्भ्रमाः ।
देहो हरितहारिद्रो रक्तनेत्रकपोलता ॥ १९ ॥

पित्तज मदात्ययाचीं विशेष लक्षणें दाह, ताप, घाम, मोह, जुलाब, तहान, भ्रम आणि शरीर हिरवें-पिवळें होणें व डोळे आणि गाल लाल होणें हीं आहेत.

श्लेष्मणश्छर्दिहृल्लासनिद्रोदर्दांगगौरवम् ।

उलटी, मळमळ, झोंप, अंगावर गांधी उठणें, आणि अंग जड होणें हीं कफज मदात्ययाचीं विशेष लक्षणें होत.

सर्वजे सर्वलिङ्गत्वम्

सान्निपातिक मदात्ययांत वरील सर्व लक्षणें होतात.

मुक्त्वा मद्यं पिबेत्तु यः ॥ २० ॥
सहसाऽनुचितं चान्यत्तस्य ध्वंसकविक्षयौ ।
भवेतां मारुतात्कष्टौ दुर्बलस्य विशेषतः ॥ २१ ॥

जो मनुष्य पुष्कळ दिवसपर्यंत मद्य प्यावयाचें सोडून पुन्हा एकदम पुष्कळसें पिऊं लागतो, किंवा ज्या प्रकारच्या मद्याची संवय नसेल तें एकाएकीं पुष्कळसें पिऊं लागतो, त्यास वायूपासून ध्वंसक व विक्षय नांवाचे दोन कष्टसाध्य रोग होतात. हे त्यांतल्या त्यांत विशेषेंकरून अशक्त मनुष्यास होतात.

ध्वंसके श्लेष्मनिष्ठीवः कंठशोषोऽतिनिद्रता ।
शब्दासहत्वं तंद्रा च

ध्वंसकांत कफ पडतो, घसा सुकतो, फार झोंप येते, शब्द सहन होत नाहीं, आणि डोळ्यांवर झांपड असते.

विक्षयेऽगशिरोतिरुक् ॥ २२ ॥
हृत्कंठरोगः संमोहः कासस्तृष्णा वमिर्ज्वरः ।

विक्षयांत अंग व डोकें अतिशय दुखणें, हृदय व घसा यांत पीडा होणें, मोह, खोकला, तहान, वांति व ताप हीं लक्षणें होतात.

निवृत्तो यस्तु मद्येभ्यो जितात्मा बुद्धिपूर्वकृत् ॥ २३ ॥
विकारैः स्पृश्यते जातु न स शारीरमानसैः ।

जो जितेन्द्रिय व विचारपूर्वक काम करणारा मनुष्य मद्यापासून अलिप्त राहतो, त्यास कोणतेही शारीरिक किंवा मानसिक विकार कधींही होत नाहींत.

रजोमोहाहिताहारपरस्य स्युस्त्रयो गदाः ॥ २४ ॥
रसासृक्चेतनावाहिस्रोतोरोधसमुद्भवाः ।
मदमूर्छायसंन्यासा यथोत्तरबलोत्तराः ॥ २५ ॥

रजोगुणी, मूढ व अपथ्यभोजन करणाऱ्या मनुष्यास, रसवाहक, रक्तवाहक व चैतन्यवाहक स्रोतांच्या अवरोधापासून मद, मूर्च्छा व संन्यास हे तीन रोग होतात. ते अनुक्रमें एकाहून एक अधिक बळवान् आहेत.

मदोऽत्र दोषैः सर्वैश्च रक्तमद्यविषैरपि ।

त्यांपैकीं मद हा वातापासून, पित्तापासून, कफापासून, सन्निपातापासून, रक्तदोषापासून, मद्यापासून व विषापासून असा सात प्रकारचा आहे.

सक्तानल्पद्रुताभाषश्चलः स्खलितचेष्टितः ॥ २६ ॥
रूक्षश्यावारुणतनुर्मदे वातोद्भवे भवेत् ।

वातिक मदांत रोगी अडखळत, पुष्कळ व घाईघाईनें बोलतो, कांपतो व वेड्यावांकड्या कृति करितो; आणि त्याचें शरीर रूक्ष, धूसर व पिंगट रंगाचें होतें.

पित्तेन क्रोधनो रक्तपीताभः कलहप्रियः ॥ २७ ॥

पैत्तिक मदांत मनुष्य रागीट, तांबडा, पिंवळा व भांडखोर होतो.

स्वल्पासंबद्धवाक्पांडुः कफाद्ध्यानपरोऽलसः ।

कफजन्य मदांत थोडें व असंबद्ध बोलतो, त्याचा रंग फिकट होतो, तो एकसारखा टक लावून चिंतेंत बसतो व आळशी होतो.

सर्वात्मा सन्निपातेन

सान्निपातिक मदांत वरील सर्व मदांचीं लक्षणें होतात.

रक्तात्स्तब्धांगदृष्टिता ॥ २८ ॥
पित्तलिंगं च

रक्तमदांत अंग व दृष्टि ताठते, आणि बाकी पैत्तिक मदाचीं लक्षणें होतात.

मद्येन विकृतेहास्वरांगता ।

मद्याच्या मदांत चेष्टा, स्वर व अंग हीं विकृत होतात.

विषे कंपोऽतिनिद्रा च सर्वेभ्योऽभ्यधिकस्तु सः ।

विषापासून आलेल्या मदांत मनुष्य कांपतो व त्यास अतिशय झोंप येते. सर्व मदांत हा अधिक मारक आहे.

लक्षयेल्लक्षणोत्कर्षाद्वातादीन् शोणितादिषु ।

रक्तदोष, मद्य व विष यांच्यापासून येणाऱ्या मदांत, वातादिकांपैकीं ज्या दोषाचीं लक्षणें अधिक आढळतील, तो दोष त्यांत आहे असें जाणावें.

अरुणं कृष्णनीलं वा खं पश्यन्प्रविशेत्तमः ॥ ३० ॥
शीघ्रं च प्रतिबुध्येत हृत्पीडा वेपथुर्भ्रमः।
कार्श्यं श्यावारुणा छाया मूर्छाये मारुतात्मके ॥ ३१ ॥

वातिक मूर्च्छेंत आकाश पिंगट, काळें किंवा निळें दिसूं लागून लगेच मनुष्य बेशुद्ध पडतो आणि पुन्हा लवकरच शुद्धीवर येतो. यांत हृदयांत पीडा होणें, कांपणें, भ्रम, कृशता, आणि अंगाची छाया धूसर-पिंगट रंगाची होणें हीं लक्षणें होतात.

पित्तेन रक्तं पीतं वा नभः पश्यन् विशेत्तमः।
विबुध्येत च सस्वेदो दाहतृट्तापपीडितः ॥ ३२ ॥
भिन्नविण्नीलपीताभो रक्तपीताकुलेक्षणः।

पित्ताच्या मूर्च्छेंत आकाश लाल किंवा पिंवळें दिसूं लागून मनुष्य बेशुद्ध होतो व सावध होतांना त्यास घाम येतो. मागाहून दाह होतो, तहान लागते, अंग तापतें, जुलाब होतात, त्याची छाया निळी किंवा पिंवळी होते आणि डोळे तांबडे-पिंवळे व बावरल्यासारखे होतात.

कफेन मेघसंकाशं पश्यन्नाकाशमाविशेत् ॥ ३३ ॥
तमश्चिराच्च बुध्येत सहृल्लासः प्रसेकवान्।
गुरुभिः स्तिमितैरंगैरार्द्रचर्मावनद्धवत् ॥ ३४ ॥

कफाच्या मूर्च्छेंत आकाश मेघाप्रमाणें दिसूं लागून मनुष्य बेशुद्ध होतो, आणि फार वेळानें सावध होतो. नंतर त्यास मळमळ, लाळ सुटणें, आणि अंग जड होणें व ओलें चामडें पांघरल्यासारखें वाटणें हीं लक्षणें होतात.

सर्वाकृतिस्त्रिभिर्दोषैरपस्मार इवाऽपरः।
पातयत्याशु निश्चेष्टं विना बीभत्सचेष्टितैः ॥ ३५ ॥

सान्निपातिक मूर्च्छेंत सर्व लक्षणें असतात. हा एक दुसरा अपस्मारच समजावयाचा, यांत अपस्माराप्रमाणें मनुष्य अगदीं निश्चेष्ट पडतो. फक्त अपस्माराप्रमाणें घाणेरड्या ( तोंडांतून फेंस येणें वगैरे ) चेष्टा मात्र यांत करीत नाहीं.

दोषेषु मदमूर्छायाः कृतवेगेषु देहिनाम्।
स्वयमेवोपशाम्यंति संन्यासो नौषधैर्विना ॥ ३६ ॥

मद व मूर्च्छा यांच्या दोषांचा जोर कमी झाला म्हणजे ते

औषधावांचून आपोआप शांत होतात. परंतु संन्यास मात्र औषधावांचून बरा होत नाहीं. ( दोहोंत मुख्य फरक हाच आहे. )

वाग्देहमनसां चेष्टामाक्षिप्यातिबला मलाः ।
संन्यासं सन्निपतिताः प्राणायतनसंश्रयाः ॥ ३७ ॥
कुर्वंति तेन पुरुषः काष्ठभूतो मृतोपमः ।
म्रियेत शीघ्रं शीघ्रं चेच्चिकित्सा न प्रयुज्यते ॥ ३८ ॥

अतिशय बळावलेले वातादि तिन्ही दोष एकत्र होऊन विशेषतः हृदयाचा आश्रय करून वाणी, शरीर व मन यांचे व्यापार बंद करून संन्यास उत्पन्न करितात. त्या योगानें मनुष्य लांकडाप्रमाणें निश्चेष्ट होऊन प्रेतासारखा पडतो. आणि त्यावर ताबडतोब चांगले औषधोपचार न केल्यास तो लवकरच मरतो.

अगाधे ग्राहबहुले सलिलौघ इवातटे ।
संन्यासे विनिमज्जंतं नरमाशु निवर्तयेत् ॥ ३९ ॥

ज्यांत खोल पाणी आहे; सुसरी, मगर वगैरे प्राणहारक प्राणी आहेत, आणि ज्याचा दुसरा तीर दिसत नाहीं, अशा मोठ्या जलाशयांत बुडणाऱ्या मनुष्याप्रमाणें या संन्यास रोगांत बुडणाऱ्या मनुष्यास ताबडतोब वर काढावें.

मदमानरोषतोषप्रभृतिभिररिभिर्निजैः परिष्वंगः ।
युक्तायुक्तं च समं युक्तिवियुक्तेन मद्येन ॥ ४० ॥

मद्याचें अयोग्य रीतीनें सेवन केल्यानें मद, गर्व, राग, काम, वगैरे जन्मतःच उत्पन्न होणारे शत्रु मनुष्यास लगेच येऊन चिकटतात; आणि योग्य व अयोग्य या दोन्ही गोष्टी त्यास सारख्याच होऊन जातात.

बलकालदेशसात्म्यप्रकृतिसहायामयवयांसि ।
प्रविभज्य तदनुरूपं यदि पिबति ततः पिबत्यमृतम् ४१

बल, काल, देश, संवय, प्रकृति, सहाय, रोग व वय यांचा योग्य विचार करून तदनुरूप जर मनुष्य मद्यपान करील तर तो अमृताचेंच पान करतो असें समजावें.

---

# अध्याय ७ वा.

अथाऽर्शसां निदानं व्याख्यास्यामः ।

आतां मूळव्याधीचें निदान सांगतों.

अरिवत्प्राणिनो मांसकीलका विशसंति यत् ।
अर्शांसि तस्मादुच्यंते गुदमार्गनिरोधतः ॥ १ ॥

मांसाचे मोड गुदमार्गाचा अवरोध करून प्राण्यास शत्रूप्रमाणें टोंचतात, म्हणून त्यांस अर्श असें म्हणतात.

दोषास्त्वङ्मांसमेदांसि संदूष्य विविधाकृतीन् ।
मांसांकुरानपानादौ कुर्वंत्यर्शांसि तान् जगुः ॥ २ ॥

वातादि दोष त्वचा, मांस व मेद यांस दूषित करून गुद, नाक, कान वगैरे स्थानीं नानाप्रकारच्या आकृतींचे मांसाचे मोड उत्पन्न करितात, त्या मोडांस अर्श म्हणजे मूळव्याध असें ह्मणतात.

सहजन्मोत्तरोत्थानभेदाद्द्वेधा समासतः ।
शुष्कस्राविविभेदाच्च

जन्मतःच झालेली व नंतर झालेली अशी संक्षेपतः मूळव्याध दोन प्रकारची आहे. तशीच शुष्क व रक्तस्रावी या भेदानेंही दोन प्रकारची आहे.

गुदः स्थूलांत्रसंश्रयः ॥ ३ ॥
अर्धपंचांगुलस्तस्मिंस्तिस्रोऽध्यर्धांगुलाः स्थिताः ।
वलयः प्रवाहिणी तासामंतर्मध्ये विसर्जनी ॥ ४ ॥
बाह्या संवरणी तस्या गुदोष्ठो बहिरंगुले ।
यवाध्यर्धप्रमाणेन रोमाण्यत्र ततः परम् ॥ ५ ॥

पोटांतील मोठ्या आंतड्याच्या बाहेरील बाजूचा शेवटला जो साडेचार बोटें लांबीचा भाग आहे, त्यास गुद असें म्हणतात. त्यांत दीड दीड बोट लांबीच्या तीन वळ्या आहेत. त्यांतील पहिली म्हणजे आंतली ती प्रवाहिणी, दुसरी म्हणजे मधली ती विसर्जनी, आणि तिसरी बाहेरची ती संवरणी. संवरणीच्या बाहेर एका बोटावर दीड जव प्रमाणाचा गुदोष्ठ आहे. आणि त्याच्या पुढें केंस येतात.

तत्र हेतुः सहोत्थानां वलीबीजोपतप्तता ।
अर्शसां बीजतप्तिस्तु मातापित्रपचारतः ॥ ६ ॥

दैवाच्च ताभ्यां कोपो हि सन्निपातस्य तान्यतः ।
असाध्यान्येवमाख्याताः सर्वे रोगाः कुलोद्भवाः ॥ ७ ॥

त्यांपैकीं जन्मतःच उत्पन्न होणाऱ्या मूळव्याधीचें कारण, गर्भधारणाच्या वेळीं सदरहू वळया उत्पन्न करणारा आईबापांच्या बीजाचा भाग दूषित होणें हें होय. आईबापांचें अपथ्यसेवन व दैव या कारणांनीं बीजभाग दूषित होतो, व याच कारणांनीं त्रिदोषांचाही प्रकोप होतो. म्हणून जन्मतः होणारी नुस्ती मूळव्याधच नव्हे तर वंशपरंपरेनें होणारे सर्वच रोग असाध्य असतात.

सहजानि विशेषेण रूक्षदुर्दर्शनानि च ।
अंतर्मुखानि पांडूनि दारुणोपद्रवाणि च ॥ ८ ॥

जन्मतः होणाऱ्या मूळव्याधी विशेष रूक्ष व विशेष अवघड व दिसण्यास कठिण अशा ठिकाणीं असतात, त्यांचीं तोंडें आंतल्या बाजूस असतात, त्यांचा रंग फिकट असतो, आणि त्यांत भयंकर उपद्रव होतात.

षोढान्यानि पृथग्दोषसंसर्गनिचयास्त्रतः ।

जन्मल्यावर होणारी मूळव्याध सहा प्रकारची आहे. वातज, पित्तज, कफज, द्विदोषज, सान्निपातिक व रक्तज.

शुष्काणि वातश्लेष्मभ्यामार्द्राणि त्वस्रपित्ततः ॥ ९ ॥

सुकी मूळव्याध वायूपासून किंवा वातकफापासून होते आणि रक्ती मूळव्याध रक्तापासून किंवा पित्तापासून होते.

दोषप्रकोपहेतुस्तु प्रागुक्तस्तेन सादिते ।
अग्नौ मलेऽतिनिचिते पुनश्चातिव्यवायतः ॥ १० ॥
यानसंक्षोभविषमकठिनोत्कटकासनात् ।
बस्तिनेत्राश्मलोष्ठोर्वीतलचैलादिघट्टनात् ॥ ११ ॥
भृशं शीतांबुसंस्पर्शात्प्रततातिप्रवाहणात् ।
वातमूत्रशकृद्वेगधारणात्तदुदीरणात् ॥ १२ ॥
ज्वरगुल्मातिसारामग्रहणीशोफपांडुभिः ।
कर्शनाद्विषमाभ्यश्च चेष्टाभ्यो योषितां पुनः ॥ १३ ॥
आमगर्भप्रपतनाद्गर्भवृद्धिप्रपीडनात् ।
ईदृशैश्चापरैर्वायुरपानः कुपितो मलम् ॥ १४ ॥

पायोर्वलीषु संधत्ते तास्वभिष्यण्णमूर्तिषु ।
जायंतेऽर्शांसि

वातादि दोष प्रकुपित होण्याचीं कारणें मागें सांगितलींच आहेत. त्यांनीं अग्नि मंद होऊन, मल अतिशय सांचून, अतिमैथुनानें, गाडी, घोडा, उंट, इत्यादि वाहनांवर बसून गुद चोळवटल्यानें, उंच, सखल व टणक जागीं बसल्यानें, उकिडवें बसल्यानें, पिचकारीची नळी, दगड, मातीचें ढेंकूळ, जमीन, वस्त्र इत्यादिकांनीं गुद घासल्यानें, अतिशय गार पाण्याचा स्पर्श झाल्यानें, शौचाचे वेळीं फार वेळ अतिशय कुंथल्यानें, मल, मूत्र, व अपान वायु इत्यादिकांचे वेग थांबविल्यानें किंवा बळेंच प्रवृत्त केल्यानें, ताप, गुल्म, अतिसार, आमविकार, संग्रहणी, सूज, पांडु इत्यादि विकारांनीं क्षीणता आल्यानें, वेड्या वांकड्या अंगचेष्टा केल्यानें, बायकांस अकाळीं गर्भपात झाल्यानें, गर्भ वाढून त्याचा गुदावर दाब बसल्यानें, व अशाच प्रकारच्या इतरही कारणांनीं अपान वायु कुपित होऊन मळास गुदांतील वळ्यांवर जमवितो. त्या योगानें ओलसर झालेल्या त्या वळ्यांवर मोड उत्पन्न होतात.

तत्पूर्वलक्षणं मंदवह्निता ॥ १५ ॥
विष्टंभः सक्थिसदनं पिंडिकोद्वेष्टनं भ्रमः ।
सादोऽगे नेत्रयोः शोफः शकृद्भेदोऽथवा ग्रहः ॥ १६ ॥
मारुतः प्रचुरो मूढः प्रायो नाभेरधश्चरन् ।
सरुक् सपरिकर्तश्च कृच्छ्रान्निर्गच्छति स्वनन् ॥ १७ ॥
अंत्रकूजनमाटोपः क्षामतोद्गारभूरिता ।
प्रभूतं मूत्रमल्पा विट् श्रद्धा वै धूमकोऽम्लकः ॥ १८ ॥
शिरःपृष्ठोरसां शूलमालस्यं भिन्नवर्णता ।
तथेंद्रियाणां दौर्बल्यं क्रोधो दुःखोपचारता ॥ १९ ॥
आशंका ग्रहणीदोषपांडुगुल्मोदरेषु च ।

मूळव्याधीचें पूर्वरूप येणेंप्रमाणें—अग्निमान्द्य, अवष्टंभ, मांड्या गळल्यासारख्या वाटणें, पोटऱ्या वळणें, भोंवळ, हातपाय मोडल्यासारखे होणें, डोळे सुजणें, जुलाब किंवा मलावरोध होणें, अपान वायु अतिशय वाढून व स्तब्ध होऊन बहुशः बेंबीच्या खालच्या

अंगांत संचार करून शूळ, कातरल्यासारखी पीडा व शब्द करीत मोठ्या कष्टानें बाहेर पडणें, आंतड्यांत कुजबुजणें, पोटांत गुरगुरणें, कृशता, फार ढेंकर येणें, लघ्वी फार होणें, शौचास कमी होणें, निरनिराळ्या पदार्थांवर इच्छा जाणें, नाकातोंडांतून ऊन वाफा निघणें, आंबट ढेंकर येणें, डोकें, पाठ, छाती यांत शूळ होणें, आळस, वर्ण पालटणें, इन्द्रियें दुर्बल होणें, राग, उपचार दुःखद होणें आणि संग्रहणी, पांडु, गुल्म व उदर हे रोग होण्याची धास्ती वाटूं लागणें.

एतान्येव विवर्धंते जातेषु हतनामसु ॥ २० ॥

मूळव्याध उत्पन्न झाली म्हणजे हींच लक्षणें वाढतात.

निवर्तमानोऽपानो हि तैरधोमार्गरोधतः ।
क्षोभयन्ननिलानन्यान् सर्वेंद्रियशरीरगान् ॥ २१ ॥
तथा मूत्रशकृत्पित्तकफान् धातूंश्च साशयान् ।
मृद्नात्यग्निं ततः सर्वो भवति प्रायशोऽर्शसः ॥ २२ ॥
कृशो भृशं हतोत्साहो दीनः क्षामोऽतिनिष्प्रभः ।
असारो विगतच्छायो जंतुजुष्ट इव द्रुमः ॥ २३ ॥
कृत्स्नैरुपद्रवैर्ग्रस्तो यथोक्तैर्मर्मपीडनैः ।
तथा कासपिपासास्यवैरस्यश्वासपीनसैः ॥ २४ ॥
क्लमांगभंगवमथुक्षवथुश्वयथुज्वरैः ।
क्लैब्यबाधिर्यतैमिर्यशर्कराश्मरिपीडितः ॥ २५ ॥
क्षामभिन्नस्वरो ध्यायन्मुहुः ष्ठीवन्नरोचकी ।
सर्वपर्वास्थिहृन्नाभिपायुवंक्षणशूलवान् ॥ २६ ॥
गुदेन स्त्रवता पिच्छां पुलाकोदकसन्निभाम् ।
विबद्धमुक्तं शुष्कार्द्रं पक्कामं चांतरांतरा ॥ २७ ॥
पांडु पीतं हरिद्रक्तं पिच्छिलं चोपवेश्यते ।

मोडांनीं गुदमार्गाचा अवरोध झाल्यानें अपान वायु वरच्या बाजूस उलटून सर्व इन्द्रियें व शरीर यांस व्यापणारे समान, उदान, व्यान व प्राण हे चार वायु आणि मूत्र, मळ, पित्त, कफ, रसादि धातु व या सर्वांचीं स्थानें यांस दूषित करून अग्नीस मंद करितो. त्यामुळें मूळव्याधीचा रोगी अतिशय कृश, हतोत्साह, दीन, क्षीण, अतिशय निस्तेज, अशक्त, कीड लागलेलें झाड जसें पानें नसल्या-

मुळें छायारहित होतें तसा छायाहीन व सर्व उपद्रवांनीं ग्रासलेला, असा होतो. त्याच्या पूर्वोक्त मर्मांत पीडा होते. त्याला खोकला, तहान, अरुचि, दमा, पीनस, ग्लानि, अंग मोडणें, वांति, शिंका, सूज, ताप, नपुंसकपणा, बहिरेपणा, डोळ्यांपुढें अंधेरी येणें, लघ्वींत रेंव जाणें, मूतखडा हे विकार होतात. त्याचा आवाज क्षीण होतो व फाटतो, तो चिंता करीत बसतो, वरचेवर थुंकतो, त्याच्या तोंडास रुचि नसते, सर्व पेरें, हाडें, हृदय, बेंबी, गुद व जांघाडे, यांत शूळ होतो. गुदांतून भाताच्या पेजेसारखा चिकट स्राव होतो. कधीं शौचास साफ होतें, कधीं अवरोध होतो; तसेंच सुकें किंवा पातळ, पक्क किंवा आम, पांडुरकें किंवा पिंवळें, हिरवें किंवा लाल व बुळबुळीत असें शौचास होतें.

गुदांकुरा बह्वनिलाः शुष्काश्चिमिचिमान्विताः ॥ २८ ॥
म्लानाः श्यावारुणाः स्तब्धा विषमाः परुषाः खराः ।
मिथो विसदृशा वक्रास्तीक्ष्णा विस्फुटिताननाः ॥ २९ ॥
बिंबीकर्कंधुखर्जूरकार्पासीफलसन्निभाः ।
केचित्कदंबपुष्पाभाः केचित्सिद्धार्थकोपमाः ॥ ३० ॥
शिरःपार्श्वांसकट्यूरुवंक्षणाभ्यधिकव्यथाः ।
क्षवथूद्गारविष्टंभहृद्ग्रहारोचकप्रदाः ॥ ३१ ॥
कासश्वासाग्निवैषम्यकर्णनादभ्रमावहाः ।
तैरार्तो ग्रथितं स्तोकं सशब्दं सप्रवाहिकम् ॥ ३२ ॥
रुक्फेनपिच्छानुगतं विबद्धमुपवेश्यते ।
कृष्णत्वङ्नखविण्मूत्रनेत्रवक्त्रश्च जायते ॥ ३३ ॥
गुल्मप्लीहोदराष्ठीलासंभवस्तत एव च ।

वाताधिक मूळव्याधींत गुदांतील मोड कोरडे, चुणचुणणारे, कोमेजलेले, मळकट, पिंगट रंगाचे, ताठ, लहानमोठे, खरखरीत, धारदार, निरनिराळ्या आकृतींचे, वांकडे, अणीदार, चिरलेल्या तोंडाचे; तोंडलें, अमदाबादी बोर, खारीक, कापशीचें बोंड यांसारखे, कांहीं कदंबाच्या फुलांसारखे आणि कित्येक शिरसाच्या दाण्याएवढे बारीक असतात. यांत डोकें, बरगडचा, खांदे, कंबर, मांडचा व जांघाडे यांत फार पीडा होते. शिंका, ढेंकर, अवष्टंभ, हृदय जखडणें, अरुचि, खोकला, दमा, अग्नीचा अनियमितपणा, कानांत शब्द होणें व भ्रम

हे विकार होतात. या मोडांनीं पीडिलेल्या रोग्याच्या मळाचा खडा धरतो. थोडें, शब्दसहित, कुंथून व अडकत शौचास होतें. शौचाचे वेळीं दुखतें आणि त्यांत फेंस व आंवेसारखा चिकट स्राव असतो, त्याची त्वचा, नखें, मल, मूत्र, डोळे व तोंड हीं काळसर होतात, आणि या मूळव्याधीपासूनच पुढें गुल्म, पानथरी, उदर व अष्ठीला हे रोग उत्पन्न होतात.

पित्तोत्तरा नीलमुखा रक्तपीतासितप्रभाः ॥ ३४ ॥
तन्वस्रस्राविणो विस्रास्तनवो मृदवः श्लथाः ।
शुकजिह्वायकृत्खंडजलौकोवक्त्रसन्निभाः ॥ ३५ ॥
दाहपाकज्वरस्वेदतृण्मूर्छारुचिमोहदाः ।
सोष्माणो द्रवनीलोष्णपीतरक्तामवर्चसः ॥ ३६ ॥
यवमध्या हरित्पीतहारिद्रत्वङ्नखादयः ।

पित्ताधिक मूळव्याधीचे मोड तांबडे, पिंवळे किंवा काळे असून त्यांचीं तोंडें निळीं असतात. त्यांतून पातळ रक्त स्रवतें, त्यांस घाण येते. ते पातळ, मऊ व लवचीक असतात. त्यांचा आकार व रंग पोपटाच्या जिभेसारखा, यकृताच्या तुकड्यासारख्या, किंवा जळवेच्या तोंडासारखा असतो. यांत दाह, पिकणें, ताप, घाम, तहान, मूर्च्छा, अरुचि व मोह हे विकार होतात. मोड हातास उष्ण लागतात. पातळ, निळा, उष्ण, पिंवळा, तांबडा व अपक्व असा मल होतो. हे पित्ताचे मोड जवासारखे म्हणजे मध्यें जाड असतात. आणि यांत त्वचा, नखें, डोळे, मल, मूत्र, तोंड हीं हिरवीं किंवा पिंवळीं होतात.

श्लेष्मोल्बणा महामूला घना मंदरुजः सिताः ॥ ३७ ॥
उच्छूनोपचिताः स्निग्धाः स्तब्धवृत्तगुरुस्थिराः ।
पिच्छिलाः स्तिमिताः श्लक्ष्णाःकंड्वाढ्याः स्पर्शनप्रियाः ३८
करीरपनसास्थ्याभास्तथा गोस्तनसन्निभाः ।
वंक्षणानाहिनः पायुबस्तिनाभिविकर्तिनः ॥ ३९ ॥
सकासश्वासहृल्लासप्रसेकारुचिपीनसाः ।
मेहकृच्छ्रशिरोजाड्यशिशिरज्वरकारिणः ॥ ४० ॥
क्लैब्याग्निमार्दवच्छर्दिरामप्रायविकारदाः ।

वसाभाः सकफप्राज्यपुरीषाः सप्रवाहिकाः ॥ ४१ ॥
न स्रवंति न भिद्यंते पांडुस्निग्धत्वगादयः ।

कफाधिक मूळव्याधीचे मोड मुळांत जाड, दाट, पांढरे, वर उभारलेले, फुगलेले, गुळगुळीत, ताठ, वाटोळे, जड व स्थिर असून ते फारसे दुखत नाहींत. शिवाय ते चिकट, ओलसर व मऊ असून त्यांस खाज सुटते व हात लावला असतां बरें वाटतें. त्यांचा आकार वेळूचा कोंब, फणसाच्या आठळ्या, किंवा गाईचे स्तन यांच्यासारखा असतो. यांत जांघाडे फुगतात; गुद, बस्ति व बेंबी यांत कातरल्यासारखी पीडा होते, आणि खोकला, दमा, मळमळ तोंडास पाणी सुटणें, अरुचि, पीनस, प्रमेह, मूत्रकृच्छ्र, डोकें जड होणें, हिंवताप, नपुंसकत्व, अग्निमान्द्य, वांति व आमविकार हे उत्पन्न होतात. कफाचे मोड वसेच्या रंगाचे असतात आणि यांच्या योगानें कफमिश्रित पुष्कळसें शौचास होतें; व त्या वेळीं कुंथावें लागतें. हे स्रवतही नाहींत. व फुटतही नाहींत. यांत त्वचा, नखें वगैरे पांढुरकीं व चिकट होतात.

संसृष्टलिंगाः संसर्गान्निचयात्सर्वलक्षणाः ॥ ४२ ॥

द्विदोषज मूळव्याधींत दोन दोषांचीं मिश्र लक्षणें होतात आणि सान्निपातिक मूळव्याधींत वर सांगितलेलीं सर्व लक्षणें होतात.

रक्तोल्बणा गुदे कीलाः पित्ताकृतिसमन्विताः ।
वटप्ररोहसदृशा गुंजाविद्रुमसान्निभाः ॥ ४३ ॥
तेऽत्यर्थं दुष्टमुष्णं च गाढविट्प्रतिपीडिताः ।
स्रवंति सहसा रक्तं तस्य चातिप्रवृत्तितः ॥ ४४ ॥
भेकाभः पीड्यते दुःखैः शोणितक्षयसंभवैः ।
हीनवर्णबलोत्साहो हतौजाः कलुषेंद्रियः ॥ ४५ ॥

रक्तज्या मूळव्याधीच्या मोडांचीं लक्षणें पित्ताधिक मूळव्याधीच्या लक्षणांसारखींच असतात. ते वडाच्या अंकुरासारखे आणि गुंजा किंवा पोंवळें यांसारखे लाल असतात. यांच्या योगानें मळाचा खडा होऊन त्यापासून ते मोड दबले व चिरले जाऊन त्यांतून एकाएकीं अतिशय दुष्ट व उष्ण रक्त स्रवूं लागतें. अतिशय रक्तस्राव झाल्यानें रोगी बेडकासारखा फटफटीत होऊन रक्तक्षयापा-

सून होणाऱ्या सर्व रोगांनीं पीडिला जातो. त्याची कांति, शक्ति व उत्साह हीं क्षीण होतात, ओज नाहींसें होतें, आणि इन्द्रियें कलुषित होतात.

मुद्गकोद्रवचूर्णाह्वकरीरचणकादिभिः ।
रूक्षैः संग्राहिभिर्वायुः स्वस्थाने कुपितो बली ॥ ४६ ॥
अधोवहानि स्रोतांसि संरुध्याधः प्रशोषयन् ।
पुरीषं वातविण्मूत्रसंगं कुर्वीत दारुणम् ॥ ४७ ॥
तेन तीव्रा रुजा कोष्ठपृष्ठहृत्पार्श्वगा भवेत् ।
आध्मानमुदरावेष्टो हृल्लासः परिकर्तनम् ॥ ४८ ॥
बस्तौ च सुतरां शूलं गंडश्वयथुसंभवः ।
पवनस्योर्ध्वगामित्वं ततश्छर्द्यरुचिज्वराः ॥ ४९ ॥
हृद्रोगग्रहणीदोषमूत्रसंगप्रवाहिकाः ।
बाधिर्यतिमिरश्वासशिरोरुक्कासपीनसाः ॥ ५० ॥
मनोविकारस्तृष्णास्रपित्तगुल्मोदरादयः ।
ते ते च वातजा रोगा जायंते भृशदारुणाः ॥ ५१ ॥
दुर्नाम्नामित्युदावर्तः परमोऽयमुपद्रवः ।
वाताभिभूतकोष्ठानां तैर्विनाऽपि स जायते ॥ ५२ ॥

मूग, हरीक, जोंधळे, वेळूचे कोंब, चणे, इत्यादि रूक्ष व अवष्टंभक पदार्थ खाल्यानें अपान वायु बस्ति वगैरे आपल्या स्थानांत कुपित होऊन प्रबल होत्साता अधोवाहक स्रोतांचा अवरोध करून मळास सुकवितो, आणि अधोवायु, विष्ठा व मूत्र यांचा भयंकर अवरोध करितो. त्यामुळें कोठा, पाठ, हृदय व बरगड्या यांत तीव्र वेदना होतात, पोट फुगतें, जखडून बांधल्याप्रमाणें वाटतें, मळमळतें, गुदांत कातरल्यासारखी पीडा होते, बस्तींत फार शूळ होतो, गाल सुजतात, अधोवायु वर येतो व त्या योगानें वांति, अरुचि, ताप, हृद्रोग, संग्रहणी, मूत्रावरोध, कुंथणें, बहिरेपणा, डोळ्यांपुढें अंधेरी येणें, दमा, डोकें दुखणें, खोकला, पीनस, मनोविकार, तहान, रक्तपित्त, गुल्म, उदर इत्यादि अनेक अत्यंत भयंकर असे वातरोग उत्पन्न होतात. असा हा उदावर्त नांवाचा मूळव्याधीचा एक महान् उपद्रव आहे. वातबद्ध कोठ्याच्या मनुष्यास हा मूळव्याधीवांचून एरवीं देखील होतो.

सहजानि त्रिदोषाणि यानि चाभ्यंतरे वलौ ।
स्थितानि तान्यसाध्यानि याप्यंतेऽग्निबलादिभिः ॥ ५३ ॥

जन्मतःच असलेल्या, त्रिदोषापासून झालेल्या व गुदांतील आंतल्या पहिल्या वळीवर झालेल्या मूळव्याधी असाध्य होत. परंतु त्याही रोग्याचा अग्नि प्रदीप्त असून आयुष्य शिल्लक असल्यास याप्य होतात.

द्वंद्वजानि द्वितीयायां वलौ यान्याश्रितानि च ।
कृच्छ्रसाध्यानि तान्याहुः परिसंवत्सराणि च ॥ ५४ ॥

द्विदोषज, दुसऱ्या वळीवर झालेल्या व एक वर्ष होऊन गेलेल्या मूळव्याधी कष्टसाध्य आहेत असें सांगतात.

बाह्यायां तु वलौ जातान्येकदोषोल्बणानि च ।
अर्शांसि सुखसाध्यानि न चिरोत्पतितानि च ॥ ५५ ॥

बाहेरच्या वळीवर झालेल्या, एकदोषजन्य व नुकत्याच झालेल्या मूळव्याधी सुखसाध्य असतात.

मेढ्रादिष्वपि वक्ष्यंते यथास्वं

शिश्नावर, कानांत, नाकांत वगैरे होणाऱ्या मोडांचें वर्णन त्या त्या रोगप्रकरणांत केलें जाईल.

नाभिजानि तु ।
गंडूपदस्वरूपाणि पिच्छिलानि मृदूनि च ॥ ५६ ॥

बेंबीवर होणारे मोड गांडूळाच्या तोंडासारखे, बुळबुळीत व मऊ असतात.

व्यानो गृहीत्वा श्लेष्माणं करोत्यर्शस्त्वचो बहिः ।
कीलोपमं स्थिरखरं चर्मकीलं तु तं विदुः ॥ ५७ ॥

व्यानवायु कफानें युक्त होऊन बाहेरच्या त्वचेवर खिळ्यासारखे चामट व खरखरीत असे जे मोड उत्पन्न करितो, त्यांस चर्मकील म्हणजे चामखीळ असें म्हणतात.

वातेन तोदः पारुष्यं पित्तादसितरक्तता ।
श्लेष्मणा स्निग्धता तस्य ग्रथितत्वं सवर्णता ॥ ५८ ॥

त्यांत वायूनें टोंचण लागते व तो खरखरीत लागतो. पित्तानें तो काळा व लाल होतो. आणि कफानें गुळगुळीत, गांठाळलेला व चामडीच्याच रंगाचा होतो.

अर्शसां प्रशमे यत्नमाशु कुर्वीत बुद्धिमान् ।
तान्याशु हि गुदं बद्ध्वा कुर्युर्बद्धगुदोदरम् ॥ ५९ ॥

मूळव्याध बरी करण्यासाठीं शहाण्या मनुष्यानें तावडतोब यत्न करावा. कारण उपाय न केल्यास ते मोड लगेच गुदद्वार बंद करून बद्धगुदोदर नांवाचा भयंकर रोग उत्पन्न करितात.

---

## अध्याय ८ वा.

अथातोऽतीसारग्रहणीरोगनिदानं व्याख्यास्यामः ।

आतां अतिसार व ग्रहणी या रोगांचें निदान सांगतों.

दोषैर्व्यस्तैः समस्तैश्च भयाच्छोकाच्च षड्विधः ।
अतीसारः

वात, पित्त, कफ, सन्निपात, भीति व शोक यांपासून सहा प्रकारचा अतिसार होतो.

स सुतरां जायतेऽत्यंबुपानतः ॥ १ ॥
कृशशुष्कामिषासात्म्यतिलपिष्टविरूढकैः ।
मद्यरूक्षातिमात्रान्नैरर्शोभिः स्नेहविभ्रमात् ॥ २ ॥
कृमिभ्यो वेगरोधाच्च

तो बहुतकरून अतिशय पाणी प्याल्यानें, रोडावलेल्या जनावरांचें व वाळलेलें मांस खाल्ल्यानें, तसेंच असात्म्य पदार्थ, तीळ, पिठाचे पदार्थ, कोंब आलेलें धान्य, मद्य, रूक्ष व अतिशय अन्न खाल्ल्यानें, मूळव्याधीपासून, स्नेहपानांत चूक झाल्यानें, व मलमूत्रांचे वेग थांबविल्यानें उत्पन्न होतो.

तद्विधैः कुपितोऽनिलः ।
विस्रंसयत्यधोऽब्धातु हत्वा तेनैव चानलम् ॥ ३ ॥
व्यापद्यानुशकृत्कोष्ठं पुरीषं द्रवतां नयन् ।
प्रकल्पतेऽतिसाराय

अशाच प्रकारच्या इतर कारणांनीं वायु कुपित होऊन, रसादि जलात्मक धातूंस खालीं नेऊन, त्यांच्याच योगानें जठराग्नीस मंद करून, मळाजवळच्या कोठ्याच्या भागांत म्हणजे मोठ्या आंतड्यांत विकार उत्पन्न करून, तीं शून्य करून व विष्ठेस पातळ करून अतिसार उत्पन्न करितो.

लक्षणं तस्य भाविनः ॥ ४ ॥
तोदो हृद्गुदकोष्ठेषु गात्रसादो मलग्रहः ।
आध्मानमविपाकश्च

हृदय, गुद व कोठा यांत टोंचण होणें, अंग गळणें, मलावरोध होणें, पोट फुगणें व अपचन होणें हीं अतिसाराचीं पूर्वरूपें होत.

तत्र वातेन विज्जलम् ॥ ५ ॥
अल्पाल्पं शब्दशूलाढ्यं विबद्धमुपवेश्यते ।
रूक्षं सफेनमच्छं च ग्रथितं वा मुहुर्मुहुः ॥ ६ ॥
तथा दग्धगुडाभासं सपिच्छापरिकर्तिकम् ।
शुष्कास्यो भ्रष्टपायुश्च हृष्टरोमा विनिष्टनन् ॥ ७ ॥

वातातिसारांत पाणी व मळ यांनीं मिश्रित, थोडथोडें, शब्द व शूल यांनीं युक्त, अडखळत, रूक्ष, फेंसाळ, पातळ किंवा गांठाळलेलें, वरचेवर, करपलेल्या गुळासारखें, आंवमिश्रित व गुदांत कातरल्यासारखी पीडा उत्पन्न करून शौचास होतें. यांत रोग्याच्या तोंडास कोरड पडते, गुद बाहेर येतें, अंगावर रोमांच उभे राहतात व शौचाचे वेळीं तो कुंथतो.

पित्तेन पीतमसितं हारितं शाद्वलप्रभम् ।
सरक्तमतिदुर्गंधं तृण्मूर्छास्वेददाहवान् ॥ ८ ॥
सशूलपायुसंतापं पाकवान्

पित्तातिसारांत पिंवळें, काळें, पारवें, हिरवें ( दूर्वांसारखें ) रक्तमिश्रित व अतिशय दुर्गंधी असें शौचास होतें. यांत तहान, मूर्च्छा, घाम, दाह, शूळ, गुदद्वाराची आग व पाक हे विकार होतात.

श्लेष्मणा घनम् ।
पिच्छिलं तंतुमच्छ्वेतं स्निग्धमामं कफान्वितम् ॥ ९ ॥
अभीक्ष्णं गुरु दुर्गंधं विबद्धमनुबद्धरुक् ।
निद्रालुरलसोऽन्नद्विडल्पाल्पं सप्रवाहिकम् ॥ १० ॥
सरोमहर्षः सोत्क्लेशो गुरुबस्तिगुदोदरः ।
कृतेऽप्यकृतसंज्ञश्च

कफातिसारांत दाट, बुळबुळीत, तंतुयुक्त, पांढरें, स्निग्ध, अपक्व, कफमिश्रित, जड, दुर्गंधी, अडखळत, वरचेवर वरचेवर मुरडा होऊन,

थोडथोडें कुंथून शौचास होतें. यांत झोंप व आळस हीं फार येतात, अन्नाचा तिटकारा येतो, रोमांच उभे राहतात, पोटांत मळमळतें; बस्ति, गुद व पोट हीं जड होतात आणि शौचास झालें तरी झालें नाहींसें वाटतें.

सर्वात्मा सर्वलक्षणः ॥ ११ ॥

सान्निपातिक अतिसारांत वरील सर्व लक्षणें होतात.

भयेन क्षोभिते चित्ते सपित्तो द्रावयेच्छकृत् ।
वायुस्ततोऽतिसार्येत क्षिप्रमुष्णं द्रवं प्लवम् ॥ १२ ॥
वातपित्तसमं लिंगैराहुस्तद्वच्च शोकतः ।

भयानें व शोकानें चित्त क्षुब्ध झालें असतां वायु पित्ताशीं मिळून मळास पातळ करितो. त्यामुळें वरचेवर उष्ण, पातळ व पाण्यावर तरंगणारे असे जुलाब होतात. यांत वातातिसाराचीं व पित्तातिसाराचीं लक्षणें होतात.

अतीसारः समासेन द्विधा सामो निरामकः ॥ १३ ॥
सासृङ्निरस्रः

संक्षेपानें अतिसाराचे दोन प्रकार होतात. एक साम व निराम; आणि दुसरा, रक्तसहित व रक्तरहित.

तत्राऽद्ये गौरवादप्सु मज्जति ।
शकृद्दुर्गंधमाटोपविष्टंभार्तिप्रसेकिनः ॥ १४ ॥
विपरीतो निरामस्तु कफात्पक्कोऽपि मज्जति ।

त्यांपैकीं आमातिसारांत मळ जड असल्यामुळें पाण्यांत बुडतो व तो दुर्गंधी असतो. यांत पोटांत गुडगुडतें, पोट फुगतें, दुखतें आणि लाळ सुटते. पक्कातिसारांत याच्या उलट लक्षणें असतात. कफातिसारांत पक्क मळ असला तरी तो पाण्यांत बुडतो.

अतीसारेषु यो नातियत्नवान् ग्रहणीगदः ॥ १५ ॥
तस्य स्यादग्निविध्वंसकरैरन्यस्य सेवितैः ।

अतिसार झाला असतां तो बरा करण्याकरितां यत्न न करणाऱ्या मनुष्यास व जो मनुष्य अग्निमांद्य करणारे पदार्थ अतिशय खातो त्यास ग्रहणी रोग होतो.

सामं शकृन्निरामं वा जीर्णे येनातिसार्यते ॥ १६ ॥
सोऽतिसारोऽतिसरणादाशुकारी स्वभावतः ।

ज्या रोगांत अन्न जिरल्यावर अपक्क किंवा पक्क मळाचे जुलाब होतात, त्यांत मळच अतिशय बाहेर सरतो, म्हणून त्यास अतिसार असें म्हणतात. हा स्वभावतःच आपली क्रिया जलद करणारा आहे.

सामं सान्नमजीर्णेऽन्ने जीर्णे पक्कं तु नैव वा ॥ १७ ॥
अकस्माद्वा मुहुर्बद्धमकस्माच्छिथिलं मुहुः ।
चिरकृद्ग्रहणीदोषः संचयाच्चोपवेशयेत् ॥ १८ ॥

ज्या रोगांत अन्नाचें पचन न झाल्यास शौचास अपक्क किंवा अन्नमिश्रित मळ होतो, आणि अन्न जिरल्यास पक्क मळ होतो किंवा मुळींच शौचास होत नाहीं, कारणावांचून वरचेवर अडखळत, किंवा मळ सांचला असल्यास एकाएकीं वारंवार पातळ जुलाब होऊं लागतात, त्या रोगास ग्रहणीदोष असें म्हणतात. हा फार दिवसपर्यंत राहतो.

स चतुर्धा पृथग्दोषैः सन्निपाताच्च जायते ।

वात, पित्त, कफ व सान्निपात या चोहोंपासून चार प्रकारची ग्रहणी होते.

प्राग्रूपं तस्य सदनं चिरात्पचनमम्लकः ॥ १९ ॥
प्रसेको वक्त्रवैरस्यमरुचिस्तृट् क्लमो भ्रमः ।
आनद्धोदरता छर्दिः कर्णक्ष्वेडोऽन्त्रकूजनम् ॥ २० ॥

अग्निमांद्य, फार उशिरां अन्न पचन होणें, आंबट ढेकर येणें, तोंडास पाणी सुटणें, तोंड बेचव होणें, अरुचि, तृषा, ग्लानि, भोंवळ, पोट फुगणें, वांति, कानांत शब्द होणें व आतड्यांत कुजबुजणें हें तिचें पूर्वरूप होय.

सामान्यं लक्षणं कार्श्यं धूमकस्तमको ज्वरः ।
मूर्च्छा शिरोरुग्विष्टंभः श्वयथुः करपादयोः ॥ २१ ॥

कृशता, घशांतून व नाकांतून धुरकट वाफा निघणें, तमकश्वास, ताप, मूर्च्छा, डोकें दुखणें, पोट फुगणें, व हातपाय सुजणें हें ग्रहणीचें सामान्य लक्षण होय.

तत्राऽनिलात्तालुशोषस्तिमिरं कर्णयोः स्वनः ।
पार्श्वोरुवंक्षणग्रीवारुजाऽभीक्ष्णं विसूचिका ॥ २२ ॥
रसेषु गृद्धिः सर्वेषु क्षुत्तृष्णा परिकर्तिका ।
जीर्णे जीर्यति चाध्मानं भुक्ते स्वास्थ्यं समश्नुते ॥ २३ ॥
वातहृद्रोगगुल्मार्शःप्लीहपांडुत्वशंकितः ।
चिराद्दुःखं द्रवं शुष्कं तन्वामं शब्दफेनवत् ॥ २४ ॥
पुनःपुनः सृजेद्वर्चः पायुरुक्श्वासकासवान् ।

वातग्रहणींत टाळूस कोरड, डोळ्यांपुढें अंधेरी, कानांत शब्द; बरगडया, मांडया, जांघाडे व मान दुखणें, अंगास एकसारख्या सुया टोंचल्याप्रमाणें वाटणें, सर्व रसांची इच्छा होणें, तहान व भूक लागणें, गुदांत कातरल्यासारखी पीडा होणें, अन्न जिरल्यावर व जिरत असतां पोट फुगणें, जेवल्यावर बरें वाटणें, वातरोग, हृद्रोग, गुल्म, मूळव्याध, पानथरी, व पांडु रोग हे झाल्याची शंका वाटणें; फार वेळानें, दुःखानें, पातळ, सुकें, थोडें, अपक्क, फेंसाळ व शब्द करून वरचेवर शौचास होणें, हे विकार होतात. यांत गुदांत दुखतें, दमा लागतो व खोकला येतो.

पित्तेन नीलं पीताभं पीताभः सृजति द्रवम् ॥ २५ ॥
पूत्यम्लोद्गारहृत्कंठदाहारुचितृडार्दितः ।

पित्ताच्या ग्रहणींत रोग्याची कांति पिंवळट होते; निळें, पिंवळें व पातळ शौचास होतें; घाणेरडे व आंबट ढेंकर येतात; छातींत व घशांत जळजळतें, अरुचि होते व तहान लागते.

श्लेष्मणा पच्यते दुःखमन्नं छर्दिररोचकः ॥ २६ ॥
आस्योपदेहनिष्ठीवकासहृल्लासपीनसाः ।
हृदयं मन्यते स्त्यानमुदरं स्तिमितं गुरु ॥ २७ ॥
उद्गारो दुष्टमधुरः सदनं स्त्रीष्वहर्षणम् ।
भिन्नामश्लेष्मसंसृष्टगुरुवर्चःप्रवर्तनम् ॥ २८ ॥
अकृशस्यापि दौर्बल्यम्

कफग्रहणींत अन्न कष्टानें पचतें; वांति, अरुचि, तोंडास चिकटा, वरचेवर थुंकी येणें, खोकला, मळमळ, पीनस हे विकार होतात; हृदय ताठल्याप्रमाणें वाटतें; पोट निश्चल व जड होतें; करपट व गुळमट ढेंकर येतात; हातपाय गळतात; स्त्रीच्या विषयीं अप्रीति

होते; शौचास पातळ, अपक्क, कफमिश्रित व जड असा मळ होतो आणि मनुष्य पुष्ट असूनही त्यास शक्ति नाहींशी होते.

सर्वजे सर्वसंकरः।

सान्निपातिक ग्रहणींत वरील सर्व लक्षणें असतात.

विभागेऽगस्य ये चोक्ता विषमाद्यास्त्रयोऽग्नयः॥ २९॥
तेऽपि स्युर्ग्रहणीदोषाः समस्तु स्वास्थ्यकारणम्।

मागें अंगविभागशारीरांत जे विषम, तीक्ष्ण व मंद असे तीन प्रकारचे अग्नि सांगितले आहेत, तेही एक प्रकारें ग्रहणीदोषच समजावे; सम अग्नि हा आरोग्यास कारण आहे.

वातव्याध्यश्मरीकुष्ठमेहोदरभगंदराः।
अर्शांसि ग्रहणीत्यष्टौ महारोगाः सुदुस्तराः॥ ३०॥

वातरोग, मूतखडा, कुष्ठ, प्रमेह, उदर, भगंदर, मूळव्याध व संग्रहणी हे आठ महारोग अतिशय दुःसाध्य आहेत.

---

## अध्याय ९ वा.

अथाऽतो मूत्राघातनिदानं व्याख्यास्यामः।

आतां मूत्राघाताचें निदान सांगतों.

बस्तिबस्तिशिरोमेढ्रकटीवृषणपायवः।
एकसंबंधनाः प्रोक्ता गुदास्थिविवराश्रयाः॥ १॥

बस्ति, बस्तीचें अग्र, शिस्न, कंबर, वृषण व गुद हे अवयव गुदाच्या हाडाच्या पोकळींत एकमेकांस लागून आहेत.

अधोमुखोऽपि बस्तिर्हि मूत्रवाहिसिरामुखैः।
पार्श्वेभ्यः पूर्यते सूक्ष्मैः स्यंदमानैरनारतम्॥ २॥
यैस्तैरेव प्रविश्यैनं दोषाः कुर्वंति विंशतिम्।
मूत्राघातान् प्रमेहांश्च कृच्छ्रान्मर्मसमाश्रयात्॥ ३॥

बस्तीचें तोंड जरी खालच्या बाजूस आहे, तथापि सूक्ष्म तोंडाच्या मूत्रवाहक शिरा त्यांत चहूं बाजूंनीं येऊन मिळतात. त्यांतून निरंतर मूत्रस्राव होत असतो. त्यानें बस्ति भरतो. याच शिरांच्या द्वारें वातादि दोष बस्तींत शिरून वीस प्रकारचे मूत्राघात व वीस प्रकारचे प्रमेह उत्पन्न करितात. हे मर्माश्रित असल्यामुळें कष्टसाध्य आहेत.

बस्तिवंक्षणमेढ्रार्तियुक्तोऽल्पाल्पं मुहुर्मुहुः ।
मूत्रयेद्वातजे कृच्छ्रे

वातजन्य मूत्रकृच्छ्रांत बस्ति, जांघाडे व शिस्न यांत कळा लागून वरचेवर थोडथोडें मुतावयास होतें.

पैत्ते पीतं सदाहरुक् ॥ ४ ॥
रक्तं वा

पैत्तिक मूत्रकृच्छ्रांत आग व तिडीक होऊन पिंवळी किंवा तांबडी लघ्वी होते.

कफजे बस्तिमेढ्गौरवशोफवान् ।
सपिच्छं सविबंधं च

कफजन्य मूत्रकृच्छ्रांत बस्ति व शिस्न जड होतात व सुजतात आणि अडखळत व चिकट लघ्वी होते.

सर्वैः सर्वात्मकं मलैः ॥ ५ ॥

सान्निपातिक मूत्रकृच्छ्रांत वरील सर्व लक्षणें होतात.

यदा वायुर्मुखं बस्तेरावृत्य परिशोषयेत् ।
मूत्रं सपित्तं सकफं सशुक्रं वा तदा क्रमात् ॥ ६ ॥
संजायतेऽश्मरी घोरा पित्ताद्गोरिव रोचना ।
श्लेष्माश्रया च सर्वा स्यात्

वायु कुपित होऊन बस्तीचें तोंड बंद करून मूत्रास सुकवितो. त्या योगानें वाताश्मरी होते. पित्तासहित मूत्र सुकविल्यास पित्ताश्मरी होते, कफासहित सुकविल्यास कफाश्मरी होते; आणि शुक्रासहित सुकविल्यास शुक्राश्मरी होते. या सर्वच अश्मरी भयंकर असून त्यांतल्या त्यांत उत्तरोत्तर घोरतर आहेत. गाईचें पित्त सुकल्यानें जसें गोरोचन होतें, तसें मूत्र सुकल्यानें अश्मरी होते. या सर्व मुतखड्यांचा मूळ आधार कफ हा आहे.

अथाऽस्याः पूर्वलक्षणम् ॥ ७ ॥

बस्त्याध्मानं तदासन्नदेशेषु परितोऽतिरुक् ।
मूत्रे च बस्तगंधत्वं मूत्रकृच्छ्रं ज्वरोऽरुचिः ॥ ८ ॥

बस्ति फुगणें, त्याच्या समोंवतालच्या जवळजवळच्या भागांत अतिशय कळा लागणें, लघ्वीस बोकडाच्या मुतासारखी घाण येणें,

लघ्वी कष्टानें होणें, ताप व अरुचि हीं लक्षणें मुतखडा होण्यापूर्वीं होतात.

सामान्यलिंगं रुङ् नाभिसेवनीबस्तिमूर्धसु ।
विशीर्णधारं मूत्रं स्यात्तया मार्गनिरोधने ॥ ९ ॥
तद्व्यपायात्सुखं मेहेदच्छं गोमेदकोपमम् ।
तत्संक्षोभात् क्षते सास्रमायासाच्चातिरुग्भवेत् ॥ १० ॥

मुतखड्याचीं सामान्य लक्षणें येणेंप्रमाणें असतातः—बेंबी, शिश्नाच्या मणक्यापासून गुदापर्यंतची शिवण व बस्तीचें अग्र यांत कळा लागणें; मुततांना मुतखडा बस्तीच्या तोंडाशीं येऊन मार्ग बंद झाला म्हणजे लघ्वीची धार दुभंगणें आणि खडा दूर झाला म्हणजे सुखानें लघ्वी होणें; गोमेद नांवाच्या रसासारखी व स्वच्छ लघ्वी होणें; खडा बस्तींत इकडे तिकडे आपटल्यानें आंत जखम होऊन त्यांतून लघ्वीबरोबर रक्त येणें आणि श्रमानें सदरहू स्थानांत अतिशय दुखणें.

तत्र वाताद्भृशार्त्यर्तो दंतान् खादति वेपते ।
मृद्गाति मेहनं नाभिं पीडयत्यनिशं क्वणन् ॥ ११ ॥
सानिलं मुंचति शकृन्मुहुर्मेहति बिंदुशः ।
श्यावा रूक्षाऽश्मरी चास्य स्याच्चिता कंटकैरिव ॥ १२ ॥

वाताश्मरींत मनुष्य अतिशय वेदनांनीं व्याकुळ होतो, दांत खातो, कांपतो, शिश्न चोळतो, बेंबी दाबतो, एकसारखा कण्हतो, मळाबरोबर अधोवायूचेंही विसर्जन करितो आणि वरचेवर वरचेवर थेंब थेंब मुततो. यांत मुतखड्याचा रंग काळसर-धूसर असून तो कांट्यांनीं भरल्याप्रमाणें खरखरीत असतो.

पित्तेन दह्यते बस्तिः पच्यमान इवोष्मवान् ।
भल्लातकास्थिसंस्थाना रक्तपीतासिताऽश्मरी ॥ १३ ॥

पित्ताश्मरींत बस्तींत आग होते, आणि तो शिजत असल्याप्रमाणें ऊन असतो. खड्याचा आकार बिब्यासारखा असून रंग लाल, पिंवळा किंवा काळा असतो.

बस्तिर्निस्तुद्यत इव श्लेष्मणा शीतलो गुरुः ।
अश्मरी महती श्लक्ष्णा मधुवर्णाऽथवा सिता ॥ १४ ॥

कफाश्मरींत बस्तींत टोंचल्यासारखी पीडा होते, तो थंड व जड लागतो. आणि खडा मोठा व मऊ असून मधाच्या रंगाचा किंवा पांढरा असतो.

एता भवंति बालानां तेषामेव च भूयसा ।
आश्रयोपचयाल्पत्वाद् ग्रहणाहरणे सुखाः ॥ १५ ॥

हे तीन प्रकारचे मुतखडे बहुतकरून लहान मुलांस होतात. आणि त्यांचा बस्ति व खडा लहान असल्यामुळें तो यंत्रानें धरून बाहेर काढणें सोपें जातें.

शुक्राश्मरी तु महतां जायते शुक्रधारणात् ।

वीर्याचा वेग थांबविल्यानें मोठ्या मनुष्यांस शुक्राश्मरी होते.

स्थानाच्च्युतममुक्तं हि मुष्कयोरंतरेऽनिलः ॥ १६ ॥
शोषयत्युपसंगृह्य शुक्रं तच्छुष्कमश्मरी ।
बस्तिरुक्कृच्छ्रमूत्रत्वमुष्कश्वयथुकारिणी ॥ १७ ॥
तस्यामुत्पन्नमात्रायां शुक्रमेति विलीयते ।
पीडिते त्ववकाशेऽस्मिन्

स्थानापासून सुटलेलें वीर्य बाहेर न पडल्यास वायु त्यास दोन अंडांच्या मध्यभागीं जमवून सुकवितो. तें सुकलें म्हणजे त्याचा खडा बनतो. हीच अश्मरी. हींत बस्तींत ठणका लागतो, लघ्वी कष्टानें होते आणि वृषण सुजतात. हा खडा बनतो, इतक्यांत त्या ठिकाणीं दुसरें वीर्य येऊन त्या खड्यास चिकटतें व अशा रीतीनें तो खडा वाढत जातो.

अश्मर्यैव च शर्करा ॥ १८ ॥
अणुशो वायुना भिन्ना सा त्वस्मिन्ननुलोमगे ।
निरेति सह मूत्रेण प्रतिलोमे विबध्यते ॥ १९ ॥

वायूनें मुतखड्याचे बारीक बारीक कण झाले म्हणजे त्यांसच शर्करा असें म्हणतात. वायु आपल्या उचित मार्गावर असला म्हणजे ती लघ्वीबरोबर बाहेर पडते व तोच वायु उन्मार्गगामी असला म्हणजे ती लघ्वींत अडकते.

मूत्रसंधारिणः कुर्याद्रुद्ध्वा बस्तेर्मुखं मरुत् ।
मूत्रसंगं रुजं कंडूं कदाचिच्च स्वधामतः ॥ २० ॥
प्रच्याव्य बस्तिमुद्वृत्तं गर्भाभं स्थूलविप्लुतम् ।

करोति तत्र रुग्दाहस्पंदनोद्वेष्टनानि च ॥ २१ ॥
बिंदुशश्च प्रवर्तेत मूत्रं बस्तौ तु पीडिते ।
धारया द्विविधोऽप्येष वातबस्तिरिति स्मृतः ॥ २२ ॥
दुस्तरो दुस्तरतरो द्वितीयः प्रबलानिलः ।

मूत्राचा अवरोध करणाऱ्या मनुष्याचा वायु कुपित होऊन तो त्याच्या बस्तीचें तोंड बंद करून आंत मूत्र कोंडतो व तेथें कळा आणि कंड उत्पन्न करितो. कदाचित् बस्तीस आपल्या जागेवरून चाळवून उलट करितो व मग तो वाढून गर्भाप्रमाणें मोठा दिसूं लागतो, आणि पाण्यावर तरंगत असल्याप्रमाणें चंचल होतो. बस्तींत टोंचतें, आग होते, तो उडतो, पिळवटल्यासारखा होतो, आणि लघ्वी थेंब थेंब होते; व बस्ति हातानें दाबला असतां धार येते. या दोन्ही प्रकारच्या मूत्रविकारांस वातबस्ति असें म्हणतात. त्यांत पहिला प्रकार दुःसाध्य असून दुसरा तर त्याहीपेक्षां अधिक दुःसाध्य आहे. त्यांत वायु प्रबल असतो.

शकृन्मार्गस्य बस्तेश्च वायुरंतरमाश्रितः ॥ २३ ॥
अष्ठीलाभं घनं ग्रंथिं करोत्यचलमुन्नतम् ।
वाताष्ठीलेति साऽध्मानविण्मूत्रानिलसंगकृत् ॥ २४ ॥

वायु गुद व बस्ति यांच्या मध्यभागीं राहून फणसाच्या आंठळीप्रमाणें कठिण, निश्चळ व वर उभारलेली गांठ उत्पन्न करितो; तीस वाताष्ठीला असें म्हणतात. हिच्यामुळें पोट फुगतें आणि मळ, मूत्र व वायु यांचा अवरोध होतो.

विगुणः कुंडलीभूतो बस्तौ तीव्रव्यथोऽनिलः ।
आविश्य मूत्रं भ्रमति सस्तंभोद्वेष्टगौरवः ॥ २५ ॥
मूत्रमल्पाल्पमथवा विमुंचति शकृत्सृजन् ।
वातकुंडलिकेत्येषा

कुपित झालेला वायु बस्तींत तीव्र वेदना उत्पन्न करून मूत्रांत शिरून कुंडलाकार होऊन चहूंकडे फिरतो. त्या योगानें मळमूत्राचा अवरोध होतो, बस्तींत पिळवटल्यासारखें होतें, जडपणा येतो, व लघ्वी थोडथोडी होते किंवा लघ्वीबरोबर शौचास होतें. या रोगास वातकुंडलिका म्हणतात.

मूत्रं तु विधृतं चिरम् ॥ २६ ॥
न निरेति विबद्धं वा मूत्रातीतं तदल्परुक् ।

पुष्कळ वेळपर्यंत मूत्र कोंडून धरल्यानें तें बाहेर येत नाहीं, किंवा थोडी कळ लागून अडकत अडकत येतें; त्यास मूत्रातीत म्हणतात.

विधारणात्प्रतिहतं वातोदावर्तितं यदा ॥ २७ ॥
नाभेरधस्तादुदरं मूत्रमापूरयेत्तदा ।
कुर्यात्तीव्ररुगाध्मानमपक्तिमलसंग्रहम् ॥ २८ ॥
तन्मूत्रजठरम्

लघ्वी थांबविल्यामुळें तुंबलेलें व वायूनें परत फिरविलेलें मूत्र बेंबीच्या खालीं पोटांत भरून त्यास फुगवितें. त्यामुळें त्यांत तीव्र कळा लागतात, पोट फुगतें, अन्न पचत नाहीं व मळाचा अवरोध होतो. त्यास मूत्रजठर म्हणतात.

छिद्रवैगुण्येनानिलेन वा ।
आक्षिप्तमल्पं मूत्रं तु बस्तौ नालेऽथवा मणौ ॥ २९ ॥
स्थित्वा स्रवेच्छनैः पश्चात्सरुजं वाऽथवाऽरुजम् ।
मूत्रोत्संगः स विच्छिन्नतच्छेषगुरुशेफसः ॥ ३० ॥

मूत्रद्वाराच्या दोषामुळें अथवा कुपित वायूच्या योगानें थोडथोडें येणारें मूत्र बस्तींत, मूत्रनळींत किंवा मण्यांत राहून मागून हळूहळू झिरपत राहतें. त्या वेळीं कधीं तिडीक येते व कधीं येत नाहीं. हें मूत्र अडकत अडकत येतें, त्यापैकीं कांहीं शिश्नांत राहतें; त्यामुळें शिश्न जड होतें. यास मूत्रोत्संग म्हणतात.

अंतर्बस्तिमुखे वृत्तः स्थिरोऽल्पः सहसा भवेत् ।
अश्मरीतुल्यरुग् ग्रंथिर्मूत्रग्रंथिः स उच्यते ॥ ३१ ॥

बस्तीच्या तोंडांत एकाएकीं लहानशी वाटोळी व निश्चळ अशी गांठ उत्पन्न होते; हीस मूत्रग्रंथी म्हणतात. हींत मुतखड्याप्रमाणें कळा लागतात.

मूत्रितस्य स्त्रियं यातो वायुना शुक्रमुद्धतम् ।
स्थानाच्च्युतं मूत्रयतः प्राक् पश्चाद्वा प्रवर्तते ॥ ३२ ॥
भस्मोदकप्रतीकाशं मूत्रशुक्रं तदुच्यते ।

लघ्वी लागली असतां ती थांबवून स्त्रीसंभोग करणाऱ्या मनु-

त्याचें वीर्य स्थानापासून सुटून वायूच्या द्वारें ढकललें जाऊन मूत्रांत मिळून लघ्वीच्या पूर्वीं किंवा नंतर राखेच्या पाण्यासारखें बाहेर येतें. त्यास मूत्रशुक्र म्हणतात.

रूक्षदुर्बलयोर्वातादुदावृत्तं शकृद्यदा ॥ ३३ ॥
मूत्रस्रोतोऽनुपर्येति संसृष्टं शकृता तदा ।
मूत्रं विट्तुल्यगंधं स्याद्विड्विघातं तमादिशेत् ॥ ३४ ॥

रूक्ष व दुर्बल मनुष्याचा मळ वायूनें कोंडला जाऊन तो परत फिरून ज्या वेळीं मूत्रवाहक स्रोतांत येऊन मूत्राशीं मिळतो, त्या वेळीं मूत्रास विष्ठेसारखी घाण येते. या विकारास विड्विघात म्हणतात.

पित्तं व्यायामतीक्ष्णोष्णभोजनाध्वातपादिभिः ।
प्रवृद्धं वायुना क्षिप्तं बस्त्युपस्थार्तिदाहवत् ॥ ३५ ॥
मूत्रं प्रवर्तयेत्पीतं सरक्तं रक्तमेव वा ।
उष्णं पुनःपुनः कृच्छ्रादुष्णवातं वदंति तम् ॥ ३६ ॥

व्यायाम, तीक्ष्ण व उष्ण भोजन, मार्गक्रमण, उन्हांत फिरणें इत्यादि कारणांनीं वाढलेल्या पित्तास वायूचा जोर मिळाला असतां बस्ति व शिस्न यांत तिडका लागतात व आग होते. आणि वरचेवर कष्टानें उष्ण, पिंवळें व रक्तमिश्रित मूत्र होतें, किंवा नुस्ती रक्ताचीच लघ्वी होते. त्यास उष्णवात म्हणतात.

रूक्षस्य क्लांतदेहस्य बस्तिस्थौ पित्तमारुतौ ।
मूत्रक्षयं सरुग्दाहं जनयेतां तदाह्वयम् ॥ ३७ ॥

रूक्ष व ग्लानि असलेल्या मनुष्याच्या बस्तींतील पित्त व वायु हे मूत्राचा क्षय करून कळा व दाह उत्पन्न करितात. त्यास मूत्रक्षय म्हणतात.

पित्तं कफो द्वावपि वा संहन्येतेऽनिलेन चेत् ।
कृच्छ्रान्मूत्रं तदा पीतं रक्तं श्वेतं घनं सृजेत् ॥ ३८ ॥
सदाहं रोचनाशंखचूर्णवर्णं भवेच्च तत् ।
शुष्कं समस्तवर्णं वा मूत्रसादं वदंति तम् ॥ ३९ ॥

पित्ताशीं किंवा कफाशीं अथवा दोहोंशीं वायु मिळाला असतां मोठ्या कष्टानें, पिंवळें, तांबडें, पांढरें व दाट असें मूत्र पडतें. त्यांत दाहही होतो आणि तें मूत्र सुकल्यावर गोरोचन, शंख किंवा चुना

यांच्या रंगासारखें होतें, किंवा वरील पिंवळा वगैरे सर्व रंग त्यांत दिसतात. या विकारास मूत्रसाद म्हणतात.

इति विस्तरतः प्रोक्ता रोगा मूत्राऽप्रवृत्तिजाः।
निदानलक्षणैरूर्ध्वं वक्ष्यंतेऽतिप्रवृत्तिजाः॥ ४०॥

याप्रमाणें मूत्रप्रवृत्ति न झाल्यानें होणाऱ्या रोगांचें सविस्तर वर्णन केलें. आतां पुढें मूत्राची अतिशय प्रवृत्ति झाल्यानें होणाऱ्या रोगांची कारणें व लक्षणें सांगतों.

## अध्याय १० वा.

अथाऽतः प्रमेहनिदानं व्याख्यास्यामः।

आतां प्रमेहाचें निदान सांगतों.

प्रमेहा विंशतिस्तत्र श्लेष्मतो दश पित्ततः।
षट् चत्वारोऽनिलात्

एकंदर वीस प्रकारचे प्रमेह आहेत. त्यांपैकीं कफापासून दहा, पित्तापासून सहा आणि वातापासून चार प्रकारचे प्रमेह होतात.

तेषां मेदोमूत्रकफावहम्॥ १॥
अन्नपानक्रियाजातं यत्प्रायस्तत्प्रवर्तकम्।
स्वाद्वम्ललवणस्निग्धगुरुपिच्छिलशीतलम्॥ २॥
नवधान्यसुरानूपमांसेक्षुगुडगोरसम्।
एकस्थानासनरतिः शयनं विधिवर्जितम्॥ ३॥

मेद, मूत्र व कफ यांस वाढविणारीं अन्नपानें व कर्में आणि गोड, आंबट, खारट, स्निग्ध, जड, बुळबुळीत व थंड पदार्थ; नवें धान्य, सुरा, पाणथळ जनावरांचें मांस, ऊंस, गूळ, दूध, दहीं; आणि एकाच जागीं पुष्कळ वेळ बसून राहणें व सांगितलेले नियम सोडून निजणें हीं बहुधा प्रमेह उत्पन्न करितात.

बस्तिमाश्रित्य कुरुते प्रमेहान्दूषितः कफः।
दूषयित्वा वपुःक्लेदस्वेदमेदोरसामिषम्॥ ४॥

दूषित झालेला कफ बस्तीचा आश्रय करून शरीरांतील क्लेद, घाम, मेद, रस व मांस यांस दूषित करून प्रमेह उत्पन्न करितो.

पित्तं रक्तमपि क्षीणे कफादौ मूत्रसंश्रयम्।

कफादि सौम्य धातु क्षीण झाले असतां कुपित झालेलें पित्त

त्यांस व रक्तास दूषित करून मूत्राश्रित होऊन प्रमेह उत्पन्न करितें.

**धातून्बस्तिमुपानीय तत्क्षयेऽपि च मारुतः ॥ ५ ॥**

कुपित झालेला वायु, धातु क्षीण झाले असतां किंवा त्यांस क्षीण करून बस्तींत नेऊन मूत्रद्वाराबाहेर काढतो; अर्थात् वातप्रमेह उत्पन्न करितो.

**साध्ययाप्यपरित्याज्या मेहास्तेनैव यद्भवाः ।**
**समासमक्रियतया महात्ययतयाऽपि च ॥ ६ ॥**

या कारणांमुळेंच कफमेह साध्य, पित्तमेह याप्य आणि वातमेह असाध्य आहेत. शिवाय कफमेहावर सम[1]क्रिया व पित्तमेहावर विरुद्ध क्रिया असल्यामुळें आणि वातमेहांत शरीराच्या आधारभूत धातूंचा जबर नाश होत असल्यामुळेंही ते अनुक्रमें साध्य, याप्य व असाध्य आहेत.

**सामान्यं लक्षणं तेषां प्रभूताविलमूत्रता ।**

एकंदर प्रमेहांचें सामान्य लक्षण म्हटलें म्हणजे पुष्कळ व गढूळ लघ्वी होणें हें आहे.

**दोषदूष्याविशेषेऽपि तत्संयोगविशेषतः ॥ ७ ॥**
**मूत्रवर्णादिभेदेन भेदो मेहेषु कल्प्यते ।**

वर सांगितलेल्या प्रमेहांत दोष व दूष्य हे जरी सारखेच असतात, तरी त्यांच्या विशेष संयोगानें व त्यामुळें मूत्राच्या रंगांत, वासांत वगैरे जो भेद होतो त्यावरून त्यांचे भेद केले आहेत.

**अच्छं बहु सितं शीतं निर्गंधमुदकोपमम् ॥ ८ ॥**
**मेहत्युदकमेहेन किंचिच्चाविलपिच्छिलम् ।**

उदकमेहांत लघ्वी स्वच्छ, पुष्कळ, पांढरी, थंड, गंधरहित, पाण्यासारखी, किंचित् गढूळ व बुळबुळीत अशी असते.

**इक्षो रसमिवात्यर्थं मधुरं चेक्षुमेहतः ॥ ९ ॥**

---

१ कफमेहांत कफाची व शरीर-क्लेदादिकांची अपतर्पणरूप एकच चिकित्सा असल्यामुळें तीं सुसाध्य असते. पित्तमेहांत पित्ताची शीत-मधुरादि चिकित्सा आणि प्रमेहाची रूक्ष-तीक्ष्णादि चिकित्सा करावी लागत असल्यामुळें ती कष्टसाध्य असते. तसेंच वातप्रमेहावर रूक्ष-तीक्ष्णादि पथ्य आहे आणि वातावर स्निग्ध-मधुरादि पथ्य आहे; अर्थात् दोहोंची क्रिया परस्परविरुद्ध आहे, म्हणून वातमेह असाध्य आहेत.

इक्षुमेहांत उंसाच्या रसासारखी अतिशय गोड लघ्वी असते.

सांद्रीभवेत्पर्युषितं सांद्रमेही प्रमेहति।

सांद्रमेहांत लघ्वी रात्रभर भांड्यांत ठेवली असतां दुसऱ्या दिवशीं सकाळीं दाट झालेली आढळते.

सुरामेही सुरातुल्यमुपर्यच्छमधो घनम्॥ १०॥

सुरामेहांत लघ्वी सुरेप्रमाणें वर पातळ व खालीं दाट असते.

संहृष्टरोमा पिष्टेन पिष्टवद्बहलं सितम्।

पिष्टमेहांत पीठ कालवलेल्या पाण्याप्रमाणें दाट व पांढरी लघ्वी होते आणि लघ्वीच्या वेळीं अंगावर शहारे येतात.

शुक्राभं वा शुक्रमिश्रं शुक्रमेही प्रमेहति॥ ११॥

शुक्रमेहांत शुक्राच्या रंगाची किंवा शुक्रमिश्रित लघ्वी होते.

मूत्राणून् सिकतामेही सिकतारूपिणो मलान्।

सिकतामेहाच्या लघ्वींत बारीक रेतीसारखे कफाचे कण असतात.

शीतमेही सुबहुशो मधुरं भृशशीतलम्॥ १२॥

शीतमेहांत पुष्कळ वेळां, गोड व अतिशय थंड अशी लघ्वी होते.

शनैः शनैः शनैर्मेही मंदं मंदं प्रमेहति।

शनैर्मेहांत वरचेवर थोडथोडी लघ्वी होते.

लालातंतुयुतं मूत्रं लालामेहेन पिच्छिलम्॥ १३॥

लालामेहाच्या लघ्वींत लाळेसारखे कफाचे तंतु असून ती बुळबुळीत असते.

गंधवर्णरसस्पर्शैः क्षारेण क्षारतोयवत्।

क्षारमेहांत लघ्वीचा वास, रंग, रस व स्पर्श हे क्षाराच्या पाण्यासारखे असतात.

नीलमेहेन नीलाभम्

नीलमेहांत लघ्वी निळी असते.

कालमेही मषीनिभम्॥ १४॥

कालमेहांत शाईसारखी असते.

हारिद्रमेही कटुकं हरिद्रासन्निभं दहत्।

हरिद्रामेहांत लघ्वी हळदीसारखी होते, व लघवी होतांना आग होते.

**विस्रं मांजिष्ठमेहेन मंजिष्ठासलिलोपमम् ॥ १५ ॥**

मंजिष्ठमेहांत मंजिष्ठाच्या काढ्यासारखी लाल व आंबूस लघ्वी होते.

**विस्रमुष्णं सलवणं रक्ताभं रक्तमेहतः ।**

रक्तमेहांत आंबुस, ऊन, किंचित् खारट व रक्तासारखी लघ्वी होते.

**वसामेही वसामिश्रं वसां वा मूत्रयेन्मुहुः ॥ १६ ॥**

वसामेहांत वरचेवर वसामिश्रित लघ्वी होते किंवा नुस्ती वसाच पडते.

**मज्जानं मज्जमिश्रं वा मज्जमेही मुहुर्मुहुः ।**

मज्जामेहांत वारंवार मज्जामिश्रित लघ्वी होते किंवा नुस्ती मज्जाच पडते.

**हस्ती मत्त इवाजस्रं मूत्रं वेगविवर्जितम् ॥ १७ ॥**
**सलसीकं विबद्धं च हस्तिमेही प्रमेहति ।**

हस्तिमेहांत मस्त हत्तीप्रमाणें एकसारखी, वेग न येतां, अडखळत व लसयुक्त लघ्वी होते.

**मधुमेही मधुसमम्**

मधुमेहांत मधासारखी लघ्वी होते.

**जायते स किल द्विधा ॥ १८ ॥**
**क्रुद्धे धातुक्षयाद्वायौ दोषावृतपथेऽथवा ।**

मधुमेह दोन प्रकारांनीं होतो. एक, धातुक्षयामुळें वायु कुपित होऊन; आणि दुसरा, दोषांनीं मार्ग बंद केल्यामुळें वायु कुपित होऊन होतो.

**आवृतो दोषलिंगानि सोऽनिमित्तं प्रदर्शयेत् ॥ १९ ॥**
**क्षीणः क्षणात्क्षणात् पूर्णो भजते कृच्छ्रसाध्यताम् ।**

वायु अवरुद्ध झाला असतां वातशोणितनिदानाध्यायांत सांगितलेलीं दोषलक्षणें अकस्मात् दिसूं लागतात; आणि तो वायु क्षणांत कमी होतो व क्षणांत मूत्राशयांत भरला म्हणजे वाढतो. यामुळें हा कष्टसाध्य आहे.

कालेनोपेक्षिताः सर्वे यद्यांति मधुमेहताम् ॥ २० ॥
मधुरं यच्च सर्वेषु प्रायो मध्विव मेहति ।
सर्वेऽपि मधुमेहाख्या माधुर्याच्च तनोरतः ॥ २१ ॥

औषधोपचाराविषयीं दुर्लक्ष केलें असतां सर्वच प्रमेह कांहीं काळानें मधुमेह बनतात. याशिवाय सर्व प्रमेहांत मूत्र बहुधा गोड व मधासारखेंच असतें, आणि प्रमेहामुळें शरीरही गोडच होतें. म्हणून सर्व प्रमेहांसही मधुमेह असें सामान्य नांव दिलें आहे.

अविपाकोऽरुचिश्छर्दिर्निद्रा कासः सपीनसः ।
उपद्रवाः प्रजायंते मेहानां कफजन्मनाम् ॥ २२ ॥

अन्न न पचणें, अरुचि, वांति, फार झोंप येणें, खोकला व पडसें हे कफप्रमेहांचे उपद्रव होत.

बस्तिमेहनयोस्तोदो मुष्कावदरणं ज्वरः ।
दाहस्तृष्णाम्लको मूर्च्छा विड्भेदः पित्तजन्मनाम् ॥२३॥

मूत्राशय व शिश्न यांत टोंचण, वृषण फाटल्यासारखें वाटणें, ताप, दाह, तहान, आंबट ढेंकर, मूर्च्छा व जुलाब हे पित्तप्रमेहांचे उपद्रव आहेत.

वातिकानामुदावर्तकंठहृद्ग्रहलोलताः ।
शूलमुन्निद्रता शोषः कासः श्वासश्च जायते ॥ २४ ॥

वातमेहांचे उपद्रव मळ व वायु बंद होणें, घसा व छाती जखडणें, चैन न पडणें, बस्तींत शूळ, झोंप न येणें, दमा व खोकला हे आहेत.

शराविका कच्छपिका जालिनी विनताऽलजी ।
मसूरिका सर्षपिका पुत्रिणी सविदारिका ॥ २५ ॥
विद्रधिश्चेति पिटिकाः प्रमेहोपेक्षया दश ।
संधिमर्मसु जायंते मांसलेषु च धामसु ॥ २६ ॥

प्रमेहांची उपेक्षा केल्यानें सांध्यांवर, मर्मस्थानावर व मांसल जागीं शराविका, कच्छपिका, जालिनी, विनता, अलजी, मसूरिका सर्षपिका, पुत्रिणी, विदारिका व विद्रधि या नांवाच्या दहा प्रकारच्या पुळ्या होतात.

अंतोन्नता मध्यनिम्ना श्यावा क्लेदरुजान्विता ।
शरावमानसंस्थाना पिटिका स्याच्छराविका ॥ २७ ॥

कडा उंच असून मधोमध खोलगट, धूसर रंगाच्या, क्लेद व पीडा यांनीं युक्त आणि शरावाएवढी मोठी व तशाच आकाराची जी पुळी असते, तीस शराविका म्हणतात.

अवगाढार्तिनिस्तोदा महावस्तुपरिग्रहा ।
श्लक्ष्णा कच्छपपृष्ठाभा पिटिका कच्छपी मता ॥ २८ ॥

जिच्यांत कळ व ठुसठुस हीं फार खोल जागीं असतात, जिचा विस्तार मोठा असतो आणि जी गुळगुळीत व कांसवाच्या पाठी-सारखी असते, तीस कच्छपिका म्हणतात.

स्तब्धा सिराजालवती स्निग्धस्रावा महाशया ।
रुजानिस्तोदबहुला सूक्ष्मच्छिद्रा च जालिनी ॥ २९ ॥

जी ताठ असते, जिच्यावर शिरांचीं जाळीं दिसतात, जिच्यां-तून स्निग्ध स्राव होतो, जिचा आशय मोठा असतो, जींत कळा व ठुसठुस हीं फार असतात व जीवर बारीक छिद्रें असतात, तीस जालिनी म्हणतात.

अवगाढरुजाऽक्लेदा पृष्ठे वा जठरेऽपि वा ।
महती पिटिका नीला विनता विनता स्मृता ॥ ३० ॥

जींत खोल जागीं वेदना होतात, क्लेद नसतो, जी मोठी असून पाठीवर किंवा पोटावर होते, व जी निळी असून चपटी असते, तीस विनता म्हणतात.

दहति त्वचमुत्थाने भृशं कष्टा विसर्पिणी ।
रक्तकृष्णातितृट्स्फोटदाहमोहज्वराऽलजी ॥ ३१ ॥

जी उत्पन्न होतांच त्वचेचा दाह होतो, जी फार कष्टदायक असून पसरते, जी लाल किंवा काळी असते, आणि जिच्या योगानें अतिशय तहान, फोड, दाह, मोह व ज्वर हे विकार उत्पन्न होतात, तीस अलजी म्हणतात.

मानसंस्थानयोस्तुल्या मसूरेण मसूरिका ।

जी मसुरेएवढी व मसुरेच्या आकाराची असते, तीस मसू-रिका म्हणतात.

सर्षपामानसंस्थाना क्षिप्रपाका महारुजा ॥ ३२ ॥
सर्षपा सर्षपातुल्यपिटिकापरिवारिता ।

जिचें प्रमाण व आकार हीं शिरसांच्या दाण्याप्रमाणें असतात, जी लवकर पिकते, जिच्यांत ठणका फार लागतो, आणि जिच्या सभोंवतीं शिरसासारख्या पुष्कळ लहान फुटकुळया असतात, तीस सर्षपा म्हणतात.

पुत्रिणी महती भूरिसुसूक्ष्मपिटिकावृता ।। ३३ ।।

जी मोठी असून तिजवर पुष्कळ बारीक बारीक पुटकुळया असतात तीस पुत्रिणी ह्मणतात.

विदारीकंदवद्वृत्ता कठिना च विदारिका ।

जी भुईकोहळयासारखी वाटोळी व टणक असते, तीस विदारिका ह्मणतात.

विद्रधिर्वक्ष्यतेऽन्यत्र

विद्रधि नांवाची पिटिका पुढें दुसऱ्या अध्यायांत सांगितली जाईल.

तत्राद्यं पिटिकात्रयम् ॥ ३४ ॥

पुत्रिणी च विदारी च दुःसहा बहुमेदसः ।

सह्याः पित्तोल्बणास्त्वन्याः संभवंत्यल्पमेदसः ॥ ३५ ॥

वरील पुळयांपैकीं पहिल्या तीन—शराविका, कच्छपिका, जालिनी—व पुत्रिणी व विदारिका या मेदस्वी मनुष्यास होत असल्यामुळें दुःसह व कष्टसाध्य असतात; बाकीच्या पांच पित्ताधिक असून ज्याच्या अंगांत मेद कमी आहे, त्यास होत असल्यामुळें सह्य व सुखसाध्य असतात.

तासु मेहवशाच्च स्याद्दोषोद्रेको यथायथम् ।

या पिटिकांत ज्या दोषाच्या प्रमेहापासून त्या झाल्या असतील, त्या दोषांचें आधिक्य असतें.

प्रमेहेण विनाप्येता जायंते दुष्टमेदसः ।

तावच्च नोपलक्ष्यंते यावद्वस्तुपरिग्रहः ॥ ३६ ॥

या पुळया ज्यांचा मेद बिघडला आहे अशा मनुष्यांस प्रमेहावांचूनही होतात, आणि आपली जागा व्यापीपर्यंत समजण्यांत येत नाहीं.

हारिद्रवर्णं रक्तं वा मेहप्राग्रूपवर्जितम् ।

यो मूत्रयेन्न तं मेहं रक्तपित्तं तु तद्विदुः ॥ ३७ ॥

प्रमेहाचें पूर्वरूप दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून जर कोणास पिंवळी किंवा लाल लघ्वी झाली, तर तो प्रमेह नसून तें रक्तपित्त आहे, असें समजावें.

**स्वेदोऽगगंधः शिथिलत्वमंगे शय्यासनस्वप्नसुखाभिषंगः।**
**हृन्नेत्रजिह्वाश्रवणोपदेहो घनांगता केशनखातिवृद्धिः ॥ ३८ ॥**
**शीतप्रियत्वं गलताल्लुशोषो माधुर्यमास्ये करपाददाहः।**
**भविष्यतो मेहगणस्य रूपं मूत्रेऽभिधावंति पिपीलिकाश्च॥३९॥**

घाम येणें, अंगास घाण येणें, शरीर शिथिल होणें; बिछान्यावर पडून रहावें, बसून रहावें, झोंप घ्यावी अशी इच्छा होणें; हृदय, डोळे, जीभ व कान यांस चिकटा बसणें, अंग जड होणें, केंस व नखें अतिशय वाढणें; थंड उपचार आवडणें; घसा व टाळू यांस कोरड, तोंड गुळमट होणें, हातपायांचा दाह होणें आणि मुतास मुंग्या येणें हीं लक्षणें प्रमेह होण्यापूर्वीं होतात.

**दृष्ट्वा प्रमेहं मधुरं सपिच्छं मधूपमं स्याद्विविधो विचारः।**
**संतर्पणाद्वा कफसंभवः स्यात्क्षीणेषु दोषेष्वनिलात्मको वा ४०**

मधुर, बुळबुळीत व मधासारखी लघ्वी पाहून ( मंदबुद्धि ) मनुष्याच्या मनांत दोन प्रकारचे विचार येतील. ते असे कीं, हा संतर्पणापासून झालेला कफाधिक प्रमेह आहे किंवा कफादि दोष क्षीण होऊन झालेला वातिक प्रमेह आहे? ( परंतु कुशल व अनुभवी वैद्य त्या त्या दोषांच्या लक्षणांवरून तेव्हांच त्यांस ओळखतो.

**सपूर्वरूपाः कफपित्तमेहाः**
**क्रमेण ये वातकृताश्च मेहाः।**
**साध्या न ते पित्तकृतास्तु याप्याः**
**साध्यास्तु मेदो यदि नातिदुष्टम् ॥ ४१ ॥**

ज्या कफमेहांत व पित्तमेहांत संपूर्ण पूर्वरूपें सदोदित हजर असतील ते, तसेच आरंभीं कफजन्य किंवा पित्तजन्य असून पुढें बदलत बदलत वातजन्य झालेले प्रमेह हे असाध्य होत. पित्तमेह सामान्यतः याप्य आहेत. परंतु त्यांत मेद फार बिघडला नसल्यास ते साध्य होतात.

# अध्याय ११ वा.

अथाऽतो विद्रधिवृद्धिगुल्मनिदानं व्याख्यास्यामः ।

आतां विद्रधि, वृद्धि व गुल्म यांचें निदान सांगतों.

भुक्तैः पर्युषितात्युष्णरूक्षशुष्कविदाहिभिः ।
जिह्मशय्याविचेष्टाभिस्तैस्तैश्चासृक्प्रदूषणैः ॥ १ ॥
दुष्टं त्वङ्मांसमेदोऽस्थिस्नावासृक्कंडराश्रयः ।
यः शोफो बहिरंतर्वा महामूलो महारुजः ॥ २ ॥
वृत्तः स्यादायतो यो वा स्मृतः षोढा स विद्रधिः ।
दोषैः पृथक्समुदितैः शोणितेन क्षतेन च ॥ ३ ॥

शिळें, अतिशय उष्ण, रूक्ष, कोरडें व विदाही अन्न खाल्ल्यानें; वेडयावांकडया बिछान्यावर निजल्यानें; अनेक प्रकारच्या वेडयावांकडया चेष्टा केल्यानें; तसेंच त्या त्या रक्त दूषित करणाऱ्या कारणांनीं दुष्ट झालेल्या दोषांनीं दूषित झालेलीं त्वचा, मांस, मेद हाडें, स्नायु, रक्त व कंडरा ( मोठया शिरा ) यांत बाहेरच्या किंवा आंतल्या बाजूस खोल गेलेली व अतिशय वेदना उत्पन्न करणारी जी वाटोळी किंवा लांबोडी सूज उत्पन्न होते, तीस विद्रधि म्हणतात. वातापासून, पित्तापासून, कफापासून, सन्निपातापासून, रक्तापासून व क्षतापासून असा हा विद्रधि सहा प्रकारचा आहे.

बाह्योऽत्र तत्र तत्रांगे दारुणो ग्रथितोन्नतः ।

त्यांपैकीं बाह्यविद्रधि त्या त्या नाभि वगैरे स्थानांत उत्पन्न होतो; तो भयंकर, गांठाळलेला व उंच असतो.

आंतरो दारुणतरो गंभीरो गुल्मवद्धनः ॥ ४ ॥
वल्मीकवत्समुच्छ्रायी शीघ्रघात्यग्निशस्त्रवत् ।

आणि अन्तर्विद्रधि त्यापेक्षांही फार भयंकर, खोल, गुल्माप्रमाणें कठिण, वारुळाप्रमाणें वर उभारलेला व अग्नि आणि शस्त्र यांप्रमाणें फार त्वरित घात करणारा असतो.

नाभिबस्तियकृत्प्लीहक्लोमहृत्कुक्षिवंक्षणे ॥ ५ ॥
स्याद्वृक्कयोरपाने च

बेंबी, मूत्राशय, यकृत्, प्लीहा, क्लोम, हृदय, कुशी, जांघाडे, वृक्क व गुद या जागीं विद्रधि होतात.

वातात्तत्राऽतितीव्ररुक्।
श्यावारुणश्चिरोत्थानपाको विषमसंस्थितिः ॥ ६ ॥
व्यधच्छेदभ्रमानाहस्पंदसर्पणशब्दवान्।

वातविद्रधींत अतिशय तीव्र वेदना होतात; त्यांचा रंग धूसर-पिंगट असतो; ते उत्पन्न होण्यास व पिकण्यास फार उशीर लागतो; ते उंचसखल असतात; त्यांत टोंचल्यासारख्या व कापल्यासारख्या वेदना होतात; चक्कर येते, पोट फुगतें; त्यावर हात ठेवला असतां तो उडतो व पसरतो आणि त्यांत शब्द होतो.

रक्ततामासितः पित्तात्तृण्मोहज्वरदाहवान् ॥ ७ ॥
क्षिप्रोत्थानप्रपाकश्च

पित्तविद्रधि लाल, तांब्याच्या रंगासारखा किंवा काळा असतो; तो लवकर उत्पन्न होतो व लवकरच पिकतो; आणि त्यांत तहान, मोह, ताप व दाह हे विकार होतात.

पांडुः कंडूयुतः कफात्।
सोत्क्लेशशीतकस्तंभजृंभारोचकगौरवः ॥ ८ ॥
चिरोत्थानविदाहश्च

कफविद्रधि पांडुरका असून त्यांत कंड असते; उम्हासे, थंडी वाजणें, अंग ताठणें, जांभया येणें, अरुचि व अंग जड होणें हे विकार होतात; आणि तो उत्पन्न होण्यास व पिकण्यास फार वेळ लागतो.

संकीर्णः सन्निपाततः।

सान्निपातिक विद्रधींत वरील सर्व लक्षणें होतात.

सामर्थ्याच्चाऽत्र विभजेद्बाह्याभ्यंतरलक्षणम् ॥ ९ ॥

विद्रधीच्या जोरावरून तो बाह्य आहे किंवा आभ्यंतर आहे, हें ठरवावें.

कृष्णस्फोटावृतः श्यावस्तीव्रदाहरुजाज्वरः।
पित्तलिंगोऽसृजा बाह्यः स्त्रीणामेव तथांतरः ॥ १० ॥

रक्तविद्रधि काळसर असून त्यावर काळे फोड येतात. त्यांत तीव्र दाह, वेदना व ताप हीं असतात; आणि पित्तविद्रधीचींही लक्षणें होतात. हा पुरुषांस बाहेर होतो व फक्त स्त्रियांसच आंत होतो.

शस्त्राद्यैरभिघातेन क्षते वाऽपथ्यकारिणः ।
क्षतोष्मा वायुविक्षिप्तः सरक्तं पित्तमीरयन् ॥ ११ ॥
पित्तासृग्लक्षणं कुर्याद्विद्रधिं भूर्युपद्रवम् ।

शस्त्रादिकांच्या आघातानें किंवा व्रणादिकांपासून क्षत होऊन अपथ्य घडल्यानें क्षतांतील उष्णता वायु इकडे तिकडे फेंकतो. त्या योगानें रक्त व पित्त हीं कुपित होऊन विद्रधि उत्पन्न करितात; त्यास क्षतविद्रधि म्हणतात. यांत पित्तविद्रधि व रक्तविद्रधि यांचीं लक्षणें असतात आणि उपद्रव फार होतात.

तेषूपद्रवभेदश्च स्मृतोऽधिष्ठानभेदतः ॥ १२ ॥

हे उपद्रव स्थानभेदाप्रमाणें निरनिराळे होतात.

नाभ्यां हिध्मा भवेद्बस्तौ मूत्रं कृच्छ्रेण पूति च ।
श्वासो यकृति रोधस्तु प्लीह्न्युच्छ्वासस्य तृट् पुनः ॥ १३ ॥
गलग्रहश्च क्लोम्नि स्यात्सर्वांगप्रग्रहो हृदि ।
प्रमोहस्तमकः कासो हृदये घट्टनं व्यथा ॥ १४ ॥
कुक्षिपार्श्वांतरांसार्तिः कुक्षावाटोपजन्म च ।
सक्थ्नोर्ग्रहो वंक्षणयोर्वृक्कयोः कटिपृष्ठयोः ॥ १५ ॥
पार्श्वयोश्च व्यथा पायौ पवनस्य निरोधनम् ।

बेंबींत विद्रधि झाला असतां उचकी लागते. बस्तींत झाला असतां लघ्वी कष्टानें होते व तीस दुर्गंध असतो. यकृतांत झाला असतां दमा लागतो. प्लीहेंत झाला असतां वर येणारा श्वास कोंडतो. क्लोमांत झाला असतां तहान लागते व घसा धरतो. हृदयांत झाला असतां सर्वांग धरतें; मोह, तमकश्वास, खोकला आणि हृदयांत घांसटल्यासारखी पीडा व शूळ हे विकार होतात. कुशींत झाल्यास कूस व बरगड्या यांच्या मध्यभागीं व खांद्यांत दुखतें आणि पोटांत गुरगुरतें. जांघाड्यांत झाल्यास मांड्या धरतात. वृक्कांत झाल्यास कंबर व पाठ हीं धरतात आणि बरगड्यांत पीडा होते. आणि गुदांत झाल्यास अधोवायूचा अवरोध होतो.

आमपक्वविदग्धत्वं तेषां शोफवदादिशेत् ॥ १६ ॥

विद्रधीच्या अपक्व, पक्व व अतिपक्व अवस्थांचीं लक्षणें मागें शस्त्रकर्मविधींत सांगितलेल्या शोफाच्या त्या त्या अवस्थेच्या लक्षणांप्रमाणें जाणावीं.

नाभेरूर्ध्वं मुखात्पक्वाः प्रस्रवंत्यपरे गुदात्।
उभाभ्यां नाभिजो

बेंबीच्या वर झालेले विद्रधि पिकले असतां त्यांचा स्राव तोंडातून होतो; बेंबीच्या खालचे विद्रधि पिकले म्हणजे त्यांचा स्राव गुदांतून होतो; आणि बेंबींत झालेला विद्रधि दोन्ही मार्गांनीं स्रवतो.

विद्याद्दोषं क्लेदाच्च विद्रधौ ॥ १७ ॥
यथास्वं व्रणवत्

व्रणांतील क्लेदाचीं व इतरही जीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्यांच्याच अनुसार विद्रधींतील क्लेदावरून व इतर लक्षणांवरून विद्रधीचे दोष समजावे.

तत्र विवर्ज्यः सन्निपातजः।
पक्वो हृन्नाभिबस्तिस्थो भिन्नोऽतर्बहिरेव वा ॥ १८ ॥
पक्वश्चांतः स्रवन्वक्रात् क्षीणस्योपद्रवान्वितः।

त्यांत सान्निपातिक; हृदय, बेंबी व बस्ति या ठिकाणीं होऊन आंत किंवा बाहेर फुटलेला, आणि पिकून तोंडांतून वाहणारा, क्षीण मनुष्यास झालेला व उपद्रवांनीं युक्त असा अन्तर्विद्रधि असाध्य समजून वैद्यानें सोडून द्यावा.

एवमेव स्तनसिरा विवृताः प्राप्य योषिताम् ॥ १९ ॥
सूतानां गर्भिणीनां वा संभवेच्छ्वयथुर्घनः।
स्तने सदुग्धेऽदुग्धे वा बाह्यविद्रधिलक्षणः ॥ २० ॥
नाडीनां सूक्ष्मवक्त्रत्वात्कन्यानां तु न जायते।

याचप्रमाणें म्हणजे पूर्वोक्त कारणांनींच दूषित झालेले दोष बाळंतीण किंवा गर्भार बायकांच्या स्तनांतील शिरा पसरलेल्या असतात त्यांत जाऊन घट्ट सूज उत्पन्न करितात; मग त्या स्तनांत दूध असो किंवा नसो. बायकांच्या या स्तनविद्रधींत बाह्यविद्रधीचीं लक्षणें होतात. लहान मुलींच्या स्तनांतील शिरांचीं तोंडें फार बारीक असल्यामुळें त्यांस स्तनविद्रधि होऊं शकत नाहीं.

क्रुद्धो रुद्धगतिर्वायुः शोफशूलकरश्चरन् ॥ २१ ॥
मुष्कौ वंक्षणतः प्राप्य फलकोशाभिवाहिनीः।
प्रपीड्य धमनीर्वृद्धिं करोति फलकोशयोः ॥ २२ ॥

गति बंद झाल्यामुळें कुपित झालेला वायु सूज व शूळ उत्पन्न

करून शरीरभर संचार करीत करीत शेवटीं जांघाड्यांतून वृषणांत जाऊन वृषणांत वाहत येणाऱ्या शिरांस अतिशय पीडा करून वृषणांची वृद्धि करितो.

दोषास्रमेदोमूत्रांत्रैः स वृद्धिः सप्तधा गदः ।
मूत्रांत्रजावप्यनिलाद्धेतुभेदस्तु केवलम् ॥ २३ ॥

वातवृद्धि, पित्तवृद्धि, कफवृद्धि, रक्तवृद्धि, मेदोवृद्धि, मूत्रवृद्धि व अंत्रवृद्धि असा हा वृद्धिरोग सात प्रकारचा आहे. मूत्रवृद्धि व अंत्रवृद्धि हे वस्तुतः वायूपासूनच होतात; परंतु त्यांच्या निकटस्थ कारणांवरून हे निराळे भेद केले आहेत.

वातपूर्णदृतिस्पर्शो रूक्षो वातादहेतुरुक् ।

वातज वृषणवृद्धींत वृषण वारा भरलेल्या पखालीप्रमाणें हातास लागतो, तो रूक्ष असतो आणि कारणावांचून त्यांत ठणका होतो.

पक्वोदुंबरसंकाशः पित्ताद्दाहोष्मपाकवान् ॥ २४ ॥

पित्तवृद्धींत वृषण पिकलेल्या उंबरासारखा असतो, त्यांत दाह होतो; तो हातास कढत लागतो व पिकतो.

कफाच्छीतो गुरुः स्निग्धः कंडूमान् कठिनोऽल्परुक् ।

कफवृद्धींत वृषण हातास कठिण, थंड व स्निग्ध लागतो; जड असतो; खाज सुटते आणि ठणका फार नसतो.

कृष्णस्फोटावृतः पित्तवृद्धिलिंगश्च रक्ततः ॥ २५ ॥

रक्तवृद्धींत पित्तवृद्धीचीं लक्षणें असतात आणि शिवाय वृषणावर काळे फोड असतात.

कफवन्मेदसा वृद्धिर्मृदुस्तालफलोपमः ।

मेदोवृद्धींत कफवृद्धीचीं लक्षणें असून वृषण मात्र ताडगोळ्याप्रमाणें मृदु असतो.

मूत्रधारणशीलस्य मूत्रजः स तु गच्छतः ॥ २६ ॥
अंभोभिः पूर्णदृतिवत्क्षोभं याति सरुङ् मृदुः ।
मूत्रकृच्छ्रमधस्ताच्च वलयं फलकोशयोः ॥ २७ ॥

ज्यास नेहमीं लघ्वी कोंडण्याची संवय असते, अशा मनुष्यास मूत्रवृद्धि होते. यांत वृषण पाण्यानें भरलेल्या पखालीसारखा होतो; आणि चालतांना डुचमळतो व किंचित् ठणका लागतो; तो मृदु

असतो, शिवाय वृषण फार वाढल्यामुळें शिश्नाभोंवतीं त्याचें एक प्रकारचें कडें होऊन शिश्न आंत दबतें व त्यामुळें मूत्रकृच्छ्र होतें.

वातकोपिभिराहारैः शीततोयावगाहनैः ।
धारणेरणभाराध्वविषमांगप्रवर्तनैः ॥ २८ ॥
क्षोभणैः क्षुभितोऽन्यैश्च क्षुद्रांत्रावयवं यदा ।
पवनो विगुणीकृत्य स्वनिवेशादधो नयेत् ।
कुर्याद्वंक्षणसंधिस्थो ग्रंथ्याभं श्वयथुं तदा ॥ २९ ॥
उपेक्ष्यमाणस्य च मुष्कवृद्धिमाध्मानरुक्स्तंभवतीं स वायुः ।
प्रपीडितोऽतः स्वनवान्प्रयाति प्रध्मापयन्नेति पुनश्च मुक्तः ३०
अंत्रवृद्धिरसाध्योऽयं वातवृद्धिसमाकृतिः ।

वातप्रकोपक आहारांनीं, थंड पाण्यांत डुंबल्यानें, उपस्थित वेग थांबविल्यानें व अनुपस्थित बळेंच प्रवृत्त केल्यानें, ओझें वाहिल्यानें, मार्ग चालल्यानें, वेडींवाकडीं अंगें केल्यानें, व इतर पूर्वीं सांगितलेल्या प्रकोपक कारणांनीं वायु कुपित होऊन लहान आंतड्यांचा कांहीं भाग दुमडून त्यांच्या जागेवरून खालीं घेऊन जातो आणि जांघाड्यांच्या संधींत गांठीसारखी सूज उत्पन्न करितो. या सुजेची हयगय केली असतां तो वायु तें आंतडें अंडांत घेऊन जाऊन अंडाची वृद्धि करितो. यांत पोट फुगतें, कळा लागतात, मळाचा अवष्टंभ होतो; वृषण दाबला असतां वायु शब्द करीत आंत येतो आणि सोडल्यावर पुन्हां अंडांत येऊन त्यास फुगवितो. हा अन्त्रवृद्धि ( अथवा प्राकृत अन्तर्गळ ) नांवाचा रोग असाध्य आहे. यांत वातवृद्धीचींच लक्षणें होतात.

रूक्षकृष्णारुणसिरातंतुजालगवाक्षितः ॥ ३१ ॥
गुल्मोऽष्टधा पृथग्दोषैः संसृष्टैर्निचयं गतैः ।
आर्तवस्य च दोषेण नारीणां जायतेऽष्टमः ॥ ३२ ॥

रूक्ष, काळ्या व पिंगट अशा शिरांचीं व तंतूंचीं जाळीं ज्यांवर सदोदित पसरलेलीं असतात, असे गुल्म आठ प्रकारचे आहेत. वातगुल्म, पित्तगुल्म, कफगुल्म, वातपित्तगुल्म, वातकफगुल्म, पित्तकफगुल्म, सान्निपातिकगुल्म, आणि स्त्रियांचें आर्तव दूषित झाल्यानें त्यांस होणारा रक्तगुल्म.

ज्वरच्छर्द्यतिसाराद्यैर्वमनाद्यैश्च कर्मभिः ।
कर्शितो वातलान्यत्ति शीतं वांबु बुभुक्षितः ॥ ३३ ॥
यः पिबत्यनु चान्नानि लंघनप्लवनादिकम् ।
सेवते देहसंक्षोभि छर्दि वा समुदीरयेत् ॥ ३४ ॥
अनुदीर्णानुदीर्णान्वा वातादीन्न विमुंचति ।
स्नेहस्वेदावनभ्यस्य शोधनं वा निषेवते ॥ ३५ ॥
शुद्धो वाशु विदाहीनि भजते स्यंदनानि वा ।
वातोल्बणास्तस्य मला पृथक् क्रुद्धा द्विशोऽथवा ॥ ३६ ॥
सर्वे वा रक्तयुक्ता वा महास्रोतोऽनुशायिनः ।
ऊर्ध्वाधोमार्गमावृत्य कुर्वते शूलपूर्वकम् ॥ ३७ ॥
स्पर्शोपलभ्यं गुल्माख्यमुत्प्लुतं ग्रंथिरूपिणम् ।

ताप, वांति, अतिसार वगैरे रोगांनीं किंवा वमनाविरेचनादि पंचकर्मांनीं कृश झालेला जो मनुष्य वातुळ पदार्थ खातो, भूक लागली असतां थंड पाणी पितो, जेवल्यानंतर पाण्यांत पोहणें वगैरे लंघन करणारीं व शरीरास खिळखिळीं करणारीं कामें करतो, बळेंच ओकाऱ्या काढतो किंवा वातादिकांचे उपस्थित वेग थांबवून धरतो, स्नेहन-स्वेदन न करितां शोधन घेतो, किंवा शोधनानंतर लागलेच विदाही व कफकारक पदार्थ सेवन करतो, त्याचे महास्रोतांतील म्हणजे आमाशय व पक्वाशय यांतील वातादिक दोष वेगवेगळे, दोन-दोन, सर्व एकत्र किंवा रक्तासहित कुपित होऊन वरचा व खालचा हे दोन्ही मार्ग बंद करून हातास लागणारा, वर उचललेला व गांठीसारखा गुल्म नांवाचा रोग उत्पन्न करितात. हा उत्पन्न होण्यापूर्वी पोटांत शूळ होऊं लागतो.

कर्शनात्कफविट्पित्तैर्मार्गस्यावरणेन वा ॥ ३८ ॥
वायुः कृताशयः कोष्ठे रौक्ष्यात्काठिन्यमागतः ।
स्वतंत्रः स्वाश्रये पुष्टः परतंत्रः पराश्रये ॥ ३९ ॥
पिंडितत्वादमूर्तोऽपि मूर्तत्वमिव संश्रितः ।
गुल्म इत्युच्यते बस्तिनाभिहृत्पार्श्वसंश्रयः ॥ ४० ॥

धातुक्षयानें किंवा कफ, मल व पित्त यांनीं मार्ग बंद केल्यानें वायु कोठ्यांत घर करून रूक्षतेमुळें कठिण होतो. तो स्वस्थानीं म्हणजे पक्वाशयांत असल्यास स्वतंत्रपणें दूषित होतो,

आणि परक्या स्थानीं म्हणजे आमाशयांत असतां पित्त-कफांच्या योगानें होतो. तो एके ठिकाणीं गोळा झाल्यामुळें साकार किंवा कठिण नसूनही तसा भासतो. म्हणून यास गुल्म असें म्हणतात. हा बस्ति, बेंबी, हृदय व कुशी यांत होतो.

वातान्मन्याशिरःशूलं ज्वरप्लीहांत्रकूजनम् ।
व्यधः सूच्येव विट्संगः कृच्छ्रादुच्छ्वसनं मुहुः ॥ ४१ ॥
स्तंभो गात्रे मुखे शोषः कार्श्यं विषमवह्निता ।
रूक्षकृष्णत्वगादित्वं चलत्वादनिलस्य च ॥ ४२ ॥
अनिरूपितसंस्थानस्थानवृद्धिक्षयव्यथः ।
पिपीलिकाव्याप्त इव गुल्मः स्फुरति तुद्यते ॥ ४३ ॥

वातगुल्मांत मान व डोकें यांत शूळ, ताप, पानथरी, आंतड्यांत गुडगुड शब्द होणें, सुईनें टोंचल्यासारख्या वेदना होणें, मलावरोध, वरचेवर दम लागणें, इंद्रियें ताठणें, तोंडास कोरड, कृशता, अग्नि अनियमित होणें; त्वचा, डोळे, नखें वगैरे रूक्ष व काळीं पडणें आणि वायूच्या चंचल स्वभावामुळें गुल्माचा आकार व स्थान, त्याचें वाढणें किंवा कमी होणें, व वेदना यांचा कोणत्याच प्रकारचा नियम नसणें आणि गुल्म मुंग्या आल्याप्रमाणें स्फुरण पावणें व त्यांत टोंचण होणें हीं लक्षणें होतात.

पित्ताद्दाहोऽम्लको मूर्छा विड्भेदस्वेदतृड्ज्वराः ।
हारिद्रत्वं त्वगाद्येषु गुल्मश्च स्पर्शनासहः ॥ ४४ ॥
दूयते दीप्यते सोष्मा स्वस्थानं दहतीव च ।

पित्तगुल्मांत दाह, आंबट ढेंकर, मूर्च्छा, जुलाब, घाम, ताप, तहान, त्वचा वगैरे हिरवी होणें, गुल्मास स्पर्श सहन न होणें, गुल्म तापणें, दुखणें, पेटल्यासारखा होणें, कढत लागणें, आणि त्याची जागा पोळल्यासारखी होणें हीं लक्षणें होतात.

कफात्स्तैमित्यमरुचिः सदनं शिशिरज्वरः ॥ ४५ ॥
पीनसालस्यहृल्लासकासशुक्लत्वगादिता ।
गुल्मोवगाढः कठिनो गुरुः सुप्तः स्थिरोऽल्परुक् ॥ ४६ ॥

कफगुल्मांत अंगावर ओलें वस्त्र पांघरल्याप्रमाणें वाटणें; अरुचि, अग्निमांद्य, हिंवताप, पडसें, आळस, मळमळ, खोकला, त्वचा

आदि करून पांढरी होणें, आणि गुल्म खोल, कठिण, जड व स्तब्ध असून त्यावर हात ठेवला असतां न कळणें व वेदना कमी होणें हीं लक्षणें होतात.

स्वदोषस्थानधामानः स्वे स्वे काले च रुक्कराः ।
प्रायः

गुल्म बहुतकरून ज्या दोषांपासून उत्पन्न होतात, त्या दोषांच्या स्थानांत असतात; आणि त्या दोषांच्या पूर्वोक्त प्रकोपकाळीं त्यांत शूळ होऊं लागतो.

त्रयस्तु द्वंद्वोत्था गुल्माः संसृष्टलक्षणाः ॥ ४७ ॥

द्वन्द्वज गुल्म तीन आहेत. त्यांत दोन दोन दोषांचीं लक्षणें होतात.

सर्वजस्तीव्ररुग्दाहः शीघ्रपाकी घनोन्नतः ।
सोऽसाध्यः

सान्निपातिक गुल्मांत तीव्र शूळ व दाह होतो, तो लवकर पिकतो आणि कठिण व उंच असतो. तो असाध्य आहे.

रक्तगुल्मस्तु स्त्रिया एव प्रजायते ॥ ४८ ॥
ऋतौ वा नवसूता वा यदि वा योनिरोगिणी ।
सेवेत वातलानि स्त्री क्रुद्धस्तस्याः समीरणः ॥ ४९ ॥
निरुणद्ध्यार्तवं योन्यां प्रतिमासमवस्थितम् ।
कुक्षिं करोति तद्गर्भलिंगमाविष्करोति च ॥ ५० ॥
हृल्लासदौहृदस्तन्यदर्शनं क्षामतादिकम् ।

रक्तगुल्म फक्त बायकांसच होतो. जी स्त्री ऋतुकाळीं, बाळंतपणांत, किंवा कांहीं योनिरोग झाला असतां वातुळ पदार्थ खाते, तिचा वायु कुपित होऊन दर महिन्यास सांचलेलें आर्तव तो योनींत कोंडून ठेवितो, त्यायोगानें पोट फुगतें आणि मळमळ, डोहाळे, स्तनांत दूध येणें, अशक्तता वगैरे गर्भाचीं लक्षणें प्रकट होतात.

क्रमेण वायुसंसर्गात्पित्तयोनितया च तत् ॥ ५१ ॥
शोणितं कुरुते तस्या वातपित्तोत्थगुल्मजान् ।
रुक्स्तंभदाहातीसारतृड्ज्वरादीनुपद्रवान् ॥ ५२ ॥
गर्भाशये च सुतरां शूलं दुष्टासृगाश्रये ।
योन्याश्च स्रावदौर्गंध्यतोदस्पंदनवेदनाः ॥ ५३ ॥

पुढें त्या सांचलेल्या रक्तांत वायूचा संसर्ग झाल्यामुळें तिला वातगुल्माचीं आणि रक्त हें पित्तापासून बनतें म्हणून पित्तगुल्माचीं लक्षणें होतात. तीं येणेंप्रमाणें—शूळ, स्तंभ, दाह, अतिसार, तृषा, ज्वर वगैरे. याशिवाय गर्भाशयांत दुष्ट रक्त जमून त्यांत फार शूळ होतो, योनींतून स्राव होतो, तीस घाण येते, तींत टोंचण होते, वेदना होतात, आणि ती फुरफुरते.

न चांगैर्गर्भवद्गुल्मः स्फुरत्यपि तु शूलवान् ।
पिंडीभूतः स एवास्याः कदाचित्स्पंदते चिरात् ॥ ५४ ॥
न चास्या वर्धते कुक्षिर्गुल्म एव तु वर्धते ।

गर्भ जसा आपल्या अंगांनीं पोटांत इकडे तिकडे चळवळ करितो, त्याप्रमाणें रक्तगुल्म त्यास अंगें नसल्यामुळें हालचाल करूं शकत नाहीं; परंतु त्यांत शूळ होतो. तो एकत्र गोळा होऊन कधीं तरी फार वेळानें स्फुरण पावतो. याशिवाय गर्भानें जसें पोट वाढतें, तसें यांत न होतां यांत गुल्मच वाढतो.

स्वदोषसंश्रयो गुल्मः सर्वो भवति तेन सः ॥ ५५ ॥
पाकं चिरेण भजते नैव वा विद्रधिः पुनः ।
पच्यते शीघ्रमत्यर्थं दुष्टरक्ताश्रयत्वतः ॥ ५६ ॥
अतः शीघ्रविदाहित्वाद्विद्रधिः सोऽभिधीयते ।

सर्व गुल्म ज्या एक किंवा अनेक दोषांपासून ते उत्पन्न होतात त्यांच्याच आश्रयानें असतात. म्हणून ते फार दिवसांनीं पिकतात किंवा मुळींच पिकत नाहींत. परंतु विद्रधि अत्यंत दुष्ट रक्ताच्या आश्रयानें होत असल्यामुळें लवकर पिकतो. याप्रमाणें त्याचा विदाह लवकर होत असल्यामुळें त्यास विद्रधि म्हणतात.

गुल्मेऽतराश्रये बस्तिकुक्षिहृत्प्लीहवेदनाः ॥ ५७ ॥
अग्निवर्णबलभ्रंशो वेगानां चाप्रवर्तनम् ।
अतो विपर्ययो बाह्ये कोष्ठांगेषु तु नातिरुक् ॥ ५८ ॥
वैवर्ण्यमवकाशस्य बहिरुन्नतताधिकम् ।

अंतराश्रित गुल्मांत बस्ति, कूस, हृदय व कौलू यांत वेदना होतात, अग्नि मंद होतो, शरीराची कांति नाहींशी होते आणि मळमूत्रादिकांचे वेग बंद होतात. बाह्य गुल्मांत याच्या उलट लक्षणें होतात; बस्ति, हृदय वगैरे कोष्ठांगांत किंचित् शूळ होतो,

गुल्माच्या जागेवरील त्वचेचा रंग बदलतो व ती जागा बाहेरून अधिक उंच दिसते.

साटोपमत्युग्ररुजमाध्मानमुदरे भृशम् ॥ ५९ ॥
ऊर्ध्वाधो वातरोधेन तमानाहं प्रचक्षते ।

वरून व खालून वायूचा अवरोध झाल्यानें पोट अतिशय फुगतें, आंत गुरगुरतें व अत्यंत तीव्र वेदना होतात. या विकारास आनाह असें म्हणतात.

घनोऽष्ठिलोपमो ग्रंथिरष्ठीलोर्ध्वं समुन्नतः ॥ ६० ॥
आनाहलिंगस्तिर्यक्तु प्रत्यष्ठीला तदाकृतिः ।

फणसाच्या आठळीसारखा कठिण, वर उचललेला ग्रंथि होऊन त्यांत आनाहाचीं लक्षणें होतात, त्यास अष्ठीला म्हणतात. तोच ग्रंथि तिर्कस असून बाकी सर्व अष्ठीलेचीं लक्षणें असलीं म्हणजे त्यास प्रत्यष्ठीला म्हणतात.

पक्वाशयाद्गुदोपस्थं वायुस्तीव्ररुजः प्रयान् ।
तूनी प्रतूनी तु भवेत्स एवातो विपर्यये ॥ ६१ ॥

वायु पक्वाशयांतून गुदाकडे व शिस्नाकडे तीव्र वेदना करीत जातो, त्या विकारास तूनी; आणि गुदशिस्नांतून पक्वाशयाकडे जातो, त्यास प्रतूनी असें म्हणतात.

उद्गारबाहुल्यपुरीषबंधतृप्त्यक्षमत्वांत्रविकूजनानि ।
आटोपमाध्मानमपक्तिशक्तिमासन्नगुलमस्य वदंति चिन्हम् ॥ ६२॥

फार ढेंकर येणें, मलावरोध, थोडें जेवलें तरी पोट भरल्याप्रमाणें वाटणें, पोटभर जेवण सहन न होणें, आंतड्यांत कुजकुजणें, पोटांत गुरगरणें, पोट फुगणें व अग्निमान्द्य हीं लक्षणें गुल्म होण्यापूर्वीं होतात.

---

## अध्याय १२ वा.

अथाऽत उदरनिदानं व्याख्यास्यामः ।

आतां उदररोगाचें निदान सांगतों.

रोगाः सर्वेऽपि मंदेऽग्नौ सुतरामुदराणि तु ।
अजीर्णान्मलिनैश्चान्नैर्जायंते मलसंचयात् ॥ १ ॥

सर्वच रोग अग्नि मंद झाल्यामुळें होतात, परंतु मुख्यत्वेंकरून उदरें होतात. त्याचप्रमाणें अजीर्णापासून, शिळें, सडलेलें वगैरे अन्न खाल्ल्यानें व फार दिवसांचा मळ सांचल्यानेंही उदरें होतात.

ऊर्ध्वाधो धातवो रुद्धा वाहिनीरंबुवाहिनीः ।
प्राणाग्न्यपानान् संदूष्य कुर्युस्त्वङ्मांससंधिगाः ॥ २ ॥
आध्माप्य कुक्षिमुदरम्

वातादि दोष खालून व वरून उदकवाहक स्रोतांचा अवरोध करून प्राणवायु, अपानवायु व अग्नि यांस दूषित करून आणि त्वचा व मांस यांच्या मध्यभागीं जाऊन पोट फुगवून उदर उत्पन्न करितात.

अष्टधा तच्च भिद्यते ।
पृथग्दोषैः समस्तैश्च प्लीहबद्धक्षतोदकैः ॥ ३ ॥

तें वातोदर, पित्तोदर, कफोदर, सन्निपातोदर, प्लीहोदर, बद्धोदर व क्षतोदर, जलोदर असें आठ प्रकारचें आहे.

तेनार्ताः शुष्कताल्वोष्ठाः शूनपादकरोदराः ।
नष्टचेष्टाबलाहाराः कृशाः प्रध्मातकुक्षयः ॥ ४ ॥
स्युः प्रेतरूपाः पुरुषाः

उदर झालेल्या मनुष्यांची टाळू व ओंठ कोरडे पडतात; हात, पाय व पोट हीं सुजतात; शरीरव्यापार, शक्ति व आहार हीं नष्ट होतात; ते कृश होतात; त्यांचीं पोटें फुगतात; व ते प्रेतासारखे दिसूं लागतात.

भाविनस्तस्य लक्षणम् ।
क्षुन्नाशोऽन्नं चिरात्सर्वं सविदाहं च पच्यते ॥ ५ ॥
जीर्णाजीर्णं न जानाति सौहित्यं सहते न च ।
क्षीयते बलतः शश्वच्छ्वसित्यल्पेऽपि चेष्टिते ॥ ६ ॥
वृद्धिर्विशोऽप्रवृत्तिश्च किंचिच्छोफश्च पादयोः ।
रुग्बास्तिसंधौ ततता लघ्वल्पाभोजनैरपि ॥ ७ ॥
राजीजन्म वलीनाशो जठरे

उदर होण्यापूर्वीं भूक नाहींशीं होणें, कसलेंही अन्न खाल्लें तरी तें उशिरां व जळजळ होऊन पचणें, अन्न जिरलें किंवा न जिरलें हें न समजणें, पोटभर जेवण न सोसणें, शक्ति क्षीण होत जाणें,

थोड्याशा श्रमानेंही दम लागणें, मळ जास्त उत्पन्न होणें परंतु बाहेर न पडणें, पाय किंचित् सुजणें, हलकें व थोडें अन्न खाल्लें तरी किंवा मुळींच न खाल्लें तरी पोटास तडस लागणें, पोटावर शिरा दिसूं लागणें व वळ्या नाहींशा होणें हीं लक्षणें होतात.

जठरेषु तु।
सर्वेषु तंद्रा सदनं मलसंगोऽल्पवह्निता ॥ ८ ॥
दाहः श्वयथुराध्मानमंते सलिलसंभवः ।

सर्व उदरांत झांपड, अंग गळणें, मलावरोध, अग्निमान्द्य, दाह, सूज व पोटफुगी हे विकार होऊन शेवटीं पाणी उत्पन्न होतें.

सर्वं त्वतोयमरुणमशोफं नातिभारिकम् ॥ ९ ॥
गवाक्षितं सिराजालैः सदा गुडगुडायते ।
नाभिमंत्रं च विष्टभ्य वेगं कृत्वा प्रणश्यति ॥ १० ॥
मारुतो हृत्कटीनाभिपायुवंक्षणवेदनाः ।
सशब्दो निश्चरेद्वायुर्विड्बंधो मूत्रमल्पकम् ॥ ११ ॥
नातिमंदोऽनलो लौल्यं न च स्याद्विरसं मुखम् ।

ज्यांत पाणी उत्पन्न झालें नाहीं असें कोणतेंही उदर तांबुस रंगाचें असतें, त्यावर सूज नसते, तें फारसें जड लागत नाहीं, त्यावर शिरांचीं जाळीं पसरलेलीं असतात, पोटांत नेहमीं गुडगुड शब्द होतो; वायु बेंबी व आंतडीं यांस ताणून हृदय, कंबर, बेंबी, गुद व जांघाडे यांत वेदना उत्पन्न करून, जोर करून नाहींसा होतो; शब्द करीत गुदद्वारानें बाहेर पडतो. मलाचा अवरोध होतो, लघवी फार थोडी होते, अग्नि फारसा मंद नसतो, खाण्याची हांव सुटते, आणि तोंड बेचव नसतें.

तत्र वातोदरे शोफः पाणिपान्मुष्ककुक्षिषु ॥ १२ ॥
कुक्षिपार्श्वोदरकटीपृष्ठरुक्पर्वभेदनम् ।
शुष्ककासोऽगमर्दोऽधोगुरुता मलसंग्रहः ॥ १३ ॥
श्यावारुणत्वगादित्वमकस्माद्वृद्धिह्रासवत् ।
सतोदभेदमुदरं तनु कृष्णसिराततम् ॥ १४ ॥
आध्मातदृतिवच्छब्दमाहतं प्रकरोति च
वायुश्चात्र सरुक्शब्दो विचरेत्सर्वतोगतिः ॥ १५ ॥

वातोदरांत हात, पाय, वृषण व कुशी सुजतात; कुशी, बर-

गडचा, पोट, कंबर व पाठ यांत शूळ होतो; हाडांचे सांधे फुटतात; कोरडी ढांस येते, अंग मोडतें, पोटाच्या खालचा भाग जड होतो, मलाचा अवरोध होतो; त्वचा, डोळे, नखें वगैरे काळसर होतात; पोट एकाएकीं वाढतें व कमी होतें; पोटांत टोंचण व फाट-ल्यासारखी वेदना होते, पोटावर बारीक काळ्या रंगाच्या शिरा पसर-लेल्या दिसतात; पोटावर टिचक्या मारल्या असतां फुगलेल्या पखालीसारखा आवाज निघतो, आणि वायु शूळ व शब्द करीत पोटांत चहूंकडे फिरतो.

पित्तोदरे ज्वरो मूर्छा दाहस्तृट्कटुकास्यता ।
भ्रमोऽतिसारः पीतत्वं त्वगादावुदरं हरित् ॥ १६ ॥
पीतताम्रसिरानद्धं सस्वेदं सोष्म दह्यते ।
धूमायति मृदुस्पर्शं क्षिप्रपाकं प्रदूयते ॥ १७ ॥

पित्तोदरांत ताप, मूर्च्छा, दाह, तहान, तोंड तिखट होणें, भ्रम, जुलाब, त्वचा आदिकरून पिंवळी होणें, पोट हिरवें व पिंवळ्या-तांबुस रंगाच्या शिरांनीं आच्छादित होणें, पोटास घाम येणें, तें कढत लागणें, त्यांत दाह होणें, त्यांतून धूर निघाल्यासारखें वाटणें, पोट हातास मऊ लागणें, लवकर पाणी होणें व दुखणें हीं लक्षणें असतात.

श्लेष्मोदरेऽङ्गसदनं स्वापश्वयथुगौरवम् ।
निद्रोत्क्लेशोऽरुचिः श्वासः कासः शुक्लत्वगादिता ॥ १८ ॥
उदरं स्तिमितं श्लक्ष्णं शुक्लराजीततं महत् ।
चिराभिवृद्धि कठिनं शीतस्पर्शं गुरु स्थिरम् ॥ १९ ॥

कफोदरांत अंग गळल्यासारखें होणें, त्याचें स्पर्शज्ञान नाहींसें होणें; तें सुजणें; जड होणें; झोंप, उम्हासे, अरुचि, दमा, खोकला, त्वचा वगैरे पांढरी होणें, पोट ओलसर व गुळगुळीत होणें, पांढऱ्या शिरांनीं भरणें, मोठें होणें, कठिण व थंड लागणें, जड व ताठ होणें, आणि फार दिवसांनीं पाणी होणें हीं लक्षणें होतात.

त्रिदोषकोपनैस्तैस्तैः स्त्रीदत्तैश्च रजोमलैः ।
गरदूषीविषाद्यैश्च सरक्ताः संचिता मलाः ॥ २० ॥
कोष्ठं प्राप्य विकुर्वाणाः शोषमूर्च्छाभ्रमान्वितम् ।

कुर्युस्त्रिलिंगमुदरं शीघ्रपाकं सुदारुणम् ॥ २१ ॥
बाधते तच्च सुतरां शीतवाताभ्रदर्शने ।

मागें सांगितलेल्या त्रिदोषप्रकोपक कारणांनीं, बायकांनीं वश करण्याकरितां दिलेले रज किंवा नाक-कान वगैरेंतील मळ पोटांत गेल्यानें, सर्पादिकांचें विष किंवा दूषीविष पोटांत गेल्यानें, वात, पित्त, कफ व रक्त हे संचित होऊन कोठ्यांत जाऊन विकृत होऊन सान्निपातिक उदर उत्पन्न करितात. यांत तिन्ही दोषांच्या उदरांचीं लक्षणें असून शिवाय शोष, मूर्च्छा व भ्रम हे विकार होतात. हें उदर भयंकर असून यांत पाणी फार लवकर होतें आणि थंडी पडली असतां, जोराचा वारा सुटला असतां व ढग आले असतां हें विकोपास जातें.

अत्याशितस्य संक्षोभाद्यानयानादिचेष्टितैः ॥ २२ ॥
अतिव्यवायकर्माध्ववमनव्याधिकर्शनैः ।
वामपार्श्वाश्रितः प्लीहा च्युतः स्थानाद्विवर्धते ॥ २३ ॥
शोणितं वा रसादिभ्यो विवृद्धं तं विवर्धयेत् ।
सोऽष्ठीलेवातिकठिनः प्राक्ततः कूर्मपृष्ठवत् ॥ २४ ॥
क्रमेण वर्धमानश्च कुक्षावुदरमावहेत् ।
श्वासकासपिपासास्यवैरस्याध्मानरुग्ज्वरैः ॥ २५ ॥
पांडुत्वक्छर्दिमूर्छार्तिदाहमोहैश्च संयुतम् ।
अरुणाभं विवर्णं वा नीलहारिद्रराजिमत् ॥ २६ ॥

फार जेवून घोडा-गाडी यांतून फिरल्यानें किंवा दुसऱ्या अशाच प्रकारच्या क्रियांनीं क्षोभ झाल्यानें किंवा अतिमैथुन, अति परिश्रम, फार मार्ग चालणें, फार वमन किंवा रोग यांनीं कृश झाल्यानें डाव्या कुशींतील पानथरी आपल्या स्थानापासून सुटून वाढते, किंवा रसादि धातूंनीं वाढलेलें रक्त तिला वाढवितें. ती आरंभीं अठळीसारखी कठिण असून नंतर कांसवाच्या पाठीसारखी हळू हळू कुशींत वाढून उदर उत्पन्न करितें. या उदरांत दमा, खोकला, तहान, तोंड बेचव होणें, पोट फुगणें, शूळ, ताप, पांडुरता, वांति, मूर्च्छा, वेदना, दाह व मोह हे विकार होतात; पोट आरक्त होतें किंवा अन्य तऱ्हेनें त्याचा रंग बदलतो, आणि त्यावर निळ्या-पिंवळ्या रेघा उठतात.

उदावर्तरुगानाहैर्मोहतृड्दहनज्वरैः ।
गौरवारुचिकाठिन्यैर्विद्यात्तत्र मलान् क्रमात् ॥ २७ ॥

त्यांत उदावर्त, पोटशूळ व पोटफुगी हीं लक्षणें असतां वायु; मोह, तहान, दाह व ताप हीं असतां पित्त; आणि जडत्व, अरुचि व कठिणपणा हीं असल्यास कफ यांची अधिकता आहे, असें समजावें.

प्लीहवद्दक्षिणात्पार्श्वात् कुर्याद्यकृदपि च्युतम् ।

पानथरीप्रमाणेंच उजव्या कुशींतील यकृतही आपल्या स्थानापासून सुटून उदर उत्पन्न करितें.

पक्ष्मवालैः सहान्नेन भुक्तैर्बद्धायने गुदे ॥ २८ ॥
दुर्नामभिरुदावर्तैरन्यैर्वान्त्रोपलेपिभिः ।
वर्चःपित्तकफान् रुद्ध्वा करोति कुपितोऽनिलः ॥ २९ ॥
अपानो जठरं तेन स्युर्दाहज्वरतृट्क्षवाः ।
कासश्वासोरुसदनं शिरोहृन्नाभिपायुरुक् ॥ ३० ॥
मलसंगोऽरुचिश्छर्दिरुदरं मूढमारुतम् ।
स्थिरं नीलारुणसिराराजिवद्धेमराजि वा ॥ ३१ ॥
नाभेरुपरि च प्रायो गोपुच्छाकृति जायते ।

पापण्यांचे केंस अन्न बरोबर पोटांत गेल्यानें, मूळव्याधीच्या मोडांनीं, उदावर्तानें किंवा आंतड्यांस चिकटून राहणाऱ्या इतर पदार्थांनीं गुदद्वार बंद झालें असतां कुपित झालेला अपानवायु मळ, पित्त, कफ यांचा अवरोध करून उदर ( बद्धोदर ) उत्पन्न करितो. यांत दाह, तृषा, ताप, शिंका, खोकला, दमा, मांड्या गळणें, डोकें, हृदय, बेंबी व गुद यांत शूळ, मलावरोध, अरुचि, वांति व पोटांत वायु कोंडणें, हीं लक्षणें होतात; आणि पोट ताठतें, पोटांवर निळ्या, तांबुस शिरा उठतात किंवा मुळींच उठत नाहींत व बेंबीच्या वर पोट गाईच्या शेपटासारखें होतें.

अस्थ्यादिशल्यैः सान्नैश्चेद्भुक्तैरत्यशनेन वा ॥ ३२ ॥
भिद्यते पच्यते वान्त्रं तच्छिद्रैश्च स्रवन्बहिः ।
आम एव गुदादेति ततोऽल्पाल्पः स विड्रसः ॥ ३३ ॥
तुल्यः कुणपगंधेन पिच्छिलः पीतलोहितः ।
शेषश्चापूर्य जठरं जठरं घोरमावहेत् ॥ ३४ ॥

वर्धते तदधो नाभेराशु चैति जलात्मताम् ।
उद्रिक्तदोषरूपं च व्याप्तं च श्वासतृड्भ्रमैः ॥ २५ ॥
छिद्रोदरमिदं प्राहुः परिस्रावीति चापरे ।

हाड वगैरे शल्यें अन्नाबरोबर खालीं गेल्यानें किंवा फार खाण्यानें आंतडें फाटतें, किंवा तें पिकतें म्हणजे जखम होऊन भोंकें पडतात. त्या भोंकांतून अपक्क अन्नरस मळासह बाहेर स्रवतो. तो बुळबुळीत, पिंवळा व लाल असून त्यास प्रेतासारखी घाण येते. यांतील थोडथोडा रस गुदांतून बाहेर पडतो, आणि बाकीचा सर्व पोटांत भरून भयंकर उदर उत्पन्न करितो. यांत बेंबीच्या खालीं पोट वाढतें आणि पाणी फार लवकर उत्पन्न होतें. यांत कुपित झालेल्या तीनही दोषांचीं लक्षणें असतात; आणि दमा, तहान व भ्रम हे विकार होतात. यास छिद्रोदर व कांहीं आचार्य परिस्रावी उदर असें म्हणतात.

प्रवृत्तस्नेहपानादेः सहसाऽमांबुपायिनः ॥ ३६ ॥
अत्यंबुपानान्मंदाग्नेः क्षीणस्यातिकृशस्य वा ।
रुध्वांऽबुमार्गाननिलः कफश्च जलमूर्छितः ॥ ३७ ॥
वर्धयेतां तदेवांबु तत्स्थानादुदराश्रितौ ।
ततः स्यादुदरं तृष्णागुदस्रुतिरुजायुतम् ॥ ३८ ॥
कासश्वासारुचियुतं नानावर्णसिराततम् ।
तोयपूर्णदृतिस्पर्शशब्दप्रक्षोभवेपथु ॥ ३९ ॥
दकोदरं महत्स्निग्धं स्थिरमावृत्तनाभि तत् ।

स्नेहन, स्वेदन वगैरे क्रिया करीत असतां मध्येंच एकाएकीं थंड पाणी प्याल्यानें, किंवा अग्नि मंद असून, शक्ति क्षीण असून अथवा शरीर अतिशय कृश असून अतिशय पाणी प्याल्यानें त्या पाण्यांत मिसळलेले कफ व वायु जलवाहक स्रोतें बंद करून पोटांत राहून तें सांचलेलें पाणी उदकस्थानांतून म्हणजे क्लोमांतून वाढवितात; त्यामुळें उदर होतें. यांत तहान, गुदस्राव, गुदशूळ, खोकला, दमा व अरुचि हे विकार होतात. पोटावर नाना रंगांच्या शिरा उठतात, पोट पाण्यानें भरलेल्या पखालीप्रमाणें हातास लागतें. टिचकी मारली असतां तसाच आवाज होतो, दाबल्यानें पखाली-

प्रमाणच आंत पाणी भरल्यासारखेंच दिसतें व पखालीसारखेंच तें डुचमळतें. पोट मोठें, गुळगुळीत व ताठ असतें व बेंबी वर येऊन भोंवताल्लन गरगरीत वाटोळी होते. हें जलोदर होय.

उपेक्षया च सर्वेषु दोषाः स्वस्थानतश्च्युताः ॥ ४० ॥
पाकाद्द्रवाद्द्रवीकुर्युः संधिस्रोतोमुखान्यपि ।
स्वेदश्च बाह्यस्रोतःसु विहतास्तिर्यगास्थितः ॥ ४१ ॥
तदेवोदकमाध्माप्य पिच्छां कुर्यात्तदा भवेत् ।
गुरूदरं स्थिरं वृत्तमाहतं च न शब्दवत् ॥ ४२ ॥
मृदु व्यपेतराजीकं नाभ्यां स्पृष्टं च सर्पति ।
तदनूदकजन्मास्मिन्कुक्षिवृद्धिस्ततोऽधिकम् ॥ ४३ ॥
सिरांतर्धानमुदकजठरोक्तं च लक्षणम् ।

कोणत्याही उदराची हयगय केली असतां आपल्या स्थानापासून सुटलेले व पक्क होऊन पातळ झालेले वातादि दोष संधि व स्रोतें यांच्या तोंडांसही पातळ करितात. बाहेरचीं स्रोतें बंद झाल्यामुळें घामाची बाह्यगति बंद होऊन तो परत पोटांत सांचून तिरपा राहून अगोदरच पोटांत सांचलेल्या पाण्यांत आणखी भर घालून त्याची पिच्छा ( चिकट पाणी ) उत्पन्न करितो. या योगानें पोट जड, ताठ, वाटोळें व मऊ होतें, बोटानें ठोकलें असतां वाजत नाहीं, त्याच्या-वरच्या शिरा नाहींशा होतात, बेंबीवर दाबलें असतां सगळें पोट एकदम हालल्यासारखें भासतें, नंतर यांत पाणी होऊन पूर्वीपेक्षां पोट मोठें होतें, शिरा दिसेनाशा होतात आणि जलोदराचीं सर्व लक्षणें होतात.

वातपित्तकफप्लीहसंनिपातोदकोदरम् ॥ ४४ ॥
कृच्छ्रं यथोत्तरम्

वातोदर, पित्तोदर, कफोदर, प्लीहोदर, सान्निपातोदर व जलोदर हे अनुक्रमें एकाहून एक अधिक कष्टसाध्य आहेत.

पक्षात्परं प्रायोऽपरे हतः ।

बद्धोदर व क्षतोदर हे झाले असतां बहुतकरून पंधरा दिवसांनीं रोगी मरतो.

सर्वं च जातसलिलं रिष्टोक्तोपद्रवान्वितम् ॥ ४५ ॥

पाणी झालेलीं व रिष्टाध्यायांत सांगितलेल्या उपद्रवांनीं युक्त अशीं सर्व उदरें असाध्य होत.

जन्मनैवोदरं सर्वं प्रायः कृच्छ्रतमं मतम्।
बलिनस्तदजातांबु यत्नसाध्यं नवोत्थितम्॥ ४६॥

सर्व उदरें जात्याच बहुशः अत्यंत कष्टसाध्य आहेत. तरी पण जें नुकेंच झालेलें असून त्यांत पाणी झालें नसेल व रोगी चांगला सशक्त असेल, तर तें चांगली चिकित्सा केल्यास यत्नानें साध्य होतें.

---

## अध्याय १३ वा.

अथाऽतः पांडुरोगशोफविसर्पनिदानं व्याख्यास्यामः।

आतां पांडुरोग, सूज व विसर्प यांचें निदान सांगतों.

पित्तप्रधानाः कुपिता यथोक्तैः कोपनैर्मलाः।
तत्रानिलेन बलिना क्षिप्तं पित्तं हृदि स्थितम्॥ १॥
धमनीर्दश संप्राप्य व्याप्नुयात्सकलां तनुम्।
श्लेष्मत्वग्रक्तमांसानि प्रदूष्यांतरमाश्रितम्॥ २॥
त्वङ्मांसयोस्तत्कुरुते त्वचि वर्णान् पृथग्विधान्।
पांडुहारिद्रहरितान् पांडुत्वं तेषु चाधिकम्॥ ३॥
यतोऽतः पांडुरित्युक्तः स रोगः

पूर्वोक्त कोप करणाऱ्या कारणांनीं वातादि दोष कुपित होतात. त्यांत पित्त अधिक असतें. जोरदार वायूच्या योगानें फेंकलें गेलेलें पित्त हृदयांत येऊन बसतें. पुढें हृदयाश्रित दहा धमन्यांत शिरून त्यांच्या द्वारें सर्व शरीरभर पसरून, कफ, त्वचा, रक्त व मांस यांस फार दूषित करून, त्वचा व मांस यांच्या मध्यभागीं राहून तें पित्त त्वचेवर पांडुर, पिंवळा, हिरवा इत्यादि निरनिराळे रंग उत्पन्न करितें. त्यांत पांडुवर्ण ( पिकट पांढऱ्या-पिंवळ्यांचें मिश्रण ) हा अधिक असतो, म्हणून या रोगास पांडुरोग असें म्हणतात.

तेन गौरवम्।
धातूनां स्याच्च शैथिल्यमोजसश्च गुणक्षयः॥ ४॥
ततोऽल्परक्तमेदस्को निःसारः स्याच्छ्लथेंद्रियः।
मृद्यमानैरिवांगैर्ना द्रवता हृदयेन च॥ ५॥
शूनाक्षिकूटः सदनः कोपनः ष्ठीवनोऽल्पवाक्।

अन्नाद्विट् शिशिरद्वेषी शीर्णरोमा हतानलः ॥ ६ ॥
सन्नसक्थो ज्वरी श्वासी कर्णक्ष्वेडी भ्रमी श्रमी ।

पांडुरोगांत रसादि धातु जड व शिथिल होतात, ओजाच्या माधुर्य-शैत्यादि गुणांचा क्षय होतो, त्यामुळें रक्त व मेद हीं कमी होतात, शक्ति क्षीण होते, इन्द्रियें शिथिल होतात, अंग मर्दन केल्याप्रमाणें वाटतें, मन फार नाजुक होतें, डोळ्यांचीं घरें सुजतात, अंग गळतें, रोगी रागीट होतो, वरचेवर थुंकतो, थोडें बोलतो, अन्नाचा व थंड पदार्थांचा द्वेष करितो, अंगावरचे केंस गळून पडतात, अग्नि मंद होतो, मांड्या गळतात, ताप येतो, दम लागतो, कानांत नाद होतो व श्रम न करतां थकवा येतो.

स पंचधा पृथग्दोषैः समस्तैर्मृत्तिकादनात् ॥ ७ ॥

वातापासून, पित्तापासून, कफापासून, सन्निपातापासून आणि माती खाण्यापासून या पांच कारणांनीं पांडुरोग पांच प्रकारचा होतो.

प्राग्रूपमस्य हृदयस्पंदनं रूक्षता त्वचि ।
अरुचिः पीतमूत्रत्वं स्वेदाभावोऽल्पवाह्निता ॥ ८ ॥
सादः श्रमः

हृदय धडधडणें, त्वचा रूक्ष होणें, अरुचि, लघ्वी पिंवळी होणें, घाम न येणें, अग्नि मंद होणें, हातपाय मोडल्यासारखे होणें, आणि श्रमावांचून थकवा येणें हीं पांडुरोगाचीं पूर्वरूपें होत.

अनिलात्तत्र गात्ररुक्तोदकंपनम्।
कृष्णरूक्षारुणासिरानखविण्मूत्रनेत्रता ॥ ९ ॥
शोफानाहास्यवैरस्यविट्शोषाः पार्श्वमूर्धरुक् ।

वायूपासून होणाऱ्या पांडुरोगांत गात्रें ठणकतात, कांपतात व त्यांत टोंचण होते; शिरा, नखें, मळ, मूत्र व डोळे हीं काळीं, रूक्ष व आरक्त होतात, अंग सुजतें, आनाह होतो, तोंड बेचव होतें, मळ सुकतो आणि बरगड्या व डोकें हीं दुखतात.

पित्ताद्धरितपीताभसिरादित्वं ज्वरस्तमः ॥ १० ॥
तृट्स्वेदमूर्छाशीतेच्छा दौर्गंध्यं कटुवक्त्रता ।
वर्चोभेदोऽम्लको दाहः

पित्तापासून झालेल्या पांडुरोगांत शिरा, नखें वगैरे हिरवीं किंवा

पिंवळीं होणें, ताप, डोळ्यापुढें अंधेरी येणें, तहान, घाम, मूर्च्छा, थंड पदार्थांवर इच्छा, अंगास घाम येणें, तोंड तिखट होणें, आंबट ढेंकर येणें व दाह हीं लक्षणें होतात.

कफाच्छुक्लसिरादिता ॥ ११ ॥
तंद्रा लवणवक्त्रत्वं रोमहर्षः स्वरक्षयः ।
कासश्छर्दिश्च

कफजन्य पांडुरोगांत शिरा वगैरे पांढऱ्या होणें, झांपड, तोंड खारट होणें, रोमांच उभे राहणें, स्वर क्षीण होणें, खोकला व वांति हीं लक्षणें होतात.

निचयान्मिश्रलिंगोऽतिदुःसहः ॥ १२ ॥

सान्निपातिक पांडुरोगांत वरील सर्व लक्षणें असतात व तो अतिशय दुस्सह असतो.

मृत्कषायानिलं पित्तमूषरा मधुरा कफम् ।
दूषयित्वा रसादींश्च रौक्ष्याद्भुक्तं विरूक्ष्य च ॥ १३ ॥
स्रोतांस्यपक्वैवापूर्य कुर्याद्रुद्ध्वा च पूर्ववत् ।
पांडुरोगं ततः शूननाभिपादास्यमेहनः ॥ १४ ॥
पुरीषं कृमिमन्मुंचेद्भिन्नं सासृक्कफं नरः ।

तुरट माती खाल्ली असतां ती वायूस, क्षारयुक्त माती पित्तास, गोड माती कफास आणि या सर्व प्रकारची माती रसादि धातूंस दूषित करून आपल्या रूक्षतेनें खाल्लेल्या अन्नासही रूक्ष करिते. ती पक्व न होतां तशीच कच्ची स्रोतांत भरून त्यांस बंद करून पूर्वोक्त रीतीनें पांडुरोग उत्पन्न करिते. त्या योगानें बेंबी, पाय, तोंड व शिस्न हीं सुजतात, आणि रोग्यास पातळ, रक्त-कफ-मिश्रित शौचास होतें व त्यांतून कृमि पडतात.

यः पांडुरोगी सेवेत पित्तलं तस्य कामलाम् ॥ १५ ॥
कोष्ठशाखाश्रयं पित्तं दग्ध्वासृङ्मांसमावहेत् ।
हारिद्रनेत्रमूत्रत्वङ्नखवक्त्रशकृत्तया ॥ १६ ॥
दाहाविपाकतृष्णावान् भेकाभो दुर्बलेंद्रियः ।

पांडुरोगी मनुष्यानें पित्तकर पदार्थ खाल्ले असतां कोठा व रक्तादि धातु आणि त्वचा यांतील पित्त हें रक्त व मांस यांस जाळून कावीळ उत्पन्न करितें. हींत डोळे, लघ्वी, त्वचा, नखें, तोंड व

मळ हीं पिंवळीं होतात, दाह होतो, अन्न पचत नाहीं, तहान लागते, बेडकासारखी कांति होते आणि इन्द्रियें दुर्बळ होतात.

भवेत्पित्तोल्बणस्याऽसौ पांडुरोगादृतेपि च ॥ १७ ॥

ज्याचें पित्त वाढलें आहे, अशा मनुष्यास पांडुरोगावांचूनही कावीळ होते.

उपेक्षया च शोफाढ्या सा कृच्छ्रा कुंभकामला ।

काविळीची हयगय केली असतां तींत फार सूज येते. हीस कुंभकामला म्हणतात व ही कष्टसाध्य असते.

हरितश्यावपीतत्वं पांडुरोगे यदा भवेत् ॥ १८ ॥
वातपित्ताद्भ्रमस्तृष्णा स्त्रीष्वहर्षो मृदुर्ज्वरः ।
तंद्राबलानलभ्रंशो लोढरं तं हलीमकम् ॥ १९ ॥
अलसं चेति शंसंति

पांडुरोगांत ज्या वेळीं डोळे, लघवी वगैरे हिरवी, काळसर व पिंवळी होतात आणि वातपित्ताच्या योगानें श्रम, तहान, स्त्रियांविषयीं अप्रीति, बारीक ताप, झांपड, शक्तिक्षीणता व अग्निमान्द्य, हीं लक्षणें होतात, त्या वेळीं त्यास लोढर, हलीमक किंवा अलस असें म्हणतात.

तेषां पूर्वमुपद्रवाः ।
शोफप्रधानाः कथिताः स एवातो निगद्यते ॥ २० ॥

पांडुरोगाच्या उपद्रवांत सूज ही मुख्य असते, असें मागें सांगितलें आहे. म्हणून आतां सुजेविषयींच निरूपण करितों.

पित्तरक्तकफान्वायुर्दुष्टो दुष्टान् बहिःशिराः ।
नीत्वा रुद्धगतिस्तैर्हि कुर्यात्त्वङ्मांससंश्रयम् ॥ २१ ॥
उत्सेधं संहतं शोफं तमाहुर्निचयादतः ।
सर्वम्

कुपित झालेला वायु दूषित झालेलें पित्त, रक्त व कफ यांस बाहेरच्या शिरांत नेतो. व त्या पित्तादिकांनीं त्याची गति बंद झाल्यानें तो त्वचा व मांस यांच्यामध्यें कठीण असा उंचवटा उत्पन्न करितो त्यास सूज असें म्हणतात. म्हणूनच सर्व प्रकारची सूज त्रिदोषात्मक असते असें म्हणतात.

हेतुविशेषैस्तु रूपभेदान्नवात्मकम् ॥ २२ ॥
दोषैः पृथग्द्वयैः सर्वैरभिघाताद्विषादपि ।
द्विधा वा निजमागंतुं सर्वांगैकांगजं च तम् ॥ २३ ॥
पृथून्नतग्रथितताविशेषैश्च त्रिधा विदुः ।

तथापि निरनिराळ्या कारणांवरून व निरनिराळ्या लक्षणांवरून तिचे नऊ भेद होतात. ते असेः—वातापासून, पित्तापासून, कफापासून, वातपित्तापासून, वातकफापासून, पित्तकफापासून, त्रिदोषांपासून, अभिघातापासून, आणि विषापासून. दुसऱ्या तऱ्हेनें निज व आगंतु, आणि सर्वांगज व एकांगज असे दोन प्रकार होतात. तसेंच पसरट, उंच व गांठाळलेली अशा तऱ्हेनें तीन भेद होतात.

सामान्यहेतुः शोफानां दोषजानां विशेषतः ॥ २४ ॥
व्याधिकर्मोपवासादिक्षीणस्य भजतो द्रुतम् ।
अतिमात्रमथान्यस्य गुर्वम्लस्निग्धशीतलम् ॥ २५ ॥
लवणक्षारतीक्ष्णोष्णं शाकांबु स्वप्नजागरम् ।
मृद्ग्राम्यमांसवल्लूरमजीर्णश्रममैथुनम् ॥ २६ ॥
पदातेर्मार्गगमनं यानेन क्षोभिणाऽपि वा ।
श्वासकासातिसारार्शोजठरप्रदरज्वराः ॥ २७ ॥
विषूच्यलसकच्छर्दिगर्भवीसर्पपांडुताः ।
अन्ये च मिथ्योपक्रांतास्तैर्दोषा वक्षसि स्थिताः ॥२८॥
ऊर्ध्वं शोफमधो बस्तौ मध्ये कुर्वंति मध्यगाः ।
सर्वांगगाः सर्वगतं प्रत्यंगेषु तदाश्रयाः ॥ २९ ॥

पुढील कारणें सामान्यतः सर्व प्रकारच्या सुजेस व विशेषेंकरून दोषज सुजेस लागू आहेत. रोग, वमनादि पंचकर्में, उपास इत्यादिकांनीं क्षीण झालेल्या मनुष्यानें किंवा निर्विकार मनुष्यानेंही एकाएकीं जड, आंबट, स्निग्ध, थंड, खारट, क्षारयुक्त, तीक्ष्ण व उष्ण पदार्थ, भाज्या, पाणी, दिवसा झोंप, रात्रीं जागरण, माती, कोंबडी वगैरे ग्राम्य प्राण्याचें मांस, वाळलेलें मांस, अजीर्णभोजन, श्रम व मैथुन यांचें अतिशय सेवन केल्यानें; पायांनीं चालल्यानें; शरीर खिळखिळें करणाऱ्या घोडें, उंट वगैरे वाहनांवर बसून फिरल्यामुळें; दमा खोकला, अतिसार, मूळव्याध, उदर, प्रदर, ताप, विषूचिका, अलसक, वांति, गर्भारपण, विसर्प, पांडुरोग व इतर कांहीं हे असेच

रोग यांवर अयोग्य चिकित्सा केल्यानें, छातींतील दोष कुपित झाल्यास वर, बस्तींतील कुपित झाल्यास खालीं, मध्यभागीं कुपित झाल्यास मध्यें, सर्वांगांतील प्रकुपित झाल्यास सगळ्या अंगावर आणि एखाद्या अवयवांतील कुपित झाल्यास त्या अवयवांत सूज उत्पन्न करितात.

तत्पूर्वरूपं दवथुः सिरायामोऽङ्गगौरवम् ।

डोळे वगैरे अवयवांतून उष्ण वाफा निघणें, शिरा ताठणें व अंग जड होणें हीं सुजेचीं पूर्वचिन्हें होत.

वाताच्छोफश्चलो रूक्षः खररोमारुणासितः ॥ ३० ॥
संकोचस्पंदहर्षार्तितोदभेदप्रसुप्तिमान् ।
क्षिप्रोत्थानशमः शीघ्रमुन्नमेत्पीडितस्तनुः ॥ ३१ ॥
स्निग्धोष्णमर्दनैः शाम्येद्रात्रावल्पो दिवा महान् ।
त्वक् च सर्षपलिप्तेव तस्मिञ्चिमिचिमायते ॥ ३२ ॥

वाताची सूज पसरणारी, रूक्ष, तांबुस व काळी असून तिजवरील केंस रांठ होतात. तींत संकोच, हालणें, रोमांच, पीडा, टोंचण, फुटण व स्पर्शज्ञान न होणें हीं लक्षणें असतात. ही लवकर उत्पन्न होते व लवकरच बरी होते. ही दाबली असतां लवकर वर उचलते, पातळ असते, स्निग्ध व उष्ण पदार्थांचें मर्दन केलें असतां बरी होते, रात्रीं कमी असून दिवसा अधिक असते, आणि मोहरीचा लेप लावल्याप्रमाणें चामडी चुरचुरते.

पीतरक्तासिताभासः पित्तादाताम्ररोमकृत् ।
शीघ्रानुसारप्रशमो मध्ये प्राग्जायते तनुः ॥ ३३ ॥
सतृड्दाहज्वरस्वेददवक्लेदमदभ्रमः ।
शीताभिलाषी विड्भेदी गंधी स्पर्शासहो मृदुः ॥ ३४ ॥

पित्तजन्य सूज पिंवळट, तांबुस किंवा काळसर असून तिच्यावरील केंसही तांबुस होतात. ही लवकर पसरते व लवकर बरी होते. ही अगोदर मध्यभागीं होते. ही पातळ व मऊ असून तीस घाण येते व स्पर्श सोसत नाहीं. थंड पदार्थांची इच्छा होते, आणि जुलाब, तहान, दाह, ताप, घाम, नेत्रादिकांतून गरम वाफा निघणें, क्लेद, गुंगी व भ्रम हे विकार होतात.

कंडूमान् पांडुरोमत्वक्कठिनः शीतलो गुरुः ।
स्निग्धः श्लक्ष्णः स्थिरः स्त्यानो निद्राच्छर्द्यग्निसादकृत् ३५
आक्रांतो नोन्नमेत्कृच्छ्रशमजन्मा निशाबलः ।
स्रवेन्नासृक् चिरात्पिच्छां कुशशस्त्रादिविक्षतः ॥ ३६ ॥
स्पर्शोष्णकांक्षी च कफात्

कफजन्य सुजेंत खाज असते, त्वचा व केंस फिकट असतात, सूज कठिण, थंड, जड, स्निग्ध, गुळगुळीत, ताठ व घट्ट असते; दाबली असतां वर उचलत नाहीं, उत्पन्न होतांना व बरी होतांना कष्ट होतात; हिचा जोर रात्रीं असतो; ही दर्भ, शस्त्र इत्यादिकांनीं चिरली असतां हिच्यांतून रक्त न स्रवतां पुष्कळ वेळानें लस वाहते, तीस स्पर्श केला असतां व उष्ण उपचारानें बरें वाटतें, आणि तींत झोंप, उलटी व अग्निमान्द्य हे विकार होतात.

यथास्वं द्वंद्वजास्त्रयः ।
संकराद्धेतुलिंगानाम्

दोन दोषांचीं कारणें व लक्षणें यांच्या मिश्रणावरून तीन प्रकारचे द्वन्द्वज शोफ ओळखावे.

निचयान्निचयात्मकः ॥ ३७ ॥

तीनही दोषांचीं कारणें व लक्षणें झालीं असतां ती सान्निपातिक सूज समजावी.

अभिघातेन शस्त्रादिच्छेदभेदक्षतादिभिः ।
हिमानिलोदध्यनिलैर्भल्लातकपिकच्छुजैः ॥ ३८ ॥
रसैः शूकैश्च संस्पर्शाच्छ्वयथुः स्याद्विसर्पवान् ।
भृशोष्मा लोहिताभासः प्रायशः पित्तलक्षणः ॥ ३९ ॥

शस्त्रादिकांनीं कापल्यानें, फुटल्यानें, क्षतादिकांनीं, समुद्राचा किंवा थंड वारा लागल्यानें आणि बिब्याचें तेल किंवा कुहिलीचीं कुसें अंगास लागल्यानें जी सूज पसरते, ती अभिघातज होय. ही अतिशय कढत लागते, लाल असते, आणि हींत पित्तजन्य सुजेचीं बहुतेक लक्षणें होतात.

विषजः सविषप्राणिपरिसर्पणमूत्रणात् ।
दंष्ट्रादंतनखापातादविषप्राणिनामपि ॥ ४० ॥
विण्मूत्रशुक्रोपहतमलवद्वस्त्रसंकरात् ।

विषवृक्षानिलस्पर्शाद्गरयोगावचूर्णनात् ॥ ४१ ॥
मृदुश्चलोऽवलंबी च शीघ्रो दाहरुजाकरः ।

विषारी प्राणी अंगावरून गेल्यानें किंवा अंगावर मुतल्यानें; निर्विष प्राण्यांच्याही दाढा, दांत किंवा नखें लागल्यानें; मळ, मूत्र, वीर्य यांनीं भरलेलें किंवा घाणेरडें वस्त्र याचा स्पर्श झाल्यानें; विषारी झाडाचा वारा लागल्यानें व कृत्रिम विष अंगास लागल्यानें जी मऊ, पसरणारी व मांसाश्रित सूज येते, ती विषजन्य होय. ती लवकर उत्पन्न होते आणि तींत दाह व वेदना होतात.

नवोऽनुपद्रवः शोफः साध्योऽसाध्यः पुरेरितः ॥ ४२ ॥

सूज नवीन असून उपद्रव झाले नसल्यास ती साध्य होते. असाध्य सुजेचीं लक्षणें मागें विकृतिविज्ञानीय शारीरांत सांगितलींच आहेत.

स्याद्विसर्पोऽभिघातांतैर्दोषैर्दूष्यैश्च शोफवत् ।
त्र्यधिष्ठानं च तं प्राहुर्बाह्यांतरुभयाश्रयात् ॥ ४३ ॥
यथोत्तरं च दुःसाध्याः

वातजन्य सुजेपासून अभिघातजन्य सुजेपर्यंत जे दोष व जीं दूष्यें सांगितलीं आहेत, त्यांच्याच योगानें सुजेप्रमाणेंच विसर्प उत्पन्न होतो. बाह्याश्रित, अन्तराश्रित व बाह्यान्तराश्रित असे स्थानभेदानें विसर्पाचे तीन प्रकार होतात. हे उत्तरोत्तर दुस्साध्य आहेत.

तत्र दोषा यथायथम् ।
प्रकोपणैः प्रकुपिता विशेषेण विदाहिभिः ॥ ४४ ॥
देहे शीघ्रं विसर्पंति तेंऽतरंतः स्थिता बहिः ।
बहिःस्था द्वितये द्विस्थाः

त्यांत वातादि दोष पूर्वोक्त कारणांनीं व विशेषतः विदाही पदार्थांनीं कुपित होऊन कोठ्यांत असल्यास आंत, त्वचेंत असल्यास बाहेर, आणि उभयत्र असल्यास दोन्ही ठिकाणीं शरीरांत फार लवकर पसरतात.

विद्यात्तत्रांतराश्रयम् ॥ ४५ ॥
मर्मोपतापात्संमोहादयनानां विघट्टनात् ।

तृष्णातियोगाद्वेगानां विषमं च प्रवर्तनात् ॥ ४६ ॥
आशु चाग्निबलभ्रंशादतो बाह्यं विपर्ययात् ।

त्यांत मर्मांत पीडा, मूर्च्छा, कान, नाक वगैरे द्वारांचें विशेष स्फुरण, अतिशय तहान, मळमूत्रांची विषम प्रवृत्ति, आणि अग्नि व शक्ति हीं एकाएकीं क्षीण होणें, हीं लक्षणें झालीं असतां अंतराश्रित विसर्प जाणावा. याच्या विपरीत लक्षणांनीं बाह्य विसर्प जाणावा.

तत्र वातात्परीसर्पो वातज्वरसमव्यथः ॥ ४७ ॥
शोफस्फुरणनिस्तोदभेदायामार्तिहर्षवान् ।

वातविसर्पांत वातज्वरासारखे विकार होऊन शिवाय सूज, स्फुरण, टोंचण, फूट, ताण, पीडा व रोमांच उभे राहणें हे विकार होतात.

पित्ताद्द्रुतगतिः पित्तज्वरलिंगोऽतिलोहितः ॥ ४८ ॥

पित्तविसर्प फार लवकर पसरतो, तो अतिशय लाल असतो आणि त्यांत पित्तज्वराचीं लक्षणें होतात.

कफात्कंडूयुतः स्निग्धः कफज्वरसमानरुक् ।

कफविसर्प स्निग्ध असतो, त्यास खाज सुटते, आणि कफज्वराचे विकार होतात.

स्वदोषलिंगैश्चीयंते सर्वस्फोटैरुपेक्षिताः ॥ ४९ ॥
ते पक्वभिन्ना स्वं स्वं च बिभ्रति व्रणलक्षणम् ।

कोणत्याही प्रकारच्या विसर्पाची हयगय केली असतां त्यावर त्या त्या दोषाच्या लक्षणांचे पुष्कळच फोड येतात,आणि ते पिकून फुटले ह्मणजे त्यांचे व्रण होतात, व त्यांचीं लक्षणें त्या त्या दोषाच्या व्रणाप्रमाणें असतात.

वातपित्ताज्ज्वरच्छर्दिमूर्छातीसारतृड्भ्रमैः ॥ ५० ॥
अस्थिभेदाग्निसदनतमकारोचकैर्युतः ।
करोति सर्वमंगं च दीप्तांगारावकीर्णवत् ॥ ५१ ॥
यं यं देशं विसर्पश्च विसर्पति भवेत्स सः ।
शांतांगारासितो नीलो रक्तो वाशु च चीयते ॥ ५२ ॥
अग्निदग्ध इव स्फोटैः शीघ्रगत्वाद्द्रुतं च सः ।
मर्मानुसारी वीसर्पः स्याद्वातोऽतिबलस्ततः ॥ ५३ ॥

व्यथेतांगं हरेत्संज्ञां निद्रां च श्वासमीरयेत् ।
हिध्मां च स गतोऽवस्थामीदृशीं लभते न ना ॥ ५४ ॥
क्वचिच्छर्मारतिग्रस्तो भूमिशय्यासनादिषु ।
चेष्टमानस्ततः क्लिष्टो मनोदेहश्रमोद्भवाम् ॥ ५५ ॥
दुष्प्रबोधोऽश्नुते निद्रां सोऽग्निवीसर्प उच्यते ।

वातपित्तापासून होणाऱ्या विसर्पांत ताप, वांति, मूर्च्छा, अतिसार, तहान, भ्रम, हाडें फुटणें, अग्निमान्द्य, तमकश्वास व अरुचि हे विकार होतात; जळजळीत निखारे ठेवल्याप्रमाणें सर्वांगाची लाही होते; ज्या ज्या भागांत विसर्प पसरतो, तो तो भाग लागलाच कोळशासारखा काळा, निळा किंवा लाल होतो; त्यावर एकदम विस्तवानें भाजल्यासारखे फोड येतात, हा फार लवकर पसरत असल्यामुळें त्वरित मर्मांत पोंचतो, त्यामुळें वायु अतिशय प्रबळ होऊन सर्वांगांत पीडा उत्पन्न करितो, शुद्धि व झोंप नष्ट करितो, दमा व उचकी उत्पन्न करितो. अशा तऱ्हेची रोग्याची अवस्था झाली ह्मणजे त्यास कोठेंच बरें वाटेनासें होतें आणि तो तळमळून सगळ्याभर गडबडा लोळूं लागतो. त्या योगानें त्यास अतिशय क्लेश होऊन मानसिक व शारीरिक श्रमांपासून झोंप येते, व त्या झोंपेंतून तो जागा होण्यास फार श्रम पडतात. यास अग्निविसर्प म्हणतात.

कफेन रुद्धः पवनो भित्त्वा तं बहुधा कफम् ॥ ५६ ॥
रक्तं वा वृद्धरक्तस्य त्वक्सिरास्नावमांसगम् ।
दूषयित्वा च दीर्घाणुवृत्तस्थूलखरात्मनाम् ॥ ५७ ॥
ग्रंथीनां कुरुते मालां रक्तानां तीव्ररुग्ज्वराम् ।
श्वासकासातिसारास्यशोषहिध्मावमिभ्रमैः ॥ ५८ ॥
मोहवैवर्ण्यमूर्छांगभंगाग्निसदनैर्युताम् ।
इत्ययं ग्रंथिवीसर्पः कफमारुतकोपजः ॥ ५९ ॥

कफानें वायु अवरुद्ध झाला असतां तो त्या कफाचे पुष्कळसे भाग करून व त्यांस दूषित करून, किंवा ज्याचें रक्त वाढलें आहे अशा मनुष्याच्या त्वचा, शिरा, स्नायु व मांस यांतील रक्ताचे पुष्कळसे भाग करून व त्यांस दूषित करून, लांब, लहान, वाटोळ्या, स्थूल,

व खरखरीत अशा लाल रंगाच्या गांठीची माळ उत्पन्न करितो. त्यांत वेदना व ताप तीव्र असतात; आणि दमा, खोकला, अतिसार, तोंडास कोरड, उचकी, वांति, भ्रम, मोह, विवर्णता, मूर्च्छा, अंग मोडणें व अग्निमान्द्य हे विकार होतात. कफ व वायु यांच्या कोपापासून होणाऱ्या या विसर्पास ग्रन्थिविसर्प म्हणतात.

कफपित्ताज्ज्वरः स्तंभो निद्रातंद्राशिरोरुजः ।
अंगावसादविक्षेपप्रलापारोचकभ्रमाः ॥ ६० ॥
मूर्छाग्निहानिभेदोऽस्थ्नां पिपासेंद्रियगौरवम् ।
आमोपवेशनं लेपः स्रोतसां स च सर्पति ॥ ६१ ॥
प्रायेणामाशये गृह्णन्नेकदेशं न चातिरुक् ।
पिटकैरवकीर्णोऽतिपीतलोहितपांडुरैः ॥ ६२ ॥
मेचकाभोऽसितस्निग्धो मलिनः शोफवान् गुरुः ।
गंभीरपाकः प्राज्योष्मा स्पृष्टः क्लिन्नोऽवदीर्यते ॥ ६३ ॥
पंकवच्छीर्णमांसश्च स्पष्टस्नायुसिरागणः ।
शवगंधिश्च वीसर्पं कर्दमाख्यमुशंति तम् ॥ ६४ ॥

कफपित्तापासून होणाऱ्या विसर्पांत ताप, अंग ताठणें, झोंप, झांपड, डोकें दुखणें, हातपाय गळणें, हातपाय टाकणें, बडबड, अरुचि, भ्रम, मूर्च्छा, अग्निमान्द्य, हाडें फुटणें, तहान, इंद्रियें जड होणें, अपक्व मळ शौचावाटे पडणें, व स्रोतांस चिकटा बसणें, हे विकार होतात. हा विसर्प बहुधा बेंबी व स्तन यांच्या मधील म्हणजे आमाशयावरचा एक भाग धरून नंतर इतर भागांत पसरतो; यांत फारशी पीडा नसते; हा पिंवळया, लाल, पांडुर रंगाच्या पुळयांनीं भरून जातो; हा निळा, काळा, स्निग्ध, मळकट, सुजलेला व जड असतो; त्यांत खोल भागीं पाक होतो, तो फार कढत लागतो; हात लावला असतां फुटून चिघळतो, त्याचें मांस कुजून चिखलासारखें होतें; हा स्नायु व शिरा यांपर्यंत पोंचतो; आणि त्यास प्रेतासारखी घाण येते. ह्यास कर्दमविसर्प म्हणतात.

सर्वजो लक्षणैः सर्वैः सर्वधात्वतिसर्पणः ।

सान्निपातिक विसर्पांत वरील सर्व दोषांचीं लक्षणें होत असून तो सर्व धातूंत अतिशय पसरतो.

बाह्यहेतोः क्षतात्क्रुद्धः सरक्तं पित्तमीरयन् ॥ ६५ ॥
विसर्पं मारुतः कुर्यात् कुलत्थसदृशैश्चितम् ।
स्फोटैः शोफज्वररुजादाहाढ्यं श्यावलोहितम् ॥ ६६ ॥

क्षत होऊन बाह्य कारणानें कुपित झालेला वायु रक्त व पित्त यांस प्रेरित करून विसर्प उत्पन्न करितो. त्यावर कुळथासारखे पुष्कळ फोड येतात, तो काळसर व लाल असून त्यांत सूज, ताप, ठणका व दाह हे विकार अतिशय होतात. हा क्षतविसर्प होय.

पृथग्दोषैस्त्रयः साध्या द्वंद्वजाश्चानुपद्रवाः ।

वात, पित्त व कफ या एकेका दोषापासून झालेले तीन विसर्प व उपद्रवरहित द्वन्द्वज विसर्प साध्य आहेत.

असाध्यौ क्षतसर्वोत्थौ सर्वे चाक्रांतमर्मकाः ॥ ६७ ॥
शीर्णस्नायुसिरामांसाः प्रक्लिन्नाः शवगंधयः ।

क्षतविसर्प, सान्निपातिक विसर्प, मर्मस्थानावर पोंचलेले सर्व प्रकारचे विसर्प, ज्यांतील स्नायु, शिरा व मांस कुजून गळलीं आहेत असे विसर्प, तसेंच अतिशय चिघळलेले आणि प्रेतासारखी घाण येत असलेले विसर्प असाध्य जाणावे.

---

## अध्याय १४ वा.

अथाऽतः कुष्ठश्वित्रक्रिमिनिदानं व्याख्यास्यामः ।

आतां कुष्ठ, श्वित्र व कृमि यांचें निदान सांगतों.

मिथ्याहारविहारेण विशेषेण विरोधिना ।
साधुनिंदावधान्यस्वहरणाद्यैश्च सेवितैः ॥ १ ॥
पाप्मभिः कर्मभिः सद्यः प्राक्तनैः प्रेरिता मलाः ।
सिराः प्रपद्य तिर्यग्गास्त्वग्लसीकासृगामिषम् ॥ २ ॥
दूषयंति श्लथीकृत्य निश्चरंतस्ततो बहिः ।
त्वचः कुर्वंति वैवर्ण्यं दुष्टाः कुष्ठमुशंति तत् ॥ ३ ॥
कालेनोपेक्षितं यस्मात्सर्वं कुष्णाति तद्वपुः ।

चुकीचे आहार-विहार केल्यानें, विशेषतः परस्परविरुद्ध पदार्थ सतत सेवन केल्यानें आणि साधूंची निंदा व वध, दुसऱ्याचें द्रव्य हरण करणें इत्यादि या जन्मीं किंवा पूर्वजन्मीं केलेल्या पापकर्मांच्या योगानें प्रेरित झालेले वातादि दोष दूषित होऊन शरीरांतील आडव्या

जाणाऱ्या शिरांत शिरून त्वचा, लस, रक्त व मांस यांस दूषित व शिथिल करून नंतर बाहेर निघून त्वचेचा रंग पालटवितात. याची हयगय केली असतां हें कांहीं काळानें सर्व शरीर तोडून खाऊन टाकितें, म्हणून यास कुष्ठ हें नांव दिलें आहे.

प्रपद्य धातून्व्याप्यांतः सर्वान् संक्लेद्य चावहेत् ॥ ४ ॥
सस्वेदक्लेदसंकोथान् कृमीन्सूक्ष्मान्सुदारुणान् ।
रोमत्वक्स्नायुधमनीतरुणास्थीनि यैः क्रमात् ॥ ५ ॥
भक्षयेच्छ्वित्रमस्माच्च कुष्ठबाह्यमुदाहृतम् ।

दोष सर्व धातूंत शिरून त्यांस व्यापून व चिघळवून स्वेद, क्लेद व कोथ म्हणजे सडणें यांनीं युक्त असे बारीक पण फार भयंकर कृमि उत्पन्न करितात. ते कृमि अनुक्रमें केंस, चामडी, स्नायु, शिरा व कोंवळीं हाडें यांस खाऊन टाकितात. श्वित्रांत हा प्रकार नसतो. म्हणून त्याचा कुष्ठांत समावेश न करितां तें त्याहून निराळें काढलें आहे.

कुष्ठानि सप्तधा दोषैः पृथङ्मिश्रैः समागतैः ॥ ६ ॥
सर्वेष्वपि त्रिदोषेषु व्यपदेशोऽधिकत्वतः ।

वातापासून, पित्तापासून व कफापासून तीन; दोन दोन दोषांच्या मिश्रणापासून तीन; आणि सन्निपातापासून एक, मिळून कुष्ठ सात प्रकारांनीं होतें. जरी सर्वच कुष्ठें त्रिदोषापासून होतात, तरी ज्यांत जो दोष अधिक असतो, त्यास त्या दोषावरून नांव दिलें जातें.

वातेन कुष्ठं कापालं पित्तादौदुंबरं कफात् ॥ ७ ॥
मंडलाख्यं विचर्ची च ऋक्षाख्यं वातपित्तजम् ।
चर्मैककुष्ठ किटिभसिध्मालसविपादिकाः ॥ ८ ॥
वातश्लेष्मोद्भवाः श्लेष्मपित्ताद्दद्रुशतारुषी ।
पुंडरीकं सविस्फोटं पामा चर्मदलं तथा ॥ ९ ॥
सर्वैः स्यात्काकणं पूर्वं त्रिकं दद्रु सकाकणम् ।
पुंडरीकर्क्षजिह्वे च महाकुष्ठानि सप्त तु ॥ १० ॥

वातापासून कापाल, पित्तापासून औदुम्बर, कफापासून मंडल व विचर्ची, वातपित्तापासून ऋक्षजिह्व, वातकफापासून चर्म, एककुष्ठ किटिभ, सिध्म, अलस व विपादिका; कफपित्तापासून दद्रु, शतारु,

पुंडरीक, विस्फोट, पामा व चर्मदल; आणि सन्निपातापासून काकण नांवाचें कुष्ठ होतें. त्यांपैकीं कापाल, औदुम्बर, मण्डल, दद्रु, काकण, पुंडरीक व ऋक्षजिह्व हीं सात महाकुष्ठें आहेत.

अतिश्लक्ष्णखरस्पर्शस्वेदास्वेदविवर्णताः ।
दाहः कंडूस्त्वचि स्वापस्तोदः कोठोन्नतिः श्रमः ॥ ११ ॥
व्रणानामधिकं शूलं शीघ्रोत्पत्तिश्चिरस्थितिः ।
रूढानामपि रूक्षत्वं निमित्तेऽल्पेऽपि कोपनम् ॥ १२ ॥
रोमहर्षोऽसृजः कार्ष्ण्यं कुष्ठलक्षणमग्रजम् ।

अंग अतिशय मऊ किंवा खरखरीत लागणें, घाम अतिशय येणें किंवा मुळींच न येणें, चामडीचा रंग पालटणें, दाह होणें, खाज सुटणें, चामडी बधिर होणें, टोंचल्यासारखी पीडा होणें, अंगावर गांधी उठणें, श्रमावांचून थकवा येणें, व्रण झाले असल्यास ते फार दुखणें, ते लवकर उत्पन्न होणें व फार दिवस राहणें, ते भरून आले तरी रूक्ष असणें, आणि यत्किंचित्‌ही कारण घडल्यास पुन्हा उमटणें, रोमांच उभे राहणें आणि रक्त काळें होणें, हीं लक्षणें कुष्ठ होण्यापूर्वीं होतात.

कृष्णारुणकपालाभं रूक्षं सुप्तं खरं तनु ॥ १३ ॥
विस्तृतासमपर्यंतं दूषितैर्लोमभिश्चितम् ।
तोदाढ्यमल्पकंडूकं कापालं शीघ्रसर्पि च ॥ १४ ॥

कापालकुष्ठ काळ्या किंवा तांबुस खापरासारखें, रूक्ष, बधिर, खरखरीत, पातळ, पसरलेल्या व वेड्या वांकड्या कडा असलेलें, दूषित केंसांनीं भरलेलें व लवकर पसरणारें असून त्यांत टोंचण फार असते, व खाज कमी असते.

पक्वोदुंबरताम्रत्वग्रोमगौरसिराचितम् ।
बहलं बहुलक्लेदं रक्तं दाहरुजाधिकम् ॥ १५ ॥
आशूत्थानावदरणक्रिमि विद्यादुदुंबरम् ।

ज्याच्या वरची चामडी व केंस पिकलेल्या उंबराप्रमाणें तांबुस असतात, जें पांढऱ्या शिरांनीं भरलेलें असतें, जें जाड असून ज्यांतील लस व रक्त हीं दाट असतात, ज्यांत आग व ठणका हीं फार असतात, जें लवकर उत्पन्न होऊन लवकर फुटतें व ज्यांत लवकरच क्रिमि उत्पन्न होतात, तें उदुम्बर कुष्ठ जाणावें.

स्थिरं स्त्यानं गुरु स्निग्धं श्वेतरक्तमनाशुगम् ॥ १६ ॥
अन्योन्यसक्तमुत्सन्नं बहुकंडूस्रुतिक्रिमि ।
श्लक्ष्णपीताभपर्यंतं मंडलं परिमंडलम् ॥ १७ ॥

स्थिर, दाट, जड, स्निग्ध, पांढरें किंवा तांबडें, लवकर न पसरणारें, एकमेकांस लागलेलें, वर उचललेलें व वाटोळें असून ज्याच्या कडा गुळगुळीत व पिंवळट असतात आणि ज्यांत खाज, स्राव व कृमि हे फार असतात, तें मंडलकुष्ठ जाणावें.

सकंडूपिटिका श्यावा लसीकाढ्या विचर्चिका ।

विचर्चिका कुष्ठ धूसर रंगाचें असून त्यांतून लस फार वाहते आणि खाज व पुळ्या असतात.

परुषं तनु रक्तांतमंतःश्यावं समुन्नतम् ॥ १८ ॥
सतोददाहरुक्क्लेदं कर्कशैः पिटिकैश्चितम् ।
ऋक्षजिह्वाकृति प्रोक्तमृक्षजिह्वं बहुक्रिमि ॥ १९ ॥

खरखरीत, पातळ, व मध्यभागीं काळसर असून कडांनीं लाल असलेलें, वर उचललेलें; टोंचणी, दाह व वेदना होत असलेलें, क्लेद-युक्त, खरबरीत पुळ्यांनीं भरलेलें, पुष्कळ कृमियुक्त असलेलें, आणि ऋष्य नांवाच्या ( निळ्या अंडाच्या ) हरिणाच्या जिभेसारखें ( आकारानें ) जें असतें, त्यास ऋक्षजिह्व म्हणतात.

हस्तिचर्मखरस्पर्शं चर्म

हत्तीच्या चामड्यासारखें खरखरीत असतें तें चर्मकुष्ठ होय.

एकाख्यं महाश्रयम् ।

अस्वेदं मत्स्यशकलसंनिभम्

एकाख्य कुष्ठ फार पसरलेलें असून आकारानें माशांच्या आंगावरच्या खवल्यासारखें असतें व त्या जागीं घाम येत नाहीं.

किटिभं पुनः ॥ २० ॥

रूक्षं किणखरस्पर्शं कंडूमत्परुषासितम् ।

किटिभ कुष्ठ रूक्ष, घट्ट्याप्रमाणें खरबरीत, घट्ट व काळें असून त्यास कंड सुटते.

सिध्मं रूक्षं बहिः स्निग्धमंतर्घृष्टं रजः किरेत् ॥ २१ ॥
श्लक्ष्णस्पर्शं तनु श्वेतताम्रं दौग्धिकपुष्पवत् ।
प्रायेण चोर्ध्वकाये स्यात्

सिध्म कुष्ठ ( ज्यास शिबें म्हणतात तें ) बाहेरून रूक्ष व आंतून स्निग्ध असून चोळलें असतां भूस पडतें. तें हातास गुळगुळीत लागतें, पातळ असतें आणि रंगानें दुध्या भोंपळीच्या फुलासारखें पांडुरकें-तांबुस असतें. हें बहुतकरून कंबरेच्या वरच्या भागावर होतें.

गंडैः कंडूयुतैश्चितम् ॥ २२ ॥

रक्तैरलसकम्

अलसक कुष्ठांत पुष्कळशा लाल गांठी असून त्यांस कंड सुटते.

पाणिपाददार्यो विपादिकाः ।

तीव्रार्त्यो मंदकंड्वश्च सरागपिटिकाचिताः ॥ २३ ॥

विपादिका कुष्ठांत हातापायावर चिरा पडतात, तीव्र पीडा होते, थोडी कंड सुटते आणि पुष्कळशा लाल पुळ्या उठतात.

दीर्घप्रताना दूर्वावदतसीकुसुमच्छविः ।
उत्सन्नमंडला दद्रूः कंडूमत्यनुषंगिणी ॥ २४ ॥

ज्याचे ताणे दूर्वेसारखे लांब पसरलेले असतात, ज्याचा रंग अळशीच्या फुलासारखा निळा असतो, ज्याचीं मंडलें वर उभारलेलीं व एकमेकांस लागून पसरलेलीं असून ज्यास कंड सुटते त्यास दद्रुकुष्ठ म्हणतात.

स्थूलमूलं सदाहार्ति रक्तश्यावं बहुव्रणम् ।
शतारुः क्लेदजंत्वाढ्यं प्रायशः पर्वजन्म च ॥ २५ ॥

ज्याचीं मुळें मोठीं असतात, ज्यांत दाह व वेदना होतात, जें तांबुस व काळसर असतें, ज्यांत पुष्कळ व्रण असतात, ज्यांत लस व कृमि फार असतात, आणि जें बहुतकरून हाडांच्या सांध्यांवर होतें तें शतारु ( खरूज ) कुष्ठ होय.

रक्तांतमंतरापांडु कंडूदाहरुजान्वितम् ।
सोत्सेधमाचितं रक्तैः पद्मपत्रमिवांशुभिः ॥ २६ ॥
घनभूरिलसीकासृक्प्रायमाशु विभेदि च ।
पुंडरीकम्

ज्याच्या कडा लाल असून मध्यभाग पांडुर असतो, ज्यांत कंड, दाह व ठणका होतो, जें उभारलेलें असतें, ज्यावर कमळाच्या

पानाप्रमाणें पुष्कळशा लाल शिरा असतात, ज्यांतून दाट व पुष्कळ अशी लस व रक्त वाहतें आणि जें लवकर फुटतें, तें पुंडरीक कुष्ठ जाणावें.

तनुत्वग्भिश्चितं स्फोटैः सितारुणैः ॥ २७ ॥
विस्फोटम्

पातळ त्वचेचे व पांढुरक्या तांबुस रंगाचे फोड ज्यांत पुष्कळसे असतात, तें विस्फोट कुष्ठ जाणावें.

पिटिकाः पामा कंडूक्लेदरुजाधिकाः ।
सूक्ष्माः श्यावारुणा बह्व्यः प्रायः स्फिक्पाणिकूर्परे ॥२८॥

बारीक व धूसर-पिंगट रंगाच्या अशा पुळया बहुतकरून कुले, हात व कोंपरें यांवर पुष्कळशा होतात, त्यांस पामा म्हणतात. यांत खाज, लस व ठणका हीं फार असतात.

सस्फोटमस्पर्शसहं कंडूषातोददाहवत् ।
रक्तं दलच्चर्मदलम्

चर्मदल कुष्ठांत फोड असतात, त्यास हात लाववत नाहीं, खाज सुटते, चुरचूर, टोंचण व दाह हीं होतात, तें लाल असतें व फुटतें.

काकणं तीव्रदाहरुक् ॥ २९ ॥
पूर्वं रक्तं च कृष्णं च काकणंतीफलोपमम् ।
कुष्ठलिंगैर्युतं सर्वैर्नैकवर्णं ततो भवेत् ॥ ३० ॥

काकण कुष्ठ प्रथम गुंजेप्रमाणें तांबडें व काळें असून त्यांत कुष्ठाचीं सर्व लक्षणें उत्पन्न झालीं म्हणजे मग अनेक प्रकारचे रंग उत्पन्न होतात. यांत दाह व वेदना हीं फार तीव्र असतात.

दोषभेदीयविहितैरादिशेल्लिंगकर्मभिः ।
कुष्ठेषु दोषोल्बणताम्

कुष्ठांत कोणता दोष अधिक आहे, हें दोषभेदीय अध्यायांत दोषांचीं लक्षणें व कर्में सांगितलीं आहेत त्यांवरून ठरवावें.

सर्वदोषोल्बणं त्यजेत् ॥ ३१ ॥
रिष्टोक्तं यच्च यच्चाऽस्थिमज्जशुक्रसमाश्रयम् ।

सान्निपातिक, विकृतिविज्ञानीय अध्यायांत सांगितलेलें, आणि हाडें, मज्जा व वीर्य यांच्या आश्रयानें राहिलेलें कुष्ठ असाध्य समजून सोडून द्यावें.

याप्यं मेदोगतम्

मेदोगत कुष्ठ याप्य असतें.

कृच्छ्रं पित्तद्वंद्वास्रमांसगम् ॥ ३२ ॥

वातपित्तज, कफपित्तज, रक्ताश्रित व मांसाश्रित हीं कुष्ठें कृच्छ्रसाध्य असतात.

अकृच्छ्रं कफवाताढ्यं त्वक्स्थमेकमलं च यत् ।

कफवातजन्य, त्वचेंत असलेलें व एकदोषात्मक कुष्ठ सुखसाध्य असतें.

तत्र त्वचि स्थिते कुष्ठे तोदवैवर्ण्यरूक्षताः ॥ ३३ ॥
स्वेदस्वापश्वयथवः शोणिते पिशिते पुनः ।
पाणिपादाश्रिताः स्फोटाः क्लेदः संधिषु चाधिकम् ३४
कौण्यं गतिक्षयोऽगानां दलनं स्याच्च मेदसि ।
नासाभंगोऽस्थिमज्जस्थे नेत्ररागः स्वरक्षयः ॥ ३५ ॥
क्षते च कृमयः शुक्रे स्वदारापत्यबाधनम् ।

कुष्ठ त्वचेंत असतां टोंचण, विवर्णता व रूक्षता उत्पन्न होते; रक्तांत गेलें असतां घाम, बधिरता व सूज उत्पन्न होते; मांसांत असतां हातापायांवर फोड येतात; सांध्यावर असतां त्यांतून लस फार वाहते; मेदांत गेलें असतां हाताचीं बोटें सडतात, त्या त्या अवयवांची गति बंद होते व ते फाटतात; हाडांत व मज्जेंत गेलें असतां नाक सडतें, डोळे लाल होतात, स्वर क्षीण होतो व क्षतांत किडे पडतात; आणि वीर्यांत गेलें असतां (संभोगानें) स्त्रीस व नंतर होणाऱ्या अपत्यास कुष्ठ होतें.

यथापूर्वं च सर्वाणि स्युर्लिंगान्यस्रगादिषु ॥ ३६ ॥

रक्तादिकांत कुष्ठ गेलें असतां त्याच्या पूर्वींच्या कुष्ठांचींही लक्षणें होतात.

कुष्ठैकसंभवं श्वित्रं किलासं दारुणं च तत् ।
निर्दिष्टमपरिस्रावि त्रिधातूद्भवसंश्रयम् ॥ ३७ ॥

श्वित्र ह्मणजे कोड हें कुष्ठाच्याच कारणांनीं उत्पन्न होतें. श्वित्रासच किलास व दारुण अशीं नांवें आहेत. यांत स्राव नसतो. हें वातादि तीन दोषांपासून उत्पन्न होतें आणि अनुक्रमें रक्त, मांस व मेद यांचा आश्रय करून राहतें.

वाताद्रूक्षारुणं पित्तात्ताम्रं कमलपत्रवत् ।
सदाहं रोमविध्वंसि कफाच्छ्वेतं घनं गुरु ॥ ३८ ॥
सकंडु च क्रमाद्रक्तमांसमेदःसु चादिशेत् ।
वर्णैनैवेद्दगुभयं कृच्छ्रं तच्चोत्तरोत्तरम् ॥ ३९ ॥

वातिक श्वित्र रूक्ष व पिंगट रंगाचें असतें. पित्तज श्वित्र तांबुस व कमळाच्या पानासारखें असून त्यांत दाह होतो व त्यावरचे केंस गळून पडतात. कफजन्य श्वित्र पांढरें, दाट, जड व खाजणारें असतें. हीं श्वित्रें क्रमशः रक्त, मांस व मेद यांत राहतात; दोष व धातु या दोहोंच्या योगानेंच यांचे असे रंग होतात. ( ह्मणजे वातामुळें निराळा रंग आणि रक्तामुळें निराळा रंग, असें नव्हे; तर वात व रक्त या दोहोंच्या योगानें एक पिंगट रंग होतो. ) हीं श्वित्रें उत्तरोत्तर कष्टसाध्य आहेत.

अशुक्लरोमाऽबहलमसंसृष्टं मिथो नवम् ।
अनग्निदग्धजं साध्यं श्वित्रं वर्ज्यमतोऽन्यथा ॥ ४० ॥
गुह्यपाणितलोष्ठेषु जातमप्यचिरंतनम् ।

ज्याच्यावरचे केंस पांढरे झाले नाहींत, जें फार जाड नाहीं, जें एकमेकांत मिळालेलें नाहीं, जें नवें ह्मणजे एक वर्षाच्या आंतलें आहे व जें विस्तवानें भाजल्यापासून झालेलें नाहीं, असें श्वित्र साध्य असतें. याहून निराळ्या प्रकारचें तें असाध्य समजावें. गुह्येन्द्रिय, तळहात व ओंठ यांवर झालेलें नवें असलें तरी तें असाध्यच असतें.

स्पर्शैकाहारशय्यादिसेवनात्प्रायशो गदाः ॥ ४१ ॥
सर्वे संचारिणो नेत्रत्वग्विकारा विशेषतः ।

स्पर्श, एका ताटांत जेवणें, एका बिछान्यावर निजणें, एका आसनावर बसणें इत्यादि प्रकारच्या संसर्गापासून बहुतेक सर्वच रोग एकापासून दुसऱ्यास होतात. तरी पण त्यांतल्या त्यांत डोळ्याचे व चामडीचे रोग हे विशेषतः स्पर्शजन्य आहेत.

क्रमयस्तु द्विधा प्रोक्ता बाह्याभ्यंतरभेदतः ॥ ४२ ॥

कृमि बाह्य व अभ्यंतर असे दोन प्रकारचे आहेत.

वहिर्मलकफासृग्विड्जन्मभेदाच्चतुर्विधाः ।

उत्पत्तिभेदानें ते चार प्रकारचे आहेत. बाहेरच्या मळापासून ह्मणजे वस्त्रें व केंस यांतील मळापासून होणारे, कफापासून होणारे, रक्तापासून होणारे आणि विष्ठेपासून होणारे.

नामतो विंशतिविधाः

नांवावरून ते वीस प्रकारचे आहेत.

बाह्यास्तत्राऽसृगुद्भवाः ॥ ४३ ॥
तिलप्रमाणसंस्थानवर्णाः केशांबराश्रयाः ।
बहुपादाश्च सूक्ष्माश्च यूका लिक्षाश्च नामतः ॥ ४४ ॥
द्विधा ते कोठपिटिकाकंडूगंडान् प्रकुर्वते ।

त्यांपैकीं बाह्य कृमि रक्तजन्य असतात. त्यांचें प्रमाण, आकार व रंग तिळासारखे असून ते केंस व वस्त्र यांत असतात. ते बारीक असून त्यांस पुष्कळ पाय असतात. त्यांचीं उवा व लिखा अशीं दोन नांवें आहेत. त्यांपासून गांधी, पुळ्या, कंड व लहान लहान गांठी उत्पन्न होतात.

कुष्ठैकहेतवोऽतर्जाः श्लेष्मजास्तेषु चाधिकम् ॥ ४५ ॥
मधुरान्नगुडक्षीरदधिसक्तुनवोदनैः ।

अभ्यन्तर कृमि कुष्ठाच्याच कारणांनीं होतात. त्यांत कफजन्य कृमि विशेषकरून मधुर अन्न, गूळ, दूध, दहीं, सातूचें पीठ व नवे तांदूळ खाल्ल्यानें होतात.

शकृज्जा बहुविड्धान्यपर्णशाकोलुकादिभिः ॥ ४६ ॥

विष्ठेपासून होणारे कृमि हे पुष्कळ मळ उत्पन्न करणारीं जव, उडीद, चवळया वगैरे धान्यें; पालक, तांदुळजा वगैरे पालेभाज्या आणि ओले हरभरे, वाल, वाटाणे वगैरे खाल्ल्यानें होतात.

कफादामाशये जाता वृद्धाः सर्पंति सर्वतः ।
पृथुवध्रनिभाः केचित् केचिद्गंडूपदोपमाः ॥ ४७ ॥
रूढधान्यांकुराकारास्तनुदीर्घास्तथाऽणवः ।
श्वेतास्ताम्रावभासाश्च नामतः सप्तधा तु ते ॥ ४८ ॥
अंत्रादा उदरावेष्टा हृदयादा महागुहाः ।
कुरवो दर्भकुसुमाः सुगंधास्ते च कुर्वते ॥ ४९ ॥
हृल्लासमास्यस्रवणमविपाकमरोचकम् ।
मूर्छाच्छर्दिज्वरानाहकार्श्यक्षवथुपीनसान् ॥ ५० ॥

कफजन्य कृमि आमाशयांत होतात. आणि ते वाढले ह्मणजे सर्व शरीरभर पसरतात. त्यांत कांहीं चामड्याच्या वादीसारखे चपटे, कांहीं गांडुळासारखे, कांहीं कोंब आलेल्या धान्याच्या मोडासारखे बारीक, लांब किंवा आंखूड असतात. ते रंगानें पांढरे किंवा तांबुस असतात. नांवानें ते सात प्रकारचे आहेत. अंत्राद, उदराविष्ट, हृदयाद, महागुह, कुरु, दर्भकुसुम व सुगंध. त्यांपासून मळमळ, लाळ सुटणें, अपचन, अरुचि, मूर्च्छा, उलटी, ताप, पोटफुगी, कृशता किंवा शिंका व पडसें हे विकार होतात.

रक्तवाहिशिरोत्थाना रक्तजा जंतवोऽणवः ।
अपादा वृत्तताम्राश्च सौक्ष्म्यात्केचिददर्शनाः ॥ ५१ ॥
केशादा लोमविध्वंसा लोमद्वीपा उदुंबराः ।
षट् ते कुष्ठैककर्माणः सहसौरसमातरः ॥ ५२ ॥

रक्तजन्य कृमि रक्तवाहक शिरांत होतात. ते बारीक, बिनपायाचे, वाटोळे व तांबुस असतात. कित्येक इतके बारीक असतात कीं दिसत सुद्धां नाहींत. ते केशाद, लोमविध्वंस, लोमद्वीप, उदुम्बर, सौरस व मातृक या नामभेदानें सहा प्रकारचे आहेत. त्यांचे योगानें कुष्ठ होतें.

पक्वाशये पुरीषोत्था जायंतेऽधोविसर्पिणः ।
वृद्धास्ते स्युर्भवेयुश्च ते यदाऽमाशयोन्मुखाः ॥ ५३ ॥
तदास्योद्गारनिःश्वासविड्गंधानुविधायिनः ।
पृथुवृत्ततनुस्थूलाः श्यावपीतसितासिताः ॥ ५४ ॥
ते पंच नाम्ना कृमयः ककेरुकमकेरुकाः ।
सौसुरादाः सलूनाख्या लेलिहा जनयंति च ॥ ५५ ॥
विड्भेदशूलविष्टंभकार्श्यपारुष्यपांडुताः ।
रोमहर्षाग्निसदनगुदकंड्वर्विनिर्गमात् ॥ ५६ ॥

विष्ठेपासून होणारे कृमि पक्वाशयांत होतात. ते वाढले ह्मणजे खालीं गुदाकडे जातात. आणि जेव्हां आमाशयाकडे जाऊं लागतात, तेव्हां ढेंकर व श्वास यांस विष्ठेसारखी घाण येऊं लागते. ते चपटे, वाटोळे, बारीक, मोठे, धूसर रंगाचे, पिंवळे, पांढरे किंवा

काळे असतात. ते ककेरुक, मकेरुक, सौसुराद, सलून व लेलिह या नामभेदानें पांच प्रकारचे आहेत. त्यांपासून जुलाब, पोटशूळ, पोटफुगी, कृशता, अंग खरखरीत व फिक्कट होणें, रोमांच उभे राहणें व अग्निमान्द्य हे विकार होतात; आणि ते बाहेर येऊं लागले ह्मणजे गुदास कंड सुटते.

---

## अध्याय १५ वा.

**अथाऽतो वातव्याधिनिदानं व्याख्यास्यामः ।**

आतां वातव्याधीचें निदान सांगतों.

**सर्वार्थानर्थकरणे विश्वस्यास्यैककारणम् ।**
**अदुष्टदुष्टः पवनः शरीरस्य विशेषतः ॥ १ ॥**

या संपूर्ण जगाच्या व विशेषेंकरून शरीराच्या एकंदर शुभ गोष्टींचें मुख्य कारण दूषित न झालेला वायु, आणि सर्व अशुभ गोष्टींचें मुख्य कारण दुष्ट वायु हें आहे.

**स विश्वकर्मा विश्वात्मा विश्वरूपः प्रजापतिः ।**
**स्रष्टा धाता विभुर्विष्णुः संहर्ता मृत्युरंतकः ॥ २ ॥**
**तददुष्टौ प्रयत्नेन यतितव्यमतः सदा ।**

तो वायु विश्वकर्मा[1] (शरीराचें जनन, वर्धन, पोषण, मारण वगैरे कर्मै करणारा), विश्वात्मा (सर्व शुभाशुभ गोष्टींचें कारण), विश्वरूप (विविध रूपें धारण करणारा), प्रजापति (प्रजापालक), स्रष्टा (सृष्टि उत्पन्न करणारा), धाता (जगास धारण करणारा), विभु, विष्णु (व्यापक), संहर्ता (संहार करणारा) मृत्यु (यमरूप), अंतक (मारणारा साक्षात् यमच) असा आहे. म्हणून तो दूषित न होऊं देण्याविषयीं सदोदित प्रयत्न करावा.

**तस्योक्तं दोषविज्ञाने कर्म प्राकृतवैकृतम् ॥ ३ ॥**
**समासाद्व्यासतो दोषभेदीये नाम धाम च ।**
**प्रत्येकं पंचधा चारो व्यापारश्च**

---

१. विश्व शब्दाचा अर्थ अनेक, पुष्कळ, असा आहे. विश्वकर्मा म्हणजे पुष्कळ कर्मै करणारा, विश्वात्मा म्हणजे सर्वांचें कारण, इत्यादि.

त्याचीं स्वाभाविक व विकृत दशेंतील कर्मे मागें दोषविज्ञानीय अध्यायांत संक्षेपानें व दोषभेदीयांत विस्तारानें सांगितलीं आहेत. त्याचप्रमाणें त्याचीं पांच प्रकारचीं नांवें, पांच स्थानें, पांच प्रकारची गति व पांच प्रकारच्या क्रियाही दोषभेदीयांत सांगितल्या आहेत.

इह वैकृतम् ॥ ४ ॥

तस्योच्यते विभागेन सनिदानं सलक्षणम् ।

या अध्यायांत त्याच्या विकृतावस्थेंतील क्रियेचे निदान-लक्षणपूर्वक विभाग आम्ही सांगणार आहों.

धातुक्षयकरैर्वायुः कुप्यत्यातिनिषेवितैः ॥ ५ ॥
चरन् स्रोतःसु रिक्तेषु भृशं तान्येव पूरयन् ।
तेभ्योऽन्यदोषपूर्णेभ्यः प्राप्य वाऽऽवरणं बली ॥ ६ ॥

धातुक्षय करणाऱ्या आहारविहारांचें अतिसेवन केल्यानें रिकाम्या झालेल्या स्रोतांत फिरून, त्यांस भरून टाकून, किंवा दुसऱ्या दोषांनीं स्रोतें भरलीं असतां त्यांच्या आच्छादनानें बळावून वायु कुपित होतो.

तत्र पक्वाशये क्रुद्धः शूलानाहांत्रकूजनम् ।
मलरोधाश्मवर्ध्मार्शस्त्रिकपृष्ठकटीग्रहम् ॥ ७ ॥
करोत्यधरकाये च तांस्तान्कृच्छ्रानुपद्रवान् ।

पक्वाशयांत कुपित झालेला वायु पोटशूळ, पोटफुगी, आंतड्यांत कुजबुजणें, मलावरोध, मुतखडा, अन्तर्गळ, मूळव्याध, माकडहाड, पाठ व कंबर हीं धरणें हे विकार, आणि कंबरेच्या खालच्या भागीं नाना प्रकारचे कष्टसाध्य उपद्रव करितो.

आमाशये तृड्वमथुश्वासकासविसूचिकाः ॥ ८ ॥
कंठोपरोधमुद्गारान् व्याधीनूर्ध्वं च नाभितः ।

आमाशयांत कुपित झालेला वायु तहान, वांति, दमा, खोकला, विषूचिका, घसा दाटणें व ढेंकर हे आणि तसेच बेंबीच्या वरच्या भागीं इतरही अनेक प्रकारचे विकार उत्पन्न करितो.

श्रोत्रादिष्विंद्रियवधम्

कान वगैरे इन्द्रियांत वायु कोपला असतां तो त्या त्या इन्द्रियांची शक्ति नष्ट करितो.

त्वचि स्फुटनरूक्षणे ॥ ९ ॥

त्वचेंत तो कोपला असतां त्वचेवर भेगा पडतात व ती रूक्ष होते.

रक्ते तीव्रा रुजः स्वापं तापं रागं विवर्णताम् ।
अरूंष्यन्नस्य विष्टंभमरुचिं कृशतां भ्रमम् ॥ १० ॥

रक्तांत वायु कोपला असतां तीव्र वेदना, त्वचा बधिर होणें, तापणें, लाल होणें, रंग पालटणें, फोड, अन्नाचें अपचन होऊन पोट फुगणें, अरुचि, कृशता व श्रम हे विकार होतात.

मांसमेदोगतो ग्रंथींस्तोदाढ्यान् कर्कशान् श्रमम् ।
गुर्वंगं चातिरुक्स्तब्धमुष्टिदंडहतोपमम् ॥ ११ ॥

मांस व मेद यांत वायु कुपित झाला असतां तो फार कठिण व फार ठणकणाऱ्या अशा गांठी, श्रम, अंग जड होणें, अतिशय ठणकणें, जखडणें आणि बुक्क्या व दांडकें यांनीं ठेंचल्याप्रमाणें होणें, हे विकार उत्पन्न करितो.

अस्थिस्थः सक्थिसंध्यास्थिशूलं तीव्रं बलक्षयम् ।

अस्थिगत वायु कुपित झाला असतां मांड्या, सांधे व हाडें यांत शूळ होतो आणि शक्ति फारच क्षीण होते.

मज्जस्थोऽस्थिषु सौषिर्यमस्वप्नं स्तब्धतां रुजम् ॥ १२ ॥

मज्जेंतील वायु कोपला असतां हाडें पोकळ होतात, झोंप येत नाहीं, अंग ताठतें व ठणकतें.

शुक्रस्य शीघ्रमुत्सर्गं संगं विकृतिमेव च ।
तद्वद्गर्भस्य शुक्रस्थः

वीर्यस्थ वायु कोपला असतां वीर्यपात लवकर होतो, त्याचा अवरोध होतो किंवा त्यास विकार होतो. आणि अशा वीर्यापासून उत्पन्न झालेल्या गर्भाचीही हीच स्थिति होते.

सिरास्वाध्मानरिक्तते ॥ १३ ॥
तत्स्थः

शिरांतील वायु कुपित झाला असतां (अनियमितपणें) शिरा फुगतात व रिकाम्या होतात.

स्नावास्थितः कुर्याद् गृध्रस्यायामकुब्जताः ।

स्नायूंतील कुपित झालेला वायु गृध्रसी, अंतरायाम, बहिरायाम व कुबडेपणा हे रोग उत्पन्न करितो.

वातपूर्णदृतिस्पर्शं शोफं संधिगतोऽनिलः ॥ १४ ॥
प्रसारणाऽकुंचनयोः प्रवृत्तिं च सवेदनाम् ।

सांध्यांतील वायु कोपला असतां त्या ठिकाणीं वाऱ्यानें भरलेल्या पखालीप्रमाणें किंवा भात्याप्रमाणें हातास लागणारी सूज येते आणि तो भाग पसरतांना व आंखडतांना दुखतो.

सर्वांगसंश्रयस्तोदभेदस्फुरणभंजनम् ॥ १५ ॥
स्तंभमाक्षेपणं स्वापं संध्याकुंचनकंपनम् ।

सर्वांगांतील वायु कोपला असतां अंगांत टोंचण, फूट, मोडल्यासारखी वेदना, अंग ताठणें, आंचके येणें, मेहरी, सांधे आंखडणें आणि कांपरें हे विकार होतात.

यदा तु धमनीः सर्वाः कुद्धोऽभ्येति मुहुर्मुहुः ॥ १६ ॥
तदांगमाक्षिपत्येष व्याधिराक्षेपकः स्मृतः ।

जेव्हां वायु कुपित होऊन शरीरांतील सर्व शिरांतून खेळूं लागतो, तेव्हां त्या मनुष्यास वरचेवर झटके येतात. या रोगास आक्षेपक म्हणतात.

अधः प्रतिहतो वायुर्व्रजत्यूर्ध्वं हृदाश्रिताः ॥ १७ ॥
नाडीः प्रविश्य हृदयं शिरः शंखौ च पीडयन् ।
आक्षिपेत्परितो गात्रं धनुर्वच्चास्य नामयेत् ॥ १८ ॥
कृच्छ्रादुच्छ्वसिति स्तब्धस्रस्तमीलितदृक्ततः ।
कपोत इव कूजेत्स निःसंज्ञः सोऽपतंत्रकः ॥ १९ ॥
स एव चापतानाख्यो मुक्ते तु मरुता हृदि ।
अश्नुवीत क्षणं स्वास्थ्यं मुहुरस्वास्थ्यमावृते ॥ २० ॥

वायूची गति खालून बंद झाली म्हणजे तो वर चढून हृदयाश्रित नाड्यांत शिरून हृदय, डोकें व आंख यांस पीडा करीत करीत शरीरास चहूंकडून आंचके देतो व धनुष्याप्रमाणें वांकवितो, रोग्यास श्वासोच्छ्वास करतांना कष्ट होतात, डोळे ताठ गळल्यासारखे होतात व मिटतात. मग तो कबुतराप्रमाणें घुमतो, आणि बेशुद्ध होऊन पडतो. या रोगास अपतंत्रक व अपतानक अशीं दोन नांवें आहेत. यांत हृदयांत दाटलेला वायु तेथून सरला म्हणजे बरें

वाटतें आणि पुन्हा तो परत हृदयांत आला म्हणजे चैन पडेनासें होतें. याप्रमाणें वरचेवर होत असतें.

गर्भपातसमुत्पन्नः शोणितातिस्रवोत्थितः।
अभिघातसमुत्थश्च दुश्चिकित्स्यतमो हि सः ॥ २१ ॥

गर्भपातानें, अतिशय रक्तस्राव झाल्यामुळें व अभिघातानें झालेला अपतंत्रक तर अत्यंत कष्टसाध्य आहे.

मन्ये संस्तभ्य वातोऽतरायच्छन् धमनीर्यदा।
व्याप्नोति सकलं देहं जत्रुरायम्यते तदा ॥ २२ ॥
अंतर्धनुरिवांगं च वेगैः स्तंभं च नेत्रयोः।
करोति जृंभां दशनं दशनानां कफोद्गमम् ॥ २३ ॥
पार्श्वयोर्वेदनां वाक्यहनुपृष्ठशिरोग्रहम्।
अंतरायाम इत्येषः

वायु मानेच्या बाजूंच्या मन्या नांवाच्या दोन शिरांस जखडून धमन्यांत शिरून ज्या वेळीं सर्व शरीरभर पसरतो, त्या वेळीं सरी ( खांदा व कांख यांस जोडणारा गळ्याखालचा भाग ) ताणते, आणि वरचेवर झटके येऊन शरीर धनुष्याप्रमाणें पाठीकडून आंतल्या बाजूस वांकतें, म्हणजे डोकें व पाय वर येतात आणि पोट आंत जातें; डोळे ताठतात; जांभया येतात; दांतखिळी बसते; कफाची उलटी होते; बरगड्यांत वेदना होतात; वाचा बसते; आणि जबडा, पाठ व डोकें हीं जखडतात. यास अंतरायाम म्हणतात.

बाह्यायामश्च तद्विधः ॥ २४ ॥
देहस्य बहिरायामात्पृष्ठतो नीयते शिरः।
उरश्चोत्क्षिप्यते तत्र कंधरा चावमृद्यते ॥ २५ ॥
दंतेष्वास्ये च वैवर्ण्यं प्रस्वेदः स्रस्तगात्रता।
बाह्यायामं धनुष्कंभं ब्रुवते वेगिनं च तम् ॥ २६ ॥

याचप्रमाणें शरीर पाठीकडे वांकून डोकें पाठीकडे जातें, छाती वर येते आणि मान चुरते, त्या रोगास बाह्यायाम म्हणतात. यांत दांत व तोंड यांचा वर्ण बदलतो, फार घाम येतो व गात्रें गळल्या-

सारखीं होतात. यास बाह्यायाम, धनुष्कुम्भ, व वेगी ( प्राकृतांत धनुर्वात ) असें म्हणतात.

व्रणं मर्माश्रितं प्राप्य समीरणसमीरणात् ।
व्यायच्छंति तनुं दोषाः सर्वामापादमस्तकम् ॥ २७ ॥
तृष्यतः पांडुगात्रस्य व्रणायामः स वर्जितः ।

मर्मावर व्रण झाला असतां त्यांत वायूनें प्रेरित झालेले दोष शिरून पायांपासून डोक्यापर्यंत सर्वांग व्यापून शरीर ताठवितात. हा व्रणायाम झाला असतां रोग्यास जर तहान लागत असेल किंवा त्याचें शरीर पांढुरकें झालें असेल, तर तो असाध्य समजून सोडून द्यावा.

गते वेगे भवेत्स्वास्थ्यं सर्वेष्वाक्षेपकेषु च ॥ २८ ॥

सर्व प्रकारच्या आक्षेपकांत वेग म्हणजे झटके येऊन गेले म्हणजे रोग्यास बरें वाटतें.

जिह्वातिलेखनात् शुष्कभक्षणादभिघाततः ।
कुपितो हनुमूलस्थः स्रंसयित्वाऽनिलो हनू ॥ २९ ॥
करोति विवृतास्यत्वमथवा संवृतास्यताम् ।
हनुस्रंसः स तेन स्यात्कृच्छ्राच्चर्वणभाषणम् ॥ ३० ॥

जीभ फार खरवडल्यानें, कोरडे पदार्थ खाल्यानें किंवा जिभेवर आघात झाल्यानें, दोन्ही जबड्यांच्या मुळांतील वायु कुपित होऊन जबड्यांचा सांधा निखळवितो. त्या योगानें तोंड एकसारखें उघडें किंवा मिटलेलेंच राहतें. या रोगास हनुस्तम्भ ( दांतखिळी ) बसणें ) म्हणतात. यापासून चावण्यास व बोलण्यास कष्ट पडतात.

वाग्वाहिनीशिरासंस्थो जिह्वां स्तंभयतेऽनिलः ।
जिह्वास्तंभः स तेनान्नपानवाक्येष्वनीशता ॥ ३१ ॥

वाक्शक्तिवाहक शिरांतील वायु कुपित झाला असतां तो जिभेस स्तब्ध करितो. त्यायोगानें खाणें, पिणें, बोलणें या क्रिया करतां येत नाहींत. या रोगास जिह्वास्तम्भ म्हणतात.

शिरसा भारहरणादतिहास्यप्रभाषणात् ।
उत्रासवक्रक्षवथुखरकार्मुककर्षणात् ॥ ३२ ॥
विषमादुपधानाच्च कठिनानां च चर्वणात् ।

वायुर्विवृद्धस्तैस्तैश्च वातलैरूर्ध्वमास्थितः ॥ ३३ ॥
वक्रीकरोति वक्त्रार्धमुक्तं हसितमीक्षितम् ।
ततोऽस्य कंपते मूर्धा वाक्संगः स्तब्धनेत्रता ॥ ३४ ॥
दंतचालः स्वरभ्रंशः श्रुतिहानिः क्षवग्रहः ।
गंधाज्ञानं स्मृतेर्मोहस्त्रासः सुप्तस्य जायते ॥ ३५ ॥
निष्ठीवः पार्श्वतो यायादेकस्याक्ष्णो निमीलनम् ।
जत्रोरूर्ध्वं रुजा तीव्रा शरीरार्धेऽधरेऽपि वा ॥ ३६ ॥
तमाहुरर्दितं केचिदेकायाममथापरे ।

डोक्यावर ओझें वाहिल्यानें, फार हंसल्यानें, फार बोलल्यानें, भयानें, तोंडांतून शिंक आल्यानें, कठिण धनुष्य वांकविल्यानें, डोक्या-खालीं उंचसखल उशी घेतल्यानें, कठिण पदार्थ चावल्यानें व इतर वात वाढविणाऱ्या आहारविहारांनीं वायु वृद्धिंगत होऊन शरीराच्या ऊर्ध्व भागीं राहून अर्धें तोंड वांकडें करितो. त्या योगानें मनु-ष्याचें बोलणें, हंसणें, पाहणें या क्रियाही वांकडया होतात. पुढें त्याचें डोकें कांपतें, तो बोलतांना अडखळतो, त्याचे डोळे ताठ-तात, दांत हालतात, स्वर क्षीण होतो, ऐकूं कमी येतें, शिंका येईनाशा होतात, वास कळेनासा होतो, आठवण कमी होते, भीति वाटते, निजला असतां तोंडांतून एका बाजूनें लाळ गळते व एकच डोळा मिटतो, आणि गळ्याच्या वर अर्ध्या भागांत किंवा कंबरेच्या खालीं अर्ध्या भागांत तीव्र वेदना होतात. या रोगास अर्दित व कित्येक ग्रंथकार एकायाम असें म्हणतात.

रक्तमाश्रित्य पवनः कुर्यान्मूर्धधराः सिराः ॥ ३७ ॥
रूक्षाः सवेदनाः कृष्णाः सोऽसाध्यः स्यात्सिराग्रहः ।

कुपित वायु रक्ताच्या आश्रयानें मस्तकास धारण करणाऱ्या शिरा रूक्ष, वेदनायुक्त व काळ्या करितो. या विकारास सिराग्रह म्हणतात. हा असाध्य आहे.

गृहीत्वार्धं तनोर्वायुः सिराः स्नायुर्विशोष्य च ॥ ३८ ॥
पक्षमन्यतरं हंति संधिबंधान् विमोक्षयन् ।
कृत्स्नोऽर्धकायस्तस्य स्यादकर्मण्यो विचेतनः ॥ ३९ ॥
एकांगरोगं तं केचिदन्ये पक्षवधं विदुः ।

कुपित वायु शरीराचा अर्धा भाग जखडून त्यांतील शिरा व स्नायु यांस शुष्क करून सांध्यांचे जोड निखळवून शरीराच्या उजव्या किंवा डाव्या कोणत्या तरी एका बाजूचा नाश करितो. त्यामुळें तो अर्धा भाग लुला व बधिर होतो. यास कोणी एकांगरोग व कोणी पक्षवध (आणि प्राकृतांत अर्धांगवायु) असें म्हणतात.

सर्वांगरोगं तद्वच्च सर्वकायाश्रितेऽनिले ॥ ४० ॥

सर्वांगांतील वायु दुष्ट होऊन वरच्याप्रमाणेंच सर्व शरीरांत विकार उत्पन्न करितो, त्यास सर्वांगरोग असें म्हणतात.

शुद्धवातहतः पक्षः कृच्छ्रसाध्यतमो मतः ।
कृच्छ्रस्त्वन्येन संसृष्टो विवर्ज्यः क्षयहेतुकः ॥ ४१ ॥

निव्वळ वायूपासून झालेला पक्षवध अतिशयच कष्टसाध्य असतो; इतर दोषांच्या मिश्रणानें झाला असल्यास कष्टसाध्य असतो, आणि क्षयापासून झाला असल्यास असाध्य समजून सोडून द्यावा.

आमबद्धायनः कुर्यात्संस्तभ्यांगं कफान्वितः ।
असाध्यं हतसर्वेहं दंडवद्दंडकं मरुत् ॥ ४२ ॥

आमानें मार्ग बंद झाला असतां वायु कफाशीं मिळून सर्वांग दांडक्याप्रमाणें लाठ व निश्चेष्ट करितो. यास दंडक म्हणतात व हा असाध्य आहे.

अंसमूलस्थितो वायुः सिराः संकोच्य तत्रगाः ।
बाहुप्रस्पंदितहरं जनयत्यवबाहुकम् ॥ ४३ ॥

खांद्याच्या मुळांत राहणारा वायु कुपित झाला असतां तिथल्याच शिरांस आखडून बाहूंची हालचाल बंद करितो. यास अवबाहुक म्हणतात.

तलं प्रत्यंगुलीनां या कंडरा बाहुपृष्ठतः ।
बाहुचेष्टापहरणी विश्वाची नाम सा स्मृता ॥ ४४ ॥

तोच कुपित वायु बाहूंच्या मागल्या बाजूपासून तळहातापर्यंत बोटांचा जो स्नायुसमुदाय जातो, त्यास आंखडून हाताची हालचाल बंद करितो. या रोगास विश्वाची म्हणतात.

वायुः कट्यां स्थितः सक्थ्नः कंडरामाक्षिपेद्यदा ।
तदा खंजो भवेज्जंतुः पंगुः सक्थ्नोर्द्वयोरपि ॥ ४५ ॥

कंबरेंतील कुपित वायूनें एका मांडींतील कंडरा आखडून धरली असतां मनुष्य लंगडा होतो आणि दोन्ही मांड्यांतील कंडरा आंखडल्या असतां तो पांगळा होतो.

कंपते गमनारंभे खंजन्निव च याति यः ।
कलायखंजं तं विद्यान्मुक्तसंधिप्रबंधनम् ॥ ४६ ॥

ज्या रोगांत मनुष्य चालूं लागतांना कापतो व लंगडल्यासारखा चालतो, त्यास कलायखंज असें म्हणतात. यांत संधिबंधनें निखळलेलीं असतात.

शीतोष्णद्रवसंशुष्कगुरुस्निग्धैर्निषेवितैः ।
जीर्णाजीर्णे तथाऽयाससंक्षोभस्वप्नजागरैः ॥ ४७ ॥
सश्लेष्ममेदःपवनमाममत्यर्थसंचितम् ।
अभिभूयेतरं दोषमूरू चेत्प्रतिपद्यते ॥ ४८ ॥
सक्थ्यस्थीनि प्रपूर्यांतः श्लेष्मणा स्तिमितेन तत् ।
तदा स्कभ्नाति तेनोरू स्तब्धौ शीतावचेतनौ ॥ ४९ ॥
परकीयाविव गुरू स्यातामतिभृशव्यथौ ।
ध्यानांगमर्दस्तैमित्यतंद्राच्छर्द्यरुचिज्वरैः ॥ ५० ॥
संयुतौ पादसदनकृच्छ्रोद्धरणसुप्तिभिः ।
तमूरुस्तंभमित्याहुराढ्यवातमथापरे ॥ ५१ ॥

कांहीं अन्न जिरलें व कांहीं न जिरलें अशा स्थितींत थंड, उष्ण, पातळ, कोरडे, जड व स्निग्ध पदार्थ सतत सेवन केल्यानें, तसेंच श्रमानें, शरीराचा क्षोभ झाल्यानें, दिवसा निजल्यानें व रात्रीं जागल्यानें अतिशय सांचलेला आम हा कफ, मेद, वायु व पित्त यांचा पराभव करून मांड्यांत जातो आणि मांड्यांतील हाडें आंतून ओलसर व दाट कफानें भरून टाकतो. त्या योगानें मांड्या ताठतात, निश्चल होतात, गार पडतात, बधिर होतात, इतक्या जड होतात कीं, त्या आपल्या मांड्या नसून दुसरा कांहीं बोजा ठेवलेला आहे असें वाटतें, त्यांत अतिशय दुस्सह कळा लागतात, आणि चिंता, अंग मोडणें, जड व ओलसर वाटणें, झांपड, उलटी,

अरुचि, ताप, पाय गळणें, ते उचलण्यास कष्ट पडणें व मेहरी येणें हे विकार होतात. या रोगास कित्येक ग्रंथकार ऊरुस्तम्भ म्हणतात व कोणी आढ्यवातही म्हणतात.

वातशोणितजः शोफो जानुमध्ये महारुजः ।
ज्ञेयः क्रोष्टुकशीर्षश्च स्थूलः क्रोष्टुकशीर्षवत् ॥ ५२ ॥

वात व रक्त यांपासून गुडघ्यावर कोल्ह्याच्या डोक्यासारखी सूज येते व तींत अतिशय काळा लागतात. या विकारास क्रोष्टुकशीर्ष असें म्हणतात.

रुक् पादे विषमन्यस्ते श्रमाद्वा जायते यदा ।
वातेन गुल्फमाश्रित्य तमाहुर्वातकंटकम् ॥ ५३ ॥

उंच-सखल अथवा वांकडा-तिकडा पाय पडून मुरगळल्यामुळें किंवा श्रमामुळें कुपित झालेला वायु घोट्यांत जाऊन तेथें शूळ उत्पन्न करितो, त्यास वातकंटक म्हणतात.

पार्ष्णिं प्रत्यंगुलीनां या कंडरा मारुतार्दिता ।
सक्थ्युत्क्षेपं निगृह्णाति गृध्रसीं तां प्रचक्षते ॥ ५४ ॥

खोंटेकडे जाणारी पायाच्या बोटांची कंडरा वायूनें पीडित झाली असतां मांडी वर उचलवत नाहीं. या विकारास गृध्रसी म्हणतात.

विश्वाची गृध्रसी चोक्ता खल्ली तीव्ररुजान्विता ।

पूर्वीं सांगितलेली विश्वाची व ही गृध्रसी यांत । तीव्र वेदना होत असल्या म्हणजे त्यांस खल्ली असें ह्मणतात.

हृष्येते चरणौ यस्य भवेतां च प्रसुप्तवत् ॥ ५५ ॥
पादहर्षः स विज्ञेयः कफमारुतकोपजः ।

कफवाताच्या कोपानें ज्या विकारांत पाय शिवशिवतात व त्यास मुंग्या येतात, त्यास पादहर्ष असें म्हणतात.

पादयोः कुरुते दाहं पित्तासृक्सहितोऽनिलः ॥ ५६ ॥
विशेषतश्चंक्रमिते पाददाहं तमादिशेत् ।

कुपित वायु पित्त व रक्त यांसह मिळून पायांत दाह उत्पन्न करितो; व तो विशेषतः फार चालल्यानें होतो. त्या विकारास पाददाह म्हणतात.

---

## अध्याय १६ वा.

अथाऽतो वातशोणितनिदानं व्याख्यास्यामः ।

आतां वातरक्ताचें निदान सांगतों.

विदाह्यन्नं विरुद्धं च तत्तच्चासृक्प्रदूषणम् ।
भजतां विधिहीनं च स्वप्नजागरमैथुनम् ॥ १ ॥
प्रायेण सुकुमाराणामचंक्रमणशीलिनाम् ।
अभिघातादशुद्धेश्च नृणामसृजि दूषिते ॥ २ ॥
वातलैः शीतलैर्वायुर्वृद्धः क्रुद्धो विमार्गगः ।
तादृशेनासृजा रुद्धः प्राक्तदेव प्रदूषयेत् ॥ ३ ॥
आढ्यरोगं खुडं वातबलासं वातशोणितम् ।
तदाहुर्नामभिस्तच्च पूर्वं पादौ प्रधावति ॥ ४ ॥
विशेषाद्यानयानाद्यैः प्रलंबौ

विदाही व परस्परविरुद्ध अन्न, तसेंच रक्तास बिघडविणारे इतर पदार्थ सेवन केल्यानें; झोंप, जागरण व स्त्रीसंग हीं नियम सोडून मनास येईल त्या रीतीनें सेवन केल्यानें, आघात झाल्यानें, व मलशुद्धि साफ होत नसल्यानें, बहुतकरून नाजुक व ज्यांस चालण्याची विशेषशी संवय नाहीं अशा मनुष्यांचें रक्त दूषित होतें. तें रक्त वातुळ व थंड पदार्थांच्या सेवनानें वाढून व कुपित होऊन भलभलत्या मार्गानें संचार करणाऱ्या वायूचा अवरोध करितें. त्यामुळें अवरुद्ध वायु प्रथम त्या रक्तासच दूषित करितो. या रोगास आढ्यवात, खुड, वातबलास व वातरक्त अशीं नांवें आहेत. गाडी-घोडा यांतून नेहमीं बसून जाण्यानें पाय विशेषतः लोंबत राहतात, म्हणून हें वातरक्त प्रथम पायांवर होतें.

तस्य लक्षणम् ।

भविष्यतः कुष्ठसमं तथा सादः श्लथांगता ॥ ५ ॥
जानुजंघोरुकट्यंसहस्तपादांगसंधिषु ।
कंडूस्फुरणनिस्तोदभेदगौरवसुप्तताः ॥ ६ ॥
भूत्वा भूत्वा प्रणश्यंति मुहुराविर्भवंति च ।

याचें पूर्वरूप कुष्ठासारखेंच असून शिवाय ग्लानि, अंग शिथिल होणें, गुडघे, पोटऱ्या, मांड्या, कंबर, खांदे, हात, पाय व सांधे

यांत खाज, स्फुरण, टोंचण, फूट, जडत्व व मेहरी हे विकार वरचेवर उद्भवणें व नाहींसे होणें, हीं लक्षणें होतात.

पादयोर्मूलमास्थाय कदाचिद्धस्तयोरपि ॥ ७ ॥
आखोरिव विषं क्रुद्धं कृत्स्नं देहं विधावति ।

हें वातरक्त प्रथम पायांत व कदाचित् हातांतही उत्पन्न होऊन नंतर उंदराच्या कुपित विषाप्रमाणें सर्व शरीरभर पसरतें.

त्वङ्मांसाश्रयमुत्तानं तत्पूर्वं जायते ततः ॥ ८ ॥
कालांतरेण गंभीरं सर्वान् धातूनभिद्रवत् ।

हें प्रथम त्वचा व मांस यांच्या आश्रयानें उत्पन्न होतें, तेव्हां त्यास उत्तान ह्मणतात; आणि तेंच पुढें कांहीं काळानें बाकीच्या सर्व धातूंत पसरलें म्हणजे त्यास गंभीर ह्मणतात.

कंड्वादिसंयुतोत्ताने त्वक्ताम्रश्यावलोहिता ॥ ९ ॥
सायामा भृशदाहोषा

उत्तान वातरक्तांत त्वचेंत कंडू, स्फुरण वगैरे विकार असून ती तांबुस, काळसर व लाल असते; ती ताणते आणि तींत फारच दाह व चुरचुर होते.

गंभीरेऽधिकपूर्वरुक् ।
श्वयथुर्ग्रथितः पाकी वायुः संध्यस्थिमज्जसु ॥ १० ॥
छिंदन्निव चरत्यंतर्वक्रीकुर्वंश्च वेगवान् ।
करोति खंजं पंगुं वा शरीरे सर्वतश्चरन् ॥ ११ ॥

गंभीरांत सूज येते, तींत आरंभीं अतिशय ठणका लागतो व ती गांठाळलेली असून पिकते. वायु जोरानें सांधे, हाडें व मज्जा यांस कापल्याप्रमाणें पीडा करीत फिरतो; व सर्व शरीरांत फिरून त्यास वांकवून रोग्यास लंगडा किंवा पांगळा करितो.

वातेऽधिकेऽधिकं तत्र शूलस्फुरणतोदनम् ।
शोफस्य रौक्ष्यकृष्णत्वश्यावतावृद्धिहानयः ॥ १२ ॥
धमन्यंगुलिसंधीनां संकोचोंऽगग्रहोऽतिरुक् ।
शीतद्वेषानुपशयौ स्तंभवेपथुसुप्तयः ॥ १३ ॥

वाताधिक वातरक्तांत शूळ, स्फुरण, टोंचण हे विकार असून सूज रूक्ष, काळी व धूसर रंगाची असते आणि ती वाढते व कमी

होते. धमन्या व बोटांचे सांधे आंखडतात, अंग जखडतें, अतिशय ठणकतें, थंड पदार्थांचा तिटकारा येतो व थंड पदार्थांपासून गुण येत नाहीं, अंग ताठतें, कांपतें व मेहरी येते.

रक्ते शोफोऽतिरुक् तोदस्ताम्रश्चिमिचिमायते ।
स्निग्धरूक्षैः शमं नैति कंडूक्लेदसमन्वितः ॥ १४ ॥

रक्ताधिक वातरक्तांत सूज तांबुस रंगाची असून तींत ठणका व टोंचण अतिशय असते, चुणचुण होते, खाज सुटते, लस येते; आणि स्निग्ध किंवा रूक्ष पदार्थांनीं वातरक्त बरें होत नाहीं.

पित्ते विदाहः संमोहः स्वेदो मूर्च्छा मदः सतृट् ।
स्पर्शाक्षमत्वं रुग्रागः शोफपाकौ भृशोष्मता ॥ १५ ॥

पित्ताधिक वातरक्तांत विदाह, मोह, घाम, मूर्च्छा, मद, तहान, स्पर्श सहन न होणें, ठणका, लाली, सूज, पाक व अतिशय कढतपणा हीं लक्षणें होतात.

कफे स्तैमित्यगुरुतासुप्तिस्निग्धत्वशीतताः ।
कंडूर्मंदा च रुग्

कफाधिक वातरक्तांत ओलसरपणा वाटणें, जडपणा, मेहरी, चिकटपणा, थंडपणा, खाज आणि किंचित् ठणका हीं लक्षणें होतात.

द्वंद्वसर्वलिंगं च संकरे ॥ १६ ॥

द्वन्द्वज वातरक्तांत दोन दोषांचीं मिश्र लक्षणें आणि सान्निपातिकांत सर्व लक्षणें होतात.

एकदोषानुगं साध्यं नवं याप्यं द्विदोषम् ।
त्रिदोषजं त्यजेत्स्रावि स्तब्धमर्बुदकारि च ॥ १७ ॥

एक दोषापासून झालेलें व नवीन वातरक्त सुसाध्य असतें, द्विदोषज याप्य असतें; आणि त्रिदोषजन्य, तसेंच ज्यांतून स्राव होतो व ज्याच्यावर गांठी आलेल्या असतात, तें असाध्य समजून सोडून द्यावें.

रक्तमार्गं विहंत्याशु शाखासंधिषु मारुतः ।
निविश्यान्योन्यमावार्य वेदनाभिर्हरत्यसून् ॥ १८ ॥

वायु हातापायांच्या सांध्यांत शिरून त्वरित रक्तमार्ग बंद करितो. नंतर रक्त व वात हे एकमेकांत घुसून परस्परांस आच्छादित करून वातरक्तोचित वेदनांनीं रोग्याचे प्राण घेतात.

वायौ पंचात्मके प्राणो रौक्ष्यव्यायामलंघनैः ।
अत्याहाराभिघाताध्ववेगोदीरणधारणैः ॥ १९ ॥
कुपितश्चक्षुरादीनामुपघातं प्रवर्तयेत् ।
पीनसार्दिततृट्कासश्वासादींश्चामयान्बहून् ॥ २० ॥

शरीरांतील पांच प्रकारच्या वायूंपैकीं प्राणवायु रूक्षता, व्यायाम, उपास, फार खाणें, आघात, मार्ग चालणें, मळमूत्रादिक बळेंच प्रवृत्त करणें किंवा आवरून धरणें, या कारणांनीं कुपित होऊन डोळे वगैरे इन्द्रियांस इजा करितो; आणि पडसें, अर्दित, तहान, खोकला, दमा, वगैरे पुष्कळ विकार उत्पन्न करितो.

उदानः क्षवथूद्गारच्छर्दिनिद्राविधारणैः ।
गुरुभारातिरुदितहास्याद्यैर्विकृतो गदान् ॥ २१ ॥
कंठरोधमनोभ्रंशच्छर्द्यरोचकपीनसान् ।
कुर्याच्च गलगंडादींस्तांस्तान् जत्रूर्ध्वसंश्रयान् ॥ २२ ॥

शिंक, ढेंकर, वांति व झोंप हीं थांबवून धरल्यानें, तसेंच जड ओझें वाहणें, फार रडणें व हंसणें इत्यादि कारणांनीं उदान वायु कुपित होऊन घसा कोंडणें, उन्माद, वांति, अरुचि, पडसें, तसेंच गलगण्ड वगैरे सरीच्या वरच्या भागीं होणारे अनेक प्रकारचे रोग उत्पन्न करितो.

व्यानोऽतिगमनध्यानक्रीडाविषमचेष्टितैः ।
विरोधिरूक्षभीहर्षविषादाद्यैश्च दूषितः ॥ २३ ॥
पुंस्त्वोत्साहबलभ्रंशशोफचित्तोत्प्लवज्वरान् ।
सर्वांगरोगनिस्तोदरोमहर्षांगसुप्तताः ॥ २४ ॥
कुष्ठं विसर्पमन्यांश्च कुर्यात्सर्वांगगान् गदान् ।

अतिशय चालणें, चिंता, खेळ, शरीराच्या वेड्या-वांकड्या चेष्टा, परस्परविरुद्ध व रूक्ष आहार व हर्ष, शोक, इत्यादि कारणांनीं व्यान वायु दूषित होऊन पुरुषत्व, उत्साह व शक्ति यांचा

नाश, सूज, उन्माद, ताप, सर्वांगरोग, टोंचण, अंगावर शहारे येणें, अंगास मेहरी येणें, कुष्ठ, विसर्प व इतर सर्वांगरोग उत्पन्न करितो.

समानो विषमाजीर्णशीतसंकीर्णभोजनैः ॥ २५ ॥
करोत्यकालशयनजागराद्यैश्च दूषितः ।
शूलगुल्मग्रहण्यादीन् पक्वामाशयजान् गदान् ॥ २६ ॥

विषम भोजन, अजीर्णावर जेवणें, थंड पदार्थ खाणें, बरें वाईट अन्न एकत्र मिळवून खाणें, अवेळीं निजणें व जागणें इत्यादि कारणांनीं समान वायु दूषित होऊन पक्वाशय व आमाशय यांत होणारे पोटशूळ, गुल्म, संग्रहणी वगैरे रोग उत्पन्न करितो.

अपानो रूक्षगुर्वन्नवेगघातातिवाहनैः ।
यानयानासनस्थानचंक्रमैश्चातिसेवितैः ॥ २७ ॥
कुपितः कुरुते रोगान् कृच्छ्रान् पक्वाशयाश्रयान् ।
मूत्रशुक्रप्रदोषार्शोगुदभ्रंशादिकान्बहून् ॥ २८ ॥

रूक्ष व जड अन्न, मळमूत्रादिक थांबविणें, शौचाचे वेळीं अतिशय कुंथणें, गाडी-घोड्यांवरून फिरणें, एकेजागीं फार वेळ बसून राहणें, फार वेळ उभें राहणें व अतिशय फिरणें या कारणांनीं अपान वायु कुपित होऊन पक्वाशयाच्या आश्रयानें होणारे मूत्ररोग, शुक्ररोग, मूळव्याध, गुद बाहेर येणें इत्यादि कष्टसाध्य रोग उत्पन्न करितो.

सर्वं च मारुतं सामं तंद्रास्तैमित्यगौरवैः ।
स्निग्धत्वारोचकालस्यशैत्यशोफाग्निहानिभिः ॥ २९ ॥
कटुरूक्षाभिलाषेण तद्विधोपशयेन च ।
युक्तं विद्यान्निरामं तु तंद्रादीनां विपर्ययात् ॥ ३० ॥

कोणताही वायु आमयुक्त असतां झांपड, अंग ओलसर भासणें, जडपणा, स्निग्धता, अरुचि, आळस, थंडी, सूज, अग्निमांद्य, तिखट व रूक्ष पदार्थांची इच्छा होणें व तशा पदार्थांनीं बरें वाटणें हीं लक्षणें होतात. आणि याच्या उलट लक्षणें असल्यास तो निराम आहे असें जाणावें.

वायोरावरणं चातो बहुभेदं प्रवक्ष्यते ।

आतां वायूचीं पुष्कळ प्रकारचीं आवरणें सांगतों.

लिंगं पित्तावृते दाहस्तृष्णा शूलं भ्रमस्तमः ॥ ३१ ॥
कट्वोष्णाम्ललवणैर्विदाहः शीतकामता ।

पित्तानें वायूचें आवरण केलें असतां दाह, तहान, शूळ, भ्रम, डोळ्यापुढें अंधेरी येणें, तिखट, उष्ण, आंबट व खारट पदार्थांनीं पोटांत जळजळणें, व थंड पदार्थांवर वासना जाणें, हीं लक्षणें होतात.

शैत्यगौरवशूलानि कट्वाद्युपशयोऽधिकम् ॥ ३२ ॥
लंघनायासरूक्षोष्णकामता च कफावृते ।

कफानें वायूचें आवरण केलें असतां थंडी, अंग जड होणें, शूळ, वर सांगितलेल्या तिखट वगैरे पदार्थांपासून सुख वाटणें, आणि लंघन, श्रम, रूक्ष व उष्ण पदार्थ यांची इच्छा, हीं लक्षणें होतात.

रक्तावृते सदाहार्तिस्त्वङ्मांसांतरजा भृशम् ॥ ३३ ॥
भवेच्च रागी श्वयथुर्जायंते मंडलानि च ।

रक्तानें वायूचें आवरण केलें असतां त्वचा व मांस यांच्या मध्यभागीं अतिशय दाह व पीडा होते, सूज लाल असते व मंडलें उत्पन्न होतात.

मांसेन कठिनः शोफो विवर्णः पिटिकास्तथा ॥ ३४ ॥
हर्षः पिपीलिकानां च संसार इव जायते ।

मांसानें वायूचें आवरण झालें असतां कठिण व चामडीहून निराळ्या रंगाची सूज, पुळ्या, अंगावर कांटा व मुंग्या चालल्याप्रमाणें वाटणें, हीं लक्षणें होतात.

चलः स्निग्धो मृदुः शीतः शोफो गात्रेष्वरोचकः ॥ ३५ ॥
आढ्यवात इति ज्ञेयः स कृच्छ्रो मेदसाऽवृते ।

वायु मेदानें आवृत झाला असतां अंगास चंचल, स्निग्ध, मऊ व थंड अशी सूज येते आणि तोंडाची रुचि नाहींशी होते. या रोगास आढ्यवात ह्मणतात. हा कष्टसाध्य आहे.

स्पर्शमस्थ्यावृतेऽत्युष्णं पीडनं चाभिनंदति ॥ ३६ ॥
सूच्येव तुद्यतेऽत्यर्थमंगं सीदति शूल्यते ।

हाडांनीं वायूस आवरण केलें असतां अंगास अतिशय उष्ण स्पर्श आवडतो व तें दाबावेंसें वाटतें, सर्वांग सुईनें टोंचल्यासारखें अतिशय दुखतें, गळल्यासारखें वाटतें व ठणकतें.

मज्जावृते विनमनं जृंभणं परिवेष्टनम् ॥ ३७ ॥
शूलं च पीड्यमानेन पाणिभ्यां लभते सुखम् ।

मज्जेनें वायु आवृत झाला असतां अंग वांकतें, जांभया येतात, अंग पिळवटल्याप्रमाणें होतें; त्यांत शूळ होतो. आणि तें हातांनीं दाबलें असतां बरें वाटतें.

शुक्रावृतेऽतिवेगो वा न वा निष्फलताऽपि वा ॥ ३८ ॥

वीर्यानें वायु आवृत झाला असतां वीर्याचा अतिशय वेग येतो, मुळींच येत नाहीं किंवा त्यापासून गर्भ रहात नाहीं.

भुक्ते कुक्षौ रुजा जीर्णे शाम्यत्यन्नावृतेऽनिले ।

वायु अन्नानें आवृत झाला असतां जेवल्यावर पोटांत दुखूं लागतें व जिरल्यावर थांबतें.

मूत्राप्रवृत्तिराध्मानं बस्तौ मूत्रावृते भवेत् ॥ ३९ ॥

वायु मूत्रानें आवृत झाला असतां लघ्वी होत नाहीं व बस्ति फुगतो.

विडावृते विबंधोऽधः स्वस्थाने परिकृंतति ।
व्रजत्याशु जरां स्नेहो भुक्ते चानह्यते नरः ॥ ४० ॥
शकृत्पीडितमन्नेन दुःखं शुष्कं चिरात्सृजेत् ।

मळानें वायु आवृत झाला असतां अधोवायूचा अवरोध होतो, गुदांत कातरल्यासारखी पीडा होते, तूप वगैरे स्निग्ध पदार्थ लवकर पचतात, जेवल्यावर पोट फुगतें, आणि अन्नाचा मळावर दाब बसून कष्टानें व फार वेळानें कोरडा मळ पडतो.

सर्वधात्वावृते वायौ श्रोणीवंक्षणपृष्ठरुक् ॥ ४१ ॥
विलोमो मारुतो स्वस्थं हृदयं पीड्यतेऽपि च ।

सर्व धातूंनीं वायु आवृत झाला असतां कंबर, जांघाडे व पाठ यांत पीडा होते, वायूची गति उलटी फिरते, मन अस्वस्थ होतें व हृदयांत अतिशय पीडा होते.

भ्रमो मूर्च्छा रुजा दाहः पित्तेन प्राण आवृते ॥ ४२ ॥
विदग्धेऽन्ने च वमनम्

पित्तानें प्राणवायूचें आवरण झालें असतां भ्रम, मूर्च्छा, पीडा व दाह हे विकार होतात, आणि अन्नाचा विदाह होऊन वांति होते.

उदानेऽपि भ्रमादयः ।
दाहोऽन्तरूर्जाभ्रंशश्च

पित्तानें उदान वायूचें आवरण झालें असतां वरील भ्रमादिक विकार होऊन शिवाय अन्तर्दाह व शक्तिपात होतो.

दाहो व्याने च सर्वगः ॥ ४३ ॥
क्लमोऽगचेष्टासंगश्च ससंतापः सवेदनः ।

पित्तानें व्यानवायु आवृत झाला असतां सर्वांगांत अन्तर्बाह्य दाह होतो, ग्लानि येते, हातापायाच्या क्रिया बंद होतात, अंग तापतें व वेदना होतात.

समान ऊष्मोपहतिरतिस्वेदोऽरतिः सतृट् ॥ ४४ ॥

पित्तानें समान वायूचें आवरण झालें असतां अग्नि मन्द होतो, अतिशय घाम येतो, चैन पडत नाहीं, तहान लागते व दाह होतो.

दाहश्च स्यादपाने तु मले हारिद्रवर्णता ।
रुजोऽतिवृद्धिस्तापश्च योनिमेहनपायुषु ॥ ४५ ॥

अपान वायु पित्तानें आवृत झाला असतां परसाकडस पिंवळ्या रंगाचें होतें; योनि, शिस्न व गुद यांत अतिशय वेदना होतात व तप्तता असते.

श्लेष्मणा त्वावृते प्राणे सादस्तंद्रारुचिर्वमिः ।
ष्ठीवनक्षवथूद्गारनिःश्वासोच्छ्वाससंग्रहाः ॥ ४६ ॥

कफानें प्राणवायूचें आवरण झालें असतां अंगग्लानि, झांपड, अरुचि, वांति, वरचेवर थुंकणें, शिंका, ढेंकर, आणि श्वासोच्छ्वासाचा अवरोध, हीं लक्षणें होतात.

उदाने गुरुगात्रत्वमरुचिर्वाक्स्वरग्रहः ।
बलवर्णप्रणाशश्च

कफानें उदान वायु आवृत झाला असतां अंग जड
अरुचि, वाचा धरणें, आवाज बसणें, शक्ति क्षीण होणें व
पणा येणें, हीं लक्षणें होतात.

व्याने पर्वास्थिवाग्ग्रहः ॥ ४७ ॥
गुरुतांऽगेषु सर्वेषु स्खलितं च गतौ भृशम् ।

कफानें व्यान वायु आवृत झाला असतां सांधे व हाडें
वाचा धरते, सर्वांग जड होतें, व चालतांना अतिशय आड

समानेऽतिहिमांगत्वमस्वेदो मंदवह्निता ॥ ४८ ॥

कफानें समान वायु आवृत झाला असतां अंग अतिश
होतें, घाम येत नाहीं व अग्नि मंद होतो.

अपाने सकफं मूत्रशकृतः स्यात्प्रवर्तनम् ।

कफानें अपान वायूचें आवरण झालें असतां लघ्वींतून
बरोबर कफ पडतो.

इति द्वाविंशतिविधं वायोरावरणं विदुः ॥ ४९ ॥

याप्रमाणें हीं बावीस प्रकारचीं वायूचीं आवरणें आहेत.

प्राणादयस्तथाऽन्योन्यमावृण्वन्ति यथाक्रमम् ।
सर्वेऽपि विंशतिविधं विद्यादावरणं च तत् ॥ ५०

त्याचप्रमाणें प्राणादि पंच वायु अनुक्रमानें एकमेकांस
करितात; त्या आवरणांचे वीस प्रकार होतात.

निःश्वासोच्छ्वाससंरोधः प्रतिश्यायः शिरोग्रहः ।
हृद्रोगो मुखशोषश्च प्राणेनोदान आवृते ॥ ५१ ॥

प्राणवायूनें उदानाचें आवरण झालें असतां श्वासोच्छ्वास
चालतो, पडसें होतें, डोकें धरतें, हृद्रोग होतात व तोंड
पडते.

---

१ प्राण हा उदान, व्यान, समान व अपान या चोहोंस आवृत क
चार प्राणास आवृत करितात. उदान हा व्यान, समान, व अपान या ति
करितो व हे तीन उदानास आवृत करितात. व्यान हा समान व अपान
करितो व समान व अपान हे व्यानास आवृत करितात. आणि समा
व अपान समानास आवृत करितो.

उदानेनावृते प्राणे वर्णौजोबलसंक्षयः ।

उदानानें प्राणाचें आवरण झालें असतां कांति, शक्ति व ओज यांचा क्षय होतो.

दिशाऽनया च विभजेत्सर्वमावरणं भिषक् ॥ ५२ ॥
स्थानान्यावेक्ष्य वातानां वृद्धिं हानिं च कर्मणाम् ।

याच पद्धतीस अनुसरून, वाताचीं स्थानें व त्याच्या क्रियांचे वृद्धि-क्षय यांचा विचार करून त्यांवरून वैद्यानें सर्व प्रकारचीं आवरणें समजून घ्यावीं.

प्राणादीनां च पंचानां मिश्रमावरणं मिथः ॥ ५३ ॥
पित्तादिभिर्द्वादशाभिर्मिश्राणां मिश्रितैश्च तैः ।
मिश्रैः पित्तादिभिस्तद्वन्मिश्रणाभिरनेकधा ॥ ५४ ॥
तारतम्यविकल्पाच्च यात्यावृत्तिरसंख्यताम् ।
तां लक्षयेदवहितो यथास्वं लक्षणोदयात् ॥ ५५ ॥
शनैः शनैश्चोपशयाद्गूढामपि मुहुर्मुहुः ।

प्राणादि पांच वायूंस त्यांचें एकमेकांचेंच मिश्र आवरण, पित्तापासून धातूपर्यंत वर सांगितलेल्या बारा पदार्थांचें परस्परमिश्र आवरण, परस्परमिश्रित अपानादिकांचें व पित्तादिकांचें आवरण, प्राणादिमिश्रित पित्तादिकांचें आवरण व त्या मिश्रणाचा कमीजास्तपणा या सर्वांचा विचार केला असतां हीं आवरणें असंख्य होतात. जरी हे इतके आवरणप्रकार फार गूढ आहेत, तरी ते प्राणादिकांच्या निरनिराळ्या लक्षणोत्पत्तीवरून आणि हळूहळू उपशयावरून वरचेवर लक्ष्य देऊन ओळखावे.

विशेषाज्जीवितं प्राण उदानो बलमुच्यते ॥ ५६ ॥
स्यात्तयोः पीडनाद्धानिरायुषश्च बलस्य च ।

जरी प्राणादिक सर्वच प्रकारच्या वायूंवर मनुष्याचें जीवित सर्वस्वीं अवलंबून आहे, तरी पण त्यांतल्या त्यांत प्राणवायूवर जीविताचा व उदानावर शक्तीचा मुख्य आधार आहे. यामुळें या दोन वायूंस पीडा झाली असतां अनुक्रमें आयुष्य व शक्ति यांची हानि होते.

आवृता वायवोऽज्ञाता ज्ञाता वा वत्सरं स्थिताः ॥ ५७ ॥
प्रयत्नेनापि दुःसाध्या भवेयुर्वानुपक्रमाः ।

वायूचीं आवरणें न समजल्यामुळें किंवा समजूनही हयगयीमुळें त्यांस एक वर्ष होऊन गेलें असतां ते प्रयत्नानें देखील दुस्साध्य किंवा असाध्यही होतात.

विद्रधिप्लीहहृद्रोगगुल्माग्निसदनादयः ।
भवंत्युपद्रवास्तेषामावृतानामुपेक्षणात् ॥ ५८ ॥

आवृत वायूंची उपेक्षा केल्यानें विद्रधि, प्लीहा, हृद्रोग, गुल्म व अग्निमान्द्य वगैरे रोग उत्पन्न होतात.

इति श्रीसिंहगुप्तसूनुवाग्भटविरचितायामष्टांगहृदय-
संहितायां तृतीयं निदानस्थानं समाप्तम् ।

निदानस्थान समाप्त.

भाग १ ला समाप्त.